# चिकित्साब्धि.

एक विस्तृत आर्य वैद्यक ग्रंथ.


कर्त्ता

वैद्यशास्त्री मणिशंकर गोविंदजी.

मुक्ता, आर्यानार्य औषध, पांडव-कौरव, राम-रावण,
पांडवाश्वमेध, श्रीकृष्णचरित्र इत्यादि प्रसिद्ध
व लोकप्रिय ग्रंथांचा कर्त्ता.

जामनगर—काठेवाड.





मुंबई :
फोर्ट प्रिंटिंग प्रेस.

१९०२.

किंमत रुपये तीन.

# अर्पणपत्रिका.

ज्येष्ठबंधु

**शास्त्री कालीदास गोविंदजी,**

ज्यांनीं,

मातापितर स्वर्गस्थ झाल्या वेळेपासून, बाल्यावस्थेंत मला
विद्याभ्यास करविण्यांत तन-मन-धनेंकरून श्रम केले,
आणि त्यांच्या प्रसादानेंच बुद्धि व कर्म यास
अनुसरून, जें थोडेंबहुत ज्ञान मी मिळविलें
व द्रव्य मिळवितां आलें, यांस,

**हा ग्रंथ,**

प्रेमळ भावाच्या स्मरणार्थ, अत्यंत नम्रतापूर्वक अर्पण केला
आहे. तो त्यांच्या श्रमाचा मोबदला म्हणून न
समजतां, त्यांनीं स्वीकारावा अशी
यांस माझी विनंति आहे.

त्यांचा कनिष्ठबंधु

**वैद्यशास्त्री मणिशंकर गोविंदजी.**

# सूचना.



या ग्रंथांत दिलेले औषधप्रयोग करते वेळीं खालीं सांगीतलेल्या गोष्टी नीट लक्षांत ठेवाव्या.

वावडिंग, पिंपळी, गूळ, धणे, तूप, व मध हे पदार्थ जितके जुने तितके उत्तम. याशिवाय बाकी सर्व पदार्थ नवेच असावे. सुकलेल्या औषधांच्या ऐवजीं ओलीं औषधें घेणें असेल तर तीं सांगीतलेल्या वजनाच्या दुप्पटीनें घ्यावीं. परंतु गुळवेल, कुड्याची साल, अडुळसा, कोहळा, शतावरी, आसंध, बडीशेप व चांदवेल हीं औषधें, मिळतील तोंवर, ओलींच घ्यावीं. आणि अशीं घेतल्यावर देखील सांगीतलेल्या वजनाहून दुप्पट घेऊं नयेत. ज्या ठिकाणीं औषधींची साल किंवा पानें घ्यावीं असें स्पष्टपणें सांगीतलें नसेल, त्या ठिकाणीं त्या औषधींचें मूळ घ्यावें. परंतु वड, आंबा, पिंपळी वगैरे औषधींची तर सालच घ्यावी. तमाल वगैरे औषधींचीं पानें घ्यावीं. आणि धावणीचीं वगैरे फुलें घ्यावीं. जेव्हां कोणताही प्रयोग करते वेळीं, पदार्थांचें वजन दिलें नसेल, तेव्हां ते पदार्थ समभाग घ्यावे. त्याच प्रमाणें प्रयोग करण्याला लागणारीं भांडीं अमुक धातुचीं वगैरे असावीं, असा उल्लेख केलेला नसेल, तेव्हां तीं मातीचीं घ्यावीं असें समजावें.

चूर्ण एक महिन्यानंतर, तूप, तेल हीं चार महिन्यांनंतर, आणि गोळ्या, अवलेह हीं वर्षानंतर गुणानें हीन होतात. परंतु आसव, भस्में, व रस हीं जसजशीं जुनीं होतात तसतशीं तीं विशेष गुणावह होत जातात. 'आसव, चूर्ण, तूप, तेल, गोळ्या, व अवलेह

हीं वर लिहिल्या मुदतीनंतरचीं सेवन करूं नयेत; आणि आमवादिक मिळतील तोंवर नुनींच मिळवून सेवन करावीं.

या ग्रंथांत औषधांची मात्रा ( प्रमाण ), बहुत करून, वैद्यक ग्रंथांत सांगीतली आहे, तिच्या आधारें दिलेली आहे. ही मात्रा सर्वांत जेवढी अधिक देतां येईल तेवढी येथें सांगीतली आहे. यास्तव, वैद्यांनीं रुग्ण मनुष्याला समक्ष पाहून, व त्याचें वय, त्याचा जठराग्नि, बळ, प्रकृति, दोष व देश या सर्वांचा विचार करून, कोणतें औषध किती प्रमाणानें द्यावें हें निश्चित करावें हें बरें.

हा ग्रंथ मूळ गुजराथी भाषेंत प्रथम तयार केला; आणि गुजराथीवरून आतां मराठी भाषेंत आणला आहे. या ग्रंथाचें ज्या भाषेंत भाषांतर करावयाचें, त्या मराठी भाषेंत भाषांतरकार रा. खंडेराव भिकाजी बेलसरे हे ग्रंथकार ह्मणून प्रसिद्ध आहेत; आणि गुजराथी भाषेशींही त्यांचा चांगला परिचय आहे. यास्तव, हा मराठी चिकित्साग्रंथ, इतर कोणाच्या हातून निघाला असता, त्याहून पुष्कळच चांगला तयार झाला आहे असें मानण्यास जागा आहे. आतां, वैद्यकशास्त्र परम गहन; व त्यांत रा. बेलसरे यांची गति जरी कांहीं झाली असली तरी ती मर्यादितच असण्याचा संभव असल्या कारणानें, प्रकृत भाषांतरांत कित्येक दोषस्थळें, नजर चुकीनें, राहून गेलीं असल्यास नवल नाहीं. तथापि अशीं दोषस्थळें बहुशः फारशीं आढळणार नाहींत; व आढळल्यास, तींही क्षुल्लक व उपेक्षणीय अशींच असतील, अशी माझी अटकळ आहे. कोंकीं हें भाषांतर मूळाशीं ताडून पाहून, जे फेरफार करणें योग्य वाटले, ते शुद्धिपत्रकांत दाखल केले आहेत. यामुळें शुद्धिपत्रक अंमळ लांबलचक झालें आहे खरें; तरी त्याबद्दल विषाद

मानण्याचें कारण नाहीं. वाचकांनीं मात्र ग्रंथास आरंभ करते वेळीं, अगोदर या शुद्धिपत्रकाप्रमाणें मूळ ग्रंथ शुद्ध करून घ्यावा; ह्मणजे वरील आक्षेपास स्थळ उरणार नाहीं. याप्रमाणें प्रस्तुत ग्रंथ लोकादरास पात्र करण्याकरतां जेवढी दक्षता ठेवणें शक्य होतें, तेवढी ठेवली आहे. तरी "मानवी कृति नेहमी अधिक उण्या दोषास पात्र असावयाचीच" या सामान्य नियमास अनुसरून, जे दोष या ग्रंथांत आढळतील, त्यांकडे लक्ष न देतां, त्यांतील गुणांशाकडे व त्याच्या उपयोगित्वाकडेसच मुख्यत्वें लक्ष देण्याविषयीं वाचकांस विनयपूर्वक विनंति करतों. व जे दोष कोणास आढळतील ते त्यांनीं आमचेकडे लिहून पाठविल्यास, त्यांचा उपकारपूर्वक स्वीकार करून, पुढील आवृत्तीचे वेळीं त्यांचा अवश्य विचार करूं असें अभिवचन देऊन पुरें करतों.

वैद्यशास्त्री मणिशंकर गोविंदजी.

# प्रस्तावना.



या पृथ्वीच्या पाठीवर ज्या अनेक प्रजा वास करतात, त्यांची आणि शास्त्रांची व त्यांतून उत्पन्न झालेल्या अनेक धर्मांचीं मूलतत्वें, थोड्याफार अंशानें, भिन्न भिन्न आहेत, असें आढळतें. प्रत्येक प्रजेचा वेगवेगळा व्यवहार, आचारविचार आणि रीतरिवाज चालत आलेला आहे. याप्रमाणें प्रत्येक बाबतींत थोडीफार भिन्नता असतांही, सर्व देशच्या मनुष्यांचे दैहिक धर्म, नैसर्गिक समदृष्टि-मंडित रचनेवर सर्वस्वीं अवलंबून असल्यामुळें, हे दैहिक धर्म सर्वत्र एकसारखेच आहेत. सृष्टिदेवीनें मनुष्यमात्रास लागणाऱ्या गरजा एकसारख्या रीतीनें पुरविल्या आहेत. आहार, निद्रा, भय, मैथुन, या क्रिया सर्व प्राण्यांस सामान्य आहेत. त्याचप्रमाणें क्षुधा, तृषा, मळ आणि मूत्र हे विधि देखील सृष्टिकृत, निरंतर आणि नियमित पद्धतीनें, सर्व काळ सर्व देशच्या प्रजांमध्यें, सामान्यत्वें करूनै, चालत आले आहेत. जागृत, स्वप्न इत्यादि अनेक अवस्था, आणि आधि-व्याधि इत्यादि शारीरिक व मानसिक सुखदुःखें, मनुष्यांस लागलेलींच आहेत. यावरून असें सिद्ध होतें, कीं सर्व मनुष्यांचे दैहिक धर्म एकच असून, या धर्मांवरच सर्व प्रकारचे त्यांचे बाह्य व्यवहार अवलंबून आहेत. यास्तव या दैहिक धर्मांच्या नियमांचें शास्त्र ह्मणजे आयुर्वेद किंवा आर्यवैद्यक शास्त्र असें पर्यायानें ज्यास ह्मणतात, तें सर्वोपयोगी व सर्वमान्य असें स्वतंत्र शास्त्र आहे. हें शास्त्र सर्व देशच्या लोकांनीं मानण्यालायक व त्यांतील नियम पाळण्यालायक असल्यामुळें या शास्त्राचें महत्व किती आहे, हें या ठिकाणीं विशेष फोडून सांगणें नलगे.

भिन्न भिन्न हवापाण्यांत उत्पन्न झालेल्या मनुष्यांच्या शरीराची रचना निरनिराळी असते, आणि त्यांच्या प्रकृति वेगवेगळ्या असतात. या प्रकृतीस व रचनेस अनुसरूनच आहारविहाराची सामग्री परमेश्वरानें त्यांस पुरविली असते.. याच आहारविहाराच्या हीन योगानें, मिथ्या योगानें आणि अतियोगानें, आरोग्यशास्त्राचे नियम न जाणणारे लोक शारीरिक आणि मानसिक व्याधींस पात्र होतात. यास्तव प्रथमच आहारविहारांचा हीनयोग, मिथ्यायोग व अतियोग होऊं नये म्हणून ज्ञानी जनांनीं पृथ्वीवरील वेगवेगळ्या प्रदेशाच्या हवापाण्यास अनुसरून जीवितरक्षणाचे वेगवेगळे अगत्याचे नियम बांधून दिले आहेत. त्याचप्रमाणें या नियमांचें उल्लंघन झालें असतां, जे अपाय होतील त्यांवर उपाय करतां यावे म्हणून त्या त्या देशांत उत्पन्न होणाऱ्या अनेक औषधि शोधून काढल्या आहेत. याप्रमाणें, जेथें मूळ देखील नव्हतें तेथें अगदीं नवीनच शोध करणारे महात्मे पुरुष उत्पन्न झाले व त्यांनीं पुढील पिढीच्या मनुष्यजातीवर अगणित उपकार करून ठेवले.

जगांतील कित्येक राष्ट्रांच्या इतिहासांत विद्वानांनीं असा एक विचार प्रगट केल्याचें आढळतें, कीं पृथ्वीच्या पाठीवर मनुष्याची उत्पत्ति करतांना, ईश्वरानें पहिल्यानें एकच जोडा उत्पन्न केला. अशाविषयीं प्रत्यक्ष वेदांतही वचनें आहेत. आतां खरा प्रकार कांहींही असो, तथापि असें अनुमान करण्यास चिंता नाहीं कीं पृथ्वीवर मनुष्योत्पत्तीच्या आदिकाळांत वस्ती फारच थोडी होती. त्या वेळीं मनुष्यांस व्यवहारांत पहिल्या पहिल्यानें ज्या अडचणी आल्या असतील, त्या पुरुषत्वें करून शारीरव्यवहारासंबंधीच आल्या असतील, यांत कांहीं शंका नाहीं. अगदीं 'पहिल्या जोडप्यापासून तों त्याच्यापासून वृद्धि पावलेल्या आजपर्यंतच्या असंख्य संततीची परंपरा तपासून पाहिली असतां, ज्याला शारीरिक आणि

मानसिक पीडा एक वेळ तरी भोगावी लागली नाहीं, अशा मनुष्याचें उदाहरण क्वचितच सांपडेल. यावरून स्पष्ट होतें कीं मनुष्यांच्या मनांत दुसऱ्या कोणत्याही धर्माचा किंवा व्यवहाराचा उदय होण्यापूर्वी पहिल्यानें शरीरसंरक्षणाचे विचार स्फुरण पावले असतील. अर्थात, ही वस्तु हितकारक अतएव ग्राह्य आणि ही अहितकारक अतएव अग्राह्य, अमुक केलें असतां सुख होतें आणि अमुक केलें असतां दुःख होतें, इत्यादि विचार मनुष्यांच्या मनांत अगोदर आले असावे. याप्रमाणें आपल्या दीर्घकाळच्या अनुभवावरून शरीरसंरक्षणाचे जे नियम मनुष्यांनीं टिपून ठेवले, तेच वैद्यकशास्त्र या नांवानें प्रसिद्ध आहेत.

काळ जसजसा जुनाट होत जातो, तसतसा मनुष्याचा अनुभव रूढ होऊन तो स्थापित होतो, व त्यावरून कांहीं चांगले चांगले संगतवार सिद्धांतही सिद्ध करतां येतात, असें आपणास अनुभवावरून कळतें. परंतु हा नियम या आपल्या आर्यावर्त देशाच्यासंबंधानें खरा आहेसें दिसत नाहीं. जें राष्ट्र इतर राष्ट्रांच्या पायीं तुडविलें गेल्यामुळें जेथें सर्वच कांहीं आंवळलेलें व उदासीन आहे, तेथची स्थिति कोणत्याही फेरफारांनीं सुधारण्या ऐवजीं तिचा विचका मात्र होण्याचा संभव आहे, आणि ते फेरफार हितकारक न होतां त्यांचे परिणामही अहितकारकच निदर्शनास येतात. दुर्भागी हिंदुस्थानदेशाची कहाणीही अशीच आहे: येथील लोकांनीं आधुनिक काळांत अमुक प्रकारचा नवीन अनुभव संपादन करून अमुक बाबतींत आपली सुधारणा केली असें दिसत नाहीं. यास्तव आर्य लोकांनीं प्राचीन काळीं केलेल्या सुधारणा आणि शोधून काढलेल्या कला, विद्या, आणि कौशल्यें यांचा सांप्रत आधार धरून, त्या त्या शास्त्रांत दर्शविलेल्या मार्गानें जाण्यांतच आपलें हित आहे. त्यांचा अविश्वास धरून, एखाद्या नव्याच कल्पित

प्रेरणानें वागलें असतां, पाय वसरून पडण्याचामात्र विशेष संभव आहे. प्राचीन सुधारणा पूर्ण झाल्यानंतरचा जो काळ तो सारा हिंदुस्थान देशाच्या संबंधानें सर्वप्रकारें र्‍हासकाळ होय. या काळांत ज्या ज्या सुधारणा व शास्त्रसंबंधी जे जे फेरफार म्हणून झाले, त्यांच्यापासून देशाचें हित न होतां केवळ त्यावर अनेक प्रकारचे अनर्थ मात्र ओढवले. अर्थात् वैद्यक शास्त्रासंबंधानें देखील आयुर्वेदांत कोणत्याही प्रकारची सुधारणा करण्याला, राजकीय उलाढालीमुळें, आधुनिक आर्य लोकांस अवकाश सांपडला नाहीं. या सर्व गोष्टी लक्षांत आणून, आम्हीं केवळ प्राचीन आर्यवैद्यकावरच विश्राम ठेवण्याचा निश्चय केला व त्यास वंदनीय मानून त्यांच्याच आधारानें हा चिकित्साब्धि नांवाचा ग्रंथ रचण्याचा विचार केला.

प्रयोजनावांचून मनुष्याची प्रवृत्ति कोणत्याही कार्यांत होत नाही, असें स्मृतिवचन प्रसिद्ध आहे. त्यास अनुसरून ग्रंथारंभीं प्रयोजनादिक चार अनुबंध लिहिण्याची रीत आहे. प्रयोजनाच्या उल्लेखाप्रमाणेंच विषयाचा उल्लेख करणेंही अवश्य आहे. कारण वाचकाच्या वेगवेगळ्या प्रकृतींप्रमाणें वेगवेगळ्या विषयांची त्यास अभिरुचि असणें स्वाभाविक आहे. म्हणून पाहिल्यानें ग्रंथाचा विषय सांगितला असतां त्यांतील विषयाचें ग्रहण करण्याला जे अधिकारी असतील त्यांची तिकडे प्रवृत्ति होईल. तिसरा अनुबंध 'संबंध' हा आहे. कारण, संबंध जाणल्यावांचून ग्रंथाचें तात्पर्य कळत नाहीं. चवथ्या अनुबंधांत, ग्रंथग्रहणाला अधिकारी कोण ? याचा निर्णय करतां यावा म्हणून अधिकाराचें विवेचनही ग्रंथारंभीं करणें अवश्य आहे. हें सर्व विवेचन या ठिकाणीं प्रस्तावनेंतच थोडक्यांत करतों.

या ग्रंथाचें प्रयोजन ह्मटलें ह्मणजे रोगाची शांति हें आहे; आणि हेतु, लिंग व औषध अशा तीन प्रकारचा या ग्रंथाचा विषय आहे. हे तीन प्रकार प्रतिपाद्य आहेत, आणि हा ग्रंथ त्यांचा प्रतिपादक आहे. यास्तव प्रतिपाद्यप्रतिपादक हा येथें संबंध जाणावा. या ग्रंथांत रोगशांतीचे उपाय साध्य असल्याकारणानें ती उपेय्य आहे, ह्मणून प्रयोजनाशीं उपायोपेय्य नांवाचा संबंधही यांत आहे. रोगाची शांति व्हावी ह्मणून औषधाची अपेक्षा करणारा पुरुष हा या ग्रंथाचा अधिकारी होय. कोणाही मनुष्यास वैद्याची, वैद्यकी करणाऱ्या माणसाची किंवा वैद्यकीय ग्रंथाची सल्ला घेतल्या-वाचून बहुधा चालतच नाहीं. ह्मणून सर्वच मनुष्यें या ग्रंथाचीं अधि-कारी होत असेंही ह्मणावयास चिंता नाहीं. यासंबंधानें येथें थोडें-बहुत लिहिण्याची गरज आहे. साधारणतः या ठिकाणीं असा प्रश्न उत्पन्न होतो कीं रोगाची शांति हें प्रयोजन लक्षांत ठेवून, अनेक विद्वानांनीं युनानी, इंग्रजी व देशी पद्धतीप्रमाणें बहुत वैद्य-कीय ग्रंथ आजपर्यंत रचले असतां, आणखी नवा ग्रंथ रचण्याचें प्रयोजन काय ? या शंकेचें समाधान करूं ह्मटलें तर संवादरूप एक मोठी लांबलचक प्रश्नोत्तरमालिकाच लिहावी लागेल, व तिचें एक स्वतंत्र पुस्तक होईल. तथापि अशा भानगडींत न पडतां, येथें थोडक्यांत एवढेंच सांगतों कीं अनेक विद्वानांनीं जरी इंग्रजी व संस्कृत वैद्यकीय ग्रंथांच्या आधारानें कित्येक टीकात्मक व स्वतंत्र ग्रंथ प्रगट केले असले तरी त्यांवरून जितकें समजणें अवश्य आहे तितकें सारें समजतेंच असें ह्मणतां येत नाहीं. कारण ही विद्या इतकी खोल आहे कीं तिजविषयीं कितीही लिहिलें तरी पुरेसें झालें असें कधीं ह्मणतां यावयाचें नाहीं. आणखी युनानी व इंग्रजी वैद्यक विद्येचें अस्तित्व तरी आयुर्वेदास अनुसरूनच आहे, असें आढळतें. आणि

याच आयुर्वेदरूप महावृक्षापासून फुटवा फुटून, फुलें व फळें यांनी युक्त झालेल्या फांद्या मुंबाज्यापेक्षांही विशेष वृद्धि पावल्या आहेत असेंही दिसतें. तथापि या वृद्धीचें कारण राजाश्रय हेंच आहे. युनानी वैद्यकविद्येचें खोड मोंगल बादशाहीच्या व्हामाबरोबर सुकत गेलें, आणि इंग्रजी वैद्यकविद्येचें खोड राज्यविस्ताराबरोबर विस्तारत चाललें आहे. तथापि यांमुळें मूळ विद्येचें माहात्म्य लेशमात्र कमी होतें असें नाहीं. देशी वैद्यकविद्येचें सारें महत्त्व राज्यकर्त्यांच्या विद्येपुढें झांकून गेलें आहे. तरी, आपले लोक व राज्यकर्ते हे आर्य वैद्यकविद्येचें पूर्ण ज्ञान करून घेण्याच्या इच्छेनें या विद्येस आश्रय देतील तर आर्य वैद्यकविद्येचा चमत्कार त्यांच्याही लक्षांत येऊन, तिच्या सरसत्वाविषयीं त्यांची बालंबाल खात्री होईल. यांशिवाय आणखी हीही एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं या देशाच्या लोकांसतर या देशात उत्पन्न झालेल्या द्रव्यांचींच औषधें विशेष हितकारक होत. या दृष्टीनें पाहिलें असतां, निदान या देशाच्या लोकांच्या उपयोगाकरितांतरी प्रस्तुत ग्रंथासारखे ग्रंथ प्रगट करणें विशेष अगत्याचें आहे.

देशी वैद्यकविद्या त्रिकालदर्शी आत्रेयादि महात्म्यांनीं प्रगट केली. हे महात्मे यथार्थवादी असल्यामुळें त्यांस आप्तपुरुष ह्मटलें आहे. त्यांच्या ठिकाणी लोभादि कुटिल वृत्तींचा पूर्ण अभाव असल्यामुळें, त्यांनीं आपलें आप्तत्व कायम राखून त्याच उत्तम गुणांचा उपयोग उत्तम उत्तम ग्रंथ लिहिण्यांत केला. हल्लींच्याप्रमाणें त्या काळीं केवळ पैशाखातर काम करणार लोक फारच थोडे असत. यामुळें त्यांनीं सर्व द्रव्यांचे यथार्थ गुणदोष स्पष्टपणें प्रगट केले, आणि औषधांचीं मापें व मिश्रणांचीं कोष्टकें देऊन औषधें सिद्ध करण्याच्या क्रिया आणि त्यांत कोणकोणतीं द्रव्यें पडतात तीं सर्व निष्कपटपणें प्रसिद्ध केलीं.

याशिवाय या देशच्या लोकांस या देशचीं औषधेंच विशेष हितकारक होत, असें वर सांगीतलें आहे तेंही खरेंच आहे. इंग्लंड वगैरे थंड प्रदेशच्या लोकांस अनुकूळ होतील अशीं औषधें हिंदुस्थानासारख्या उष्ण प्रदेशांतील लोकांस हितकारक व्हावीं किंवा नाहीं याविषयीं संशयच आहे. अनेक प्रकारचीं स्पिरिटें, ब्रांड्या व क्षार हीं द्रव्यें ज्यांत प्रमुख आहेत अशीं पैत्तिक प्रकृतीचीं इंग्रजी औषधें या देशच्या लोकांस कशीं मानवावीं? ज्या औषधानें रोग तत्काळ बरा होतो तें औषध हितकारक होय, असें बहुत करून हल्लीं समजतात. परंतु आप्तपुरुषांचें मत याहून वेगळें आहे. कित्येक इंग्रजी औषधांनीं उत्तमत्व मान्य केल्यावांचून चालत नाहीं, हें खरें; तथापि कांहीं औषधें वर सांगितलेल्या प्रकारचीं आहेत. तीं अशीं कीं त्यांपासून तत्काळ गुण वाटला तरी इतर बाबतींत शरीराला नुकसान पोचल्यावांचून रहात नाहीं. ही गोष्ट साधारण लोकांच्या आपोआप समजुतींत येण्यासारखी नाहीं. याशिवाय आणखी असें आहे कीं अझूनही या देशच्या बहुत लोकांस इंग्रजी औषधाविषयीं धर्मसंबंधानें अप्रीति वाटत आहे. या सर्व कारणांस्तव आयुर्वेदावर प्रमुख असे मानलेले चरकसुश्रुत आदिकरून प्रमाणग्रंथांच्या आधारानेंच, पण कांहीं अपूर्व चातुर्यानें गुंफलेला ग्रंथ देशी भाषांत रचून प्रगट केला असतां त्याचा लोकांस बहुत उपयोग होईल, असें आम्हास वाटतें.

आर्यवैद्यक विद्येच्या आयुर्वेदनामक आद्यग्रंथांत, हित, अहित, सुख आणि दुःख असें चार प्रकारचें आयुष्य वर्णिलें आहे. त्याचप्रमाणें आयुष्याचें स्वरूप, प्रमाण, व त्याला वाढविणारे व कमी करणारे आहारविहाराचे प्रकार यांचेंही वर्णन

दिलें आहे. हा आयुर्वेद समजण्यास कठिण [illegible] जाणून, [illegible] अनुसरून आत्रेयादि महर्षींनीं जे ग्रंथ [illegible] चरक सुश्रुत व वाग्भट हे होत. या तिहींस 'वृद्ध त्रयी' [illegible] आणि यांच्या मागून भावप्रकाश, माधवनिदान [illegible] हे ग्रंथ झाले. त्यांस 'लघु त्रयी' म्हणतात. [illegible] त्व यांस अनुलक्षून वरील नांवें पडलीं आहेत [illegible] ग्रंथांत आहारविहाराचे जे नियम [illegible] त्याप्रमाणें वागलें असतां, मनुष्यांच्या अमूल्य आयुष्याचें [illegible] प्रकारें रक्षण होईल. हे नियम पाळण्यांत चूक [illegible] ( आमय ) उत्पन्न होतात. त्यांवर [illegible] उपचार केले असतां, यथायोग्य काळीं, त्याचा [illegible] रहाणार नाहीं, अशीं अमूल्य आणि हितकारक औषधें [illegible] ग्रंथांत [illegible] केलीं आहेत. तथापि [illegible] तर त्याबद्दल महात्म्यांस दोष देणें [illegible] नाहीं. कारण हा सर्व दोष कल्पना करणाऱ्या आधुनिक वैद्यांच्या बुद्धिमत्तेचा आहे. सारांश सदर ग्रंथ असत्य आहेत असा दोष त्यास लावतां येत नाहीं. हे ग्रंथ कितीही सत्यज्ञानानें भरलेले असले, तरी ते समजण्यास अनुभवी वैद्यांची अपेक्षा आहे. जशी तिखट तलवार अज्ञान मनुष्याच्या हातांत गेली असतां, आपलें सामर्थ्य प्रगट करूं शकत नाहीं, व त्यांत जसा तलवारीचा दोष नाहीं, त्याचप्रमाणें आप्तपुरुष जे भिषग्वर्य प्राचीन मुनि, त्यांनीं प्रगट केलेल्या विचारांचें रहस्य अज्ञान वैद्यांस कळलें नाहीं तर त्यांत बिचाऱ्या त्या प्राचीन ग्रंथांचा काय दोष बरें !

आर्य वैद्यकांत अमेध्य ( मद्यमांसादिक ) पदार्थ औषध म्हणून घेण्यास चिंता नाहीं, असें म्हटलें आहे. तथापि असे उपाय

ि नत्वें करून योजिलेच पाहिजेत असें नाहीं. पहिल्यानें वनस्पती
द करून पवित्र द्रव्यांपासून सिद्ध केलेलीं औषधें योजावीं,
ण त्यांच्या योगानें आरोग्याचें रक्षण होणें अशक्य वाटल्यास
र, ' औषधार्थं सुरां पिबेत् ' या वाक्याचा आदर करून, अमेध्य
षधें योजावीं, असें ठरलें आहे. तोच कित्ता आम्हीं या आमच्या
ांत गिरविला आहे. यांत, मद्यमांसादिक अमेध्य द्रव्यें अमुक
मक रोगावर योजावीं असें जरी लिहिलें आहे, तरी तें केवळ
पत्कालास अनलक्षून आहे असें समजावें. आणखी हीं अमेध्य
व्यें सर्वांसाठीं आहेत असेंही नाहीं. धर्मपरत्वें जे त्यांचे अधि-
ारी असतील त्यांस न तीं सल्ल्यानें करून द्यावीं, हेंही येथें लक्षांत
ेवले पाहिजे.

जर या आर्य वैद्यकविद्येला उत्तेजन मिळणार नाहीं, तर आपत्काळचा आचार हाच सदाचार असें प्रवृत्त होईल, आणि खरा सदाचार निःसार होऊन परिणामीं नाश पावेल. शरीर आणि धर्म हे दोन्हीही अर्थ एकमेकांवर अवलंबून आहेत. आणि या दोहोंचेंही रक्षण आर्य वैद्यकविद्येच्या आश्रयानें प्रशस्तपणें होतें, यांत संशय नाहीं. पवित्र द्रव्यें नेहमीं पिणारा कोणीही आर्य मनुष्य घ्या, त्याजवर व्याधिग्रस्ततेमुळें अमेध्य पदार्थ पिण्याचा आपत्प्रसंग आला तर त्या वेळीं त्याच्या मनांत तो शब्द ऐकतांच, त्यास होत असलेल्या वेदना, प्रथम कांहीं वेळ तरी, वाढणा-रच वाढणार, यांत काय नवल आहे! कांहीं इंग्रजी औषधें सर्वोत्तम असून चमत्कारिक गुण प्रगट करतात, या गोष्टीकडे जरी दुर्लक्ष केलें नाहीं, तरी सामन्यें करून विचार केला असतां, देशी वैद्यक-विद्येचें महत्व फार आहे, हें कोणासही कबूल करावें लागेल.

सांप्रत देशी वैद्यकविद्येचें जें स्वरूप आपणास माहित आहे त्याहून तें फार वेगळें आहे, असें सिद्ध करून देण्याचा प्रसंग परमेश्वरानें देशी वैद्यांस लवकरच आणून द्यावा अशी आमची त्यास प्रार्थना आहे. इंग्रजी वैद्यकशास्त्रांतलें शारीर प्रकरण पाहून, देशी वैद्यकविद्येच्या महत्वाविषयीं भ्रम पडण्याचा संभव आहे; आणि खरोखर यांतच इंग्रजी वैद्यकशास्त्राच्या एवढ्या कीर्तिचेंही बीज आहे. देशी वैद्यक विद्या शस्त्रक्रियेंत मागें पडली, ही तिच्यांत मोठी उणीव आहे. आणि ही उणीव दूर करण्याचा अनुकूल समय हाच आहे. यास्तव देशी वैद्यकाच्या धन्वंतऱ्यांनी याच समयीं ही उणीव दूर करण्यास झटलें पाहिजे. देशी वैद्य हें शारीर प्रकरण जर आपल्या ग्रंथांत यथासांग आणतील आणि आयुर्वेदाचा हा कमीपणा काढून टाकतील, तर आर्य वैद्यकावर त्यांचे मोठे उपकार होतील. प्रस्तुत ओघास अनुसरून आह्मी येथें सरकारासही अशी सूचना करतों कीं जर इंग्रजी व देशी अशा दोन्ही वैद्यकविद्येचें संशोधन करवून, दोहोंच्या आशयास अनुलक्षून वैद्यक शास्त्राचे नवे नियम सिद्ध करण्याकरितां जर सरकार कंबर बांधील तर तेणेंकरून अत्यंत लाभ होतील, यांत संशय नाहीं.

कोणत्याही लेखाचे गुणपरत्वें चार भेद करतां येतात. कांहीं लेख अल्पाक्षर आणि अल्पार्थ असे असतात. ह्मणजे त्यांत अक्षरें थोडीं व अर्थही थोडा असतो. कित्येक बह्वक्षर आणि बह्वर्थ असे असतात. ह्मणजे अक्षरें पुष्कळ आणि त्यांत अर्थही पुष्कळ अशी कित्येकांची तऱ्हा असते. कित्येकांत अल्पाक्षर आणि बह्वर्थ अशी योजना असते. अर्थात् लेख लहान तरी त्यांत प्रगट केलेला अर्थ विस्तृत असतो. आणि चौथा प्रकार म्हटला ह्मणजे लेख बह्वक्षर असून अल्पार्थ

असतो. अर्थात लेख लांबलचक पण त्यांत अर्थ फार "थोडा," असा प्रकार असतो. हे भेद लक्षांत ठेवूनच, हे चारही भेद येथें प्रसंगविशेषीं आदरले आहेत. वैद्यकाचे कित्येक विषय इतके गहन आहेत. कीं त्यांविषयीं थोडक्यांत लिहून चालणारच नाहीं, व लोकांस त्याची समजही पडणार नाहीं. याचप्रमाणें कांहीं गोष्टी अशाही आहेत, कीं त्यांविषयीं लांबलचक माहिती देऊन, भारूड भरण्याची अवश्यकता नाही. यास्तव अशा गोष्टी थोडक्यांतच आणल्या आहेत. याशिवाय ग्रंथ वाढेल या भयानें कित्येक स्थळीं थोडक्यांत अनेक गोष्टींचा समावेश करण्याचा यत्न केला आहे.

चरक, सुश्रुत इत्यादि ग्रंथ संस्कृतांत फार प्रौढ वाणीनें लिहिले आहेत. सामान्य सर्व लोकांस ते समजणें बरेंच कठिण जातें. आतां कांहीं सुगम व लहानसान ग्रंथ संस्कृतांत आहेत. परंतु त्यांच्यापासून इच्छेप्रमाणें कार्य भागत नाहीं. याशिवाय कांहीं मध्यम प्रतीचेही ग्रंथ आहेत, व त्यांचीं प्रचलित देशी भाषांत रूपांतरेंही झालीं आहेत. या ग्रंथांपासून मात्र लोकांस थोडाथोडका उपयोग होण्यासारखा आहे. परंतु झालेलीं भाषांतरें अनेक उणिवांनीं भरलेलीं असल्यामुळें कांहीं अशीं निरुपयोगी निदान अल्पोपयोगी तरी आहेत असें ह्मणणें भाग आहे. इंग्रजी वैद्यकाविषयीं मोठमोठे ग्रंथ झाले आहेत खरे; पण ते आर्यवैद्यकविद्येचा अभिमान धरणाऱ्या व त्याचीच अभिरुचि असलेल्या लोकांस एवढे पसंत पडण्यासारखे नाहींत. देशी भाषांतही ग्रंथ स्वतंत्र झाले आहेत ते इंग्रेजी पद्धतीचेच आहेत. यामुळें तेही सर्व लोकांस पसंत पडतील असे नाहींत. असे कित्येक विचार मनांत उदय पावून, त्याचप्रमाणें कांहीं वैद्यांचा व मित्र मंडळीचा आग्रह पडल्यावरून, अगदीं नवीन रचना करून हा ग्रंथ सिद्ध केला आहे.

' आपल्या पुराणांत अशी एक कथा आहे कीं देव आणि दैत्य यांनीं जेव्हां क्षीरसागराचें मंथन केलें, तेव्हां त्यांतून चवदा रत्नें प्राप्त झालीं. आणि त्या रत्नांपासून त्रिभुवनास सुख प्राप्त झालें. स्त्री रत्न, चंद्ररत्न, गजेंद्ररत्न, अमृतरत्न वगैरे रत्नें किती लोकोपयोगाचीं आहेत हें प्रसिद्धच आहे. बहुधा त्यांवांचून जगाचें चालणारच नाहीं, असेंहीं ह्मणावयास चिंता नाहीं. त्याच न्यायानें चिकित्साब्धीचें मंथन केलें असतां जीं चवदा रत्नें आमच्या हातास लागलीं, तीं या ग्रंथाच्या द्वारा आह्मी आमच्या वाचकांस अर्पण करित आहों. सर्व रोगी व नीरोगी लोकांस त्यापासून सुखप्राप्ति होईल अशी आशा आहे.

या ग्रंथाचे चार भाग केले असून, त्यास तरंग अशी संज्ञा दिली आहे. कारण या ग्रंथाचें नांव चिकित्साब्धि (ह्मणजे रोग-चिकित्सेचा समुद्र) असें ठेवलें असल्यामुळें, यांतील विभागांस समुद्रांतील तरंगाप्रमाणें अन्वर्थकच तरंग संज्ञा आहे. या चार तरंगांत चवदा प्रकरणांचा समावेश केला आहे. प्रत्येक प्रकरणास रत्न कल्पिलें आहे. पहिल्या तरंगांत देवांगना रत्न व चंद्र रत्न यांचा समावेश केला आहे. दुसऱ्या तरंगांत धन्वंतरि रत्न आणि पारिजात रत्न यांचा समावेश झाला आहे. तिसऱ्या तरंगांत विष रत्न, अमृत रत्न, वाजि रत्न, लक्ष्मी रत्न, धेनु रत्न, शंख रत्न, आणि मद्य रत्न हीं घातलीं असून, चवथ्या तरंगांत कौस्तुभ रत्न, शार्ङ्ग रत्न, आणि गजेंद्र रत्न यांचा समावेश केला आहे. शेवटीं एक परिशिष्ट भाग जोडला आहे.

प्राण्यांच्या उत्पत्तीचें मूळस्थान स्त्री होय. सांप्रत आर्यावर्तावर राज्य करणारीतरी ( **महाराणी व्हिक्टोरिया** ) स्त्रीच

आहे. प्रत्येक कुटुंबांत घरांतला कारभार करणें, तो स्त्रीच करते. पुत्रापासून सुख प्राप्त होतें. त्या पुत्राचें उत्पत्तिस्थानही स्त्रीच आहे. कामपीडा निवारण्याला औषध म्हटलें म्हणजे स्त्री होय. सारांश संसाराच्या सर्व सुखांचें मूळ स्त्री असल्याकारणानें या ग्रंथांत आरंभींच देवांगना रत्न घातलें आहे. याशिवाय आणखी देव शब्द मंगलसूचक आहे, म्हणून तो प्रथम योजून उपन्यास केला आहे. या रत्नामध्यें स्त्रीरोगचिकित्सा, प्रजोत्पत्ति आणि त्याच्या पोटविभागांत बालरोगचिकित्सा हे विषय वर्णिले आहेत.

बालकाची उत्पत्ति झाल्यावर, त्याचें शरीर कशाचें बनलें आहे हें व त्यांत कोणकोणते भाग आहेत हें समजण्याची अवश्यकता असल्यामुळें शारीर प्रकरण हें चंद्ररत्न या नांवानें दुसरें ग्रंथांत घातलें आहे. चंद्राचा गुण प्रकाशन करणें हा आहे, आणि शारीरतरी शरीराच्या बाह्य व आभ्यंतर भागांचें प्रकाशन करतें. यास्तव या गुणाचा बोध करणारा शक्यार्थ सोडून देऊन लक्ष्यार्थावर धोरण ठेवून, या प्रकरणाचें नांव चंद्ररत्न ठेवलें आहे, तें यथायोग्यच आहे असें दिसून येईल.

दुसऱ्या रत्नांत धन्वंतरी आणि पारिजातक या रत्नांचा समावेश केला आहे. चंद्ररत्नांत शारीर प्रकरण सांगितल्यानंतर धन्वंतरी प्रकरण घालण्यांत हेतु असा आहे कीं शारीर आणल्यानंतर शरीरांत कोणकोणते रोग कसकसे उत्पन्न होतात, हें जाणणें अवश्य आहे. यास्तव धन्वंतरि रत्नांत रोगांचे भेद आणि त्यांची परीक्षा वगैरे विषय सांगितले आहेत. गुरूची सेवा केल्यावांचून जी वैद्यकीय सूक्ष्म रहस्यें कळणें कठिण, तीं इतर स्थळीं विस्तारानें लिहिण्याचा विचार नसल्यामुळें याच प्रकरणांत गोविलीं आहेत. पहिल्यानें

* मूळग्रंथ लिहिला ते वेळीं या महाराणी साहेब जीवमान असून, अलीकडे नुकतीच यांस देवाज्ञा झाली.

शरीर नीरोगी ठेवून, नंतर तें पुष्ट होण्याचे उपाय योजावे. असें न करितां, जर शरीर व्याधिग्रस्त असेल तर व्याधींचा वध करण्याकरितां औषधोपचार करण्याची जरूर आहे. शरीर नीरोगी ठेवणें, त्याला पुष्टि देणें आणि व्याधि टाळणें इतक्या गोष्टी करण्याकरितां औषधींची ओळख असणें व त्यांचे गुणदोष जाणणें फार अगत्याचें आहे; आणि सर्व औषधींत पारिजात (कल्पवृक्ष) हा सर्वोत्तम व श्रेष्ठ आहे म्हणून औषधींचें प्रकरण पारिजात रत्नांत दाखल केलें आहे. सत्पुरुषांस मान्य ज्या स्थावर औषधि, त्यांचे गुण या प्रकरणांत गुंफिले असल्यामुळें, या प्रकरणास पारिजात म्हणून म्हटलें आहे. 'दह्याकडे पहा, कावळा खाईल' असें म्हटलें असतां, केवळ कावळा दहीं खाण्यास आला असतां त्याला मात्र हाकलावयाचें, मांजर वगैरे इतर प्राणी आले असतां त्यांस हाकलावयाचें नाहीं, असें यावरून समजावयाचें की काय? तर याचें उत्तर समजावयाचें नाहीं असेंच येणार. कारण वरील वाक्यांत दहीं खाणाऱ्या सर्व प्राण्यांमध्यें कावळा विशेष चपळ असल्याकारणानें तो इतर प्राण्यांचें उपलक्षण होय. म्हणजे या उपलक्षणानें, मांजर वगैरे इतर प्राण्यांपासून देखील दह्याचें रक्षण कर, अशी सूचना होते, याच न्यायानें या स्थलीं पारिजात रत्न सर्वांत सर्वोत्तम औषधि असल्यामुळें, तिच्यावरून उपलक्षणानें इतर सर्व औषधींचें ग्रहण होतें असें समजावें.

पारिजात रत्नांत औषधींचें ज्ञान करून दिल्यावर व गुणदोष सांगितल्यावर, कौस्तुभरत्न पुढें आणण्याची अवश्यकता आहे. कारण कीं यांत निदान व चिकित्सा हे दोनही भाग सांगितले आहेत. परंतु अगोदर तिसऱ्या तरंगांतील रत्नांत आलेले विषय घेण्याची जरूर दिसल्यावरून त्यांस प्रथम स्थळ दिलें आहे. विषरत्नांत स्थावर

आणि जंगम अशा दोनही प्रकारच्या विषाची उत्पत्ति, त्यांचा परिणाम, साध्यासाध्यविचार व निवारणोपाय, त्याच प्रमाणें घरांतील नित्य खाण्याचे पदार्थ कोणत्या रीतीनें एकत्र झाले असतां विषरूप होतात वगैरे अनेक उपयुक्त गोष्टींचें वर्णन त्यांत आलें आहे. अमृतरत्नांत ऋतुचर्या, नीरोगी असण्याचे नियम, व रसायनप्रयोग यांस स्थळ दिलें आहे. जीं रसायनें नेहमीं सेवन केल्यानें दुष्ट रोगांच्या क्लेशांपासून त्वरित मुक्त होऊन मनुष्यांस अजरामर होतां येतें, त्या रसायनप्रयोगांचीं नांवें, त्यांचे गुण व स्वरूप यांचें वर्णन या प्रकरणांत विस्तारें करून दिलें असल्यामुळें, तें अमृतासमान आहे, असें समजून या प्रकरणास अमृतरत्न हेंच नांव दिलें आहे. ज्या औषधांच्या सेवनानें खरें पुरुषत्व प्राप्त होतें, असे वाजीकरणप्रयोग या प्रकरणांत पुष्कळ असल्यामुळें त्यास वाजिरत्न असें समर्पक नांव दिलें आहे. लक्ष्मीरत्नांत पाऱ्याचे प्रयोग दिले आहेत. रस सिद्ध झाले असतां जगाचें दारिद्र्य व रोग यांचें निवारण होईल, असें रसवाग्भटाचा कर्ता जें प्रतिज्ञावाक्य लिहितो, तें खरें मानून लक्ष्मीचें कारण जे प्रयोग तेच अवयव, त्यांनीं सुशोभित केलेल्या या प्रकरणास लक्ष्मीरत्न असें नांव ठेविलें आहे. धेनुरत्नांत गोरसाचें वर्णन म्हणजे दहीं, दूध, ताक, तूप वगैरे सर्व गोरसाचें वर्णन, सात्म्य आणि असात्म्य अशा विभागें करून, शास्त्रपद्धतीला अनसरून केलें आहे. त्याचप्रमाणें बकरी, उंटीण, म्हैस इत्यादिकांच्या दुधाचें देखील विवेचन यांतच केलें आहे. यावरून या प्रकरणास दिलेलें धेनुरत्न नांव यथोचित आहे. कित्येक स्थळीं कार्य हें कारणाचा बोध करतें, आणि कित्येक स्थळीं कारण हें कार्याचा बोध करतें. याप्रमाणें सत्पुरुषांनीं स्वीकारलेल्या पद्धतीस अनुसरून शंखरत्नांत ग्राह्य जल कोणतें हें कळण्यासाठीं देशकालसंसर्गानें लागलेल्या जलाच्या

उत्तम, मध्यम आणि अधम गुणांचें वर्णन ज्या प्रकरणांत केलें आहे त्याला शंखरत्न नांव दिलें आहे. आणि ज्यांत मद्याचे गुण, दोष, भेद, रचना, प्रमाण, प्रकार आणि ग्राह्याग्राह्यविचार सर्वांशानें सांगितला आहे, त्या प्रकरणास मद्याच्या स्वतांच्याच अर्थाला अनुकूळ असें मद्यरत्न नांव ठेवलें आहे.

कौस्तुभ रत्नांत सर्व रोग व त्यांची चिकित्सा आली आहे कौस्तुभ हें विष्णूच्या वक्षःस्थळावर अलंकाररूप रत्नाचें नांव आहे. आणि रत्नांत सर्व गुणांहून प्रकाशत्व गुण मुख्य असतो, त्याचा आश्रय करून, या रत्नांत रोगाचें स्वरूप व त्याचीं आद्यकारणें यांचा प्रकाश करणारा वैद्यकविद्येचा भाग घातला असल्यामुळें, सादृश्यावरून, या प्रकरणास कौस्तुभरत्न असें नांव दिलें आहे. या रत्नांत कित्येक मुख्य मुख्य रोगांचें निदान आणि अवश्यक तितकी चिकित्सा लिहिली आहे त्याचच आणखी इतर उपाय लिहिले नाहींत. कारणकीं प्रत्येक रोगा माफक असे जे उपाय, ते या पुस्तकाच्या वेगवेगळ्या भागांत येऊन गेले आहेत. आणि या रत्नांत ज्वरादि मोठमोठ्या रोगांचें निदान व चिकित्सा यांचा संग्रह केला आहे. दुसऱ्या क्षुद्र रोगासंबंधानें परिशिष्टांत व इतर ठिकाणी लागु पडणारे प्रयोग योजावे. आर्य आणि अनार्य वैद्यांनीं रचलेल्या प्रौढ प्रबंधांत सांगितलेली, शस्त्रानें व अस्त्रानें करावयाच्या व्रणरोगाची चिकित्सा देऊन त्याचें उच्छेदनकार्य सिद्धीस जातें. ह्मणून या प्रकरणास योग्य असें शाङ्गरत्न असें नांव दिलें आहे. या प्रकरणांत इंग्रजी पद्धतीस अनुसरून शस्त्रप्रकरण घातलें आहे. तथापि कौस्तुभरत्नांत व्रणादिक ज्या ज्या रोगांवर शस्त्रक्रिया करावयाची त्या त्या रोगांची चिकित्सा सांगतांना, प्रथम पद्धतीस अनुसरून

कांहीं शस्त्रक्रियेचे प्रकारही सांगितले आहेत. त्यांवरून आर्य आणि अनार्य शस्त्रक्रियेंत किती तफावत आहे हें वाचकांस कळून येईल. शेवटलें ह्मणजे चवदावें रत्न लिहितांना, समरभूमीवर शूर राजांस युद्धकार्यांत हत्तीचा उपयोग सर्वांहून अधिक असल्यामुळें, यथाविधि अनेक प्रकारच्या दुर्धर रोगांशीं युद्ध करूं इच्छिणाऱ्या वैद्याला या प्रकरणापासून अतिशय मदत होणार असल्यामुळें, या प्रकरणाचें गजेंद्ररत्न असें समर्पक नांव ठेविलें आहे.

शेवटीं परिशिष्ट प्रकरण जोडलें आहे, त्यांत धातूंचीं भस्में करण्याच्या रीति व अनुभवसिद्ध देशी औषधोपायांचा संग्रह केला आहे. वैद्यकविद्या आणि रोगाची चिकित्सा करणारा वैद्य या दोहोंवर व्याधिग्रस्त मनुष्यांचें आयुष्य अवलंबून आहे. चिकित्सा करणारा वैद्य अडाणी असेल, तर रोग्याचें दुःख उलटें वाढवून, अखेरीस त्यास तो कारण लावील. या गोष्टीवर लक्ष ठेवूनच राजाचा हुकूम घेतल्यावांचन शस्त्रक्रिया करूं नये, ह्मणून प्राचीन आर्य लोकांच्या वैद्यकग्रंथांत सांगितलें आहे. अर्थात शस्त्रविद्येंत वैद्य प्रवीण असला तरच त्यास राजाची परवानगी मिळे. पूर्वी सांप्रत याच पद्धतीस अनुसरून, वैद्यकींत परीक्षा घेऊन जे योग्य ठरतात त्यांसच वैद्यकी व शस्त्रक्रिया करण्याविषयीं चर्मपत्र देऊन मोकळीक ठेविली आहे. तथापि खासगी रीतीनें वैद्यकी करण्यास कोणत्याही प्रकारचा प्रतिबंध नसल्यामुळें, निरुद्योगी कोणाही मनुष्यास सहज वैद्य बनतां येतें. आणि यामुळेंच अर्ध्या हळकुंडानें गांधी होऊन बसलेले असे नामधारी वैद्य गांवोगांव व ठिकठिकाणीं बहुत आढळतात. परंतु अशा मोकळिकीनें लोकांचें किती नुकसान होतें याचा विचार होणें जरूर आहे. कायद्याची अमुक परीक्षा झाली असेल तरच त्यास

कोर्टांत वकिली करण्याची परवानगी मिळते, त्याचप्रमाणें देशी व इंग्रजी वैद्यांच्या संबंधानेंही कांहीं मर्यादा केल्यास लोकांचा फायदाच होईल यांत शंका नाहीं.

सांप्रत कित्येक ग्रंथकार केवळ पैशाच्या लोभानें कोणा धनाढ्य शेटसावकारास आपले ग्रंथ अर्पण करतात व साजणार नाहीं अशी अतिशयोक्तिप्रचुर खोटीच प्रशंसा करतात. त्यांची ही रीत मला प्रशस्त वाटत नसल्यावरून, हा ग्रंथ मी माझे वडील बंधु **अनेकशास्त्रसंपन्न कालिदास गोविंदजी** यांस अर्पण करतों. यांनी, माझीं मातापितरें देवलोकीं गेल्यावर, मागें माझ्या लहानपणीं माझा प्रतिपाळ केला व मला सज्ञान करण्यांत तनमनधनानें मेहनत घेऊन माझें निरंतर कल्याण केलें. त्यांचें स्मरण निरंतर रहावें हा माझा हेतु, हा ग्रंथ त्यांस अर्पण केल्यानें परिपूर्ण होईल असें मला वाटतें.

ग्रंथकार.



# चिकित्साब्धि.

## अनुक्रमणिका.

### तरंग १ ला.

### देवांगना रत्न १ लें.

## चंद्ररत्न २ रें.

तरंग २ रा.

## धन्वंतरि रत्न ३ रें.

## पारिजात रत्न ४ थें.



या प्रकरणांत औषधीय पदार्थांचें गुणदोषविवेचन, अ,-ते क्ष-पर्यंत वर्णानुक्रमानें केलें आहे. यास्तव प्रत्येक पदार्थाचें नांव याच्यांत दिलें नाहीं.

### तरंग ३ रा.

## विष रत्न ५ वें.

## धातुविषाची आणि वनस्पतिविषाची चिकित्सा.

## अमृत रत्न ६ वें.

## वाजी रत्न ७ वें.



## लक्ष्मी रत्न ८ वें.

### पाऱ्याच्या शुद्धीचीं साधनें.

विषय. पृष्ठांक

## पाऱ्याच्या शोधनार्थ संस्कार.



## रसप्रयोग.

## धेनु रत्न ९ वें.



## पांचजन्य रत्न १० वें.

## मद्यरत्न ११ वें.

## तरंग ४ था.

# कौस्तुभ रत्न १२ वें.

# शार्ङ्ग रत्न १३ वें.

## गजेंद्र रत्न १४ वें.



## परिशिष्ट.

| विषय. | | पृष्ठांक. |
|---|---|---|

# शुद्धिपत्रक.

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| [illegible] | १३ | दुर्गंधयुक्त | गंधरहित |
| ८ | २ | स्थिर | अस्थिर |
| ११ | ३ | पाहिल्यानें | पाहिल्यानें |
| ,, | ६ | अंडासारखा | पिंडासारखा |
| ,, | १० | क्लेश | क्लेद |
| १२ | ६ | चालण्याची | जाणण्याची |
| १४ | ५ | असला तर मु- लीस प्रसवणारी मुलगी जन्मते | असला तर स्त्री- लक्षणरहित प- रंतु स्त्रीच्या आ कृतीच्या मुलीस जन्म देते |
| २१ | १४ | आणि वा | आणि तो |
| ,, | २४ | "मक्कन" | "मक्कल" |
| २२ | ३ | घने) आणि नागकेशर | नागकेशर ) आणि घणे |
| ,, | १८ | मोठाल्या स्त- नांची | वर्तुळ स्तनांची |
| २५ | १७ | तृष | तृप |
| ,, | २० | मुजलें | पिकलें |
| २७ | १२ | आमरहित | आमसहित |
| ,, | २१ | अडळमा | टेंटू |

| पृष्ठ | | ओळ | | अशुद्ध | | शुद्ध |
|---|---|---|---|---|---|---|
| २९ | खालून | ४ | ... | हात आणि पाय | ... | हात किंवा पाय |
| ३० | ,, | ७ | ... | उचकी | ... | ढेंकर |
| ३१ | वरून | ५ | ... | पर्यंत वळावळ | ... | पर्यंत दोघांचें वळावळ |
| ३२ | खालून | १३ | ... | गुडघा | ... | घोटा |
| ,, | ,, | ८ | ... | वारा येण्याला एकच मार्ग | ... | वारा जाण्यायेण्याला मार्ग |
| ३३ | ,, | ८ | ... | विरुद्ध | ... | अविरुद्ध |
| ३[illegible] | ,, | १४ | ... | रक्षारां | ... | रक्षरा |
| ३७ | वरून | [illegible] | ... | कफ व पित्त | ... | वातपित्त |
| ,, | ,, | १६ | ... | क्षीरकंकोळ | ... | क्षीरकाकोळी |
| ,, | ,, | १८ | ... | कांटेरी अशेरा | .. | कोरांटी |
| ,, | खालून | [illegible] | ... | त्रिजोऱ्याचें | ... | महाळुंगाचें |
| ३८ | वरून | ५ | ... | कर्ष प्रमाण | ... | कर्पकर्षप्रमाण |
| ,, | ,, | [illegible] | ... | गाईच्या मूत्रांत | ... | गाईच्या नितक्याच मूत्रांत |
| ,, | ,, | १[illegible] | ... | शेक करावा | ... | सेचन करावें |
| ३९ | खालून | ८ | ... | जायफळ | ... | कायफळ |
| ,, | ,, | ८ | ... | (टेंभुर्णी), दाळिंब | ... | (टेंभुर्णी. तुरटी दाळिंब |
| ,, | ,, | ७ | ... | अक्षप्रमाण | ... | अक्षअक्षप्रमाण |
| ,, | ,, | ,, | ... | बकरीच्या मूत्रांत | ... | बकरीच्या दुप्पट मूत्रांत |
| ,, | ,, | ,, | ... | व दुप्पट दुधांत | ... | व तितक्याच दुधांत |

| पृष्ठ | | ओळ | | अशुद्ध | | शुद्ध |
|---|---|---|---|---|---|---|
| ४० | खालून | ४ | ... | पडवळ | ... | अंबष्ठा |
| ,, | ,, | २ | ... | मोनुली | ... | काकजंघा |
| ४१ | वरून | २ | ... | पाण्याच्या | ... | तांदुळाच्या |
| ,, | खालून | ६ | ... | वासिनी | ... | वामिनी |
| ,, | ,, | ,, | ... | स्रुत | ... | विस्रुता |
| ,, | ,, | १ | ... | कवट | ... | कोष्टकोळिंजन |
| ,, | ,, | ,, | ... | पिंपळाचा अर्क | ... | पिंपळी, रुईची बोंडे, |
| ४२ | वरून | ३ | ... | तेल | ... | स्नेह |
| ,, | ,, | २ | ... | उद्वार्त | ... | उद्‍वर्त्ताचे |
| ,, | ,, | ६ | ... | महायोनि | ... | विवृता |
| ,, | ,, | ७ | ... | तेलाचा | ... | स्नेहाचा |
| ,, | ,, | [illegible] | ... | अथवा महायोनीला | ... | स्रंसिनी योनीला |
| ,, | खालून | १ | ... | जायफळाच्या | ... | जांभळाच्या |
| ४३ | ,, | ७ | ... | व्याधि आणि वेग | ... | व्याधि यांच्या योगानें आणि वेग |
| ४४ | वरून | ३ | ... | जाळीत बाहेर | ... | जाळीतजाळीत बाहेर |
| ,, | ,, | ९ | ... | जळ करणार | ... | जळ न करणार |
| ४५ | ,, | ६ | ... | स्त्रीच्या रजाचें प्रदर्शन | ... | अरसज्ञपणा |
| ४६ | ,, | १७ | ... | शुक्राचें | ... | शुक्राची |

| पृष्ठ | | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|---|
| ४७ | खालून | २ | बुळबुळीत | रूक्ष |
| ४९ | वरून | ६ | रोग | दोष |
| ,, | ,, | ७ | बुळबुळित | रूक्ष |
| ,, | खालून | ७ | वज | वेखंड |
| ,, | ,, | ,, | कडासाल | कुड्याचीसाल |
| ५० | वरून | ३ | पांच बोरें | पंचकोळ |
| ,, | ,, | ४ | काळी पाठ | पहाड मूळ |
| ,, | ,, | १० | ,, | ,, |
| ५१ | खालून | १ | ३४ | २४ |
| ५७ | वरून | ८ | बराच | कांहींसा |
| ६१ | ,, | ७ | पूड | खोड |
| ६२ | ,, | १ | लांब लांब आणि पोकळ | लांब व रुंद |
| ६३ | वरून | ८ | जोड, उर | जोड, ज्ञानतंतु, उर |
| ,, | ,, | १२ | हिच्या | हिचे |
| ,, | ,, | ,, | रंगाच्या | रंगाचे |
| ,, | ,, | ,, | गुठळ्या | लचके |
| ,, | ,, | १३ | लेल्या | लेले |
| ,, | ,, | २० | वट | चिवट |
| ६४ | ,, | २ | उरामध्यें शिंपी पाशीं | नाभीपाशीं |
| ,, | ,, | २ | होऊन गळ्यापर्यंत | होऊन उरामध्यें गळ्यापर्यंत |

| पृष्ठ | | आळ | | अशुद्ध | | शुद्ध |
|---|---|---|---|---|---|---|
| ६५ | वरून | ३ | ... | अन्ननलिका आणि | ... | अन्ननलिका मोठी रसवाहिनी आणि |
| ६६ | ,, | १६ | ... | रवंथ | ... | मदत |
| ,, | खालून | ३ | ... | पोकळ | ... | रुंद |
| ६७ | ,, | ८ | ... | होजरी | ... | अन्नाशय |
| ,, | ,, | ,, | ... | अन्नमार्गाचा | ... | अन्न राहण्याचा |
| ,, | ,, | ७ | ... | होजरींत | ... | अन्नाशयांत |
| ,, | ,, | ५ | ... | तिचा | ... | त्याचा |
| ,, | ,, | ४ | ... | तिच्या | ... | त्याच्या |
| ,, | ,, | २ | ... | होजरीमध्यें | ... | अन्नाशयामध्यें |
| ,, | ,, | १ | ... | होजरीच्या | ... | अन्नाशयाच्या |
| ६८ | वरून | ६ | ... | होजरीचें | ... | अन्नाशयाचें |
| ,, | खालून | ७ | ... | होजरी | ... | अन्नाशय |
| ६९ | ,, | ६ | ... | आहेत—एक | ... | आहेत फुप्फुसेंही दोन आहेत—एक |
| ७० | वरून | १ | ... | रक्त | ... | हवा |
| ,, | ,, | १ | ... | भरलेलें | ... | भरलेली |
| ७१ | ,, | ५ | ... | येतें आणि | ... | येतें व फुप्फुसांत जातें आणि |
| ,, | खालून | ५ | ... | लंब गोल व लों-ध्यासारखा | ... | लंब गोल लों-ध्यासारखा |
| ७२ | वरून | ३ | ... | मदु | ... | मेंदु |
| ७४ | ,, | १६ | ... | गर्भाशीं | ... | गर्भांडाशीं |

| पृष्ठ | | ओळ | | अशुद्ध | | शुद्ध |
|---|---|---|---|---|---|---|
| ७६ | खालून | ४ | ... | ह्याऽ | ... | ह्या |
| ,, | ,, | २ | ... | यत्रैतस्थ | ... | यत्रैतस्य |
| ७८ | वरून | १ | ... | महास्नें | ... | महास्नेह |
| ,, | ,, | ३ | ... | कर्मांचा असा | ... | कर्मांचा आश्रय असा |
| ,, | ,, | ८ | ... | यात्रा | ... | मात्रा |
| ८० | ,, | १८ | ... | मार्गानें न जाणारे | ... | मार्गाला न जाणारे |
| ८१ | ,, | १ | ... | सुन | ... | सश्रुन |
| ८२ | ,, | ,, | ... | वैद्य | ... | जीविताभिसर |
| ,, | ,, | १२ | ... | तेच खरे | ... | तेच जीविताभिसर म्हणजे खरे |
| ८३ | खालून | ३ | ... | शरीरांत | ... | शरीर |
| ८५ | वरून | १३ | ... | काणि | ... | कठिण |
| ,, | ,, | १७ | ... | एवढ्याचा | ... | एकट्याचा |
| ,, | खालून | ४ | ... | पाणी | ... | पान |
| ८६ | वरून | १० | ... | कोपविणाऱ्या व प्रतिकूळ | ... | कोपविणाऱ्या प्रतिकूळ |
| ८७ | खालून | ४ | ... | वातप्रकोप्याचा | ... | वातप्रकोपाचा |
| ९१ | वरून | १६ | ... | मृष्टिक्रमाला | ... | उत्तम वैद्याच्या अपेक्षेनें |
| ९५ | ,, | ३ | ... | अस्थिरपणावरून | ... | स्थिरपणावरून |
| ,, | ,, | ४ | ... | क्यावरून | ... | काळावरून |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
| --- | --- | --- | --- |
| ९५ | वरून १७ | विशेष वेदने- वरून | वेदनाविशेषा वरून |
| ,, | ,, ७ | उलट उपाय | उलट सुलट उपाय |
| ,, | खालून १ | दोषित | दोष |
| ९६ | वरून ४ | विपद | विशद |
| ९७ | ,, १ | काग्र | कृस |
| ९८ | खालून १० | कोष्ठ | ओष्ठ |
| ,, | ,, ९ | कृम, उर | ग्वांदा |
| ९९ | ,, १२ | मांड्या | ढुंगण |
| ,, | ,, ,, | आहेत ज्यांच्या | आहे ज्याचें |
| १०० | ,, १७ | बुळबुळित | रूक्ष |
| ,, | ,, २ | ,, | ,, |
| १०५ | वरून ४ | नां | तें |
| ,, | ,, १७ | विकारांमुळें | विहारांमुळें |
| १०६ | ,, १ | अळशी | जवस |
| ,, | ,, २ | गान्हा | गोभा (वाघचा-वडा) |
| ,, | ,, १० | हवेंन कामानें | काळांत |
| १०७ | ,, १२ | रोगापैकीं | दोषांपैकीं |
| १०८ | ,, ३ | अपचन | अपचीं |
| ,, | खालून ४ | दोन आणि एक अशा | दोन अशा |

| पृष्ठ | | ओळ | | अशुद्ध | | शुद्ध |
|---|---|---|---|---|---|---|
| १०९ | वरून | ९ | ... | वायव्य | .. | वायवीय |
| ,, | ,, | १० | ... | आकाश्य | ... | आकाशीय |
| ,, | ,, | १६ | ... | संघ (समुदाय) | .. | बांधा |
| ,, | ,, | १९ | ... | स्नेह | .. | स्नेहन |
| ,, | ,, | २० | ... | संघाताला पृथक् | .. | बांध्याला शिथिल |
| ११३ | ,, | ५ | ... | तपर्ण | ... | तर्पण |
| ११४ | ,, | ६ | ... | मध्यभक्त | ... | मध्ये भक्त |
| ११५ | ,, | १६ | ... | ज | ... | जें |
| ११६ | ,, | ७ | ... | सुरकुत्या | ... | वण |
| ११७ | ,, | ५ | ... | चंद्राम | ... | चंद्राच्या |
| ११९ | ,, | ५ | ... | अनिष्ट | ... | अरिष्ट |
| ,, | ,, | ८ | ... | अशनी | ... | अशनि |
| ,, | खालून | ८ | ... | भगेंद्र | ... | भगंदर |
| ,, | ,, | २ | ... | शून्य झाल्या-मुळें | ... | (हे शब्द नकोच) |
| ,, | ,, | १ | ... | मेहरली | ... | सुजली |
| १२० | वरून | १ | ... | कापरें | ... | पोटफुगी |
| ,, | ,, | १२ | ... | शून्य झालें | ... | सुजलेलें |
| १२२ | ,, | ६ | ... | काख | ... | खांदा |
| १२३ | खालून | २ | ... | फुगणें | ... | जड होणें |
| १२६ | ,, | १ | ... | कत्येक | ... | कित्येक |
| १२९ | वरून | ९ | ... | उदर | ... | कोठा |
| १३१ | खालून | ५ | ... | स्नेहन | ... | स्वेदन |
| १३२ | वरून | २ | ... | अति वृद्धि | ... | अति वृद्ध |

| पृष्ठ | | ओळ | | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|---|---|
| १३४ | वरून | २ | ... | साडेतेरा पळांचा... | सव्वीस तोळ्यांचा |
| १३५ | ,, | ४ | ... | शरीर जाडें व भारयुक्त झालें असेल ... | ओकारीनें जबडे आंखडले असतील |
| ,, | ,, | ११ | ... | मोठी ... | हवी तशी |
| १३७ | ,, | २ | ... | प्रगेह ... | प्रमेह |
| ,, | ,, | १४ | ... | श्लेमल ... | श्लेष्मल |
| १३८ | खालून | ३ | ... | सरळ ... | उताणें |
| १३९ | वरून | १ | ... | पोटरीच्या ... | मांड्यां |
| ,, | ,, | ५ | ... | स्मेह ... | स्नेह |
| ,, | ,, | १६ | ... | अनुक्रमें मज्जेला आणि शुक्राला ... | अनुक्रमें, अस्थीला व मज्जेला |
| ,, | ,, | ,, | ... | हानववा ... | हा |
| १४० | ,, | १४ | ... | कांटाशेरी ... | कोरांटी |
| ,, | ,, | १५ | ... | गुंज ... | कावळी |
| ,, | ,, | १६ | ... | अतसी ... | अळशी |
| १४१ | ,, | ३ | ... | अनुवामन आणि आस्थापन बस्तीच्या ... | अनुवासन बस्तीच्या |
| ,, | खालून | ९ | ... | आणि पलाशबीज ... | शेरणी व गेळफळ |
| ,, | ,, | ७।६ | ... | त्यांचें चूर्ण ... | त्यांचा कल्क |
| १४३ | ,, | ७ | ... | पळस ... | शेरणी |
| ,, | ,, | ८ | ... | जायफळ ... | गेळफळ |

| पृष्ठ | | ओळ | | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|---|---|
| १४४ | वरून | ४ | ... | उत्तम | ... उत्तर |
| ,, | खालून | ४० | ... | हा | ... सर्व |
| ,, | ,, | ,, | ... | पोहचला | ... पोहचले |
| ,, | ,, | ,, | ... | म्हं० | ... आणि |
| १४६ | वरून | ७ | ... | वायु | ... ( काढून टाकणें ) |
| ,, | ,, | ८।९ | ... | तो बहुधा स्नेहा बरोबर मिळवून विरेचन | ... ( काढून टाकणें ) |
| ,, | ,, | ९ | ... | नस्य | ... स्नेहन नस्य |
| ,, | खालून | ७ | ... | वायु | ... फेंपरें |
| ,, | ,, | ६ | ... | सरशव व कठ | ... शिरस व कोष्ठ-कोठिंजन |
| १४७ | वरून | १ | ... | दोन रुपये भार | ... आठ शाण भार |
| ,, | ,, | २ | ... | एक रुपया | ... चार शाण |
| ,, | ,, | ३ | ... | अर्धा रुपया | ... एक शाण |
| ,, | ,, | १० | ... | वमनाचें | ... वमन किंवा |
| ,, | ,, | १३ | ... | काखेच्या | ... खांद्याच्या |
| ,, | ,, | १४ | ... | अलौलिक | ... अकालिक |
| ,, | ,, | १६ | ... | तेलाचें | ... स्नेहाचें |
| ,, | खालून | १ | ... | कोंच्या | ... कुहिली |
| ,, | ,, | १ | ... | आसोंदरा | ... आपटा |
| १४८ | ,, | ४ | ... | माल कांकणीचें | ... पिंगवीचें |
| १४९ | वरून | १३ | ... | द्वारे ते | ... द्वारें व मुखद्वारे |
| ,, | ,, | १६ | ... | व राग | ... ( काढून टाकणें ) |

| पृष्ठ | | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|---|
| १५० | खालून | ३ | ... अन्न, दहीं | ... अन्न पुष्कळ खाल्लें व दहीं |
| १५१ | .. | २७ | ... व्रण धूमामध्यें | ... व्रण धूपन धूमामध्यें |
| .. | .. | १८ | ... भिजविलेल्या | ... भिजवलेली वात |
| .. | .. | .. | ... नळीला चिलमींत घालून | ... नळींत घालून |
| .. | .. | १८ | ... शेवग्याच्या | ... शरावाच्या |
| .. | .. | ८ | ... तिक्तांचें | ... मिऱ्यांचें |
| १५२ | .. | १३ | ... पित्त | ... तिक्त |
| १५३ | वरून | १ | ... तर | ... तों पर्यंत व |
| .. | खालून | ९ | ... थंडें | ... थंड |
| .. | .. | ६ | ... बिजोऱ्याच्या तंतूंन | ... महाळुंगाचे तंतु, |
| १५४ | वरून | ७ | ... कवट | ... कोष्ठकोळिंजन, |
| .. | .. | १४ | ... हीन | ... लघु गुणाचे |
| १५५ | .. | २ | ... द्रव्य आणि | ... द्रव्य, दोष आणि |
| .. | .. | ८ | ... व | ... हें |
| .. | .. | ५ | ... हें | ... ( काढून टाकणें ) |
| .. | खालून | ८ | ... स्नेहाच्या उष्ण-तेच्या | ... स्नेहाच्या व उ-ष्णतेच्या |
| १५७ | वरून | १० | ... तो | ... लवण हें |
| .. | .. | १३ | ... क्षार | ... लवण |
| १६० | खालून | ११ | ... संस्था | ... ( काढून टाकणें ) |
| .. | .. | २ | ... घुसळण्यानें | ... मथण्यानें |

| पृष्ठ | | ओळ | | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|---|---|
| १६३ | खालून | ५. | ... | स्थितीमध्यें असतां | ... स्थानीं बसून |
| १६६ | ,, | ८ | ... | गुप्त मांधा | ... मांधा |
| १६९ | ,, | १४ | ... | ऐरणी | ... अरणी |
| १७० | ,, | ७ | ... | सारवा, श्वेत उपलसरी | ... ( काढून टाकणें ) |
| १७२ | वरून | ४ | ... | काळीपाठ | ... काळीपाठ ( पहाड मूळ ) |
| ,, | खालून | ६ | ... | कांटे आशरी | ... कांटे आशरी ( कोरांटी ) |
| १७३ | वरून | ७ | ... | कुंब | ... कुंभी |
| १७५ | ,, | ६ | ... | कंकोळ | ... कंकोळ(कांकोळी) |
| ,, | ,, | १४ | ... | खरखोडी | ... खरखोडी (हरणवेल ) |
| १७६ | ,, | १६ | ... | गर्ळजभी | ... गर्ळजभी(पाथरी) |
| ,, | ,, | ,, | ... | वायुहारक | ... वायुकारक |
| १७८ | ,, | ९ | ... | गंगेटी | ... गंगेटी ( गांडेधामण ) |
| ,, | ,, | १९ | ... | चणकबाव | ... चणकबाब ( कंकोळ ) |
| १७९ | ,, | १० | ... | चारवेल | ... चंदवेल |
| ,, | ,, | १२ | ... | अशेरी | ... अशेरी (अहाळींव) |
| ,, | ,, | ,, | ... | जवाण | ... यवान ( किरमाणी ओंवा ) |

| पृष्ठ | | ओळ | | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|---|---|
| १७९ | खालून | १ | ... | चिमेड | ... चिमेड ( रान-कुळीथ ) |
| १८० | वरून | १ | ... | चिली | ... चिली (चाकवत) |
| ,, | खालून | २ | ... | जवाण | ... जवाण (यवान=किरमाणी ओंवा ) |
| १८१ | वरून | १ | ... | जवम | ... जवस ( तांबडा धमासा ) |
| १८२ | ,, | ४ | ... | झेंडू | ... झेंडू ( दोडकी ) |
| ,, | ,, | ७ | ... | टांको | ... टांको ( पालकी भाजी ). |
| १८३ | खालून | २ | .... | कानकिरळी | ... विसर्प |
| १८६ | ,, | ९ | ... | तुंबडी–कफ | ... तुंबडी ( तानीचा वेल. )–कफ |
| ,, | ,, | ,, | ... | पित्त | ... वात |
| १८७ | वरून | १० | ... | ( गजपिंपळी ) | ... ( काढून टाकणें ) |
| १८८ | ,, | ७ | ... | ( पांढरा ) | ... ( काढून टाकणें ) |
| ,, | खालून | ६ | ... | बहुफळी–कड-वट | ... बहुफळी ( बाफ-ळी )–कडवट |
| ,, | ,, | ४ | ... | बळदाणा–पु-ष्टिकारक | ... बळदाणा (चिकणा)–पुष्टिकारक |
| ,, | ,, | २ | ... | प्रमेहातिसार | ... आमातिसार |
| १८९ | वरून | २ | ... | बीही | ... बाहवा |
| १९१ | खालून | १० | ... | मरवा–कपाय | ... मरवा (सबजा)–कपाय |

| पृष्ठ | | ओळ | | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|---|---|
| १९१ | खालून | ८ | ... | व बस्ति | ... ( काढून टाकणें ) |
| ,, | ,, | ३ | ... | मालकांकणी– | ... मालकांकणी |
| | | | | तिची | ... (पिंगवी)–तिची |
| १९२ | वरून | ८ | ... | मुसळकंद-मधुर | ... मुसळकंद ( सफेद मुसळी)–मधुर |
| १९३ | ,, | ६ | ... | मोहरी | ... तांबडी |
| ,, | ,, | १०।११ | ... | कानकिरळी | ... विसर्प |
| ,, | ,, | १२ | ... | रतवेल–वीर्य | ... रतवेल ( जल पिंपळी )–वीर्य |
| १९४ | ,, | ५ | ... | पचविणारा | ... पिकवणारा |
| ,, | ,, | ० | ... | कानकिरळी | ... विसर्प |
| ,, | ,, | ,, | ... | प्रण व शूळ | ... व्रण व शूळ |
| ,, | ,, | ११ | ... | रिंगणी–स्वादिष्ट | ... रिंगणी (वांगी)–स्वादिष्ट |
| ,, | ,, | १३ | ... | रूपामुखी–नेत्राला | ... रूपामुखी ( रौप्य माक्षिक)–नेत्राला |
| १९५ | ,, | १ | ... | लवाळा | ... लवाळा ( रान मोगरी ) |
| ,, | खालून | ३ | ... | कानकिरळी | ... विसर्प |
| १९६ | ,, | ११ | ... | कानकिरळी | ... विसर्प |
| ,, | ,, | ८ | ... | विकळ | ... विकळ (वेहकळ) |
| ,, | ,, | ६ | ... | विदारीकंद | ... विदारीकंद (भुईकोहळा ) |
| १९७ | ,, | ८ | ... | शंखावळी | ... शंखाहुली |

| पृष्ठ | | ओळ | | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|---|---|
| १९८ | वरून | १ | ... | शामा | ... शामा ( सांवें ) |
| १९९ | ,, | ३ | ... | पिंपरीमूळ | ... पिंपळमूळ |
| ,, | खालून | ७ | ... | सताप | ... सताप (सातविण) |
| २०१ | वरून | ५ | ... | हंसराज | ... हंसराज ( रक्त-लाजाळू ) |
| ,, | ,, | ६ | ... | किरळी | ... विसर्प |
| २०२ | ,, | ४ | ... | हिराबोळ | ... हिराबोळ (रक्तया-बोळ ) |
| २०३ | वरून | ३ | ... | अमृतासाठी | ... ( काढून टाकणें ) |
| २०५ | ,, | ३ | ... | पाणघोडा | ... पाण घोरपड |
| ,, | खालून | १ | ... | मगर | ... सरडा |
| २०६ | वरून | ३ | ... | गरळ | ... गर |
| ,, | ,, | ६ | ... | गरळ | ... गर |
| २०७ | ,, | १४ | ... | वात | ... श्वास |
| २०९ | ,, | १ | ... | पित्ताचे | ... वाताचे |
| ,, | ,, | ११ | ... | संचळखार | ... साजीखार |
| ,, | ,, | १२ | ... | कठ | ... कोष्ठकोळिंजन |
| २१० | खालून | ५ | ... | काळीपाट | ... पहाडमूळ |
| ,, | ,, | ,, | ... | शिरिप | ... शिरीष |
| ,, | ,, | ३ | ... | साटोडी | ... पुनर्नवा |
| २११ | ,, | १८ | ... | शिरसाच्या | ... शिरीषाच्या |
| ,, | ,, | ९ | ... | कवठ | ... कोष्ठकोळिंजन |
| ,, | ,, | ८ | ... | शिरसाची | ... शिरीषाची |
| ,, | ,, | ३ | ... | मरोड | ... पुणेर |

| पृष्ठ | | ओळ | | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|---|---|
| २१३ | खालून | २ | ... | कठ | ... कोष्ठकोळिंजन |
| ,, | ,, | ,, | ... | शिरसाची | ... शिरीषाची |
| २१४ | ,, | १८ | ... | कावीळ | ... करणी |
| २१४ | ,, | १० | ... | कवठ | ... कोष्ठकोळिंजन |
| ,, | ,, | ८ | ... | त्यांच्यांत | ... पाण्यांत |
| ,, | ,, | १ | ... | काथ | ... खांदें |
| २१५ | ,, | १६ | ... | पायांत | ... वायांत |
| ,, | ,, | १५ | ... | पळस | ... काळा मोखावृक्ष |
| ,, | ,, | ,, | ... | गुळवेल | ... गोकर्णी |
| ,, | ,, | १४ | ... | शिरस | ... शिरीष |
| ,, | ,, | १३ | ... | अतवशेक | ... अतिविष |
| ,, | ,, | ६ | ... | त्याला गर | ... त्यालाही गर |
| ,, | ,, | ५ | ... | बोजट रंगाचा | ... निस्तेज |
| ,, | ,, | २ | ... | यकृत | ... अंडवृद्धि |
| २१६ | वरून | ८ | ... | पोळलेल्या | ... पीडलेल्या |
| २१९ | ,, | २ | ... | होझरी | ... अन्नाशय |
| ,, | ,, | ६ | ... | सोनामुखी | ... गेळफळ |
| ,, | खालून | २ | ... | काकमारी | ... काकमारी (म नुली) |
| २२० | ,, | १२ | ... | लडबडं | ... ताठ |
| २२२ | वरून | ७ | ... | गौघेर | ... गौधेर |
| २२३ | ,, | ११ | ... | भित्र्या | ... सर्पाचा स्पर्श झ ल्यानेच भित्र्या |
| ,, | ,, | १५ | ... | उद्वेग | ... विषासारखा वेग |

| पृष्ठ | | ओळ | | अशुद्ध | | शुद्ध |
|---|---|---|---|---|---|---|
| २२४ | वरून | ९ | ... | ठणका | ... | दाह |
| ,, | ,, | १० | ... | लागतो | ... | होतो |
| २२५ | खालून | ६ | ... | कर्णस्थानांत | ... | छेद केल्यानेही |
| २२८ | वरून | २ | ... | गरणी | ... | गोकर्णी |
| ,, | ,, | ३ | | | | |
| ,, | ,, | ४ | | | | |
| ,, | ,, | ८ | ... | आपटा | ... | आसंध |
| ,, | ,, | १२ | ... | वडाची पारंबी | ... | वडाच्या कोंवळ्या बोळ्या |
| ,, | खालून | २ | ... | फार | ... | थोडी |
| ,, | ,, | ,, | | | | |
| २३० | वरून | २ | ... | सुकटलेल्या तोंडाचा | ... | कोरड पडलेला |
| ,, | ,, | ११ | ... | उद्भ्रम | ... | उचिटिंग |
| ,, | ,, | १८ | ... | पित्तकृतीच्या | ... | पित्तप्रकृतीच्या |
| २३२ | ,, | २ | ... | शून्यत्व | ... | सूज |
| ,, | खालून | ३ | ... | कट | ... | कोष्ठकोळिंजन |
| २३४ | वरून | १ | ... | पाहण्यानें | ... | पाणी पाहिल्यानें |
| ,, | ,, | ७ | ... | शेकावें | ... | भाजावें |
| ,, | ,, | १७ | ... | गळजिभी | ... | पाथरी. |
| २३६ | ,, | ८ | ... | आसात्म्य, अनिल | ... | दोष |
| ,, | ,, | ९ | ... | पोट | ... | कोठा |
| ,, | ,, | ,, | ... | परिहार, पाक | ... | परिहार, उपचार, पाक |

| पृष्ठ | | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|---|
| २३६ | वरून | १४ ... | सेवनविरुद्ध | ... सेवन देशविरुद्ध |
| ,, | ,, | १६ ... | सेवनविरुद्ध | ... सेवन काळविरुद्ध |
| ,, | ,, | १८ ... | पदार्थविरुद्ध | ... पदार्थ अग्निविरुद्ध |
| ,, | खालून | ९ व ६ ... | यांच्या मध्यंतरी पुढील शुद्ध अधिक घालणें:—मध व तूप यांचे समान भाग सेवन केल्यास, हें मात्राविरुद्ध होय. | |
| ,, | ,, | ४-३-२ ... | जो पदार्थ ज्याला मानवत नाहीं त्याचा उपयोग त्याला करण्याचा प्रसंग आला म्हणजे तो असात्म्य विरुद्ध. | (हें वाक्य काढून टाकणें.) |
| २३७ | वरून | ९ } ... | पोटाच्या | ... कोठ्याच्या |
| ,, | ,, | १० } | | |
| ,, | ,, | १२ ... | आसक्ति | ... अशक्ति |
| ,, | खालून | ३ व २ ... | ओळीच्या मध्यंतरी पुढील वाक्य अधिक घालावें:—योग्य आहार पदार्थाचा अयोग्य सामग्री बरोबर उपयोग केल्यास, तो उपचारविरुद्ध समजावा. | |
| ,, | ,, | २ ... | विषारी | ... दुष्ट |
| २३८ | वरून | ५ ... | जे तोंडी लावण्याचे पदार्थ सांगितले | ... जे पदार्थ अगोदर किंवा मागाहून खावे ह्मणून सांगितले |
| २३९ | खालून | ७ ... | उत्तेजित करून | ... उकरून काढून |

बहिरा, मुका, मस्तकाची पीडा भोगणारा, खोकला, श्वास आणि शोष या पीडांनीं पीडित आणि कुबडा असा निपजतो. यासाठीं या वेळीं खालून वर चोळीत जावें. अशा प्रकारें उपचार करीत असतांही गर्भ प्रसवस्थानांत अडकून बसलेला दिसला तर त्याच्या मुखभागाला काळ्या सर्पाच्या कांतीचा अथवा मदनफळाचा धूप द्यावा. त्यानंतर जन्मणाऱ्या बाळकाचें मुख आणि वारेत वेटाळलेला शरीराचा भाग हीं तुपांत सैंधेलोण विरवून त्यानें शुद्ध करावीं. तुपांत बोळलेली घडी टाळूवर ठेवावी. नंतर बाळकाच्या नाभींत राहिलेलें नाळ मुळापासून आठ बोटांवर भक्कम रीतीनें दोऱ्यानें बांधावें आणि पुढचा भाग कापून टाकावा. बांधलेला भाग बाळकाच्या गळ्या भोंवतीं अडकवून ठेवावा. नंतर बाळकास थंड पाण्यानें आंघोळ घालून जातकर्म करावें. तें कर्म पुरें झाल्यावर मध, तूप, तांबडा धमासा व ब्राह्मी यांच्या रसांत सुवर्णाचें चूर्ण घालून तें करंगळीजवळच्या अनामिका नामक बोटानें बाळकास चाटवावें. नंतर देशकाळ पाहून आणि आपल्या शक्ती-प्रमाणें अनेक सुगंधि पदार्थ मिश्रित करून आणि सोनें, रुपें घालून उकळलेलेल्या पाण्यानें बालकास स्नान घालावें.

**प्रसूता स्त्रीची व्यवस्था**—प्रसूता स्त्रीच्या हृदयांतील नाडीचीं मुखें संकोच पावल्यामुळें तीन चार दिवसानंतर यथास्थित स्तनांत दूध येऊं लागतें, यासाठीं पहिले दिवशीं तांबड्या धमाशासहित तूप आणि मध एकत्र करून, तीन वेळ बाळकास पाजावें. दुसरे आणि तिसरे दिवशीं आपल्या तळहातावर राहील तितकें तूप आणि मध विषम भाग-घेउन बाळकास दोन वेळां पाजावें. आणि नंतर त्यास आंगावर स्तन पिण्यास द्यावें. सूतिकेला बलदाण्याचें तेल अंगाला चोळून वातहारक औषधींचा काढा द्यावा. असें केलें असतां ही सूतिकेच्या अंगात कांहीं दोष राहून गेले असें वाटलें तर पिंपळी, पिंपळमूळ, गजपिंपळी, चित्रक

आणि सुंठ यांचें चूर्ण उन्हून केलेल्या गुळाच्या पाण्यांत पिण्यास द्यावें. याप्रमाणें जोंवर तिच्या अंगांत खराब रक्त असेल तोंवर दोन-तीन दिवस देत जावें. पुष्कळ तूप घातलेली अथवा दुधाची कण्हेरी तीन दिवस पिण्यास द्यावी. बाळंतीण बायकोस दूध देण्यास कित्येक लोकांस दिक्कत वाटते; पण हरकत नाहीं. यानंतर सूतिकेच्या जठराग्नीचें बळ पाहून जंगली जनावराच्या मांसरसाबरोबर भात खाऊं घालावा. याप्रमाणें दीड महिना केल्यावर बाळंतपणच्या आहारविहाराचा त्याग करावा. येथें कित्येक जण असें ह्मणतात कीं पुनः रजोदर्शन होई तों पर्यंत असेच हे उपचार चालू ठेवावे. बळकट स्त्रीला तीन रात्रीस अथवा पांच रात्रीस कांजी पाजावी. त्यानंतर स्निग्ध अन्न खाऊं घालावें, आणि तिला खूब ऊन पाण्यानें आंग धुऊं घालावें. बाळंतिणीनें क्रोध, मेहनत, आणि मैथुन यांचा त्याग करावा. मिथ्या आहारविहारानें बाळंतिणीच्या अंगात जो व्याधि उत्पन्न होतो तो कष्टसाध्य समजावा. आणि वा अत्यंत उपवासादिकांनीं क्वचितच साध्य होतो. या सर्व कारणांस्तव देश काळ आणि पथ्याचा विचार करून बाळंतिणीचा सांभाळ करावा. प्रसूत स्त्रीचें रूक्ष शरीर पाहून तीक्ष्ण उपायांनीं तिच्या शरीरांतील रक्ताची जर शुद्धि न झाली तर त्या देशीं असलेल्या वायूनें आडविलेलें रक्त नाभीच्या खालीं, दोनही कुशींत, बस्तींत अथवा बस्तीच्या मस्तकांत गांठ उत्पन्न करतें. नंतर नाभि, बस्ति आणि उदर यांच्यांत शूळ उत्पन्न होतो, आणि पक्वाशय जणों सुईनें टोंचत असावा, भिन्न होत असावा, फाटत असावा अशी अनिवार वेदना होते. त्याच प्रमाणें पोटांत चहुंकडे गडबड होऊं लागते आणि मूत्राचा निरोध होतो. या रोगास "मक्कल" असें ह्मणतात. या रोगांत जवखाराचें चूर्ण तुपांत अथवा थोड्या ऊन पाण्यांत घालून द्यावें; पिंपळीच्या काढ्यांत मिठाची पूड

घालून द्यावें; सुरेच्या मंडाबरोबर पिंपळीचें चूर्ण द्यावें: अथवा त्रिकटु (सुंठ, मिरी, पिंपळी); चातुर्जातक (दालचिनी, तमालपत्र, वेलची, व धने) आणि नागकेशर यांनीं युक्त जुना गूळ खाऊं घालावा आणि वर स्वच्छ अरिष्ट प्यावयास द्यावें.

**नुकताच जन्मलेल्या बाळकाची व्यवस्था**—नुकत्याच जन्मलेल्या बाळकास रेशमी फडक्यांत गुंडाळून रेशमी वस्त्रांनीं बनविलेल्या गोधडीच्या आंथरुणावर निजवावें. पिलुवृक्षाच्या आणि लिंबणीच्या पानासहित हिरव्या लिंबाच्या डाहाळीनें त्यावर वारा घालावा. नेहमीं त्याच्या टाळूवर तेलांत फडक्याची घडी बुडवून ती ठेवावी. त्याचे हात, पाय, मस्तक आणि गळा यांच्या ठिकाणीं रक्षा बंधन करावें. त्याच्या आसपासच्या प्रदेशीं अग्नीचा शेक ठेवावा. नंतर दहाव्या दिवशीं मंगळ वस्तु धारण करवून त्याच्या आईबापांनीं त्याच्या नक्षत्रास अनुसरून आवडतें असें नांव ठेवावें.

**दाई**—त्या बाळकास स्तन पाजण्यास दाई ठेवावी. ती त्याच्या जातीची, मध्यम आकाराची, तरुण अवस्थेंतली, रोगरहित, सुशील, चंचळतारहित, लोभरहित, सडपातळ ह्मणजे फार जाड नाहीं व फार कृश नाहीं अशी, निर्मळ दुधाची, लांब ओठाशिवायची, मोठाल्या स्तनांची, सर्व अवयवांनीं संपूर्ण, अफू वगैरे व्यसनांनीं मुक्त, जीवंत मुलांनीं लेकुरवाळी, बाळकावर प्रेम ठेवणारी, तुच्छ कामें न करणारी, आणि चांगल्या कुळांत उत्पन्न झालेली, असेच दुसरे ही चांगलेच गुण जिच्यांत आहेत अशी असावी. अशा दाईपासून बाळकाच्या अंगीं आरोग्य आणि बळ यांची वृद्धि होते. उंच स्तनांची दाई असली तर त्याला पिणारें बाळक भयंकर निपजतें लांब स्तनांची दाई असली तर तिला पिणारे बाळकाचें नाक आणि तोंड दबलें जातें आणि त्यामुळें मरण ही येतें. वर सांगीतलेल्या

चांगल्या गुणांनीं युक्त अशा दाईनें शुभ दिवशीं आपल्या घरीं बोलावून आणून, डोक्यावरून आंघोळ घालून, नवीं वस्त्रें पांघरवून पूर्वेकडे तोंड करून बसवून, तिचा उजवा स्तन धुऊन टाकवून त्यांतील थोडेंसें दूध पिळून टाकवावें. नंतर त्या दाईनें बाळकाचें मुख उत्तरेकडे करून पाजण्यास घ्यावें. पाजते वेळीं दाईनें बाळकाच्या मस्तकावर हात ठेवावा. दाई एकच असावी; अनेक दाई ठेवल्यानें बाळकाच्या शरीरांत रोग उत्पन्न होतात. पहिल्यानें स्तनांतून थोडेंसें दूध बाहेर पिळून न टाकतां जर पाजण्यास मूल घेतलें तर दुधानें भरलेल्या स्तनांतून निघणाऱ्या दुधाच्या प्रबळ धारांच्या प्रवाहाच्या प्रत्याघातानें खोकला, दमा वगैरे रोग उत्पन्न होतात. क्रोध, शोक, व प्रेमाऽभाव यामुळें स्त्रीचें दूध जळून जातें. दाईला दूध फार सुटावें म्हणून तिला संतोषित ठेवावी. तिला जव, गहूं, साठे तांदूळ, आणि मांसरस इत्यादि पदार्थ खाऊं घालावे.

स्तन्य (दूध)—जर स्तन्य पाण्यांत टाकलें आणि तें पाण्याशीं मिळून गेलें, फेस न आला, आंत तंतु, केसर नसले, वर तरंगत राहिलें नाहीं, फुटलें नाहीं, तसेंच तें शीतळ, निर्मळ, आणि शंखासारखें पांढरें असलें तर तें दूध शुद्ध समजावें. अशा दुधानें बाळकाच्या आरोग्याची व बळाची वृद्धि होऊन शरीराची पुष्टि प्राप्त होते. भुकेलेली, शोकार्त, थकलेली, धातु बिघडलेली, गर्भिणी, ताप आलेली, अतिकृश, अति जाडी, अजीर्ण झालेली आणि विरुद्ध आहारानें तृप्त झालेली अशा दाईच्या दुधानें बाळकास अनेक रोग जडतात. गुरु, विषम आणि दोषयुक्त भोजनानें दाईच्या आंगचे दोष बळ पावून, तिचें दूध बिघडतें. मिथ्या आहारविहार करणाऱ्या अबलेचें आंग रोगानें व्याप्त असतें. यासाठीं तिचें अंगावर पिणारें अल्पअवस्थेचें बाळक आतुर अवस्थेप्रत येऊन पोंचतें. जर आंगावरचें दूध, काळसर, तां-

बळ्या रंगाचें, कषाय, ज्यास कोणताच गंध येत नाहीं असें, फेसाळ, हलकें, तृप्ति न देणारें, बालकाला दुर्बळ करणारें, तसेंच वातविकार उत्पन्न करणारें दिसलें तर तें वातप्रधानें समजावें. जें तांबड्या, हिरव्या, पिंवळ्या आणि काळ्या वर्णाचें आणि कडू, आंबट आणि तिखट रुचीचें, ज्याचा गंध रक्तासारखा, जें अत्यंत उष्ण, तसें जें पित्तविकार उत्पन्न करणारें तें दूध पित्तप्रधान समजावें. जें दूध फार पांढरें, अत्यंत गोड, मागाहून खारट लागणारें, तूप, तेल, वसा, आणि मज्जा यांच्या सारख्या गंधाचें, तर आणि तंतू यांणीं युक्त, आणि श्लेष्म विकार उत्पन्न करणारें, तें कफप्रधान समजावें. या तीन प्रकारच्या स्तन्य दुधाची परीक्षा करून, त्या त्या दोषांस निवृत्त करणारीं औषधें वापरून दाईचें दूध शुद्ध करावें. वरील प्रमाणें खराब दुधाच्या दाईला जव, गहूं, तांबडे तांदूळ, साळ, मूग इत्यादि पदार्थांचा आहार खाऊं घालावा म्हणजे तिचें दूध शुद्ध होईल.

**बाळरोगपरीक्षा आणि चिकित्सा**—जेव्हां बाळक डचकून उठतें, स्पर्श केला तर रडतें आणि डोळे उघडीत नाहीं तेव्हां त्याच्या मस्तकाच्या शिरांमध्यें रोग झाला आहे असें समजावें. जर बस्तींत दोष असला तर मूत्रकृच्छ्रानें पीडलेलें बाळक त्रास व मूर्च्छा पावतें. कोठ्यांत दोष असला तर विष्ठा आणि मूत्र बाहेत येत नाहीं, शरीर सुस्त होतें, उलटी, पोट फुगतें, आणि आंतड्यांत करकर शब्द होतो. सर्व शरीरांत दोष झाला असला तर बाळक रात्रंदिवस रडत असतें. वर सांगितल्या लक्षाणांवरून दोषांची परीक्षा करून मृदु आणि छेदन न करणारें औषध मोजून पाजावें. दूध पिण्याला शिकलें असेल तर बाळकाला, नाहीं तर दाईला दूधांत आणि तुपांत औषध घालून द्यावें. बाळक फक्त दूधच पित असे तोंपर्यंत त्या बाळकाला आणि दाईला अशा दोघांस ही औषध द्यावें असेंही कि-

त्येकांचें मत आहे. अन्न खाण्यास शिकल्यावर फक्त बाळकालाच औषध द्यावें, दाईला देण्याची कांहीं गरज नाहीं. जन्मल्यावर दूध पिणाऱ्या बाळकास दोन बोटाच्या चिमुटभर औषध द्यावें; कल्क केलेलें औषध दर वेळेस चणेबोराच्या अठी एवढें द्यावें, आणि दूध आणि अन्न खाऊं लागलेल्या बाळकास चणेबोरा एवढें द्यावें. बाळकाच्या रोगाची निवृत्ति करण्यांत जीं जीं औषधें सांगीतलीं आहेत त्यांच्या कल्काचें स्तनावर लेपन करून मुलाला पाजावें. फक्त दूध पिणाऱ्या बाळकास वात, पित्त आणि कफ यांनीं उत्पन्न झालेल्या ज्वरामध्यें क्रमानें एक, दोन, आणि तीन दिवसपर्यंत पाजणाऱ्या स्त्रीनें तूप खाऊं नये. दूध आणि अन्न खाऊं लागलल्या बाळकाला ज्वराच्या प्रकरणांत सांगीतलेले औषधोपचार करावे. या ज्वरांत तृषेनें आतुर झाल्यावांचून बाळकास पाजूं नये आणि तसेंच कांहीं कारण पडल्यावांचून विरेचनाचा दवा देऊं नये. कित्येक अनुभवी वैद्याचें असेंही मत आहे कीं मुलाला सतरा वर्षे होत तोंपर्यंत विरेचनाचें औषध देऊं नये, आणि देणें जरूरच पडलें तर शुद्ध एरंडेल द्यावें. वायूच्या प्रकोपानें बाळकाच्या टाळूचा भाग खालीं बसला तर मधुर द्रव्यानें शोधलेलें दूध थोडें प्यावयास द्यावें, आणि त्यानें आंगाला अभ्यंग करावा. वायूच्या प्रकोपानें वर आलेल्या नाभीला तुंडि असें ह्मणतात. त्याच्या निवारणार्थ वायूला हरणारे उपाय स्नेह स्वेद, आणि उपनाह असे करावे. बाळकाचें गुदद्वार सुजलें तर पित्ताचा उपशम करणारी क्रिया करावी. बाळकाच्या शरीराला क्लेश न होतील अशा प्रकारें त्याला घ्यावें, हिसकाहिसक करूं नये. त्रासाच्या भयानें निजलें असलें तर उठवूं नये; वायूच्या भयानें लौकर उचलून हातांत घेऊं नये आणि पाळण्यांत मोठ्यानें झोपा घालूं नयेत. कुबडे होऊं नये म्हणून अगोदर बळानें बसतें करूं नये. त्याला आवडीचे

पदार्थ द्यावे. या प्रमाणें बाळकाच्या मनाला खुश ठेवल्यानें दिनप्रतिदिन त्याचें शरीर वृद्धि पावतें, बळवान होतें आणि रोगी होत नाहीं, तसेंच नेहमीं आनंदांत राहतें.

**बाळकरक्षण**—थंडी, ऊन, वारा, विजेचा तडाका, वृक्ष, लता, पडित घर आणि उतरती जमीन यांच्या पासून बाळकाचें रक्षण करावें. अशुचि स्थानीं, आगाशीवर, वाकड्यातिकड्या जागीं, तापलेल्या जागीं, अति वाऱ्याच्या ठिकाणीं, पावसांत, धूळ उधळल्या जागीं, धुरकट जागीं आणि पाणथळ जागीं बाळकाला संभाळणाऱ्यावांचून एकटें सोडून जाऊं नये. ज्या बाळकाला दूध पिऊन पचविण्याचें सामर्थ्य असेल त्याला गाईचें दूध पाजावें. तें तरी दाईच्या जेवढ्या दुधानें तृप्ति होते तेवढेंच पाजावें. साहा महिन्यांचें लेकरूं झालें ह्मणजे त्याला हलकें आणि हितकर असें अन्न खाऊं घालूं लागावें.

**विवाहाला योग्य काळ**—अशा मुलाकडून शक्तिसंपन्न जाणून विद्याभ्यास करवावा. आणि पंचवीस वर्षांचा झाल्यावर बारा वर्षांच्या कन्येबरोबर विवाह करावा. असें केल्यानें उत्तम संतति प्राप्त होऊन पितरादिकांचें ऋणांतून मुक्तता होते आणि धर्म, अर्थ आणि काम यांची प्राप्ति होते. सोळा वर्षांच्या आंतल्या वयाची स्त्री आणि पंचवीस वर्षांच्या आंतील वयाचा पुरुष यांच्या समागमानें उत्पन्न झालेला गर्भ पोटांत नाश पावतो. कदाचित् जीवंत उपजला तर फार काळ जगत नाहीं आणि जगला तरी त्याचीं इंद्रियें आणि त्याचें शरीर हीं शिथिल होतात. वृद्ध, फार दिवसांची, रोगट आणि इतर विकारांनीं व्याप्त अशा स्त्रीच्या ठिकाणीं गर्भाची स्थापना करूं नये, आणि अशा प्रकारच्या पुरुषानें केलेल्या गर्भस्थापनेंत हीच दोष सांगितले आहेत.

सगर्भा स्त्रीला होणारें रजोदर्शन आणि त्याची चिकित्सा--गर्भिणीनें सेवन न करण्यासारख्या आहारविहाराच्या उपयोगानें अथवा गर्भिणीच्या शरीरांत उत्पन्न झालेल्या रोगानें उदरांत गर्भ असतां ही प्रसवस्थानामध्यें रजोदर्शन झालें आणि शूळ उद्भवला तर शरीराच्या बाहेरच्या भागीं तसेंच आंतल्या भागीं स्निग्ध आणि शीत उपचार करावे. वाळा, कमळ, चंदन, चिंकाच्या पिंपळ आदि वृक्षांच्या सालीच्या कल्कयुक्त तुपांत चांगला भिजलेला बोळा प्रसवस्थानांत आणि बस्तींत ठेवावा. पुष्कळ वेळां तुपाला धुऊन, तूप चोपडून वर सांगीतलेल्या औषधींच्या पाण्यांत स्त्रीला नाभिपर्यंत बुडे अशी बसवावी. नंतर साखर, मध, कुमुद, कमळ, आणि उत्पल यांच्या ततूंच्या चूर्णाला तुपांत मिळवून चाटवावें. अथवा जंगली जनावरांचे मांसरसाबरोबर तांबडे तांदुळांचा भात खाऊं घालावा. तसेंच वमन, विरेचन यांणीं रहित अशा रक्तपित्त रोगाच्या निवारणार्थ सांगीतलेले उपाय करावे. तीन महिने पुरे झाले नसतील आणि आमरहित रज अथवा केवळ रज पडूं लागलें तर तें एकदम असाध्य म्हणून समजावें; त्याची चिकित्सा वैद्यानें करूं नये आणि करावी लागली तरी तें बंद होणें महा मुष्किल आहे असें सांगूनच उपाय सुरू करावे. वर सांगितल्या प्रमाणें दरद आलें तर तिक्तकषायसहित शीतळ उपचार बाहेरून व आंतून करवावे. आणि उपवास करवावे. आणि दोनही प्रकारचे वाळे, गुळवेल, अडुळसा, धणे, धमासा, पित्तपापडा, चंदन, अतिविष आणि बळदाण्याच्या पाण्यांत काढा करून, तो प्यावयास द्यावा. त्यावर मुगाचें पाणी आणि गवती धान्य म्हणजे बाजरी, नागली, वरी वगैरे हीं खाण्यांत यावीं. या प्रमाणें उपचार केले असतां ही जर प्रारब्धानें गर्भ पडला तर त्या गर्भपाताच्या वेदनांच्या विस्मरणार्थ आणि गर्भाशयाच्या शुद्धीकरतां तीक्ष्ण मद्य अतिशय पाजावें. आणि या प्रमाणें जितक्या

महिन्यांचा गर्भ पडला असेल तितके दिवसपर्यंत लवण आणि स्नेह यांनीं रहित बिल्वादि पांच पदार्थांचा काढा अथवा तीळ, मठ आणि तंडुल यांची पेज पाजावी. त्यानंतर बळ देणाऱ्या जठराग्नीला दीपित करणाऱ्या आणि जीवन देणाऱ्या स्नेहाचा बस्ति आणि अन्न द्यावें.

**गर्भशल्य आणि वार बाहेर काढण्याचे उपाय**—गर्भाला बळ आल्यावर प्रसवस्थानांतून परिस्राव झाला तर स्फुरणसहित तो गर्भ स्वस्थानींच स्थिति करतो. या गर्भास **उपविष्टक** असें म्हणतात. या गर्भाच्या योगानें उदराची वृद्धि होत नाहीं. शोक, उपवास आणि रूक्ष वस्तूंचा आहार यांच्या योगानें आणि अतिस्रावानें वाताचा कोप होतो आणि गर्भ पोटांतच सुकूं लागतो. या गर्भाला **नागोदर** म्हणतात. या गर्भाच्या सुकण्याबरोबर वृद्धि पावलेलें उदरही ओसरूं लागतें, आणि फार दिवसांनीं गर्भाचें स्फुरण होतें. वर सांगीतलेल्या उपविष्टक आणि नागोदर नांवाच्या गर्भाच्या निवारणार्थ शरीराची पुष्टि करणाऱ्या, वात हरणाऱ्या आणि मधुर द्रव्यांचा संस्कार केलेल्या तुपाचा दुधाचा आणि मांसरसाचा उपयोग करावा, आणि स्त्रीला अंडीं खावयास द्यावीं. हे पदार्थ खाऊन तृप्त झालेल्या स्त्रीला वाहनावर बसवून खूब हलवावी, म्हणजे त्या योगें ती प्रसूत होते. उदरांतील गर्भ स्फुरण पावत नसला तर त्याला लीन असें नांव दिलें आहे. या उपद्रवाच्या निवृत्तीसाठीं श्येन, मासळी, अथवा मोराचा मांसरस पुष्कळशा तुपांत घालून खाऊं घालावा; आणि उडीद अथवा मुळ्याचा रस पुष्कळ तूप घालून पाजावा. अथवा कच्चें बेलफळ, तीळ, उडीद आणि सक्तु दुधांत टाकून प्यावयास द्यावी. आणि त्या स्त्रीला तिला आवडतील अशा आहारविहारांनीं नेहमीं खुशींत ठेवावी. असें केलें असतां त्या गर्भाला

प्रसवाची योग्यता प्राप्त होते. वरील प्रमाणें उपचार न केले तरीही कदाचित असा गर्भ जन्मेल अथवा उदरांतच राहील. जर गर्भिणी स्त्रीला उदावर्त रोग होईल तर त्या रोगाला योग्य अशा स्नेह आणि बस्ति यांच्या योगानें तावडतोब बरें करावें; नाहीं तर तो गर्भासहित गर्भिणीचा नाश करतो. अत्यंत दोषाची वृद्धि झाल्यानें, अपथ्य सेवन घडल्यानें अथवा दैवयोगानें गर्भ उदरांतच मरण पावला तर उदर, शीतळ, भारयुक्त, फुगलेलें आणि अत्यंत व्यथित होतें, आणि आंतील गर्भ स्फुरत नाहीं. त्याचप्रमाणें त्या स्त्रीला तृष्णा, भ्रम आणि क्लम उत्पन्न होतात; ती मोठ्या कष्टानें श्वास घेऊं शकते, कोठेंही बसण्याला उठण्याला आनंद वाटत नाहीं, डोळे बाहेर निघून आल्यासारखे वाटतें, आणि वेणा येत नाहींत. अशा स्त्रीला ऊन पाण्याची आंघोळ घालावी; तिच्या प्रसवस्थानीवर गूळ, तिळाची पेंड आणि लवण यांच्या चूर्णाचा कल्क करून लेप करावा. सांवरीच्या आणि गरणी गोंदाचा तुपांत कल्क करून प्रसवस्थानांत भरून ठेवावा. असें केल्यानेंही जर गर्भ बाहेर न निघे तर राजाचा हुकूम घेऊन प्रसवस्थानावर तूप चोपडून, तूप आणि सांवरीच्या गोंदाच्या रसांत हात बुडवून, त्या हातांनीं उदरस्थ गर्भाला ओढून काढावें. तो गर्भ अडवा आला असला तर तो सरळ होईल अशा प्रकारें स्त्रीच्या शरीराला चोळून व दाबून सरळ करावा, व मग ओढून काढावा. हात, पाय आणि मस्तक हीं वाकडीं होऊन गर्भ प्रसवस्थानांत आला अथवा एकच हात किंवा पाय बाहेर आला आणि दुसरा हात आणि पाय गुदद्वारानें बाहेर आला तर हे दोनही प्रकारचे गर्भ विष्कंभ या नांवानें ओळखले जातात. ह्या दोनही मूढ गर्भास शस्त्रानें कापून काढल्यास हरकत नाहीं. कोणतेंही तीक्ष्ण शस्त्र प्रसवस्थानांत शिरवूं नये. पहिल्यानें मस्तकाचीं दोन कपाळें चिरून

स्त्रीच्या उदरांतून बाहेर काढल्यावर, खाक, ऊर, ताळू, हनुवटी आणि इतर प्रदेशीं पकडून गर्भाला ओढून घ्यावें. अथवा मस्तक न कापतां नेत्रांत अथवा गंडभागीं शंकु लावून गर्भ ओढून घ्यावा. उजवा खांदा अडकून राहिला तर उजवा हात, आणि डावा खांदा अडकला असला तर डावा हात कापून गर्भ ओढून घ्यावा आणि कमरेपासून अडकून राहिला तर कमरेचे तुकडे करून गर्भ ओढून काढावा. गर्भ स्त्रीच्या उदरांत फुगला असला तर गर्भाचें पोट चिरून, आंतडीं बाहेर काढून घेऊन गर्भ ओढून घ्यावा. वायूच्या प्रकोपानें गर्भाचें जें जें अंग स्त्रीच्या गर्भाशयांत अडकून राहिलें असेल तें तें अंग कापून काढून गर्भ बाहेर काढावा. असें करतांना गर्भिणी स्त्रीला जरासुद्धां इजा न पोंचे अशा प्रकारचा सांभाळ ठेवावा. बिघडलेला वायु गर्भाला अनेक प्रकारच्या गति देतो. यासाठीं जें जें कर्म केल्यानें गर्भ बाहेर निघून येईल आणि स्त्रीला अडचण न पडेल तसें कर्म कुशल वैद्यानें करावें. गैरमाहितगारीनें जीवंत गर्भाला कापण्याचा यत्न वैद्यानें सहसा करूं नये. कारण तसें केल्यानें गर्भाबरोबर त्याच्या मातेच्या मरणाचीही धास्ती असते. वायूच्या प्रकोपानें ज्या स्त्रीचें प्रसवस्थान आवृत झालें असेल अथवा बाहेर निघून गेलें असेल, त्या स्त्रीच्या मस्तकांत, बस्तींत आणि कोठ्यांत शूळ उत्पन्न होतो, उभा श्वास चालतो, दुर्गंधयुक्त उचकी येते आणि सर्वांग शीतळ होतें. अशा मूढ गर्भाच्या स्त्रीची चिकित्सा करूं नये. गर्भ बाहेर निघाल्यावरही वार पडत नसली तर वरील प्रमाणेंच चिकित्सा करावी. या प्रमाणें गर्भशल्यरहित झालेल्या स्त्रीला ऊन पाण्याचें सेचन करावें. आणि प्रसवस्थानांत तेलाची घडी ठेवावी. त्या योगानें प्रसवस्थान कोमळ होतें आणि शूळ नाहींसा होतो. त्यानंतर ओंवा, अतिविषाची कळी, रास्ना, हिंग, मेलची आणि पंचकोळ यांच्या

चूर्णाचा काढा तूप घालून प्यावयास द्यावा. अथवा त्या औषधांचा कल्क तुपांत मिळवून चाटवावा. कुटकी, अतिविष, पाठा, सागाची साल, हिंग आणि पिंगवी यांच्या चूर्णानें साधलेलें तूप बाकी राहिलेले दोष दूर करण्यासाठीं आणि वेदनांच्या शांतीसाठीं तीन अथवा सात दिवसपर्यंत बळाबळ पाहून प्यावयास द्यावें. त्यावर स्नेहपान करावें, अथवा अरिष्ट आणि आसव सायंकाळीं प्यावयास द्यावीं. शिरस आणि अर्जुनवृक्ष यांच्या काढ्याची भावना दिलेली घडी प्रसवस्थानांत ठेवावी. असें करतांना दुसरे उपद्रव उपजले तर त्यांचीं कारणें शोधून त्यावर जो लागू पडेल तोच उपाय करावा. वातहर औषध टाकून उकळलेलें तूप, दहा दिवसपर्यंत प्यावयास द्यावें. त्यानंतर आणखी दहा दिवस मांसरस प्यावयास द्यावा, आणि हलकें, पथ्य, आणि अल्पभोजन करवावें. असें केलें तर क्रमा क्रमानें सुख वाटूं लागेल. प्रसवाच्या वेळीं स्त्री मेली आणि मूल पोटांत जीवंत असलें तर त्या वेळींच पोट चिरून मूल बाहेर काढावें.

**बाळकाच्या दीर्घायुष्याचीं लक्षणें**-ज्या बालकाचे केश एकसारखे, मृदु, सूक्ष्म, चकचकणारे, दृढमूळाचे, आणि काळे असतील; मस्तक छत्राप्रमाणें वर निमूळतें आणि खालीं रुंद; कपाळ उंच, दृढ, मजबूत वळ्यांनीं युक्त, आणि अर्ध चंद्राकार असें असेल; कर्णपुटें विशाल, सारख्या पाळींनीं युक्त, खालीं नमलेलीं, दृढ, मागल्या बाजूनें नमलेलीं, आणि मजबूत बांध्याचीं असतील; कान मोठ्या छिद्राचे असतील, डोळ्यांच्या भुवई जरा नमणाऱ्या, समान, लांब लांब आणि दाट असतील; डोळे सारखे, स्पष्ट पाहण्याची शक्ति धरणारे, बळवान, तेजस्वी आणि अंगें आणि उपांगें यांसहित असतील; नासिका—सरळ; उंच, वेळूच्या बांध्यासारखी आणि अग्रभागीं किंचित नमलेली; मुख—मोठें; जीभ—लांब, रुंद आणि पांढरी, पातळ आणि विकृतिर-

हित; ताळू–चिकट, केसाळ, आणि लाल; स्वर–मोठा, दीनतारहित, मृदंगाप्रमाणें नादयुक्त, गंभीर आणि धीर; ओंठ–जाडे नाहींत आणि फार पातळही नाहींत, दांतांला झाकणारे आणि लाल; हनुवटी–मोठी आणि वाटोळी; गळा–फार उंच नाहीं, गळसरी आंत बसती आणि पुष्ट; पाठण तसेंच; स्तन फार दूर दूर; दोनही बाजू खांद्याबरोबर हडसून सांधलेल्या; आणि स्थिर; हात, मांड्या आणि बोटें–वाटोळीं, मांसळ, आणि लांब सडक; पाय आणि हात–लांब सडक आणि पुष्ट; हातांचीं नखें–स्थिर, वाटोळीं, चकचकणारीं, लाल, उंच आणि खेकड्याच्या पाठीसारखीं; नाभि–दक्षिण खळग्याची आणि बैठी; कमर–सारखी, सरळ आणि मांसानें पुष्ट; पायांच्या पोटऱ्या–वाटोळ्या, स्थिर, मांसानें पुष्ट, फार उंच नाहीं आणि फार निंच नाहीं; पोटऱ्यांचा खालचा भाग–वाटोळा आणि पुष्ट; टांच–पुष्ट असावी आणि कृश नसावी; गुडघा–फार पुष्ट नसावा; वात, मूत्र, पुरी ययांचीं स्थानें विकाररहित असावीं; तसेंच निजणें, पाजणें, जागणें, हे सगळे व्यवहार वेळचे वेळीं होत असतील त्या बाळकाला दिर्घायुषी समजावें.

**बाळकास राहण्याचें घर.**–इमारत बांधण्याच्या कामांत माहितगार पुरुषांनीं वानिलेलें, मनोहर, अंधकार नसलेलें, फार वारा नसलेलें, वारा येण्याला एकच मार्ग आहे असें, मजबूत, पशु, चावणारीं जनावरें, उंदीर आणि कीटक, पतंग इत्यादिकांनीं रहित, ज्या ऋतूंत जशा स्थळीं निजलें पाहिजे तशीं स्थळें आणि बिछान्यांनें सुशोभित, पाण्याच्या स्थळानें युक्त, कुटण्याची जागा आहे असें शौचकूप, सैंपाकघर आणि स्नानाची जागा यांनीं युक्त, सर्व ऋतूंत सुख देणारें, वैद्य, वृद्ध, आणि प्रेम ठेवणाऱ्या मनुष्यांनीं भरलेलें असें घर बाळकासाठीं तैयार करावें; असें केल्यानें त्या बाळकाची दिवसेंदिवस वृद्धि होत जाते आणि तें नीरोगी होतें.

**आथरूण**—मुलाच्या निजण्याच्या आथरूणांत ठेकूण, पिसवा, मूत्र, आणि विष्ठा इत्यादिकांचा संसर्ग नसावा. यथाशक्ति, आथरूण वारंवार बदलावें अथवा तेंचें तेंच ठेवावयाचें तर धुऊन सुकवून आथरण्याची रीत असावी.

**खेळणीं**—बाळकाला खेळावयासाठीं खेळणीं वाजणारीं, सुंदर, हलकीं, अग्रहित, गिळतां न येण्यासारखीं, तशीं ज्यांस पाहून त्रास न वाटेल अशीं असावीं.

**बाळकाचा सांभाळ**—बाळक खावत नसेल, जेवीत नसेल, अथवा आपल्या सांगण्याप्रमाणें काम करीत नसेल तर तीं तीं कामें करविण्याकरतां भूतप्रेतादिकांचीं नांवें घेऊन भय दाखवूं नये. जर बाळक दुखणेकरी पडलें तर त्याच्या प्रकृतीची परीक्षा करून त्याला योग्य औषध देऊन लौकर आराम पडेल असें करावें. बाळकाचे रोग दूर करण्यासाठीं फार करून मधुर, मृदु, लघु, सुगंधयुक्त आणि शीतवीर्ययुक्त पदार्थ उपयोगांत आणावे. कारण कीं असले पदार्थ बाळकांस फार करून सात्म्य आहेत. बाळकाच्या शरीरांत कोणत्याही प्रकारचा रोग नसला तरी युवावस्थेला येई तों पर्यंत नेहमीं रोग्याप्रमाणेंच त्यांची तर्तूद ठेवून त्यांचा सांभाळ ठेवला पाहिजे. अहितकारक वस्तूंस शिवूं देऊं नये. देश, काळ, आणि प्रकृति यांनीं विरुद्ध अशा वस्तूंचा उपयोग करावा कीं तेणेंकरून त्याचें शरीर स्वस्थ असेल. अशी व्यवस्था ठेवल्यानें बळ, वर्ण आणि शारीरीक पुष्टि यांनीं युक्त असें तें बाळक होतें.

**स्त्रियांच्या योनींत उद्भवणारे रोगांचीं नांवें व त्यांची चिकित्सा**—संभोगसुखाचें आणि मुलांचें मुख्य मूळ स्त्रिया होत. आणि त्या स्त्रियांच्या प्रसवस्थानांत असणाऱ्या रोगांचीं मूळें या दोनही सुखांचा विनाश करतात. यासाठीं या स्थानीं उत्पन्न होणाऱ्या रोगांचीं कारणें आणि त्यांच्या विकृतींचे उपाय अवश्य जाणले पाहिजेत.

' वात प्रकृतीचा आहारविहार करणारी आणि वातप्रकृतीची अशा स्त्रीच्या शरीरांत वृद्धि पावलेला वात प्रसवस्थानांत प्रवेश करून पीडा उत्पन्न करतो. आणि त्या स्थानीं स्तब्धपणा, खरखराट, मुंग्या फिरण्याप्रमाणें चटचटपणा, आणि दुसरेही वायूसंबंधी रोग उद्भवतात. या वायूच्या प्रकोपानें रजोदर्शनसमयीं स्त्रीचें रज शब्द-सहित फेणयुक्त असतें. वायु कोपण्याचें कारणही हेंच कीं कोणीही स्त्री स्वतः रूक्ष, दुर्बळ, आणि बाल्यावस्थेंत असतांही शास्त्रांत सांगीतलेल्या क्रमाविरुद्ध अयोग्य पुरुषाबरोबर संयुक्त झाल्यानें तिच्या शरीरांतील वायु कोपतो आणि अशा प्रकारें कुपित वायु प्रसवस्थानांत येऊन त्या स्थानासंबंधी अनेक रोग उत्पन्न करतो. तसेंच आंबट आणि खारट पदार्थांच्या सेवनानें पित्त कोपून अनेक रोग उत्पन्न करतें. पित्ताच्या प्रकोपानें स्त्रीचें बिघडलेलें प्रसवस्थान, दाह, पाक, व ज्वर, याच्या सारख्या उष्णतेनें पीडित आणि हिरव्या, पींवळ्या व काळसर रजानें युक्त आणि अत्यंत दुर्गंधयुक्त ही होतें. कफाची वृद्धि करणाऱ्या पदार्थांच्या सेवनानें कोपलेला कफ जेव्हां त्या स्थानाला बिघडवितो, तेव्हां तेथून पांढरें पाणी निघूं लागतें, पांढरें रज पडतें, कंडु उत्पन्न होते, आणि फार वेदना होतात. तीनही दोषांस कोपविणारे पदार्थ खाल्यानें त्या स्थानीं तीनही दोषांचीं चिन्हें उत्पन्न होऊन, रोग उद्भवतात. आणखी हे रोग वर सांगीतल्याप्रमाणें दोष कुपित झाल्या कारणानें, ऋतु बिघड-ल्यानें, बीजाच्या दोषामुळें अथवा केवळ दैवयोगानें सुद्धां उत्पन्न होतात. असें प्रसवस्थानाचे रोग पुढें लिहिल्याप्रमाणें वीस प्रका-रचे होतातः—

**१ प्रथम पीडेसहित फेणयुक्त रज प्रसवस्थानांतून निघतें; पण रज बाहेर दिसत नाहीं तों पर्यंत स्त्रीला पीडा होत असते. आणि**

एकदां रज पडलें ह्मणजे स्त्रीला सुख वाटूं लागतें. शास्त्रांत या रोगानें पीडलेल्या योनीला " **उदावर्ता** " असें नांव दिलें आहे.

२. जेव्हां स्त्रीच्या योनींत आर्तव नसेल अथवा आर्तव असूनही संतति होत नसेल तेव्हां त्या योनीला " **वंध्या** " ह्मणतात.

३. ज्या योनींत एकसारखी पीडाच होत असते तिला " **विप्लुता** " ह्मणतात.

४. मैथुनाच्या वेळीं योनीला पीडा होते, त्या योनीला "**परिप्लुता** " ह्मणतात.

५. खरखरीत, स्तब्ध आणि शूळानें पीडित अशा योनीला " **वातला** " असें ह्मणतात.

६. ज्या योनींत ऊन, खळखळणारें रक्त पडतें तिला " **रुधिरक्षारा** " असें ह्मणतात.

७. रजःसंयुक्त बीजाला वाताच्या धक्यानें जी योनि बाहेर फेकून देते तिला " **वामिनी** " असें ह्मणतात.

८. पुरुषाच्या जननेंद्रियानें घर्षण होत असतां जींतून फार स्राव होतो तिला " **स्रंसिनी** " असें ह्मणतात.

९. रुधिरस्रावानें गर्भाला एकसारखी बाहेर लोटणारी जी योनि तिला " **पुत्रघ्नी** " ह्मणतात.

१०. दाह, पाक, आणि ज्वर यांनीं अत्यंत पीडलेली जी योनि तिला " **पित्तला** " असें ह्मणतात.

११. मैथुनानें संतुष्ट न होणाऱ्या योनीला " **अत्यानंदा** " ह्मणतात.

१२. कफ आणि रुधिर यांहींकरून जिची कड जमलेली असते आणि जिच्यांत कमळाच्या कळीप्रमाणें मांसल गांठी होतात त्या योनीला " **कर्णिका** " असें ह्मणतात.

१३." मैथुन होण्यापूर्वी पुरुषाहून अधिक शक्ति दाखविणारं जो योनि तिला "**प्राक्चरणा**" असें ह्मणतात.

**१४.** जी योनि बीज धारण करीत नाहीं तिला "**अतिचरणा**" असें नांव दिलें आहे.. रोगट स्थितीत या योनीला सूज येते आणि तींत दुखत असतें, आणि स्त्री नेहमीं पुरुषाची इच्छा करते. याचें कारण इतकेंच कीं योनि धुऊन स्वच्छ न ठेवीत गेल्याकारणानें तिच्यांत सूक्ष्म जंतु आणि खरूज उत्पन्न होते.

१५. खरजेनें युक्त, शीतळ. आणि डबडबलेली योनि "**श्लेष्मला**" म्हणतात

१६. ज्या स्त्रीला स्तन नसतात आणि आर्तवही नसते आणि मैथुनाच्या वेळीं खरखरीत स्पर्श असतो त्या योनीला "**षंढी**" म्हणतात.

१७. तरुण अवस्थेमध्यें जाड झालेल्या योनीला "**फलिनी**" असें ह्मणावें.

१८. आकृतीनें मोठी आणि उघड्या तोंडाची जी योनि तिला "**विवृता**" असें ह्मणतात. रोगट अवस्थेंत या योनीमध्यें नेहमी पीडा होत असते आणि ती रूक्ष आणि फेनयुक्त रुधिराला स्रवते आणि सांध्यांमध्यें व पाठणामध्यें दुखत असतें.

१९. स्त्रीची योनि सुईच्या छिद्रासारखी बारीक छिद्राची असते तेव्हां तिला "**सूचिमुखी**" असें ह्मणतात.

२०. वात, पित्त, आणि कफ यांच्या योगानें जिच्यामध्ये शूळ, दाह, आणि खरूज वगैरे चिन्हें होतात त्या योनीला "**संनिपातिनी**" असें ह्मणतात.

**याप्रमाणें योनीचे वीस रोग सांगीतले आहेत. या वीस प्रकारच्या योनींपैकीं वाताच्या आणि पित्ताच्या प्रकोपानें "प**

प्लुता" आणि "वामिनी" या नांवांची योनि होते. वाताच्या आणि कफाच्या प्राधान्यामुळें "कर्णिका" आणि "उपप्लुता" नांवाची योनि होते. याशिवाय बाकीच्या भेदांमध्यें वात प्रधान असतो. वात-प्रधान योनीचे विकार नाहींसे करण्यासाठीं स्नेहाचा आणि स्वेदाचा उपयोग करावा, कफ व पित्त यानीं प्रधान अशा योनीला रक्तपि-त्ताचे विकार मोडण्याचे उपचार करावे, आणि वातकफप्रधान योनीच्या विकारांवर रूक्ष आणि उष्ण उपचार करावे. तिनही दोषांचीं चिन्हें जींत आहेत अशा योनीच्या विकारांवर त्रिदोष निवारण्याचे उपाय योजावे म्हणजे मृदुवमनादिक पंचकर्मे करावीं. याप्रमाणें शरीर शुद्ध करून औषधाचा उपयोग करावा.

बळदाण्याच्या दोन द्रोण काढ्यामध्यें तूप व तेल हीं दोन आढक घालावीं. शाल्पर्णी, कांकोळ, हरणवेल, काळा वाळा, जीवक गोरखमुंडी, पिंपळी, रान मुगाचें झाड, पिलुवृक्ष, रान उडदाचें झाड, साखर, क्षीरकंकोळ, आणि काकजंघा, इतक्या औषधाचें चूर्ण करून त्याच्या चौपट दुधांत तें कढवावें. नंतर जठराग्नीच्या बळाप्रमाणें त्यांतून अमुक प्रमाण द्यावें; यानें वाताचें आणि पित्ताचे विकार दूर होतात आणि स्त्रीला गर्भ राहतो. शिवणी, हरडा, बेहडा, आंवळकटी, द्राक्ष, फणस, पुनर्नवा, हळद, दारुहळद, काकजंघा, कांटेरी अशेरी, शतावरी, आणि गुळवेळ यांच्या चूर्णानें साधलेलें तूप प्याल्यानें योनीचे वातज रोग दूर होतात व गर्भ राहतो. पिंपळी, काळें जिरें, कुंचिका, अडुळसा, सैंधलोण, वेखंड, जवखार, ओंवा, खडीसाखर, आणि चित्रक एवढ्या पदार्थांस वांटून आणि तुपांत परतून "प्रसन्ना" नांवाच्या मद्याबरोबर प्याल्यानें योनीच्या बाजूमध्यें होणाऱ्या पीडा, हृद्रोग, गुल्म, आणि अर्श हे विकार मोडतात. अडुळसा, बिजोऱ्याचें मूळ, आणि मदयंतिकेचें मूळ, हीं लवणयुक्त मद्याबरोबर प्याल्यानें,

अथवा पिंपळी आणि मेथी लवणयुक्त मद्यांबरोबर प्याल्यानें योनींचे रोग दूर होतात. योनींत शूळ येत असेल तर गोखरूं, अडुळसा आणि रास्ना ही घालून उकळविलेलें दूध प्यावें. गुळवेल, मालती, भुईरिंगणी, हरडा, देवदार, बळदाणा, चित्रक, जेष्ठमध आणि जुई, हे सारे पदार्थ कर्ष प्रमाण घेऊन, एक प्रस्थ तेल व दोन प्रस्थ दूध घेऊन हीं सर्व गायीच्या मूत्रांत कढवावीं. मग त्या तेलांत एक बोळा भरून घेऊन रोगी स्त्रीनें योनींत धारण करावा ह्मणजे वात रोगाचें निवारण होतें. वातरोगी, पित्तरोगी आणि कफरोगी स्त्रीनें अनुक्रमानें भुईरिंगणीच्या ऊन कल्काचा, वड, उंबर, पिंपळ, पारोसा पिंपळ, व मोठी पिंपळी यांच्या सालीच्या चूर्णाचा आणि कांग यांच्या चूर्णाचा अभ्यंग करावा. पित्तकोपानें बिघडलेल्या योनीवर शीतवीर्याच्या औषधांचा अभ्यंग व शेक करावा व त्यांनीं बनविलेल्या तेलाची घडी ठेवावी. शतावरीचें मूळ चार तुला प्रमाण घेऊन, त्यांतून रस काढून व तेवढेंच त्यांत दूध घालून, त्यांत आढक प्रमाण तूप कढवावें; या तुपाच्या उपयोगानें योनिरोग दूर होतात. जीवनीय गणांमध्यें सांगितलेलीं औषधें, शतावरी, द्राक्ष, फणस, प्रियाळ, बेहडा, व जेष्ट-मध हीं वांटून कढवावीं. मग तें निवाल्यावर त्यांत मध, व पिंपळी हीं दोनही द्रव्यें आठ पळ प्रमाण घालावीं. आणि दहा पळ प्रमाण खडीसाखर घालावी. नंतर आपल्या हाताच्या तळव्यावर राहील तेवढें तें चाटवें. यानें योनीचा रुधिरदोष आणि पुरुषाचा वीर्यदोष नाहींसे होतात, आणि वीर्याची पुष्टि होऊन संतानप्राप्ति होतें. यानेंच आणखी क्षत, क्षय, रक्तपित्त, कास, श्वास, हलीमक, कामल, वातरक्त, विसर्प, हृदयाचे व मस्तकाचे रोग, उन्माद, संन्यास रोग व वातपित्त या रोगांचा नाश होतो. याप्रमाणें जीवनीय औषधांनीं साधलेलें तूप आणि दूध मिळमिळतीच्या स्त्रीला संतान देणारें आहे. कफानें

दुष्ट झालेल्या योनीला सुधारण्यासाठीं शोधनद्रव्यांनीं बनविलेली वर्ति ह्मणजे वात उपयोगी आहे. रुईच्या दुधाची भावना दिलेल्या उडीदांचें चूर्ण सैंधेलोण घालून त्याची वात करावी व ती योनींत शिरवावी व सोसेल तेवढ्या ऊन पाण्याचा तिच्यावर शेक करावा. पिंपळी, मिरीं, उडीद, शतावरी, कुष्ठ, व सैंधेलोण यांच्या चूर्णाची करांगुळी एवढी वात करून आंत ठेवल्यानें योनि शुद्ध होते. उंबराचें सुकलेलें फळ, वडाची, उंबराची, पिंपळाची, पारस पिंपळाची व मोठ्या पिंपळीची साल, कडुलिंबाचीं व मालतीचीं पानें हीं पाण्यांत टाकून रात्रभर ठेवावीं. त्यांत एक प्रस्थ प्रमाण तेल कढवावें. मग तें तेल लाख, पळसाची साल व त्याचा गोंद व सावर यांच्या चूर्णांत दुसऱ्यांदा कढवावें. मग त्या तेलांत कापसाचा बोळा बुडवून, योनींत धारण करावा. त्यावर खडीसाखर मिळविलेल्या शीतळ कषायाचें सेचन करावें. अशा प्रकारें सात दिवस केल्यानें योनीचे रोग सर्व दूर होतात व संतानाची प्राप्ति होते. उंबराच्या चिकाची भावना दिलेल्या तिळांचें तेल काढून वर सांगीतल्याप्रमाणें कढवून त्यांत बुडविलेला बोळा योनींत धरल्यानें हें वरीलच फळ मिळतें. धावणीची व आंवळीचीं पानें, सुरमा, ज्येष्ठमध, कमळ, हिराकस, लोध्र जायफळ, तिंदुक (टेंभुर्णी), दालिंब, दालचिनी व उंबराचीं कच्चीं फळे हे पदार्थ अक्ष प्रमाण घेऊन बकरीच्या मूत्रांत व दुप्पट दुधांत कढवावे. मग त्यांत एक प्रस्थ, तेल कढवून त्यांत भिजविलेली घडी योनीमध्यें ठेविल्यानें, अंगाला अभ्यंग केल्यानें आणि बस्ति दिल्यानें योनिसंबंधी सर्व रोग दूर होतात.

कारवी, कडुलिंब, रुई, वेळु, जांभूळ, मंजिष्ठ, आणि मोह यांचा काढा, द्राक्षांचा 'सीधू आणि शुक्त यांनीं योनि धुण्याची चाल ठेवावी ह्मणजे प्रदर रोगाची निवृत्ति होईल. तसेंच

ताकासहित गोमूत्रामध्यें मिळविलेल्या शुक्तानें अथवा त्रिफळाच्या रसानें योनि धूत गेलें असतां स्राव बंद होतो. श्लेष्मप्रधान योनीच्या रोगाच्या निवारणार्थ तिखटद्रव्यांमध्यें मिळविलेल्या मूत्राचा बस्ति हितकारक आहे. पित्तप्रधान योनीच्या रोगनिवारणार्थ मधुर द्रव्यामध्यें मिळविलेल्या दुधाचा बस्ति, तसेंच वातप्रधान योनीच्या रोगनिवार्णार्थ अम्ल पदार्थांशीं मिळविलेल्या तेलाचा बस्ति हितकारक आहे. सन्निपातानें उत्पन्न झालेल्या योनिरोगाच्या निवृत्तीसाठीं साधारण कर्म हितकारक आहे असें सांगितलें आहे. योनींतून रुधिराचा स्राव होत असेल तर रुधिर बंद करण्याचा उपाय करावा. वायूच्या प्रकोपानें रुधिर पडतें असें समजण्यांत येईल तेव्हां तिळांचें चूर्ण, दहीं, तूप, पुरता न कढविलेला पातळ गुळ, आणि डुकराची वसा ( चरबी ) हीं मधींत मिळवून प्यावयास द्यावीं. आल्याचा रस आणि मध हे दोनही जिन्नस समभाग घेऊन मिळवून प्याल्यानें खाल्लेलें मांस आणि अन्न लौकर पचवूं शकतें एवढा जठराग्नीचा जोर वाढतो. वातप्रधान रोगावर कुळथीच्या रसांत डुकराचा मांसरस द्यावा असें ही सांगितलें आहे. अथवा खडीसाखर, तेल, जेष्ठमध आणि सुंठ याच्यांत दहीं मिळवून प्यालें असतांही हितकारक आहे. पित्तानें झालेल्या रक्त प्रदर रोगावर बिदारिका, कमळ, कमळाचें मूळ, कमळाचे तंतु, दारुहळद, दूध, खडीसाखर आणि मध हीं सर्व एकत्र करून प्याल्यानें तो रोग नाहींसा होतो. पहाडमूळ यांची अंतर साल, शिलाजित, रसांजन, कुटकी, पडवळ, सांवर, मंजिष्ट, कडासाल केशर, अतिविष, बेलफळ, नागरमोथा, लोध्र, गेरु, कायफळ, मिरीं,सुंठ, सोनुळी रतांजळी, कुटकी, धमासा, धावणीचें फूल, ज्येष्टमध, आणि अंजन वृक्ष हे सर्व पदार्थ समभाग घेऊन बारिक भुकटी करून त्यांत मध घालून

तांदुळाच्या धुणाबरोबर प्यालें असतां अर्श, अतिसार, रक्तातिसार, मुलांचा जंतांचा रोग, योनिदोष आणि रजासंबंधी दोष त्वरित दूर होतात. तांदुळज्याच्या मुळांचें चूर्ण मधांत मिळवून पाण्याच्या धुणांत रसांजन आणि लाख हीं दोन्ही मिळवून बकरीच्या दुधांत आणि राळ आणि कवठ यांच्या पानांचें चूर्ण तुपामध्यें मिळवून बकरीच्या दुधांत प्याल्यानें पित्ताच्या प्रकोपानें झालेल्या रक्तप्रदराची शांति होते. ज्येष्ठमध, हरडा, बेहडा, आंवळकटी, लोध्र, मोथा, तुरटी, मध, कडुलिंब आणि गुळवेल हीं सर्व औषधें मद्याबरोबर प्याल्यानें कफापासून झालेला रक्तप्रदर शांत होतो. महातिक्त विरेचन आणि महातिक्त नांवाच्या तुपाचें पान केल्यानें पित्तापासून झालेला रक्तप्रदर शांत होतो. आणि गर्भपात झाला असतांही त्यावर हा उपाय हितकारक आहे म्हणून सांगितलें आहे.

शिवणी आणि कडामाल यांच्या काढ्यांत सिद्ध केलेलें तूप उत्तर बस्तीनें उपयोगांत आणिलें असतां ही रुधिरस्राव बंद होतो. आणि रजोदर्शन बंद पडलें असलें तर तें फिरून चालू होतें. ज्या स्त्रीला रजोदर्शन होत नाहीं तिनें मृग, बकरी, डुक्कर आणि मेंढा यांचे रुधिर, दहीं आणि आंबट फळाच्या तुपांत मिळवून प्यावें. अथवा जिवनीय गणांत सांगितलेल्या औषधांनीं सिद्ध केलेलें दूध प्यावें. वातकफप्रधान योनीच्या रोगनिवारणार्थ उत्तर बस्तीपासून तेलाचा उपयोग करावा. वर सांगितलेल्या वासिनी व लुन योनीच्या शांतीसाठीं स्वेदन विधि करावा त्या नंतर स्नेहन विधि करावा. मंजिष्ठ जांभूळ आणि साली ग्रहण करण्याच्या प्रकारणांत सांगितलेल्या पांच वृक्षांच्या सालींच्या काढ्यामध्यें सिद्ध केलेल्या तेलाची पट्टी ठेविल्यानें विस्रुतापण नाहींसें होतें. कर्णिका योनीच्या निवृत्ति साठीं कवठ, पिंपळाचा अर्क, आणि सैंधव यांची बकरीच्या मुत्रानें

बनविलेली वात योनींत धारण करावी. तसेंच कफनिवर्तक सर्व औषधें सुद्धां ह्या रोगावर हितकारक म्हणून सांगितलीं आहेत. निशोत्तरा घालून कढविलेलें तेल आणि स्वेद तसेंच गांवच्या अथवा पाणथळ देशच्या जनावरांचा मांसरस, दशमूळानीं सिद्ध केलेल्या दुधाचा बस्ति उदावर्त रोगाला हाणून पाडतात, आणि वायूची व्याधि दूर करतात. वर सांगितलेली महायोनि आणि स्रस्त योनि ह्यांच्या शांतीसाठीं निशोत्तरा या औषधानें सिद्ध केलेल्या तेलाचा अनुवासनबस्ति आणि उत्तर बस्ति हितकारक सांगितला आहे. गोड पदार्थाबरोबर सिद्ध केलेली डुकराची चरबी अथवा तूप यांनीं महायोनि भरून वर रेशमी वस्त्राच्या तुकड्याचा बोळा बसवावा. अथवा महायोनीला प्रथम तूप चोळून दुधाचा शेक देऊन मसाल्याच्या (यांत तिखट पदार्थ घालूं नयेत) गुटिका आंत ठेवाव्या. फक्त मूत्राच्या वेळीं मात्र सांभाळावें. योनीसंबंधी रोगांत वात मिश्र असतो त्यामुळें वातनिवर्तक जे उपाय सांगितले आहेत तेही करावे. जेव्हां वात शांत होईल तेव्हां दुसऱ्या दोषांच्या निवृत्तिसाठीं औषध करावें. श्वेत प्रदराच्या निवारणार्थ खडीसाखर आणि मध याशीं आंवळकटीच्या बियांचें चूर्ण मिळवून प्यावें. अथवा मधींत आंवळ्याचा रस मिळवून प्यावा अथवा वडाच्या सालीच्या काढ्याची भावना दिलेला रेशमी वस्त्राचा तुकडा योनीवर ठेवावा. असें केल्यानें स्राव बंद होईल. पिंपळीच्या सालीचें चूर्ण मधामध्यें मिळवून गोळी तयार करावी व ती योनींत ठेवावी ह्मणजे श्वेत स्राव बंद होतो. अथवा कषाय रसयुक्त द्रव्याची मधीमध्यें बनविलेली वात योनींत धारण करावी. अथवा योनींत तूप चोळून तुपांत निशोत्तरा गुग्गुळ आणि चवक हीं मिळून त्याचा धूप द्यावा. लडबडलेली ह्मणजे गुळगुळीत झालेली योनि स्वच्छ करण्यासाठीं हिराकस त्रिफळा (हरडा, बेहडा आणि अवळकटी) जायफळाच्या बिया

आणि धावण यांचें चूर्ण मधांत मिळवून योनींत धारण करावें. धुळस दुपारीचें फूल ( बंधूक ) जांभळीची साल, मंजिष्ठ, सांवरीचा गोंद आणि धावण यांचें चूर्ण गाऱ्यासारखी झालेली योनि साफ करण्याचे कामीं फार उपयोगी आहे ह्मणून सांगितलें आहे. सुगंधी पदार्थांचा कल्क योनीचा दुर्गंध नाहींसा करण्याकरितां योजावा. याप्रमाणें उपाय केल्यानें योनि शुद्ध होईल तेव्हांच गर्भ धारण करण्याला पात्र होईल.

**गर्भधारणास पुरुषाच्या शुद्ध वीर्याची आवश्यकता—** गर्भधारणास योनीच्या शुद्धीची जशी अवश्यकता आहे तशीच पुरुषाच्या वीर्याच्या शुद्धीचीही आहे. कारण कीं बीज कुजलेलें असेल तर उत्तम जमिनीत पेरल्यानेंही तें उगवणार नाहीं; त्याच प्रमाणें पुरुषाचें वीर्य बिघडलें असेल तर शुद्ध योनींतही त्याच्या पासून गर्भ धारण होऊं शकणार नाहीं.

अति मैथुन केल्यानें, अति कसरत केल्यानें, कुपथ्याच्या पदार्थाचें सेवन केल्यानें, अवेळीं मैथुन केल्यानें, योनिशिवाय इतर मार्गानें मैथुनसुख घेतल्यानें, रूक्ष तिखट, उष्ण, कषाय, अति लवण, आणि अम्ली पदार्थ यांच्या सेवनानें, मधुर, स्निग्ध आणि गुरु अशा अन्नाच्या सेवनानें वृद्धावस्थेमुळें चिंता, शोक, अविश्वास, शस्त्र, क्षार, अग्नि, भय, क्रोध, व्याधि आणि वेग ही बंद पाडल्यानें क्षयानें, आणि धातु बिघडल्यानें, दुर्बळ झालेल्या पुरुषाच्या प्रत्येक दोषानें अथवा सर्व दोष मिळून वीर्य वहन करणाऱ्या नाडींमध्यें शिरून वीर्य बिघडवितात. फेसाळ, पातळ, सुकलेलें, विरुद्ध वर्णाचें, दुर्गंधयुक्त, गाऱ्यासारखें, इतर धातूंनीं मिश्र आणि बाहेर पडतेवेळीं वेदना उत्पन्न करणारें असें पुरुषाचें वीर्य बिघडलेलें जाणावें. त्याचे आठ प्रकार आहेत. वातप्रकोपानें पुरुषाचें वीर्य फेसाळ, सुकलेलें,

गाऱ्यासारखें आणि पातळ असें होतें. त्यानें गर्भधारण होत नाहीं. पित्ताच्या प्रकोपानें बिघडलेलें वीर्य निळें, पिवळें, अत्यंत उष्ण, दुर्गंधयुक्त, आणि जननेंद्रियाला जाळीत बाहेर पडतें. कफाच्या प्रकोपानें अतिशय गाऱ्यासारखें, अत्यंत स्त्रीसमागमानें अभिघात आणि क्षय यांनीं बिघडलेलें वीर्य रक्तमिश्रित बाहेर पडतें. वेगधारण केल्यानें वीर्याच्या मार्गांत राहून गेलेल्या वायूनें पीडिलेलें वीर्य वेदना करीत करीत बाहेर येतें तें खेद करणारें समजावें. याप्रमाणें वीर्याचे आठ दोष लक्षणांसहित सांगितले. स्निग्ध, घट्ट, मधुर, पडते वेळीं जळजळ करणारें आणि स्फटिकासारख्या वर्णाचें जें वीर्य तें शुद्ध समजावें. दुष्ट वीर्य सुधारण्यासाठीं वाजीकरण्याच्या प्रकरणांत सांगितलेले उपाय करावे, आणि विशेषें करून रक्तपित्तरोग दूर करणारे उपाय योजावे. तूप, जीवनीय औषधें आणि शिलाजित यांच्या प्रयोगानें वीर्याचे दोष नाहींसे होतात. वातप्रकोपामुळें बिघडलेलें वीर्य शुद्ध करण्यासाठीं निरूह आणि अनुवासन बस्ति योजावे. पित्तप्रकोपामुळें बिघडलेल्या वीर्याच्या शुद्ध्यर्थ आंवळकटीचा प्रयोग उत्तम सांगितला आहे. जुई, गुळवेल, लोह, आणि त्रिफळा आणि भिलाव्याचें रसायन यांनीं वीर्यांत राहिलेल्या कफाचा दोष दूर होतो. इतर धातूशीं मिश्र झालेलें वीर्य पाहून वैद्यानें सदहु धातूंच्या दोषांच्या निवारणार्थ औषधें द्यावीं. तूप, दूध, साळीचे तांदूळ, गहूं आणि राते तांदूळ हीं खाल्यानें आणि बस्ति योजिल्यानें वीर्य दोष बरे होतात.

**वीर्याच्या दोषापासून आलेलें नपुंसकत्व**—बीज, वीर्य, आणि लिंग यांच्या उपघातामुळें, वृद्धावस्थेमुळें, आणि वीर्याच्या क्षयानें, नपुंसकत्व प्राप्त होतें. त्यामुळें मैथुन करण्याची इच्छा असतांही स्त्रीसमागम जननेंद्रिय शिथिल झाल्यानें करूं शकत नाहीं,

अथवा कधीं एखाद दिवस करूं शकतो. मैथुन करतेवेळीं श्वास उत्पन्न होईल, घामानें थबथबेल, लिंग शिथिल होईल तर या सगळ्या लक्षणांवरून नपुंसकत्व जाणावें. थंड, रूक्ष, अल्प, अम्बलेलें, विरुद्ध आणि अजीर्ण अशा भोजनामुळें, शोक, चिंता, भय, अत्यंत स्त्री सेवन, रसादिकांचा क्षय, ओजोगुणाचा क्षय, उपवास, श्रम, आणि स्त्रीच्या रजानें प्रदर्शन इतक्या कारणांनीं वीर्याचा उपघात होतो, त्यामुळें फिकट वर्णाचा आणि रोड, थोड्या संततीचा आणि दीपन रहित नमाच हृद्रोग, पांडुरोग, तमक आणि कमळा या रोगांनीं युक्त असा पुरुष बनतो.

**जननेंद्रियाच्या भंगामुळें आलेलें नपुंसकत्व-** अत्यंत अंबट, खारट, विरुद्ध ( म्हणजे ज्या पदार्थांचा परस्पर संयोग विषासारखा होतो म्हणून सांगितलें आहे तें ) अजीर्ण, अत्यंत पाणी पिणें, अवेळीं खाणें, जठराग्नि न पचवूं शकेल असें भोजन, दहीं, दूध, आणि पाणथळ प्रदेशाच्या जनावरांचें मांस, यांच्या सेवनानें कन्येशीं गमन केल्यानें, फार दिवसांची रोगी व रजस्वला अशा स्त्रीशीं गमन केल्यानें, दुर्गंधयुक्त पाणी स्रवणाऱ्या योनीच्या स्पर्शानें, पशु जातीच्या स्त्रीशीं मैथुन केल्यानें, जननेंद्रिय धूत न गेल्यानें, शस्त्र दंत आणि नख यांच्या क्षतानें, काष्ठाच्या प्रहारानें, दाबल्यानें आणि वीर्याच्या प्रतिघातानें ध्वजाचा भंग होतो. त्यामुळें सूज, वेदना, लाली, फोड आणि लिंगाचा पाक हीं उत्पन्न होतात आणि मांसाची वृद्धि व व्रण हीं उत्पन्न होतात. या व्रणांतून पांढरें काळें आणि तांबडट पाणी निघतें. अशा रोगानें पीडलेल्या पुरुषाला तहान, मूर्च्छा भ्रम, आणि वांति होतात, आणि विस्तवानें जाळल्याप्रमाणें लिंगाचा दाह होतो. बस्ति, वृषण, शिवण आणि वंक्षण यांतून पांढरें पाणी झरत असतें. अशा प्रकारचे अनेक उपद्रव झाल्याकारणानें पुरुष नपुंसक होतो.

" **म्हातारपणामुळें येणारें नपुंसकत्व**—जघन्य, मध्य आणि उत्कृष्ट असे मनुष्याच्या अवस्थेचे तीन भेद सांगितले आहेत. त्यांपैकीं जेव्हां वृद्धावस्था प्राप्त होते तेव्हां पुरुषाचें वीर्य क्षीण होतें. रसादिक धातूंच्या क्षयानें आणि वीर्याची पुष्टि करणारे पदार्थ न सेविल्यानें, बळ वर्ण आणि इंद्रिय यांचा क्रमाक्रमानें क्षय झाल्यानें, आयुष्याच्या क्षयानें आणि अल्प आहारानें वृद्धावस्थेमध्यें नपुंसकत्व प्राप्त होतें. त्यामुळें त्या वृद्ध पुरुषाचा धातु क्षीण होऊन तो दुर्बळ होतो. विवर्ण, विव्हळ आणि दीन झालेला तो वृद्ध पुरुष लौकरच व्याधीस पात्र होतो.

**क्षयामुळें उत्पन्न होणारें नपुंसकत्व**—अत्यंत चींतेमुळें, शोक, क्रोध, भय यांच्यामुळें, तसेंच ईर्षा, उत्कंठा आणि उद्वेग यांच्या योगानें वीर्याचा क्षय होतो. त्याचप्रमाणें रूक्ष अन्नपान सेविल्यानें, दुर्बळ प्रकृतीमुळें, उपवासामुळें , आणि थोडें खाल्ल्यानें हृययांत असलेला रस धातु क्षीण होतो. मग अर्थात्‌च रक्तादिक धातु शुक्र पर्यंत क्षय पावतात. चित्तांत अत्यंत हर्ष धरून, अत्यंत मैथुन करणाऱ्या पुरुषाचें वीर्यही क्षीण होतें, त्यानें तो व्याधिग्रस्त होतो अथवा मरणही पावतो. यासाठीं आरोग्य इच्छिणाऱ्या पुरुषानें शुक्राचें जतन करावी. याप्रमाणें चार प्रकारच्या कारणांनीं आणि लक्षणांनीं नपुंसकत्व प्राप्त होतें. लिंग भंगानें आणि वीर्यक्षयानें आलेलें नपुंसकत्व असाध्य जाणावें असें कित्येकांचें म्हणणें आहे. पण तें खरें नाहीं. फक्त लिंगछेदानें अथवा वृषणछेदानें आणि आईबापांच्या बीजदोषांनीं आलेलें नपुसंकत्व असाध्य होय. यास्तव या तीन प्रकारच्या नपुंसकपणाहून निराळ्या नपुंसकपणाची निवृत्ति उपायांनीं होऊं शकते. शुक्रदोषाच्या निवृत्तिसाठीं जीं औषधें सांगीतलीं आहेत तीं ही नपुंसकपणाच्या निवृतिसाठीं उपयोगी आहेत. बस्ति,

दूध, तूप, वीर्यपुष्टीचे उपाय आणि रसायन औषधें हीं सगळीं नपुंसकपणाला नाहींशीं करणारीं आहेत. देश, काळ आणि प्रकृति पाहून ज्या कारणानें नपुंसकत्व आलें असेल त्याच्या विरुद्ध उपचार केल्यानें नपुंसकत्व दूर होतें. नपुंसक पुरुषाला स्नेहक्रिया व स्वेदक्रिया करवून स्नेहानें विरेचन द्यावें, अनुवासन बस्ति द्यावा; आणि पळस, एरंड, आणि मोथा वगैरे औषधांच्या काढ्यानें आस्थापन बस्ति वगैरे उपाय अनुक्रमानें योजावे. वाजीकरण प्रयोग वीर्यक्षयापासून आलेल्या नपुंसकत्वाच्या निवारणार्थ योजावे. आणि लिंगभंगामुळें आलेलें नपुंसकत्व असेल तर लिंगावर लेप करावे. शिरा काढाव्या, व स्नेहाचे अनुवासन व आस्थापन बस्ति द्यावे आणि व्रणासारखी चिकित्सा करावी. वृद्धावस्थेंतल्या नपुंसकत्वाच्या निवारणार्थ स्नेह स्वेदादिक क्रिया कराव्या आणि स्नेहानें शोधन औषध द्यावें हें फायदेशीर आहे, व त्यावर दूध, तूप, वीर्यपुष्टीचे उपाय, बस्ति व रसायन प्रयोग यांचा उपयोग करावा.

प्रदररोग—जी स्त्री, गोड, आंबट, गुरु, कडु, दाहजनक, चिकट, गांवठी व जलचर प्राण्यांचें मांस, खिचडी, दहीं, दूधपाक, शुक्त (दारूचा भेद) दह्यांचें सायटें, आणि सुरा इत्यादि पदार्थांस फार सेवित, त्या स्त्रीच्या शरीरांतील वायु कोपून गर्भाशयांत असलेल्या रजास वाहून नेणाऱ्या नाडींत शिरून तींत असलेल्या रक्त- संयुक्त रजाला ग्रहण करून बाहेर काढतो; तेव्हां त्यास प्रदर रोग म्हणतात. हा प्रदर रोग वात, पित्त, कफ आणि संन्निपात असा चार प्रकारचा आहे.

रूक्षादिक पदार्थ खाल्ल्यानें कोपलेला वात पूर्वीप्रमाणें रुधिराचें ग्रहण करून प्रदररोग उत्पन्न करतो. त्याला वातप्रदर म्हणतात. हें रुधिर, फेसाळ, सूक्ष्म बुळबुळीत, काळें, लाल, पळसाच्या फुलांच्या गर्भासारखें, पीडासहित, अथवा पीडारहित

असें असतें. आणखी कमर, पाठण, हृदय, कुशी, कणा, व कटिप- श्चात्भाग यांच्या ठिकाणीं वेदना होतात. आंबट, खारट, उष्णवीर्य, आणि क्षार आदि पित्त करणाऱ्या पदार्थांच्या भोजनानें कोपलेलें पित्त प्रदर उत्पन्न करतें. ज्या पित्तप्रदरांत नील, पीत, अत्यंतउष्ण, काळें, लाल, आणि अत्यंत पडिसहित रुधिर पडत असतें. आणखी जळजळ, लाली, तृषा, मोह, ज्वर, आणि भ्रम हीं हीं उत्पन्न होतात. गुरु वगैरे अन्न भक्षण केल्यानें कोपलेला कफ प्रदर उत्पन्न करतो, तो कफ प्रदर ह्मणावा. त्यांत पांढरें, गुरु, तेलकट, आणि शीतळ जळ योनींतून गळत असतें, मर्मस्थानांत पीडा होते, तसेंच वांति, अरुचि, तोंडांतून कुळ येणें, श्वास व कास हीं उत्पन्न होतात. आणि तीनही दोष कुपित झाल्यानें उत्पन्न झालेल्या प्रदरांत तीनही दोष दिसतात. जेव्हां स्त्री अतिक्लेशांनीं रोड बनते तेव्हां वृद्धि पावलेल्या वायूमुळें तीनही दोषांच्या चिन्हांनीं युक्त रुधिर बाहेर पडतें. दुर्गंधयुक्त, सायत्याच्या द्रव्याप्रमाणें, पींवळें व दाह करणारें रुधिर ज्याचें तो प्रदर असाध्य जाणावा. प्रतिमासीं ज्या रजाचें दर्शन होतें व जें पांच दिवस असतें, वजनांत जसें असावें तसें असतें, ज्याचा रंग गुंजसारखा व अळित्यासारखा, तें रज शुद्ध जाणावें. वाताच्या प्रकोपामुळें होणाऱ्या चार प्रकारच्या योनिरोगांवर जीं औषधें पूर्वीं सांगितलीं आहेत, तींच या प्रदरावरही उपयोगी आहेत व रुधिराच्या शौच्यावर रक्तपित्तावर व रक्त स्रवणाऱ्या अर्शावर जीं औषधें तींच या प्रदरावर योजावीं.

**बिघडलेलें दूध आणि तें सुधारण्याचे उपाय**—न पच- णारें, कुपथ्य विषम, विरुद्ध, अत्यंत खारट, आंबट, कडवट, आणि आंबलेलें अन्न खाल्यानें, मानसिक आणि शारीरिक संतापामुळें, रात्रीस निद्रा न आल्यामुळें, पुष्कळ विचार केल्यामुळें, आलस्या

वेगाला बंद केल्यामुळें, वेग येत नसतांही बळानें आणल्यामुळें, दुष्कळ गुळचिट अन्न आणि नाड्या धरणारें मांस खाल्यामुळें, दिवसा निजल्यामुळें, फार मद्य प्याल्यामुळें, फार मेहनत झाल्यामुळें, क्रोधामुळें आणि रोगामुळें दुर्बळ झाल्या कारणानें, तीनही दोष कुपित होऊन दूध उत्पन्न होण्याच्या ठिकाणींच दुधाला बिघडवून आठ प्रकारचे रोग उत्पन्न करतात. त्यांत वायूनें बिघडलेलें दूध रसरहित, फेसाळ आणि बुळबुळीत असतें. पित्तानें बिघडलेलें दूध दुर्गंधयुक्त आणि विवर्ण असतें. आणि कफानें बिघडलेलें दूध चिकट, सायत्याच्या दह्यासारखें आणि गुरु असतें. वातामुळें बिघडलेलें दूध पिणारें बाळक रोड होत जातें आणि त्या बाळकाचा स्वर सुद्धां ओढलेला होत जातो. आणि झाडा मळत होतो. उष्ण पदार्थांच्या सेवनानें कोपलेलें पित्त, दुधाच्या उत्पत्तिस्थानांत जाऊन, दुधाला हिरवें, पिंवळें, आणि काळें करून टाकतें. तें पिणारें बाळक निस्तेज शरीराचें, खिन्न, तृषाक्रांत, पातळ हगणारें, आणि उष्ण शरीराचें असें असतें. स्निग्ध आणि गुरु पदार्थ खाल्ल्यानें कोपलेला कफ, दुग्धोत्पत्तीच्या ठिकाणीं जाऊन, दूध अत्यंत स्नेहयुक्त करतो; हें दूध पिणारे बाळकास वारंवार वांति होते, लाळ स्रवते, आणि आळसामुळें व निद्रेमुळें श्वास, कास, तमक, वगैरे रोग होतात. स्नेहयुक्त आंवळकटीचें चूर्ण प्रातःकाळीं खावें. वज, कांग, ज्येष्ठमध, कडामाल, शिरसाचें बीं, कडुलिंब, आणि कडु घोसाळी यांचा काढा करून वमन करवावें. या योगानें दूध शुद्ध होतें. त्यानंतर अवशिष्ट राहिलेल्या दोषांच्या निवारणार्थ योग्य अनुपानाचा उपयोग करावा. साळी, रातेतांदूळ, शामाक, कांग, जव, मूग, कोद्रु, मसूर, आणि कुळिथ यांचा जेवणांत उपयोग करीत जावा. कडुलिंब, पिलु आंवळकटी, सुंठ, आणि सैंधेलोण यांचा काढा करून प्यावा म्हणजे दुधाची शुद्धि होते.

ससा, हरिण, आणि कपिंजल (एका जातीचा पक्षी) यांच्या मांसांचा उपयोग करावा. द्राक्ष, ज्येष्ठीमध, आणि उपलसरी यांचें पान करावें. पांच बोरें आणि कुळिथ यांस वांटून, त्याचा स्तनावर लेप करावा. काळीपाठ, सुंठ, आणि पिलु यांस थंड पाण्यांत वांटून अथवा अंजन, तगर, दारुहळद, वेलाचें मूळ, आणि कांग यांस थंड पाण्यांत वांटून त्याचा स्तनावर लेप केल्यानें दूध सुधरतें. ज्येष्ठीमध, मोहडा, द्राक्ष, विदारिका, आणि निर्गुंड यांस थंड पाण्यांत वांटून प्यालें असतांही दूध सुधरतें. अथवा द्राक्षाचा आणि ज्येष्ठीमधाचा स्तनावर लेप करावा. दारुहळद, नागरमोथी आणि काळीपाठ, हीं थंड पाण्यांत वांटून त्यांत सैंधेलोण टाकून प्यावें ह्मणजे लागलेंच दूध सुधरतें. याप्रमाणें थोडक्यांत सर्व विकारांचीं कारणें आणि त्यांवर उपाय येथें लिहिले आहेत; ते समजून घेऊन वैद्यांनीं देश, काळ, आणि अवस्था यांचा विचार करून नवीन प्रयोग योजावे, व रोगाची तावडतोब शांति करावी.

### इंद्रवज्रा.

देवांगनारत्नमयत्नलभ्य
प्रत्नार्थमादौ मणिशंकरेण ।
धर्मार्थकामानवलोक्य वामा-
धीनानलेखि स्वपरोपकारि ॥

### शार्दूल विक्रीडितम्

साम्राज्यात्स्वकुटुंबसंभवमहाराज्यास्तनूजन्मनाम्
क्षेत्रत्वात्सुखदायिनां च मदनातंकैकदिव्यौषधेः ।
प्राधान्यं प्रसमीक्ष्य पक्ष्मलदृशां पुंभ्यः प्रगल्भात्मनां
प्राग्रत्नं मणिशंकरेण लिखितं देवांगनानामिदम् ॥

# चंद्र रत्न २ रें

वैद्यानें चिकित्सा करण्याला आरंभ करण्यापूर्वी, ज्या शरीराची चिकित्सा करावयाची तें कशानें बनलें आहे तें जाणण्याची अत्यंत गरज आहे. आणि याचें ज्ञान झाल्याच्या अगोदर वैद्यास आपल्या क्रियेंत कधीं प्रवीण होतां येणार नाहीं. यास्तव या प्रकरणांत शरीराच्या घटनेची माहिती सांगतों.

## शरीर खालीं लिहिलेल्या भागांचें बनलें आहे.

१ अस्थिपंजर.
२ कूर्चा.
३ मांस (स्नायु).
४ धमनी.
५ शिरा.
६ ज्ञानतंतु.
७ चरबी.
८ संयोजक.
९ रसवाहिनी नलिका.
१० रक्त.
११ मर्मस्थानें.
१२ वायु, पाणी, मळ, मूत्र वगैरे बाहेरचे पदार्थ.

शरीरांत एकंदर २३९ हाडें आहेत. त्यांचा खुलासा पुढें लिहिल्या प्रमाणें:—

१ डोक्याचीं हाडें ... ... ८
२ तोंडाचीं ,, ... ... १४
३ दांतांचीं .. ... ... ३२
४ पाठणाचीं ,, ... ... ३३
५ फासळ्यांचीं ,, ... ... २४

याशिवाय केव्हां केव्हां कवटीच्या सांध्याच्या मध्यमार्गी एक किंवा दोन दुसरीं बारीक अस्थि असतात, हीं अस्थि आरंभीं कुर्चामय असतात. याशिवाय

| | | |
|---|---|---|
| ६ गळ्याचें हाड | ... ... | १ |
| ७ उराचें ,, | ... ... | १ |
| ८ खांद्यांचीं ,, | ... ... | २ |
| ९ जत्रूचीं ,, | ... ... | २ |
| १० दोनही हातांचीं ,, | ... | ६० |
| ११ नितंबाचीं ,, | ... ... | २ |
| १२ दोनही पायांचीं ,, | ... | ६० |
| | एकंदर | २३९ |

पाठणाच्या हाडांमध्यें एक वाढतें किंवा कमी होतें. त्याचप्रमाणें फासळ्यांमध्येंही एखाद हाड कमीजास्ती होतें. यास्तव शरीराच्या हाडांची एकंदर संख्या २३९ पासून २४३ पर्यंत मानली आहे.

**डोक्याचीं हाडें**—यांत १ कपाळाचें, १ डोक्याच्या मागचें, २ गंडस्थळाचीं, २ डोक्याच्या ताळव्याचीं, हीं दोनही हाडें मिळून, पुढील कपाळाच्या हाडांबरोबर, मागें डोक्याच्या मागल्या हाडाबरोबर आणि खालीं दोहोंबाजूस गंडस्थळाच्या हाडांबरोबर जोडलेलीं आहेत. १ स्फिनाइड अस्थि आणि १ अथ्माइड अस्थि: हीं दोनहीं हाडें खालीं आलेलीं आहेत. त्यांपैकीं स्फिनाइड मागील आहे आणि अथ्माईड पुढील आहे. या दोनही हाडांच्या वर, आणि पुढें सांगीतल्याप्रमाणें डोक्याच्या हाडांच्या खालीं, मगज अथवा मेंदु आहे.

**तोंडाचीं हाडें**--२ नाकाचीं, २ वरच्या जबड्याचीं, २ डोळ्यांचीं, २ गालांचीं, २ ताळूचीं, २ टर्बीनेटेड, २ वुमर, आणि १ खालच्या जबड्याचें. यांतून दोन टर्बिनेटेड आणि एक वुमर नांवाचें अस्थि नाकाच्या भागांत येतें.

**दांतांचीं हाडें**—हीं प्रत्येक जबड्यांत सोळा सोळा आहेत. वरल्या जबड्याच्या दांतांच्या मूळांवर वरल्या जबड्यामध्यें बसविलेलीं आहेत, आणि चावण्याची सपाटी खालीं ठेवली आहे.

खालच्या जबड्याच्या दांतांचीं मुळें खालीं आणि वर, चावण्याची सपाटी ठेवली आहे. तेणेंकरून दोनही चावण्याच्या बाजू एकत्र होऊं शकतात. प्रत्येक जबड्यांत सोळा दांत आहेत. त्यांत आठ उजवी-कडे आणि आठ डावीकडे आहेत. जेथें या दोहों बाजूंचे दांत मध्य-मार्गी जवळ जवळ येतात तेथून दाढांकडे जातांना दांत क्रमानें खालीं लिहिल्याप्रमाणें असतात. २ कापणारे, १ सुळका, २ कोप-ऱ्याचे, आणि ३ दाढा. याचप्रमाणें डावीकडे. आणि एका जब-ड्यांत जसे हे सोळा दांत आहेत तसेच ते दुसऱ्या जबड्यांतही आहेत.

**पाठाणाचीं हाडें**—हीं तेहतीस हाडें मिळून पाठणाची मोठी फरड होते आणि ती डोक्याच्या मागल्या हाडांपासून तों पेट त्रिका पर्यंत जोडलेली आहेत. हीं तेहतीस अस्थि पुढील प्रमाणें रचलेलीं आहेत.

| | | |
|---|---|---|
| १ मानेचीं हाडें ... ... ... | ७ | केव्हां केव्हां या पांच |
| २ पाठीचीं " ... ... ... | १२ | विभागांतून एखाद्या विभागांत |
| ३ कमरेचीं " ... ... ... | ५ | एखादें अस्थि जास्ती कमी असतें. |
| ४ त्रिकाचीं " ... ... ... | ५ | तसेंच त्रिकांतही पांच अस्थि |
| ५ गुदास्थीचीं" ... ... ... | ४ | आणि गुदास्थीचीं चार निरनिराळीं |
| | —— | अस्थि जोडलेलीं होऊन, एक |
| एकंदर | ३३ | त्रिकाचें आणि एक गुदास्थीच्या |

भागाचें अशीं अस्थि बनतात. या पाठणाच्या प्रत्येक अस्थीला मणका असें ह्मणतात. हे सर्व मणके एकावर एक असे आहेत. प्रत्येक मणक्याचा मागला व पुढला भाग कमानदार असतो, आणि त्यांच्या मध्यांतून एक मोठें च्छिद्र असतें. फरडीचे मणके एकावर एक रचले असल्यामुळें त्यांच्या मध्यमार्गी असलेलें छिद्र एक-

एकाशीं मिळतें असल्याकारणानें एक मोठी आरपार नळी बनते. यांत करोड रज्जु मस्तकाच्या मागल्या भागापासून तों थेट गुदास्थिच्या वरल्या भागापर्यंत अवलंबन करून राहिले आहेत.

**फासळ्यांचीं हाडें**---उराच्या प्रत्येक बाजूला बारा बारा फासळ्या आहेत. कोणाच्या शरीरांत वेळेनुसार तेरा असतात, आणि कोणाच्या शरीरांत अकराही आढळतात. फासळीच्या हाडांचें एक शेवट, मध्यें उराच्या हाडांशीं जोडलेलें असतें, आणि दुसरें शेवट पाठीच्या बारा मणक्यांच्या एकेक बेचकळ्याबरोबर जोडलेलें असतें. अशा प्रकारें उराचें हाड, फासळ्या, आणि पाठीचे मणके मिळून उराचा खोलगा झाला आहे. हीं हाडें पातळ आणि पोंचट आहेत, दुसऱ्या हाडांप्रमाणें तीं कठिण नाहींत. ह्मणून तीं सहज मोडू शकतात. श्वास घेण्याच्या कामीं हीं हाडें फार उपयोगीं आहेत.

**गळ्याचें हाड**---हें एक लहान नाजूक हाड आहे. त्याचा आकार अर्धगोल शिंगाच्या सारखा आहे, एके बाजूचें शिंग, दुसऱ्याबाजूच्यापेक्षां जरा मोठें आहे. हें हाड फार पोंचट आहे. आणि गळ्याला फास लागला असतां कित्येक वेळां तें मोडतें सुद्धां.

**उराचें हाड**---हें तीन निरनिराळ्या अस्थींनीं बनलेलें मधलें हाड आहे. त्याचा मधला तुकडा सर्वांहून मोठा आहे. तें दोनही बाजूंनीं फासळ्यांशीं जोडलेलें आहे. खालचा तुकडा पातळ असून त्याला धार आहे. आणि कांहीं कृश मनुष्यांच्या शरीरांत त्यास दाबतांही येतें. वरला तुकडा रुंद आहे. यामुळें हे तीनही तुकडे मिळून त्यांची आकृति तळवारीसारखी होते. वरचा भाग मुठीसारखा रुंद आहे, खालचा भाग तळवारीच्या पात्याप्रमाणें धारायुक्त आहे. श्वासोच्छ्वास घेतांनाही हें हाड हलतें.

**खांद्यांचीं हाडें**—हीं दोन हाडें पाठीमागें फासळ्यांच्या रक्षणार्थ ढाली सारखीं होत. कोणताही बोजा उचलणें झालें तर खांद्यांचीं हाडें आडवीं असल्याकारणानें त्याचा भार फासळ्यांस अथवा उराच्या खोलग्यांच्या आंतील मर्मस्थानांस पोंचत नाहीं. तीं रुंद आणि त्रिकोणाकार आहेत. आणि ढालीला धरण्याला मागच्या अंगानें आंत मूठ असते, त्याचप्रमाणें ह्या हाडांच्या मागल्या सपाटीवर मोरप्रमाणें हाडांना चढता भाग आहे. तसेंच ढालीच्या आंतून खोलगटपणा असतो त्याचप्रमाणें हीं खांद्याचीं हाडें आंतल्या भागीं खोलगट आहेत. आणि त्यांच्या कडा जराशा पुढें आलेल्या आहेत.

**गळसरीचीं हाडें**--प्रत्येक बाजूला एकेक गळसरीचें हाड आहे. या गळसरीच्या अस्थींच्या देखाव्यावरून शरीराच्या दुर्बळतेचें आणि स्थूळतेचें अनुमान होतें. त्याच्या बाकणावरून त्यांचा आकार ह अक्षरासारखा आहे. स्त्रियांच्या व पुरुषांच्या या अस्थींमध्यें थोडा फेर आहे. स्त्रियांचीं हीं हाडें जराशीं कमी बाकदार असतात, पण जास्ती नाजूक आणि गुळगुळीत असतात. जीं मनुष्यें मोठे बोजे उचलतात आणि पुष्कळ मेहनत करतात, त्यांचीं हीं हाडें जास्ती जाडीं, जास्ती तोकडीं, आणी जास्ती बाकदार असतात. तशीं डाव्यापेक्षां उजवीं हाडें जास्ती वजनदार, जाडीं, खडबडीत आणि आखूड असतात.

**दोनही हातांचीं हाडें**—२ दंडाचीं, ४ हाताच्या मणगटाचीं, १६ कांब्याचीं, १० तळाथाचीं, ४ आंगठ्याचीं, आणि २४ बोटांचीं. भुजास्थि खांद्यापासून ते कोपरांपर्यंत आलीं आहेत. त्यांचें वरचें येक गोल, चेंडूसारखें आहे, आणि त्यास भुजास्थीचें डोकें ह्मणतात. तीं खांद्याच्या हाडांच्या अग्रभागाच्या कोपऱ्यावरल्या गोल खोलग्यांत असतात. कित्येक वेळां हासडा बसल्यानें किंवा एखा-

दी. वस्तु जोरानें फेकतांना या भुजास्थीचें डोकें त्या खोलग्यांतून निसटून बाहेर पडतें आणि बगलेंत स्पष्ट रीतीनें दिसतें. हा सांधा इतर सांध्याहून विशेष लक्षांत ठेवण्यासारखा आहे व त्याच्यासारखी गति दुसऱ्या कोणत्याही सांध्यांत दिसत नाहीं. हाताच्या मणगटाचीं दोन हाडें आहेत; एक कुर्परास्थि आणि एक मणिबंधास्थि. कुर्परास्थि आंतल्या भागीं आलेलें आहे व मणिबंधास्थि बाहेरच्या अंगाला आलें आहे. हीं दोनही हाडें वरच्या कोपराला व खालीं कांब्यापाशीं जोडलेलीं आहेत. प्रत्येक कांब्यांत आठ हाडें आहेत आणि त्यांच्या चारचारांच्या दोन ओळी आहेत. वरल्या ओळींतील चारी हाडें कुर्परास्थींशीं जोडलेलीं आहेत. खालच्या ओळींतील हाडें तळाथाच्या अस्थींशीं संबंध ठेवतात. तळाथाच्या पांच हाडांपैकीं एक हाड आंगठ्याशीं संबंध ठेवतें आणि बाकीचीं चार बोटांशीं संबद्ध आहेत. बोटांच्यापेक्षां आंगठ्याशीं संबंध ठेवणारें तळाथाचें हाड बोटाच्या दुसऱ्या हाडांपेक्षां प्रमाणानें जास्ती अंतरावर आहे. प्रत्येक बोटांत तीन तीन हाडें असतात आणि आंगठ्यांत दोन दोन.

**नितंबाचीं हाडकें**—हीं दोनही हाडें मागून वरल्या भागीं त्रिकास्थीशीं आणि खालच्या भागीं गुदास्थीशीं, तशींच एकमेकाशीं पण पुढें सांधलेलीं आहेत, आणि त्यांच्या योगानें बस्तिपंजर बनला आहे. हें नितंबाचें हाड तीन निरनिराळ्या तुकड्यांचें बनलें आहे. वरचा भाग जो रुंद पंखासारखा आहे त्याला इल्यम असें ह्मणतात. आणि कडेवर हात ठेवले असतां ज्या भागावर भार येतो तो भाग हाच आहे. दोनही अस्थींच्या यावरच्या बाजू मिळाल्या असल्यामुळें बस्तिपंजराचा आराखडा होतो. दुसरा तुकडा भारी जाडा आणि खालीं ठेपशाचा आहे; यावरच बसण्याचा सगळा भार येतो. त्याचें नांव इस्कियम असें आहे. तिसरा तुकडा पातळ आणि अरुंद आहे आणि त्याचें नांव

प्यूबिस असें आहे. दोनही बाजूंची प्यूबिस हाडें मिळाल्यानें बस्तिपंजराची अग्रकमान होते. पोक्त वयांत या अग्रकमानीच्या भागावर केश उत्पन्न होतात. ज्या ठिकाणी हे तीनही तुकडे बाहेरून मांडले जातात त्या ठिकाणीं एक खोल खळगा आहे. यांतच मांडीच्या अस्थीचें टोंक आलें आहे. पुरुषाच्यापेक्षां स्त्रियांची नितंबास्थि अधिक रुंद भाग पसरट आहेत. जशी हातामध्यें खांद्याची अस्थि तशी त्यांच्याशी समान अशी पायांत नितंबास्थि होत. स्त्रियांच्या आणि पुरुषाच्या बस्तीमध्यें बराच फेर आहे. पुरुषाचा बस्तिपंजर अधिक जाड आणि बळकट आहे; आणि त्यावर जे मोठ-मोठे स्नायु आले आहेत त्यांच्या योगानें ही सगळी हाडें नीटपणें गुंफून गेली आहेत. तसेंच त्याच्या बस्तिपंजराच्या आंतील भाग खोल आणि अरुंद आहे. स्त्रियांच्या बस्तिपंजराची हाडें हलकी आणि अधिक खुललेली आहेत. स्नायु चिकटण्याचें स्थानसुद्धा फार गुळगुळीत असून बांधलेलें आहे. प्युबिसचा पुढला भाग अथवा बस्तिपंजराची अग्रकमान जास्ती रुंद आणि खुली आहे. इलियम आणि इस्कियम या दोनही बाहेरच्या बाजूला अतिप्रफुल्लित झाल्या आहेत. आणि यामुळेंच स्त्रियांस आपल्या मोठ्या नितंबाचा भार वाटतो. जेथें दोन्ही बाजूच्या प्युबिस अस्थींचा संधी होतो, त्या स्थळाला केश-भूमि म्हणतात. आणि या भागावर स्नायु, थोडी बहुत चरबी. आ-णि वर कातडी, अशी असतात. या कमानीच्या खालच्या आणि खुल्या भागीं जननेंद्रियांचे बाह्य अवयव आहेत. गुह्य अवयवांचा, बस्तिपंजराच्या खोल भागामध्यें समावेश झाला आहे.

**दोन्ही पायांचीं हाडें**--२ मांड्यांचीं, २ गुडघ्यांच्या झांकणीचीं, ४ पोटऱ्यांचीं, १४ घोट्यांचीं, १० पायाच्या फळ्याचीं, ४ आंग-ठ्याचीं, आणि २४ बोटांचीं. मांड्यांचीं दोनही हाडें भुजास्थीला

मिळतीं आहेत. हाताच्या कळ्याप्रमाणें पायाच्या पोटऱ्यांत दोन दोन हाडें आहेत. अधिक इतकेंच कीं एकेक पायांत एकेक याप्रमाणें दोनही गुडघ्यांवर एकेक अशा दोन झांकण्या आहेत. पाय भुईवर लांब ठेवून जर आपण त्या झांकणीस हलविलें तर त्या हालतात. त्यांचा आकार वाटोळा आहे, तशाच त्या चपट्या आणि पातळ आहेत. घोट्याच्या सात हाडांपैकीं एक हाड भारी मोठें, जाड आणि बळकट आहे. त्याचीच पायाची खोट बनली आहे. हें हाड घोट्याच्या बाकीच्या हाडांशीं, तसेंच पायाच्या फळ्याच्या हाडांशीं, कमनीच्या आकारानें असें बळकट बांधलें गेलें आहे कीं, त्याच्या योगानें तें सगळ्या शरीराचा भार तोलून धरतें. आंगठ्याचीं दोन आणि बोटाचीं तीनतीन हाडें आहेत. परंतु या हाडांवर श्वेततंतूचें संधिबंधन अशा रीतीनें आलें आहे कीं त्यांच्यांत हाताच्या बोटांप्रमाणें गति राहिली नाहीं.

हा अस्थिपंजराचा विषय पुरा करण्यापूर्वीं सांध्यांविषयीं जास्ती विवेचन करण्याची जरूर आहे. कारण कीं जेथें दोन हाडें एकमेकाशीं मिळतात तेथें सांधा होतो, आणि असे अनेक सांधे मिळून अस्थिपंजर झाला आहे. सुट्या सुट्या हाडांच्या भाऱ्यास अस्थिपंजर ह्मणतां येणार नाहीं. जेथें जेथें अस्थींचा संधी होतो तेथें तेथें एका हाडाच्या शेवटीं खोलगा असतो व दुसऱ्या हाडांचें शेवट गोल असतें. त्यामुळें तीं दोनही हाडें एकमेकांशीं बरोबर मिळून, त्यांचा सांधा बिजागरासारखा हलूं शकतो. अस्थीचें शेवट खडबडीत असल्यामुळें सांधा बरोबर बसण्यांत जी हरकत यावयाची ती न यावी ह्मणून, तशा हाडांच्या शेवटावर कूर्चा असते. ही कूर्चा अर्थात् लवचीक आणि गुळगुळीत आहे. कूर्चा, खरें ह्मटलें तर, अस्थींचाच मृदु प्रकार आहे. अस्थीच्या सांध्यांत त्यामुळें लवचीकपणा

आला आहे आणि त्यांच्या मोकळ्या गतींत कांहीं हरकत येत नाहीं. आणखी सांधे नेहमीं बुळबुळीत रहावे ह्मणून बहुतेक सांध्यांवर आणि मुख्यत्वें करून ज्या सांध्यांत फारच गति ठेवली आहे अशा सांध्यांवर एक रसोत्पादक पडदा ठेवला आहे, त्यांतून एक चिकट रस उत्पन्न होतो व तो सांध्यास तेलाप्रमाणें बुळबुळीत ठेवण्याचें काम करतो. सांधा उखळूं नये ह्मणून त्याच्या आसपास श्वेततंतूंचें बंधन आहे. याशिवाय त्यांच्यावर स्नायुही आलेले आहेत, त्यामुळें सांध्यांस बळकटी येऊन ते निखळून जात नाहींत.

शरीरांत जे स्नायु आहेत, त्यांत कित्येक गतियुक्त आहेत आणि कित्येकांस घट्ट बसविण्यांत आलें आहे. डोक्याच्या हाडांचे आणि तोंडाच्या हाडांचे सांधे गतिरहित आणि बळकट बसविले आहेत. डोक्याचीं हाडें पूर्णपणें बळकट असावीं ह्मणून त्या हाडांच्या बाजूवर करवतीप्रमाणें दांते असतात. आणि एका हाडाचे दांते आणि खोलगे दुसऱ्या हाडांच्या दात्यांत आणि खोलग्यांत, एकांत एक, मिळून बसतात. अशा रीतीनें सांध्यांची रचना असल्यामुळें जेथें तीं हाडें मिळतात तेथें वाकड्या तिकड्या रेषा पडतात. अज्ञान लोक त्यांस विद्यादेवीचीं लेखाक्षरें असें मानतात आणि कोणी दैवी लिपीचीं अक्षरें समजतात.

गतीच्या सांध्यांचे दोन भाग आहेत. कित्येक सांधे बिजागऱ्याप्रमाणें एकाच बाजूला फिरतात आणि दुसऱ्या बाजूला त्यांची गति बिलकूल होत नाहीं. कोंपराचे, गुडघ्याचे आणि हातापायांच्या बोटांचे सांधे. तसेच खांद्याचे, मांड्यांचे, आणि मानेचे सांधे, बिजागऱ्याप्रमाणें उघडमीट करूं शकतात, इतकेंच नाहीं, पण ते आजूबाजूलाही फिरूं शकतात. पाठणाच्या सांध्यांत फक्त मागें पुढें झुलण्याचीच गति आहे.

**कूर्चा**—हा पोंचट, स्थितिस्थापक, श्वेत आणि जाडा रबरासारखा पदार्थ आहे. हा अस्थिचें पूर्वरूप होय. गर्भामध्यें जेव्हां अस्थीचें बंधन तयार होत असतें, तेव्हां सर्व अस्थि प्रथम कूर्चारूपच असतात. जसजशी गर्भ राहिल्याची मुदत वाढत जाते तसतशी अस्थि ही दृढ होत जातात. जन्मल्यावरही कित्येक हाडांचीं टोकें कूर्चामय असतात, आणि तींच पुढें थोड्या दिवसांनी दृढ होऊन हाडें बनतात. सांध्यांच्या मधल्या भागीं, फासळ्यांच्या टोकांना, श्वासनलिकेमध्यें, नाकाच्या पडद्यामध्यें, आणि कानाच्या पाळीमध्यें, मरेपर्यंत कूर्चाच असतात. त्या घट्ट होऊन कधीं अस्थिरूप होत नाहींत. तरी वृद्धावस्थेमध्यें एखाद्या कूर्चेचा थोडा बहुत भाग अस्थीसारखा कठिण झालेला आढळतो, नाहीं असें नाहीं.

**स्नायु**—हे मांसाचे लचके होत, आणि ते अस्थीवर चिकटलेले असतात. जेथें जसे मजबूत आणि जशा आकृतीचे स्नायु असावे, तसेच तेथें ते ठेविलेले असतात. ज्याच्या शरीराचे स्नायु अधिक प्रफुल्लित असतात, त्यांस अधिक बळकट समजतात, खरोखरी मेहनती आणि सशक्त मनुष्याचे स्नायु अशक्त आणि रोड मनुष्यांच्या स्नायूंपेक्षां प्रमाणानें अधिक, मोठे, आणि जाडे असतात. चर्बीमुळें शरीर जाडें बनतें; परंतु तें दाबलें असतां पोंचट लागतें आणि वजनांत हलकें भरतें. स्नायूचा गुण शरीराच्या निरनिराळ्या भागांत गति उत्पन्न करण्याचा आहे. ज्या भागाला पुष्कळ आणि मेहनतीचें काम पडतें, त्या भागांत भारी बळकट स्नायु ठेवले आहेत. स्नायु दोन प्रकारचे असतात, जशी मनुष्याची इच्छा असते त्याप्रमाणें वर्तणारे हे एक प्रकारचे, आणि इतर मर्मस्थानाला गति देणारे हे दुसऱ्या प्रकारचे. ह्या स्नायूंचे व्यापार अहर्निश चालूच आहेत. मर्मस्थानें आपलें काम अहर्निश करीत असतात, तरी त्याचें भान

मनुष्यास बिलकूल नसतें. हे स्नायु फारच लहान असतात. हात, पाय, पाट, आणि पोट यांवर फार मोठे स्नायु आले आहेत. कारण कीं त्यांस फार मेहनतीचें काम करावें लागतें.

धमनी—या लांब पोकळ नळीसारख्या असतात. यांच्या द्वारा अंतःकरणापासून तों सगळ्या शरीराचें रक्तानें पोषण होतें. धमनी-च्या द्वारा शरीराचें पोषण होणें ही रचना वृक्षाच्या गर्भांतील रच-नेला मिळती आहे. छातींत राहिलेली मोठी धमनी त्याचें धड आहे. आणि झाडाला जशा पहिल्यानें दोन तीन मोठाल्या डाळ्या फुट-तात. त्याच प्रमाणें त्यांतून पहिल्यानें तीन डाळ्यांप्रमाणें तीन धमन्या फुटतात, पुढें त्यांतूनही दुसऱ्या लहान लहान धमन्या फुट-तात. अशा प्रकारें पुढें पुढें यांच्यांतून आणखी बारीक बारीक पुष्कळ धमन्या निघतात: त्या इतक्या कीं सर्व शरीरभर त्यांचें जाळें पसरल्याप्रमाणें होतें. नखें, केश, कूर्चा, आणि उपत्वचा यांस सोडून दुसऱ्या सर्व भागांत त्या पसरल्या आहेत. यांच्या द्वारा शुद्ध रक्ताचा पुरवठा सर्व शरीरांत होतो. एखाद्या रोगामुळें, अथवा दाबामुळें जरा एखाद्या भागाला रक्ताचा पुरवठा न झाला तर तो काष्टासारखा वेदनाशून्य होतो व निर्जीव बनतो. मोठी धमनी फारच खोल भागांत छातीच्या पोकळींत बसविली आहे. त्यामुळें तिला कोणत्याही प्रकारें इजा पोंचत नाहीं. प्रत्येक शस्त्रवैद्यानें या धमनीची माहिती करून घेणें जरूर आहे. कारण कापण्याच्या अथवा फाडण्याच्या कामीं कोणती धमनी आडवी येते, कोणती येत नाहीं, हें जाणण्याची आणि संभाळण्याची त्याला गरज पडते; व तसें करणें त्याचें कर्तव्य कर्मच आहे. साधारण आकाराची धमनी कापली गेल्यानेंही बळेनुसार इतका भारी रक्तस्राव होतो कीं रोगी मरण पावण्याचीही भास्ती उत्पन्न होते.

शिरा—शिराही धमनीप्रमाणेंच लांब लांब आणि पोकळ नळ्या आहेत. धमनी जशा शरीराच्या निरनिराळ्या भागांस शुद्ध रक्ताचा पुरवठा करतातात, तशा शिरा खराब झालेलें रक्त शरीरांतून एकत्र करून, पुनः शुद्ध करण्यासाठीं फुप्फुसांमध्यें घेऊन येतात. जेथें अतिशय बारीक बारीक धमान्यांचा शेवट होतो, तेथेंच शिरांचीही उत्पत्ति होते, आणि एकामागून एक लहान लहान शिरा मिळून एक मोठी शिर बनते. धमनीच्या उलटीच गति शिरांची असते. जेथें धमनीचा अंत, तेथेंच शिरांचें मूळ. धमनी, शिरा आणि ज्ञानतंतु—कीं ज्यांचें वर्णन यानंतर येईल—हीं तीनही मिळून सरशींच राहिलीं असतात.

**ज्ञानतंतु**—हा वाटोळा, चपटा आणि लांब दोरासारखा पदार्थ आहे. हा एके अंगानें ज्ञानेंद्रियांशीं जोडलेला आहे आणि दुसऱ्या अंगानें शरीराच्या निरनिराळ्या भागांमध्यें बारीक आकृतीनें पसरलेला आहे. शरीराच्या प्रत्येक भागाला, अवयवाला, आणि मर्मस्थानाला, तो आपापलें काम करावयास शिकवितो. धमनीप्रमाणें त्यालाही शाखा फुटतात. ज्ञानतंतु दोन प्रकारचा आहे:—एक मेंदु अथवा पाठणांत असलेल्या ज्ञानेंद्रियांतून निघतो तो; आणि दुसऱ्या प्रकारचा ज्ञानतंतु तंतुग्रंथींतून निघतो. सर्व मिळून सुमारें पन्नास एक ज्ञानतंतूंच्या जोड्या आहेत. प्रत्येक जोडींतून एक ज्ञानतंतु उजवे बाजूकडे जातो आणि दुसरा डाव्या बाजूकडे जातो. या पन्नास जोडांतून नऊ जोड मेंदूंतून आणि एकतीस जोड पाठणाच्या रज्जूंतून आणि सुमारें नऊ किंवा दहा जोड तंतुग्रंथींतून निघतात.

मेंदूंतून जे ज्ञानतंतु निघतात ते, कान, नाक, डोळे, जीभ वगैरे अवयवांस ज्ञानशक्ति देतात. पाठणाच्यां रज्जूंतून जे निघतात, त्यांतून आठ जोड मानेंतून निघतात, आणि ते मान व हात यांच्या

भागांस शक्ति देतात. पाठीच्या विभागांतून निघणारे बारा जोड उराच्या आणि पाठीच्या भागांवर पसरलेले आहेत. कमरेच्या विभागांतून जे पांच जोड निघतात ते, कमर, पोट आणि ओटीपोट या भागांस आणि पायांच्या पुढच्या भागांस शक्ति देतात. त्रिक आणि गुदास्थि याच्या भागांत आलेले पाठणांतले जे रज्जु, त्यांतून ज्ञानतंतूचे साहा जोड निघतात आणि ते ओटीपोट, नितंब आणि पायांच्या मागला भाग यांस आधार भूत आहेत.

तंतुग्रंथींतून निघणारे नऊ अथवा दहा जोड. उर, पोट, आणि मेंदूचीं मर्मस्थानें, यांच्याशीं संबंध ठेवतात. या ज्ञानतंतूचें काम फार गूढ आहे आणि ते मर्मस्थानाला आपलें कर्तव्य कर्म सर्वोत्कृष्ठ करण्याला शक्तिमान करतात असें मानिलें आहे.

**चर्बी**—हिच्या पिवळ्या रंगाच्या गुठळ्या संयोजकाशीं चिकटलेल्या असतात. जे मनुष्य शरीरानें फार जाडे असतात व वजनांत फार हलके असतात, त्यांच्या शरीरांत चर्बी फार वाढली ह्मणून समजावें, आणि ती शरीराच्या निरनिराळ्या भागीं असते.

**संयोजक**—हे बारीक रेषांचे बनले आहेत. आणि त्यांचें पातळ आस्तर स्नायु, धमनी, ज्ञानतंतु, अस्थि वगैरे शरीराच्या निरनिराळ्या भागांवर पसरलें आहे. आणि त्यामुळें हे भाग गळून पडत नाहींत. हें संयोजकांचें आस्तर साधारणपणें कित्येक स्नायूंच्या भागांवर बरेंच घट्ट असते.

**रसवाहिन्यांच्या नलिका**—रस वाहिन्यांच्या नलिका शरीराच्या प्रत्येक भागांत पसरलेल्या आहेत. त्यांचे दोन विभाग केले आहेत. एक " वरची त्वचा " ह्मणजे जी अगदीं वरल्या भागीं, कातडीच्या खालीं आहे ती; आणि दुसरी " आंतली त्वचा " जी, फार खोल भागीं असतात अशा मर्मस्थानांशीं आंतड्यांचा संबंध

जोडते ती. ह्या सर्व रसवाहिन्या एका मोठ्या नळीमध्यें येऊन मिळतात; आणि ती नळी उरामध्यें शिंपीपाशीं उत्पन्न होऊन गळ्यापर्यंत आली आहे. होजरीमध्यें अन्न घेऊन जाणारी अन्ननलिका आणि मोठी धमनी ह्या तिनही बरोबर एकमेकांच्या बाजूबाजूला राहिल्या आहेत. शिंपीच्या खालीं, मागल्या भागावर हा सर्व रस राहील एवढा एक पिशवीसारखा अवयव आहे. त्यांत आंतड्यामध्यें झालेला अन्नाचा रस एकत्र जमतो. वर जी मोठी रसवाहिनी सांगितली आहे ती ह्या अवयवांतून प्रथम निघते.

**रक्त**—हा एक लाल प्रवाही पदार्थ आहे. तो धमनींच्या द्वारा शरीराच्या प्रत्येक अवयवाला पोषण देणारा आहे. रक्त हें शरीराला जीवनरूप आहे आणि तें नेहमीं प्रवाहीच असतें. ज्या मनुष्याचें रक्त थिजलें तो मृत्यु पावला ह्मणून समजावें. मेलेल्या मनुष्याचें रक्त थिजलें असल्या कारणानें हालत चालत नाहीं. धमनी आणि शिरा यांतून रक्त सर्व शरीरांत फिरतें. धमनींतील रक्त शुद्ध असतें आणि शिरांतील रक्त मलिन असतें. धमनींतील रक्त चमकणारें आणि लाल रंगाचें असतें. आणि शिरांतील रक्त गढूळ व काळसर रंगाचें असतें. रक्ताची रुचि खारट आहे. रक्ताच्या आंतल्या तांबड्या प्रवाही अंशास रक्तजळ असें ह्मणतात आणि त्यांतच दुसरे लाल रंगाचे रजःकण असतात त्यांस रक्तकण असें ह्मणतात. या कणांचा रंग लालच असतो आणि या रक्तकणांमुळेंच रक्त लाल दिसतें. रक्तकण ज्या वेळेस शरीरांत कमी होतात त्या वेळेस शरीर पिंवळट दिसतें.

**मर्मस्थान**—निरनिराळीं कार्यें जीं या शरीरांत सतत चाललीं आहेत, त्यांच्या गरजेप्रमाणें शरीरामध्यें मर्मस्थानांची योजना केली आहे. हीं मर्मस्थानें एकंदर साहा आहेत.

| | |
|---|---|
| १ अन्नमार्गांची मर्मस्थानें. | ४ ज्ञानमार्गाची मर्मस्थानें. |
| २ श्वासमार्गांची मर्मस्थानें. | ५ मूत्रमार्गाची मर्मस्थानें. |
| ३ रुधिराभिसरणमार्गांची मर्मस्थानें. | ६ उत्पत्तिमार्गांची मर्मस्थानें. |

**अन्नमार्गाची मर्मस्थानें**—अन्नमार्गामध्यें खालीं लिहिलेल्या अवयवांचा समावेश होतो.—

| | |
|---|---|
| १ तोंड | ७ होजरी. |
| २ जीभ. | ८ काळीज. |
| ३ दांत. | ९ प्लीहा. |
| ४ थुंकी गाहण्याचें स्थान. | १० पित्ताशय. |
| ५ अन्नगळ. | ११ पांक्रिआस. |
| ६ अन्ननलिका. | १२ आंतडें. |

**तोंड**—तोंडामध्यें ओठ, तालु, जीभ, दांत, हिरड्यां वगैरे अवयव येतात. दोन्ही ओठ हें तोंडाचें द्वार आहे. त्याच्या मदतीनें तोंडामध्यें खाण्यासाठीं घातलेला पदार्थ खालीं पडत नाहीं. त्याच प्रमाणें गालाच्या आंतले स्नायु चावण्याच्या कामीं उत्तम प्रकारें स्वंथ करतात. दांत दोन प्रकारचे आहेत. मुलांचे जे दांत त्यांस दुधाळ म्हणतात. पांचव्या किंवा साहाव्या वर्षी हे दांत पडूं लागतात. त्यानंतर नेहमीचे दांत येतात. दुधाळ दांतांची संख्या वीस असते आणि नेहमीचे दांत बत्तीस असतात. दुधाळ दांत नवव्या महिन्यापासून येऊं लागतात, ते सर्व, मूल अडीच वर्षांचें होई तों पर्यंत येण्याचे संपतात. जेव्हां बालकास दांत येतात तेव्हां बालक फार दुखणेकरी होतें आणि त्यास अनेक रोग जडण्याचा संभव असतो. नेहमी जे बत्तीस दांत, त्यांत बारा दाढा असतात. त्या मोठ्या पोकळ असतात. त्यांचा उपयोग चावण्याच्या कामीं होतो. दातांच्या उपयोगाप्रमाणें त्यांस निरनिराळीं नावें दिलीं आहेत. कापणारे दांत प्रत्येक

जबड्यामध्यें चार असून, ते बरोबर मध्य भागीं असतात. त्यानंतर त्यांच्या दोहो बाजूला एक एक असे प्रत्येक गालफडांत दोन दोन सुळे दांत आहेत. हे, वरचा एक आणि खालचा एक असे, प्रत्येक गालफडांत दोन दोन मिळून चार आहेत. हे दांत अणिदार आणि कुत्र्यांच्या सुळक्यांना मिळते आहेत, त्यामुळें यांस कुत्र्यांचे दांत असेंही ह्मणतां येईल. सुळक्यांच्या बाजूला दोन कोपऱ्याचे दांत येतात, ह्मणजे दोन्ही गालफडामध्यें दोन दोन कोपऱ्याचे दांत मिळून आठ दांत असतात. या आठांतून एकही दांत मुलांस असत नाहीं. दाढा ह्या जबड्यानध्यें खालवर तीन तीन अशा दोन जबड्यांतल्या मिळून बारा असतात. मुलामध्यें ह्या फक्त आठच असतात.

**जीभ**—हें रुचीचें इंद्रिय आहे. त्यामुळें आपल्यास प्रत्येक पदार्थाची रुचि कळते. तिचें मूळ गळ्याच्या हाडाबरोबर चिकटलेलें आहे. ती पोंचट आणि स्नायुमय आहेत. जिभेला रुचि समजावी यासाठीं पदार्थ प्रवाही रूपानें अथवा थुंकीमध्यें मिसळलेल्या स्थितीमध्यें जिभेला लागला पाहिजे. जिभेवर बारीक बारीक कांटे असतात. परंतु ती नेहमी ओली असल्याकारणानें ते कळत नाहींत. त्रिदोषावस्थेमध्यें जेव्हां तोंडांत थुंकी नसते आणि जीभ सुकून जाते, तेव्हां हे कांटे खरखरीत लागतात.

**तालू**—ह्या दोन आहेत. एक कठीण अस्थीची आणि दुसरी पोंचट स्नायुमय. गळ्यांतील पडजीभ ही तालवेबरोबर गणिली जाते. हिचाही रुचि जाणण्याचे कामीं जिभेप्रमाणें उपयोग होतो.

**आंतला गळा**—हा पडजिभेच्या खालीं अन्ननलिकेच्या मधला भाग आहे. ह्या भागाला बाहेरून गळा असें ह्मणतात. त्याच्या आंतल्या भागीं जो रस्ता आहे त्यानेंच अन्ननलिकेमध्यें अन्न उतरतें.

**थुंकी**—थुंकी राहण्याचें स्थान अथवा थुंकीचे पिंड तीन आ-

हेत. एक, कानाच्या खालीं व जबड्याच्या मागें; दुसरा, जबड्याच्या कोपऱ्याच्या आंत; आणि तिसरा जिभेच्या खालीं आहे. या मगळ्यांतून थुंकी उत्पन्न होते. थुंकी अन्नाचें पचन करण्यास आवश्यक आहे. तिच्या योगानें तोंड ओलें राहतें. आणि जेवते वेळीं ती अन्नाशीं मिळून जाऊन त्याचा पाहिजे तसा लोंधा होऊन, तें सुलभतेनें घशाखालीं उतरतें. जेवते वेळीं व जेवल्यावर थुंकी फार उत्पन्न होते. आणि तिच्याच साहाय्यानें अन्नाचा आस्वाद जिभेला समजतो. सुक्या जिभेला अन्नाची कांहींही गोडी कळत नाहीं. याशिवाय अन्न पचविण्यांतही ती कांहीं रासायनिक काम करते. जेवल्यावर जी थुंकी आपण घशाखालीं उतरतों, तिच्या योगानें अन्नांतील पिठूळ भाग पचतो.

**अन्नमार्ग**—अन्नमार्ग, घशापासून होजरीपर्यंत आहे. घशांत अन्न आलें कीं तें आपलें अन्नमार्गाच्या द्वारा होजरीमध्यें येतें. केव्हां केव्हां अन्नमार्गाला व्याधि झाला असतां, घशानें अन्न बिलकूल खालीं येत नाहीं, तेव्हां रबराच्या नळीचा उपयोग करावा लागतो. उरांत गांठी उत्पन्न झाल्या असतांही अन्नमार्गावर त्यांचा दाब पडतो, त्यामुळें अन्न खालीं उतरत नाहीं.

**होजरी**—हा अन्नमार्गाचा एक मोठा अवयव आहे. कमींत कमी तीन तास पर्यंत अन्न होजरींत राहतें. ती एका अंगानें अन्नमार्गाशीं व दुसऱ्या अंगानें आंतड्याशीं जोडलेली आहे. ती पोकळ असून तिचा आकार पखालीसारखा आहे. बेंबीच्या वर आणि उरांतील हाडांच्या खालच्या भागीं ती स्थित आहे. तिच्या एका अंगाला काळीज आणि दुसऱ्या अंगाला प्लीह आहे. पचनक्रिया व्हावयासाठीं होजरीमध्यें आहार इकडे तिकडे फिरत असतो. आहाराचा स्पर्श होतांच होजरीच्या आंतील श्लेष्मावरणाला गति

प्राप्त होतें आणि त्यामुळेंच आहारासही गति प्राप्त होते. श्लेष्माव-रणाच्या वळकुत्यांला सूक्ष्म छिद्रें असतात, व त्यांतून जठररस उत्पन्न होतो. याच्या योगानें आहाराचा बराच भाग पचविण्यास सुलभ पडतो. अन्न पचल्यावर जो रस निघतो तो आणि बा-कीचा न पचलेला अन्नाचा भाग तसाचा तसाच आंतड्यांत येतो, मग त्याचें पचन आतड्यांत होतें. अन्नमार्गाकडील होजरीचें तोंड रुंद असतें व आंतड्याकडील अरुंद असतें.

**काळीज**–हें अतिशय वजनदार असें अन्नाच्या मार्गाचें मर्म-स्थान होय. त्याचें वजन सुमारें तीन रत्तल आहे. अर्थात् हें वजन प्रौढ मनुष्याच्या कलिजाचें आहे. संस्कृतांत याला यकृत ह्मणतात. पोटांत उजव्या कुशीला जी गांठ होते तें एक प्रकारचें यकृताचें दरद आहे. त्याची लांबी अदमासें एक फूट आणि जाडी साहा इंच असते. ही गांठ उजव्या कुशीतून निघून, उदराचा भाग उलटून, डाव्या कुशींत थेट कौलूच्या भागापर्यंत व्यापलेली असते. अन्न-मार्गाच्या दुसऱ्या अवयवांप्रमाणें हा अवयव कांहीं पोंचट नाहीं. यांतून पित्त उत्पन्न होतें व तें पित्ताशयांत जमतें.

**पित्ताशय**–हा काळिजाच्या खालीं हिरव्या पोपटी रंगाची आणि मुळ्याच्या आकाराची एक पिशवी आहे. ती मोठ्या आं-तड्यांच्या वरच्या भागीं जेथें होजरी आणि आंतडीं जोडलेलीं आहेत, तेथून थोड्याशा खालच्या भागीं पित्तवाहिनी नळीच्या द्वारा पित्त आणून सोडते. आहारामध्यें जर कांहीं चर्बीचा भाग असला तर तो हें पचवितें.

**कौलू**–डाव्या कुशीला ही असते. जेव्हां ती आपल्या योग्य प्रमाणांत असते तेव्हा ती पोटांत आहेशी भासत नाहीं. परंतु तापामुळें तिचा आकार वेळोवेळीं फार वाढतो. केव्हां केव्हांतर ती

मगळ्या उदरालाही व्यापून राहिलेली आढळते. तिचें कार्य रक्तशुद्धीचें आहे. कित्येक डाक्टरांचें असें मत आहे कीं ज्या मनुष्याची कोळ कापून काढली असेल तो फार अन्न खाणारा होतो व त्याची तृप्ति ह्मणून होतच नाहीं. कोळचा रंग गडद आहे.

**पांक्रियास** या नांवाचा पिंड पोटांत आडवा राहिला आहे आणि त्यांतून पुंकीशी मिळता व तिच्या मारक्यात गुणांचा असा एक रस उत्पन्न होतो. या अवयवाला अर्बुद वगैरे व्याधि होतात, ते असाध्य आहेत. अन्नांतील स्निग्ध पदार्थ पचन करण्याच्या कामीं याचा उपयोग मोठा आहे.

**आंतडीं** यांची लांबी सुमारें तीस फीट आहे. मोठीं आंतडीं आखूड पण रुंद आणि जाड असतात, व लहान आंतडी लांब परंतु अरुंद असतात. लहान आंतडीं पंचवीस फीट लांब असतात आणि मोठीं पांच फीट असतात. मोठ्या आंतड्यांच्या शेवटल्या भागाला मलस्थान ह्मणतात. आंतड्यांत मळ जमा होतो. आंतड्यांतही एक श्लेष्मावरण असतें, व त्यांत निरनिराळ्या जातीचे रसोत्पादक पिंड आहेत. हे पिंड मोठ्या आंतड्यापेक्षां लहानांतच जास्ती आढळतात. चर्बीचा भाग आणि अन्नाचा भाग जठरामध्यें पचला नाहीं तो हे आंतड्यांत पचतात.

**श्वासमार्गाचीं मर्मस्थानें**–श्वासमार्गाचीं मर्मस्थानें, फुप्फुसें व श्वासनलिका अशीं दोन आहेत–एक डावें व दुसरें उजवें. उजवें फुप्फुस डाव्यापेक्षां वजनानें सुमारें पांच एक तोळे अधिक आहे. या फुप्फुसाचा आकार स्पंजासारखा आहे. स्पंज जसा पाण्यांत बुडवून फुगल्यावर दाबला असतां, संकोच पावतो, त्याचप्रमाणें फुप्फुस दाबल्यानें, रक्त आणि रक्ताचे बुडके बाहेर पडतात, श्वासनलिकेच्या मोठाल्या शाखांतून पुढें दुसऱ्या लहान लहान शाखा निघतात. फुप्फुस हें या सर्व श्वास-

नलिकांनीं बनलेलें आहे. या शाखांच्या छिद्रांमध्यें रक्त भरलेलें असतें. नाकावाटे जी शुद्ध हवा आपण आंत ओढतों ती श्वासनलिकांच्या द्वारा फुप्फुसांमध्यें जाते, आणि त्यामुळें तेथें राहिलेलें मळिण रक्त पुनः शुद्ध होतें. फुप्फुसांवर एक पडदा आहे. थंडी वगैरे लागल्यानें या पडद्याला व्रण होतात आणि त्यामुळें उदरांत असह्य शूळ उत्पन्न होतो. दोनही फुप्फुसांचें एकंदर वजन सुमारें चाळीस औंस आहे. त्यांचा रंग जन्मल्या वेळीं चकचकीत लाल असतो. परंतु पोक्त वयामध्यें तो मलिन व मळकट होतो. जसजसें वय वाढतें तसतशी त्यावर काळसरपणाची झांक मारते.

श्वास नाकांतून अथवा तोंडांतून लॅरिंग्स व ट्रेकिया यांच्या वाटे फुप्फुसांमध्यें जातो. लॅरिंग्स अथवा कंठाचे अवयव आणि ट्रेकिया मिळून श्वासनलिका बनली आहे. लॅरिंग्स मानेच्या भागीं असतात. ते निरनिराळ्या नऊ कूर्चांचे बनले आहेत. त्यांचा वरचा भाग रुंद आणि खालचा भाग अरुंद असा आहे. ट्रेकिया याच्या पंधरा सोळा कड्या आहेत. उराकडे जातांना ट्रेकियाचे दोन भाग होतात. एक भाग उजव्या फुप्फुसांत जातो आणि दुसरा डाव्यांत जातो. उजव्या बाजूपेक्षां डावीकडची नळी जरा जास्ती लांब आहे. फुप्फुसांमध्यें या नळ्यांतून दुसऱ्या अनेक नळ्या निघाल्या आहेत. व त्या जाळ्याप्रमाणें सगळ्या फुप्फुसांमध्यें पसरल्या आहेत. शिरा सगळ्या शरीरांतलें खराब रक्त एकत्र जमवून अंतःकरणाच्या उजव्या कुशीच्या मार्फत फुप्फुसांमध्यें आणतात व येथेंच त्याची शुद्धि होते.

**रुधिराभिसरणमार्गाचीं मर्मस्थानें**–यांच्या पोटीं हृदय व धमनी हीं येतात. धमन्यांविषयीं पूर्वीं लिहिलेंच आहे. हृदय दोहों फुप्फुसांच्या मध्यें डाव्या कुशीवर ठेविलेलें आहे. त्यांतून रक्त धमन्यांच्या मार्फत सर्व शरीरांत फिरतें. मोठ्या धमन्यांचें मूळ हृदय आहे. उराच्या

अस्थीपासून एका इंचाच्या अंतरावर साहाव्या फासळीच्या खालच्या भागीं कान ठेवून ऐकल्यास, हृदयाची धडकी स्पष्टपणें ऐकूं येते. त्याच्या दोन बाजू आहेत—एक उजवी व दुसरी डावी. आणि दोनही बाजूंचे फिरून दोन दोन विभाग आहेत. उजव्या विभागामध्यें अशुद्ध रक्त मोठ्या शिरांच्या मार्फत येतें आणि डाव्या बाजूला फुप्फुसांतून शुद्ध रक्त येतें; तें तेथून मग धमनींत शिरतें.

फुप्फुस व अंतःकरण हीं उराच्या बरगडींमध्यें आहेत. हीं दोनही मोठ्या महत्वाचीं मर्मस्थानें आहेत. त्यांवर सगळ्या जीवनाचा आधार आहे. यापैकीं एकही अवयव जरा पांच पळें आपलें काम करणें बंद करील तर मनुष्यास मृत्युच येईल.

**ज्ञानमार्गाचीं मर्मस्थानें**–मेंदु आणि कण्याची रज्जु हीं ज्ञानाच्या उत्पत्तीचीं स्थानें आहेत, आणि त्यांपैकीं प्रत्येकामध्यें निरनिराळ्या कार्याचें ज्ञान होतें. ज्ञानतंतूंच्या द्वारा शरीराच्या निरनिराळ्या भागास ज्ञान प्राप्त होतें. मेंदु हें सर्वांहून श्रेष्ठ ज्ञानाचें स्थान आहे. तो डोक्याच्या करटींत ठेवला आहे, आणि कोणत्याही प्रकारें त्याला लौकर इजा पोंचूं नये ह्मणून त्याच्या भोंवतीं बळकट हाडांचा घेरा आहे. मेंदूचे चार भाग आहेत. या चोहोंपैकीं दोन विभाग मेंदूस व कण्याच्या रज्जूस सांधणारे आहेत, व ते मेंदूच्या आणि कण्याच्या रज्जूच्या मार्गावरच आहेत. खरा मेंदूचा भाग एकच आहे आणि त्यास सीरिब्रम ह्मणतात. त्याचे दोन विभाग आहेत. त्या प्रत्येकाचा आकार लंबगोल व लोंध्यासारखा असतो. ते वरून सुटे व खालून जोडलेले आहेत. मेंदूच्या वरच्या भागीं वळकुट्यांप्रमाणें कांहीं असतें. ज्याच्या मेंदूस वळकुट्या पुष्कळ व खोल तो मनुष्य जास्त बुद्धिमान असतो. या शिवाय आणखी एक लहान मेंदु आहे. त्याचें वजन अजमासें १२

पासून १४ तोळे असतें. मोठा मेंदु लहानापेक्षां आठपट मोठा असतो. पुरुषापेक्षां स्त्रियांचा लहान मेंदु अधिक मोठा असतो. लहान मेंदु कंवटीच्या मागच्या बाजूला गेला आहे. पाठीच्या कण्याची रज्जु सुमारें सतरा इंच लांब असते. आणि ती पाठणाच्या हाडांच्या मधल्या छिद्रांनी बनलेल्या पन्हळीमध्यें असते. गर्भामध्यें कण्याची रज्जु प्रमाणानें अधिक लांब असते, पण जन्मल्यावर ती आखूड होत जाते. या रज्जूंतून एकतीस ज्ञानतंतूच्या जोडया फुटल्या आहेत.

**मूत्रमार्गाची मर्मस्थानें**—मूत्रपिंड, मूत्रनलिका, मूत्राशय आणि शिश्न हे मूत्रमार्गाचे अवयव आहेत. शिश्न उत्पत्त्यवयवांमध्येंही येतें. मूत्रपिंड शरीरांत दोन आहेत—एक डाव्या बाजूला व एक उजव्या बाजूला ओटी पोटांत आहे. उजव्या बाजूच्यापेक्षां डावीकडील मूत्रपिंड जास्ती वजनाचा आहे. त्याच्यांत बारीक बारीक नलिका आहेत. त्यांत रक्त फिरतें. तेव्हां त्यांतून पाण्याचा अंश ओढून मूत्ररूपानें वेगळा पडतो, व तो मूत्रनलिकेच्या द्वारा मूत्राशयांत जमतो आणि शिश्नाच्या वाटे बाहेर पडतो. मूत्रमार्ग सुमारें सतरा अठरा इंच लांबीचा आहे, व तो इंग्रजी लिहिण्याच्या पिसाच्या पेनाच्या पोकळी इतका जाडा आहे. प्रत्येक मूत्रपिंडांतून एकेक नलिका निघून मूत्राशयाच्या एकेका बाजूवर येऊन उघडते. मूत्राशय नाभीच्या खाली बस्तीच्या अग्रभागीं राहिला आहे. जेव्हां तो मूत्रानें भरलेला असतो, तेव्हां तो मोठा लागतो. मूत्र बंद झालेल्या रोग्याचें पोट पाहिल्यानें मुत्राशयाच्या योग्य स्थानाचें ज्ञान होतें. कारण कीं मूत्र भरून राहिल्यानें मूत्राशय ताणतो व पोटाला फुगोटी येते. मूत्राशयांतून मूत्र पुरुषाच्या शिश्नामध्यें व स्त्रीच्या योनिमार्गें बाहेर येतें. पुरुषाहून स्त्रीचा आंतला मूत्रमार्ग अधिक रुंद आहे. यामुळें मूत्राशयांतून कंकर, खडा वगैरे पदार्थ लौकर व सहज बाहेर येऊं शकतो.

**उत्पत्तिमार्गाचीं मर्मस्थानें**—स्त्रीपुरुषांचे उत्पत्त्यवयव निरनिराळे आहेत. वृषण, वीर्यमार्ग, वीर्याशय, आणि शिश्न हे पुरुषाचे अवयव आहेत; व गर्भाशय, गर्भांड, फलवाहिनी व योनि हे स्त्रीचे होत.

**पुरुषाचे उत्पत्त्यवयव**—वृषणाच्या दोन गोळ्या वेगळ्या वेगळ्या वृषणाच्या थैलींत ठेवल्या आहेत, आणि हे वृषण रज्जूच्या आधारानें अधांतरी टांगून राहतें. या दोनही गोळ्यांमध्यें फारच बारीक बारीक वीर्योत्पादक नलिका आहेत. यांच्यातून वीर्य स्रवतें आणि तें जमा होऊन वीर्यमार्गाच्या द्वारा वीर्याशयांत येतें. वृषणाच्या गोळ्यांवर पांच निरनिराळीं आस्तरें वेटाळलेलीं आहेत. वर जें रसाचें पुट आहे तें पोटाच्या आंतल्या रसाच्या पुटाला मिळतें आहे. वृषणवृद्धिमध्यें ज्या भागीं पाणी जमतें तो भाग या रसाच्या पुटाच्या वर आणि कातडीच्या पुटाच्या मधला आहे. यांतील पाण्याचा आणि वृषणाचा कोणत्याही तऱ्हेचा संबंध नाहीं. या वृषणाच्या वर आणखी एक उपवृषण आहे. वृषण बोटानें दाबल्यानें वरल्या भागीं कांहींसें लोंब्यासारखें लागतें तेंच उपवृषण. त्याला दाबलें असतां बारीक दोरीसारखा एक दोर हाताला लागतो; तोच वृषणरज्जु. हा वीर्योत्पादक नलिकांतून वीर्याला वीर्याशयांत घेऊन जातो. वीर्याशय मूत्राशयाच्या बाजूलाच आहे. शिश्नाच्या मूळाशींच वीर्याशयाचें तोंड खुलें होतें. आणि शिश्नमार्गानें वीर्य बाहेर येतें.

**शिश्न**—हा सृष्टिकर्माचा वर्णावयव आहे. तें तीन वेगळ्या वेगळ्या भागाचें बनलें आहे. त्याची कातडी मुळीं खालून वृषणावर पडली आहे. त्याचें मुख शंकूच्या आकृतीचें आहे. त्याला फूल अथवा मणि ह्मणतात. यावरला कातडीचा भाग चिकटलेला नसतो,

तर सुटा असतो, व बस्तीच्या अग्रकमानीवरल्या अंगाला लागलेला आहे आणि बस्तीची कमान खालच्या भागीं. ढळती असल्या कारणानें त्याची लांबी वरल्या भागापेक्षां खालच्या भागीं जास्त असलेली दिसते.

**स्त्रीचे उत्पत्त्यवयव**—गर्भाशय बस्तीच्या बरोबर मध्यभागीं आहे. त्याच्या पुढल्या भागावर मूत्राशयाचा व मागल्या भागावर मलमार्गाचा भाग आलेला आहे. तो तीन एक इंच लांब आहे. व त्याचें वजन अदमासें चार तोळे असतें. कौमार अवस्थेमध्यें गर्भाशय प्रमाणानें फार लहान असतो. त्याच्या पुढल्याभागाला ग्रीवा अथवा कमळ ह्मणतात, आणि त्याच्या मध्यभागीं जें छिद्र आहे त्याच्या वाटे गर्भाशयाच्या आंतले सर्व पदार्थ बाहेर पडतात. याला कमलमुख किंवा गर्भाशयाचें मुख ह्मणतात. गर्भाशयांतून पडणारा श्वेतपदार्थ, ऋतुस्रावाचें रक्त, व पुढें गर्भ हीं या मुखाच्या द्वाराच बाहेर येतात. गर्भाशयाच्या वरच्या भागीं दोन कोपऱ्याला दोन छिद्रें आहेत व तीं फलवाहिनी नळ्यांचीं तोंडें होत. या फलवाहिनी नळ्या दुसऱ्या बाजूला गर्भांशीं जोडलेल्या आहेत. गर्भांडाच्या दोन लहान गोळ्या स्त्रीच्या दोनही बाजूस ओटीपोटामध्यें एकेक अशा असतात, व त्यांत स्त्रीबीज परिपक्व होतें. जें कार्य पुरुषाच्या शरीरामध्यें वृषण करतें त्याला मिळतेंच कार्य स्त्रीच्या शरीरांत गर्भांड करतें. स्तनही स्त्रीच्या उत्पत्त्यवयवामध्येंच येतात. तरुण वयांत जेव्हां स्त्रीचे अवयव प्रफुल्लित होतात तेव्हां स्तनही प्रफुल्लित होतात. ते अणिदार, व चंद्रप्रमाणें वाटोळे असून स्त्रीच्या उरावरील दोन मांसपिंड होत. त्यांत चर्बी पुष्कळ असते. त्यांच्यांत बारापासून पंधरापर्यंत दुग्धोत्पादक नलिका असतात. त्यांच्या द्वारा दूध स्रवून स्तनांच्या मुखाच्या वाटे बाहेर पडतें. कौमार अ-

वस्थेमध्यें स्तन बिलकूल वाढलेले नसतात. वय वाढल्यानें, गर्भस्थापन झाल्यानें आणि बाळंतपणामुळें स्तनांच्या वाढीमध्यें आणि स्थिती-मध्यें फेर पडतो. वृद्धावस्थेमध्यें ते गळतात. कित्येक स्त्रियांच्या स्तनांचा भाग फार असतो आणि कित्येकींच्या स्तनांचा थोडा असतो. मोठे स्तन असले ह्मणजे दूध फार असतें असा कांहीं सर्वत्र नियम नाहीं.

वायु, पाणी, मळ, मूत्र, वगैरे बाह्य पदार्थ, -मळमूत्रादिक व वायु वगैरे बाहेरचे पदार्थ कित्येक वेळीं शरीरांत वाढलेले आणि कित्येक वेळीं कमी झालेले आढळतात. तथापि त्यांचा थोडा बहुत अंश नेहमी शरीरांत असतोच असतो.

सूर्याचंद्रमसौ सदा प्रवहतो नासाग्ररंध्रद्वयाऽ-
दित्यालोच्य शरीरभागरचनाः सर्वाः समुद्बोधिताः ।
यत्रैतत्स्थहिमांशुरत्नमिति सत्संज्ञाऽर्पिता प्रेमतः
शक्यार्थं परिहाय वाचितगणं लक्ष्यार्थभाजा मया ॥



# तरंग २ रा.

## धन्वंतरि रत्न ३ रें.

आयुर्वेदाची उत्पत्ति—कोणा एका वेळीं सर्व देवांमध्यें व श्रेष्ठ ऋषिमंडळामध्यें बसलेला आणि धन्वंतरीचा अवतार धारण करणारा दिवोदास नांवाचा काशीराजा होता. त्याच्यापाशीं सुश्रुतादि शिष्य मंडळीनें जाऊन विनयपूर्वक प्रश्न केला कीं—"हे महाराज, या भूमंडळावर शारीर (शरीरामध्यें उपजणाऱ्या), मानस (मनामध्यें उपजणाऱ्या), आगंतुक (बाह्य कारणांनीं उत्पन्न होणाऱ्या) आणि स्वाभाविक (स्वभावें करून उत्पन्न होणाऱ्या) व्याधींनीं अनेक प्रकारच्या पीडांचा अनुभव ज्यास घडत आहे, आणि राजादिक रक्षण असतांही अनाथाप्रमाणें भासणारे आणि विव्हळ होणारे, अशा मनुष्यांस पाहून, आमच्या मनास फार दुःख होतें. यासाठीं सुखाची इच्छा करणाऱ्या या मनुष्य जातीच्या रोगाची शांति व्हावी आणि अशा प्रकारें उत्तम हितकर उद्योग करून आपलें उपजीवन त्यांस मिळवितां यावें, अशा हेतूनें आह्मीं आपल्या मुखानें आयुर्वेद ऐकावयास इच्छितों. यांतच इहलोकचें आणि परलोकचें हित राहिलें आहे." अशा प्रकारें त्यांची प्रार्थना ऐकून प्रसन्न चित्त झालेल्या धन्वंतरीनें सांगितलें—"तुह्मी आलां, फार चांगलें झालें. मी तुह्माला आपल्या पुत्रासारखें गणून आनंदानें आयुर्वेद शिकवितों." असें आश्वासन देऊन तो आणखी असेंही ह्मणाला—"आयुर्वेद हा अथर्व वेदाचें उपांग आहे. ब्रह्मदेवानें प्रजांची उत्पत्ति करण्यापूर्वींच त्यांच्या हितासाठीं एकलक्ष श्लोक

आणि त्याचे एक हजार अध्याय मिळून आयुर्वेद प्रथम प्रगट केला. नंतर काळें करून मनुष्यें अल्पबुद्धि आणि अल्पायुषी झालीं असें पाहून अनुग्रहदृष्टीनें त्या आयुर्वेदाचे त्यानें आठ विभाग केले. यांतच वैद्यांची सगळी इतिकर्तव्यता आली आहे." याप्रमाणें आरंभीं धन्वंतरीनें सर्व आयुर्वेद सुश्रुतादिक शिष्यांस ऐकविला.

वैद्यांची ओळख- मनुष्याच्या शरीरामध्यें प्राण राहण्याचीं ठिकाणें दहा आहेत. दोन शंख, तीन मर्म, कंठ, रक्त, शुक्र, ओज आणि गुदा. हीं दहा स्थानें. इंद्रियें, विज्ञान, चेतनेचे हेतु, आणि रोग यांस जो जाणतो तोच वैद्य प्राणाभिसर ( प्राण आणणारा ) समजावा. कित्येक वैद्य प्राणाचें रक्षण करून रोग हरणारे आहेत आणि कित्येक प्राण हरणारे आहेत. या प्रकारें वैद्यांचे दोन प्रकार आहेत. या दोनही प्रकारच्या वैद्यांस कसें ओळखावें त्याविषयीं थोडक्यांत विवेचन येथें करतों. चांगल्या कुळांत उत्पन्न झालेला, संशयादिकांनीं मुक्त, शास्त्राचा अभ्यास केलेला, क्रियांमध्यें कुशळ, सुघड, पवित्र, हातीं धरलेलें काम तडीस नेणारा, मनाला स्वाधीन ठेवणारा, सर्व साधनसंपन्न, सर्व इंद्रियांनीं युक्त, रोग्याची प्रकृति जाणणारा आणि सर्व प्रकारच्या युक्तींमध्यें निपुण, असा वैद्य प्राण राखणारा आणि रोग हरणारा ह्मणून समजावा. असा वैद्य शरीराच्या ज्ञानाविषयीं व शरीराच्या प्रकृतीच्या ज्ञानाविषयीं तसेंच प्रकृतीत आलेल्या विकाराच्या ज्ञानाविषयीं संदेहरहित असतो. तसेंच तो सुखसाध्य, कृच्छ्रसाध्य, याप्य आणि असाध्य अशा चार प्रकारच्या रोगांचें निदान, पूर्वरूप, लिंग आणि उपशयाचें विशेष ज्ञान याविषयींही संदेहरहित असतो. तीन प्रकारच्या औषधांनीं सुशोभित आणि संक्षेपानें आणि विस्तारानें सर्व अर्थ दाखविणाऱ्या तीन प्रकारच्या आयुर्वेदाचें विवेचन करूं शकेल असा

असतो. पस्तीस मूळें आणि फळें, चार महास्नेंं, पांच लवणें. आठ मूत्रें, आठ दुग्धें, सहा प्रकारचे क्षीर ( पांढरा चीक ) ज्यांस आहे असे साालीचे वृक्ष, शिरोविरेचन इत्यादि पंच कर्माचा असा जो औषधसमूह तो, अठ्ठाविस यवागु, बत्तीस प्रकारचीं चूर्णें आणि तेवढेच लेप, सहाशें विरेचनें आणि पांचशें कषाय. ह्यांस तो जाणतो; तसेंच रोगरहित अवस्थेमध्यें करण्याला योग्य असें भोजन, पान, नियम, स्थान, परिमार्जन, वेगविधारण, व वेगाऽविधारण, चंक्रमण, शय्या, आसन, यात्रा, द्रव्य, अंजन, धूम, नावन, अभ्यंजन, व्यायाम, सात्म्य आणि सद्वृत्त या सर्व, इहलोक आणि परलोक प्राप्त करून देणाऱ्या, आहारविहारादि क्रियांमध्यें तो कुशळ असतो. अनुकूळ आणि प्रतिकूळ षोडष कळांनीं युक्त, चतुष्पाद औषधांच्या ज्ञानाविषयीं संदेहरहित, चार प्रकारचे स्नेह आणि चोविस प्रकारच्या प्रयोगांची व्यवस्था करणारा, अनेक प्रकारें विधानयुक्त स्नेह, स्वेद आणि वमन हीं हटकून आणणाऱ्या औषधांच्या व तद्विरुद्ध औषधांच्या उपचारांमध्यें कुशळ, दोषामुळें कमीजास्ती झालेल्या व्याधींचा समूह जाणणारा, आणि क्षय, पिटिका, विद्रधी, तीन प्रकारची सूज, सुजेचीं अनेक कारणें, अठ्ठेचाळीस रोगांचा अधिकार आणि अनेक प्रकारें उत्पन्न झालेल्या चोविसशें व्याधी जाणणारा; कारण, लक्षण आणि चिकित्सा यांसहित निंदित मळाच्या अभिवृद्धीनें रोड झालेल्या पुरुषाची प्रकृति ओळखणारा; लंघनादिक सहा प्रकारची चिकित्सा, अत्यंत तृप्ति व अतृप्ति यामुळें झालेले रोग आणि रूपास बिघडविणाऱ्या रुधिरजन्य व्याधी आणि मद, मूर्च्छा व सन्यास या रोगांस, कारण व रूप यांसहित, जाणणारा असा तो वैद्य असतो. आहार कोणता घ्यावा याच्या निश्चयाविषयीं, प्रकृतीनें सर्वांस हितकारक अशा आहाराच्या निरनिराळ्या भेदांविषयीं,

आसवांच्या मुख्य संग्रहाविषयीं आणि चौऱ्यांशीं प्रकारच्या द्रव्य-
गुणांच्या निश्चयाविषयीं प्रवीण ; रस आणि अरस यांचा आश्रय-
करणारें अन्नपान, त्यांचे गुण व प्रभाव, नऊ प्रकारची आहाराची गति
आणि हिताहित अन्नपानाचे उपयोग हीं सर्व जाणणारा ; शुभाशु-
भाचे विशेष, धातुगत रोग, दहा औषधांचा संग्रह, आणि आयुर्वेदांत
सांगितलेल्या समग्र औषधांचे प्रयोग, देश, काळ, ऋतु आणि सात्म्य
इत्यादि अवश्य जाणण्यासारख्या अशा अर्थांविषयीं तो कुशळ
असतो. स्मृति, मति, युक्ति, शास्त्रज्ञान आणि शील यांस संपाद-
णारा, आणि सर्व प्राण्यांवर माता पिता बंधु व संबंधी जन यांच्या
प्रमाणें स्नेह ठेवणारा असा वैद्य प्राणरक्षक आणि रोगहारक जा-
णावा. याहून विपरीत गुणांचा वैद्य प्राणांचा नाश करणारा आणि
रोग वाढविणारा जाणावा. असे लोक सद्वैद्याचा वेष घेऊन बगाला
कांट्याप्रमाणें पीडा देणारे समजावे. असे लोक कोणत्याही प्रकारें
राजाची कृपा संपादून धनाच्या लोभानें आपल्या मर्जीप्रमाणें मनु-
ष्यादि प्राण्यांस उपचार करण्यास बिलकुल दिक्कत मनांत आणित
नाहींत. आणि आपण उत्तम आहों अशी वरचेवर स्तुति चालवि-
तात. कोठेंही कोणी दुखणेकरी ऐकले कीं गिधाडाप्रमाणें ते झडप
घालतात, ह्मणजे बोलावल्यावांचूनच उपचार करण्यास दुखणेक-
ऱ्याच्या घरीं धांव घेतात. दुखणेकऱ्याच्या कुटुंबांतील माणसांच्या
कानीं जातील अशीं आपलींच गाणीं आपण गातात. आणि कोणी
चांगल्या वैद्य उपचार करित असेल तर त्याच्यावर दोष ठेवितात.
रोग्याच्या इष्टमित्रांस थट्टामस्करीनें खुष करून त्यांच्याच तोंडानें
चांगल्या वैद्यास दूर करून आपले भलते सलते उपचार चालू करि-
तात. मला धनाची इच्छा नाहीं, आपली कुशलता दाखवून यश जोड-
ण्यास मी आलों आहे अशीं अनेक उपदेशवाक्यें बोलतात. आ-

पलें. अज्ञान लपविण्यासाठीं दुखणेकऱ्याची नाडी, डोळे, मूत्र, विष्टा वगैरे वारंवार तपासून आपल्या कामांत आपण अत्यंत काळजी वाहात आहों असें दाखवितात. आपल्या उपायांनीं गुण वाटला नाहीं तर दुखणेकरी सांगितल्याप्रमाणें चालत नाहीं असें ह्मणतात अथवा हा रोग असाध्य आहे असें सांगून आपल्या उत्तमत्वाला अडचण येऊं देत नाहींत. मूर्ख लोकांच्या समुदायांत आपली कुशलता प्रगट करितात. आणि विद्वान वैद्यांस पाहून दूर पळून जातात, आणि ह्मणतात, 'ठीक, विद्वान वैद्य शास्त्रांतील अनेक वचनें उच्चारोत तरी त्यापासून रोगाची शांति व्हावयाची नाहीं. रोग बरा करण्याची रीत आमची कुलपरंपरागत चालत आलेली आहे. ती इतरांस काय ठाउक?' असे कुवैद्य सद्वैद्याचा वेष घेऊन, पारधी जसा द्वेष घेऊन पक्ष्यांस जाळ्यांत पकडून त्यांस मारतो, तसेच हेही, जीं मनुष्यें आपल्या जाळ्यांत सांपडतात त्यांचा नाश करितात. शास्त्र, औषधी मात्रा, देशकाळ इत्यादि लक्ष्यांत घेण्यासारख्या गोष्टी न जाणणाऱ्या वैद्यापासून औषध घेऊं नये; कारण कीं अशा वैद्यांस मृत्यूचे दूत असेंच नांव शास्त्रांत दिलें आहे. आपलें उपजीवन करण्यासाठीं सद्वैद्याचें ढोंग करणारे आणि वैद्यविद्येच्या मार्गानें न जाणारे नामधारी वैद्य, वायु भक्षून पुष्ट झालेल्या सर्पाप्रमाणें, दुखणाइतांचे प्राण मात्र घेतात. ही गोष्ट लक्षांत ठेवून रोग्यानें त्यांच्यावर कधींही विश्वास ठेवूं नये. जे वैद्य शास्त्र जाणतात, इतिकर्तव्यता समजतात, ज्यांची बुद्धि पवित्र आहे, जे मन वश ठेवितात आणि लोभादि दुष्ट विकारांस थारा देत नाहींत, अशांपासूनच रोगाची चिकित्सा करवावी; कारण कीं जो वैद्य केवळ शास्त्र जाणतो पण क्रिया जाणत नाहीं, तसेंच जो क्रियेंत कुशळ आहे पण शास्त्रानभिज्ञ आहे, अशा वैद्याचें औषध वज्र-

पाताप्रमाणें होय. अशा कुवैद्याचा वध करावा असें सुत सांगतात. शास्त्र आणि क्रिया यांत जो कुशळ तोच खरा वैद्य म्हणावा. वैद्यविद्या फार कठिण आहे. तींत महाबुद्धिवान पुरुषांची बुद्धिही व्याकुळ होते. म्हणून चांगल्या वैद्यानेंही वैद्यकसंबंधी अनेक ग्रंथांचा अभ्यास व वैद्यविद्या जाणणाऱ्यांचा सहवास करावा. कारण कीं एका शास्त्रावरूनच वैद्यविद्येचा सर्व उलगडा होऊं शकत नाहीं. म्हणून वैद्यकसंबंधी अनेक शास्त्रें जाणणारासच वैद्य म्हणावें. आणि हीं शास्त्रेंही गुरुमुखानेंच पढावीं. या सर्व गोष्टींचा विचार केला तर वैद्यांचे तीन प्रकार होतात. एक, वैद्य देतात तीं औषधें पाहून पुस्तकें धुंडाळून व वैद्य ज्या युक्ति करतात त्याप्रमाणें करून उपचार करणारे नामधारी वैद्य : दुसरा, इतर वैद्यांची लक्ष्मी, यश व ज्ञान यांचीं उदाहरणें देऊन त्यांच्याप्रमाणें बनावयाची इच्छा धरणारे; आणि तिसरा, प्रयोग, ज्ञान, विज्ञान आणि सिद्धि यांनीं सिद्ध झालेले. या तिहींपैकीं पहिल्या दोघा वैद्यांचा त्याग करावा असें शास्त्र सांगतें. वैद्याविषयीं अधिक विवेचन करण्याचें कारण असें कीं रोगाची शांति करण्यामध्यें वैद्य, औषध, सुश्रुषा करणार, आणि रोगी या चार गोष्टी मुख्य आहेत; त्यांतही वैद्याची मातब्बरी अधिक. पाकक्रियेला अग्नि हें जसें मुख्य साधन आणि भांडीं, लाकडें आणि वायु हीं गौण होत, त्याचप्रमाणें रोग शमविण्यास वैद्य हें मुख्य साधन असून बाकीचीं गौण होत. माती, दंड, चक्र, सूत्र, ह्या सर्व वस्तु हव्या तशा असतांही कुंभारावांचून घट तयार व्हावयाचा नाहीं, त्याच प्रमाणें वैद्यावांचून इतर साधनें लंगडीं होत. अनेक भयंकर रोगांचा नाश करण्याच्या कामीं व क्षुल्लक रोगांची वृद्धि करण्याचे कामीं, ज्ञानी आणि अज्ञानी वैद्यच अनुक्रमें कारणीभूत होत. भिषक वेषधर सिद्धसाधित

आणि वैद्य अशीं वैद्यांचीं तीन नांवें आहेत. वैद्यकीचें ज्ञान नसतां इतरांस तें दाखवण्यासाठीं वैद्यकीचीं पुस्तकें कपाटभर ठेवून दुकानांत औषधांच्या बाटल्यांचा थाट करून जे दुकानांत बसल्या बसल्या निरनिराळ्या प्रकारच्या वनस्पती शोधितात आणि आपल्या ज्ञानाचा टेंभा मिरवितात, त्यांस भिषग् वेषधर ह्मणतात. हजारों रुपये जवळ करून जगांत प्रख्यात झालेल्या व आयुर्वेदाचें मर्म जाणणाऱ्या अमुक अमुक वैद्यापासून आह्मीं वैद्यकाचें इलम शिकलों आहों असें, उत्तम उत्तम वैद्यांचीं नांवें घेऊन अथवा तेच आह्मी आहों असें ह्मणवून, सांगत फिरतात, व वैद्यकाची ओळख नसतांही उपचार करण्यास पुढें सरसावतात, त्यांस सिद्धसाधित वैद्य ह्मणतात. आणि जे प्रयोगांचें सामान्य आणि विशेष ज्ञान संपादून व ठिकठिकाणीं यश मिळवून आयुर्वेदाचीं सर्व मर्में जाणतात तेच खरे वैद्य ह्मणावे आणि तेच प्राणाचें रक्षण करणारे जाणावे. अज्ञान वैद्याकडून उपचार करविण्यापेक्षां स्वतांस अग्नींत होमावें हें फार बरें. क्षुल्लक कारणानें आलेले आणि अल्पावकाशांत स्वाभाविक चिकित्सेनेंच बरे होणारे रोग बरे करण्याचें यश मिळवून स्वतांस वैद्य ह्मणविणारे मनुष्य हजारों मनुष्यांचा घात करणारे बनतात. यासाठीं रोगाचें कारण, त्याचीं लक्षणें, त्याची शांति व तो पुन्हा उत्पन्न न होई अशी खबरदारी, या चार गोष्टींचें ज्यास पूर्ण ज्ञान असेल त्यासच वैद्य हें नांव शोभतें.

**व्याधींचे प्रकार**—व्याधि दोन प्रकारची आहे:—शस्त्रानें दूर होईल अशी आणि स्नेहादिक द्रव्यानें दूर होईल अशी. त्यांत शस्त्रक्रियेनें दूर होणाऱ्या व्याधींमध्यें स्नेहादिक द्रव्याचा उपयोग करण्यास निषेध नाहीं। परंतु स्नेहादिकानें बरी होणाऱ्या व्याधी-

मध्यें शस्त्रक्रियेचा उपयोग निषिद्ध मानिला आहे. शरीरासंबंधी दुःख त्यास व्याधि असें ह्मणतात. ते आध्यात्मिक, आधिभौतिक, आणि आधिदैविक असे तीन प्रकारचे असून, आदिबळप्रवृत्त, जन्मबलप्रवृत्त, दोषबलप्रवृत्त, संघातबलप्रवृत्त, काळबलप्रवृत्त, दैवबलप्रवृत्त आणि स्वभावबलप्रवृत्त असे त्याचे आणखी सात प्रकार आहेत. त्यांत पित्याचें शुक्र आणि मातेचें रज यांशीं संबंध ठेवणारे कुष्ठ, अर्श इत्यादि रोग आदिबळानें उद्भवतात असें मानिलें आहे. कारण कीं ते जन्मतः आदिकाळामध्यें असणाऱ्या शुक्रशोणितांत स्थित असल्यामुळें दुसऱ्या कारणांची अपेक्षा न धरतां शरीरांत प्रगट होतात. यांत कित्येक व्याधि पित्याकडून व कित्येक मातेकडून प्राप्त होतात, व यामुळें पितृज आणि मातृज असे त्यांचे आणखी दोन भेद होतात. मातेच्या दोषानें पांगळेपणा, जन्मांधपणा, बहिरेपणा, मुकेपणा, बोबडेपणा आणि ठेंगणेपणा इत्यादि दोष जन्मतांच होत असल्यामुळें ते जन्मबलप्रवृत्त या नांवानें प्रसिद्ध आहेत. त्यांचेही, रसकृत (रसापासून आलेले) आणि दौहृदापचारकृत (मागितल्याप्रमाणें गर्भिणीचे धर्म गर्भिणीनें न पाळल्यामुळें आलेले) असेही दोन प्रकार आहेत. मिथ्या आहारविहारामुळें जे रोग उत्पन्न होतात त्यांस दोषबलप्रवृत्त असें ह्मणतात. त्यांचेही आमाशयसमुत्थ (कच्या अन्नाच्या स्थानामध्यें उत्पन्न होणारे) आणि पक्काशयसमुत्थ (पचलेलें अन्न रहाण्याच्या ठिकाणीं प्रगट होणारे) असे दोन भेद आहेत. हे व्याधि जेव्हां वातपित्तकफाच्या न्यूनाधिक्यामुळें होतात तेव्हां शरीरांत अशा नांवानें ओळखले जातात आणि जेव्हां रजोगुण व तमोगुण यांच्या न्युनाधिक्यानें होतात तेव्हां ते मानस असें नांव पावतात. हे आदिबलप्रवृत्त, जन्मबलप्रवृत्त व दोष

बलप्रवृत्त नांवाचे व्याधि आध्यात्मिक अशा नांवानेंही ओळखले जातात. बलवंताबरोबर कज्जा केल्यानें उद्भवणारे आगंतुक व्याधि संघातबलप्रवृत या नांवानें प्रसिद्ध आहेत. त्याचेही, शस्त्रकृत, व दंशकृत असे दोन भेद आहेत. हे व्याधि आधिभौतिक या नांवानें प्रसिद्ध आहेत. शीत, उष्ण, वात, आणि वर्षा इत्यादि निमित्तानें उद्भवणारे व्याधि कालबलप्रवृत्त असें ह्मणतात. त्यांचे-ही व्यापन्नऋतुकृत (बिघडलेल्या ऋतूमुळें झालेले) व अव्यापन्नऋतु-कृत (ज्या ऋतूंत शीतादिक प्राप्त व्हावयाचीं त्यापासून झालेले) असे दोन प्रकार प्राचीन पंडितांनीं सांगितले आहेत. दैवाच्या क्षोभामुळें व मारणमोहादिक अथर्व वेदांत सांगितलेल्या प्रयोगामुळें आणि उत्पातामुळें जे व्याधि उत्पन्न होतात ते दैवबलप्रवृत्त असें नांव पावतात; त्यांचेही, विद्युत्पातकृत (विज पडल्यानें झालेले) व पिशाचादिकृत असे दोन भेद आहेत. आणखी या व्याधींचे संस-र्गज (संबंधानें झालेले) व आकस्मिक असे दोन विभाग होऊं शक-तात. भूक, तृषा, जरा, मृत्यु व निद्रा आदिकरून जे व्याधी स्वाभाविक ह्मटले आहेत त्यांचेही काळकृत आणि अकाळकृत असे दोन भेद होतात. हे सर्व आधिदैविक या नांवानें शास्त्रांत लिहिले आहेत. या जगाचा असा नियम आहे कीं थोडक्यांत पदार्थांचें वर्णन करूं ह्मटलें तर संख्या होते आणि विस्तारानें वर्णन करूं तर कोणत्याही पदार्थाचा अंतच येत नाहीं. यास्तव ज्या साधु पुरुषांनीं जगांतील पदार्थांची संख्या दाखविली आहे आणि ज्यांनीं असंख्यपण वर्णिलें आहे, ते दोघेही पुरुष निर्दोष होत. जर विस्तारानें वर्णन केलें तर व्याधि असंख्य आहेत असें दिसून येतें.

**व्याधीचें मूळ**—सर्व व्याधींचें मूळ वात, पित्त आणि कफ हे तीनही दोष हें होय. शरीरांत फिरणारा वातादि दोष आणि

रसादिक हे दूष्य, असे हे आहारविहारांच्या फेरफारानें ज्या ठिकाणीं अटकतात तेथें व्याधि उत्पन्न होतो. सर्व व्याधि मन आणि शरीर यांचा आश्रय करून असतात. त्यांची निवृत्ति, सम्यक् शोधन, सम्यक् शमन, सम्यक् आहार आणि सम्यक् विहार यांच्या योगानें होते. सर्व प्राण्यांच्या बळाचें, वर्णाचें व ओजाचें मूळ आहार होय. क्षुधेची निवृत्ति होते या लक्षणानें हा आहार जरी एकच आहे, तरी त्याचे स्थावरजंगम या रीतीनें उत्पत्तिभेदानें दोन प्रकार होतात. प्रभावानें हित, अहित आणि हिताहित असे त्याचे आणखी तीन भेद होतात. उपयोगावरून पिण्याचें, खाण्याचें, चावून खाण्याचें व चाटून खाण्याचें अशा प्रकारें चार भेद होतात. रसभेदावरून मधुर, अम्ल, लवण, कटु, तिक्त आणि कषाय याप्रमाणें सहा भेद होतात आणि गुणावरून गुरु, लघु, शीत, उष्ण, स्निग्ध, रूक्ष, मंद, तीक्ष्ण, स्थिर, सर (पातळ), मृदु, काठिण, विषद, पिच्छिल, श्लक्ष्ण, खर, सूक्ष्म, स्थूल, सांद्र व द्रव अशा प्रकारें वीस भेद होतात. आणखी सिद्ध करण्याच्या भेदावरून त्याचे असंख्य भेद होतात. जसें गहुं या एका पदार्थापासून लाडू, लापशी, शिरा, पुरी इत्यादि. त्यांतही एकाच्याच वस्तूपासून बनलेल्या पदार्थांपैकीं मनुष्याला कांहीं स्वभावानें हितकर आहेत आणि कांहीं अहितकर आहेत. शास्त्रविधिप्रमाणें अन्न तयार केलें असेल व खाल्लें असेल, तर त्याचा वर्ण, गंध, रस आणि स्पर्श पाहिजे तसा असला, तरी त्याचें सेवन खरोखर प्राणद होय; आणि याहून उलटें असेल तर शरीरांत अनेक रोग उत्पन्न होतात. अन्न आणि पाणी हीं किती सेवन करावीं याचें प्रमाण सांगतां येत नाहीं. कारण त्याचा आधार जठराग्नीच्या बळाबळावर राहिला आहे, म्हणून खाल्लेला अथवा प्यालेला आहार प्रकृतीला बिघडविल्यावांचून पचला म्हणजे तेंच त्याचें प्रमाण समजावें. कांहीं पदार्थ

स्वाभाविकपणें हलके आहेत आणि कांहीं गुरु आहेत. गुरु पदार्थांनीं पोटाचे तीन भाग अथवा खरें ह्मटलें तर दोन भाग भरतील एवढे ते खावे, पण अगदीं पोट भरून कधीं खाऊं नयेत. या प्रमाणें खाल्लेलें अन्न प्रकृति बिघडल्यावांचून बळ, वर्ण, सुख व आयुष्य हीं देतें. वर सांगितल्याप्रमाणें दोष हें व्याधींचें मूळ कारण होय. असें कीं रजोगुण आणि तमोगुण हे दोन मनाचे दोष होत; आणि काम, क्रोध, लोभ, मोह, ईर्षा, मान, मद, शोक, चित्ताचा उद्वेग, भय आणि हर्ष इत्यादि त्यांचे विकार होत. तसेंच वात, पित्त आणि कफ हे शरीराचे दोष ह्मटले आहेत आणि ज्वर, अतिसार, सूज, प्रमेह, इत्यादि त्यांचे विकार होत. याप्रमाणें दोष कोपविणाऱ्या व प्रतिकूळ पदार्थांशीं इंद्रियांचा संबंध, स्वतांची चूक आणि परिणाम हीं तीन व्याधींचीं कारणें होत. हीं तीन कारणें एकत्र मिळाल्यानें कोपलेले दोन प्रकारचे दोष, अनेक प्रकारच्या व्याधींस उत्पन्न करितात. या विकाराचे कामादिक व ज्वरादिक असे दोन भेद आहेत. रजोगुणावांचून तमोगुण आणि तमोगुणावांचून रजोगुण असे एकेकटे कधीं कोणत्याही प्राण्यामध्यें आढळत नाहींत. वास्तव या दोषांचा व मनोदोषांचा परस्पर दृढ संबंध आहे, आणि शरीरांतील वातादि दोषांचा, रजोगुणतमोगुणाप्रमाणें वृद्धि आणि क्षय या आवस्थेंत सदोदित सहनिवास असत नाहीं. त्यामुळें कोपलेल्या एकच दोषानें झालेला रोग साध्य ह्मटला आहे. संसर्ग (दोनही दोषांची वृद्धि अथवा त्यांचा क्षय) यापासून झालेला रोग कष्टसाध्य समजावा आणि सन्निपातानें (तीनही दोषांची वृद्धि अथवा क्षय) झालेला रोग आसाध्य ह्मटला आहे. शरीरांतील जठराग्नि तीक्ष्ण, मंद, सम आणि विषम असा बळाच्या भेदेंकरून चार प्रकारचा आहे. त्यांत जो सात्म्य व असात्म्य आहाराला पचवितो त्यास

तीक्ष्ण असें नांव दिलें आहे. त्याहून उलट लक्षणाचा जठराग्नि मंद ह्मणून समजावा. जो विरुद्ध आहारानें विकृति पावतो आणि अनुकूळ आहारानें योग्य भावस्थित राहतो त्यास सम ह्मणावें. सम अग्नीच्या लक्षणाहून विरुद्ध लक्षणाचा अग्नि विषम ह्मणावा. हे चार प्रकारचे अग्नि चार प्रकारच्या पुरुषामध्यें राहतात. त्यांत ज्या पुरुषाच्या शरीरांत वात, पित्त आणि कफ हीं सारखीं असतात त्याच्या शरीरांतील जठराग्नि ही सम असतो. वातप्रकृतीच्या शरीरांतील अग्नीचें स्थान वायूनें बिघडलें असतें ह्मणून त्याच्या शरीरांतील अग्नि विषम समजावा. पित्त प्रकृतीच्या मनुष्यांच्या शरीरांतील अग्नि तीक्ष्ण व कफ प्रकृतीच्या मनुष्याच्या शरीरांतील अग्नि मंद समजावा. ज्या मनुष्याच्या ठिकाणीं वात पित्त आणि कफ हे तीन्ही दोष समान आहेत तो स्वस्थप्रकृतिस्थ आणि नीरोग समजावा. एकेक दोषाच्या प्रबळतेनें मनुष्याची प्रकृति रोगी समजावी. कारण कीं वातप्रकृतीच्या मनुष्यास वातजन्य, पित्त प्रकृतीच्या मनुष्यास पित्तजन्य, आणि कफ प्रकृतीच्या मनुष्यास कफ जन्य, अशा व्याधि फार करून अत्यंत प्रबळ उत्पन्न होतात. जो वात-प्रकृतीचा आहे आणि जो वाताला कोपविणाऱ्या पदार्थांचें सेवन करितो त्याच्या शरीरांत तत्काळ वायु कुपित होतो; तसा तो पित्त प्रकृतीच्या व कफप्रकृतीच्या मनुष्याच्या शरीरांत कोपत नाहीं. आणि जेव्हां कोप पावतो तेव्हां सांगितलेल्या वातजन्य व्याधींनें त्याचें शरीर पीडित होतें. व बळ, वर्ण सुख आणि आयुष्य यांचा नाश होतो. या वातप्रकोप्याचा नाश करण्यासाठीं स्नेहविधि, स्वेद विधि आणि हलकीं विरेचनें वगैरे उपाय करावे. तसेंच पित्तप्रकृतीचे मनुष्य पित्ताला कोपविणाऱ्या पदार्थांचें सेवन करतील तर त्यांच्या शरीरांत कुपित पित्त पित्तप्रकोपजन्य व्याधि उत्पन्न करितें.

तसें.ते वात प्रकृतीच्या व कफ प्रकृतीच्या मनुष्याच्या शरीरांत लौकर व्याधि उत्पन्न करित नाहीं. ज्या व्याधीनें पैत्तिक मनुष्याचें शरीर, बळ, वर्ण आणि आयुष्य यांच्या उपघाताला पावतें त्या पित्ताच्या प्रकोपाला जिंकण्यासाठीं घृतपान, विरेचन, मधुर, तिक्त आणि कषाय व शीत औषधें व आहार हीं योजावीं, आणि मृदु, सुरभि, शीत, व हृद्य पदार्थांचें सेवन करावें. पाण्यांत भिजवून मोत्याचे व मण्यांचे हार छातीवर ठेवावे. उत्तम चंदन, कमलतंतु, शीतल जळ व कमळें यांनीं शरीरावर प्रोक्षण करावें. कानाला सुख देणाऱ्या कोमल, मधुर व आवडतीं गीतवाद्यें श्रवण करावीं. इष्ट मित्रास भेटावें. थंड वस्त्रें व थंड माळा अंगावर घालणाऱ्या स्त्रीला आलिंगन द्यावें. सुगंध, शीतल आणि मंद वायु वाहणाऱ्या सुखदायक बगीच्यामधें जाऊन हवा खावी. कफ कोपविणाऱ्या पदार्थांच्या सेवनानें कफप्रकृतीच्या मनुष्याच्या शरीरांत जसा कफ कुपित होतो तसा वातप्रकृतीच्या व पित्तप्रकृतीच्या मनुष्याच्या शरीरांत लौकर कोपत नाहीं. जेव्हां कोपतो तेव्हां शास्त्रांत सांगितलेल्या कफ विकारांस उत्पन्न करून बळ, वर्ण आणि आयुष्य यांचा उपघात करतो. या कफाला जिंकण्यासाठीं तीक्ष्ण आणि उष्ण शोधन द्रव्यें वापरावीं आणि रूक्ष पदार्थ खावे. तसेंच धावावें, उड्या माराव्या, चालावें, जागावें, कुस्ती करावी, शरीर चोळवावें, स्नान करावें, सवड असेल त्यानें तीक्ष्ण आणि जुनी दारू प्यावी, उपास करावे, गरम वस्त्रें नेसावीं, धूम्रपान करावें, आणि सुख घेऊं नये. असें जो करील तोच सुखी होईल. याप्रमाणें सगळ्या प्राण्यांच्या बळाचें, वर्णाचें आणि ओजाचें मूळ आहार आहे. तो आहार मधुरादि साहा रसांच्या अधीन आहे. ते साहा रस द्रव्यांत आहेत आणि वैद्य शास्त्रांत द्रव्य शब्द औषधीला लावितात.

**औषधीचे प्रकार**–औषधीचे स्थावर आणि जंगम असे दोन भेद आहेत. स्थावर औषधि ह्मणजे वनस्पति. वृक्ष, वरिुध आणि ओषधि अशी चार प्रकारची आहे. जीस पुष्पें येत नाहींत पण फळें येतात. तिला वनस्पति ह्मणतात. जिला फुलें व फळें दोनही येतात तिला वृक्ष ह्मणतात. तंतुयुक्त औषधीला वीरुध ह्मणतात. आणि फळ येऊन पिकल्यावर नाश पावणाऱ्या औषधीला ओषधि ह्मणतात. जंगम औषधिही जरायुज, अंडज, स्वेदज आणि उद्भिज्ज अशी चार प्रकारची आहे. यांत मनुष्य, पशु वगैरे जरायुज होत; पक्षी, सर्प वगैरे अंडज होत; कृमि, कीटक वगैरे स्वेदज; आणि इंद्रगोप (पावसाळ्यांत होणारे एक प्रकारचे किडे) वगैरे उद्भिज्ज समजावे. स्थावर औषधींपैकीं साल, पानें, फळ, फूल, मूळ, कंद, चीक, स्वरस इत्यादिकांचें काम पडतें आणि जंगम औषधींपैकीं चर्म, नख, रोम आणि रुधिर इत्यादि उपयोगी पडतात. सुवर्ण, रुपें, मणि, मोतीं, मनःशीळ इत्यादि पार्थिव औषधि ह्मटल्या आहेत. पुष्कळ वायु, थोडा वायु, ऊन, छाया, चांदणें, अंधार, शीत, उष्ण, वर्षा, दिवस, रात्र, पक्ष, मास, ऋतु, अयन आणि संवत्सर इत्यादिक काळकृत औषधि जाणाव्या. ज्या पदार्थांनीं वैद्य रोग दूर करतो त्यांस औषध ह्मणावें. या औषधांपैकीं कांहीं वातादि तीनहि दोषांला शांत करितात. कांहीं त्यांस कोपवितात, आणि कांहीं आरोग्याला फायदा करणाऱ्या आहेत. औषधांमध्यें दोन गुण आहेत. कित्येक उष्णवीर्य आणि कित्येक शीतवीर्य आहेत. आणखी दैवव्यपाश्रय, युक्तिव्यपाश्रय आणि सत्वावजय अशीं तीन प्रकारचीं औषधें सांगितलीं आहेत. त्यांत मणि, मंत्र, औषधि, मंगळ, नियम, प्रायश्चित्त, उपवास, स्वस्तिवाचन, नमन इत्यादि दैवव्यपाश्रय औषधें जाणावीं. आहार आणि औषधें यांच्या द्रव्याची जशी आपल्यास अनुकूळ तशी योजना करणें हें युक्तिव्यपाश्रय औषध ह्मणावें. आणि आप-

त्यास अहित करणाऱ्या पदार्थांपासून आपल्या मनाला परत फिरवणें हें सत्वावजय औषध ह्मटलें आहे. शरीरांतील दोषाचा प्रकोप झाला असतां शरीराचाच आश्रय करून हीं तीन प्रकारचीं औषधें करावीं. हे तीन भेद अंतःपरिमार्जन, बहिःपरिमार्जन आणि शस्त्रप्रणिधान या नांवानेंही प्रसिद्ध आहेत. यापैकीं जें औषध शरीरांत शिरून आहारानें झालेल्या रोगाचा नाश करितें, त्यास अंतःपरिमार्जन ह्मणावें. जें बाहेरच्या स्पर्शाचा आश्रय करून अभ्यंग, स्वेद, प्रदेह ( बांधणें ), परिषेक ( सिंचन ) आणि उन्मर्दन अशा प्रकारें उपयोग केल्यानें रोग दूर करितें, त्यास बहिःपरिमार्जन असें ह्मणतात. आणि कापणें, फोडणें, भोंक पाडणें, चिरणें, उकलणें, शिवणें, क्षार आणि जळवा लावणें हीं सर्व शस्त्रप्रणिधान औषधें म्हटलीं आहेत.

चिकित्सा करण्याची आवश्यकता—रोग दूर करण्यांत वर सांगितल्याप्रमाणें चांगल्या वैद्याची तशीच चांगल्याच औषधांचीही जरूर आहे. औषध पुष्कळ, योग्य, आणि ज्याचे पुष्कळ प्रकार होऊं शकतात असें असलें पाहिजे. ह्या ठिकाणीं कांहीं लोक अशी शंका घेतात कीं औषधाची कांहीं गरज नाहीं : कारण कीं पुष्कळ रोगी मनुष्यें वैद्याच्या व औषधांच्या साहाय्यानें नीरोगी होतात, तशींच कित्येक मरणही पावतात; तसेंच कित्येक रोगी, जरी त्यांस पुरेशीं साधनें नसतात तरी ते रोगमुक्त होतात. यास्तव औषधोपाय करणें व्यर्थ आहे. परंतु असें ह्मणणें बरोबर नाहीं. औषधानें बरे होतात असे रोग औषधें बरे करूं शकत नाहींत असें नाहीं ; अर्थात त्याच्यापासून फायदा आहेच. जे रोग औषधावांचून बरे होतात, त्यांस औषधाची अपेक्षा नाहीं असें खरेंच.' तरी अशा रोगालाही औषधोपाय केला असतां विषेश उपयोग आहे. जसा चिखलांत

पडलेला मनुष्य आपल्या आपण उठण्यास समर्थ असतांही जर त्यास मित्राचा आधार मिळाला तर तो अधिक सुलभतेनें उठूं शकतो. तसेंच ज्या रोगास औषधाची अपेक्षा नाहीं त्यास औषधोपचार केल्या असतां तो लौकर दूर होऊन दुःख कमी होतें. जे रोग औषधानें बरे होत नाहींत आणि स्वाभाविकपणेंही बरे होत नाहींत, ते वैद्यक शास्त्रांत असाध्य मानिले आहेत. आणि या असाध्य रोगांची चिकित्सा करण्याचा वैद्यांस वैद्यक शास्त्रानें मनाई केली आहे. कारणकीं असाध्य रोगाची चिकित्सा केल्यानें अर्थ, विद्या आणि यश यांची हानि होते आणि लोकनिंदेस पात्र व्हावें लागतें. ह्मणून औषध कांहीं व्यर्थ होय असें ह्मणूं नये. कारणकीं चांगले वैद्य चांगल्या औषधांनीं रोडक्यास पुष्ट करितात. स्थूलास सडपातळ करितात, उष्णतेनें पीडिलेल्यास शीतोपचारानें आराम देतात, थंडीनें पीडिलेल्यास उष्णोपचारानें सुख देतात, धातूला वाढवितात. सारांश व्याधीच्या कारणाच्या विपरीत औषधोपचार करून प्रकृति समधात करितात. यावरून असें सिद्ध होतें कीं रोग दूर करण्याचे कामीं चांगलें औषध सृष्टिक्रमाच्या दुय्यम पदवी पावतें.

**रोगाचे मार्ग**- शाखा, मर्म व अस्थि, संधि आणि कोष्ठ या प्रमाणें रोगाचे तीन मार्ग आहेत. रुधिरादिक धातु आणि त्वचा हे शाखारूप बाह्य रोगमार्ग होत. बस्ति, हृदय आणि मस्तक इत्यादि मर्मे होत. आणि अस्थीच्या संयोगाला अस्थिसंधि ह्मणतात. हे दोन्ही आणि त्यांत असलेल्या नाड्या हे मध्यम रोगमार्ग गणिले आहेत. शरीराच्या मध्यभागास आणि आमपक्वाशय या नांवानें शास्त्रांत प्रसिद्ध असलेल्या शरीराच्या भागास कोष्ठ ह्मणतात. कोष्ठ हा रोगाचा आभ्यंतर मार्ग ह्मटला आहे. त्यांत पीडक, अलजि, अपचि, चर्मकील, अधिमास. कुष्ट, लुलेपण, आणि पांगळेपण इत्यादि·

रोग हे बाह्य मार्गामध्यें उत्पन्न होतात. विसर्प, सूज, गांठ, अर्श आणि विद्रधि इत्यादि रोग शाखामध्यें उत्पन्न होतात. पक्षघात, अर्दितवात, शोष, राजयक्ष्मा, हाडांच्या सांधींमध्यें शूळ, आणि मस्तक, हृदय, आणि बस्ति यांचे रोग मधल्या मार्गामध्यें उत्पन्न होतात. ज्वर, अतिसार, वांति, विषूचिका, कास, श्वास, उचकी, पोटफुगी, उदर-रोग आणि प्लीह्याची वृद्धि इत्यादि रोग आंतल्या भागीं होतात.

**रोगाची परीक्षा**—रोगाच्या विशेषाचें ज्ञान सांगितल्यावरून, पाहिल्या वरून, आणि अनुमानावरून होत असतें. यास्तव हें ज्ञान थोडक्यांत तीन प्रकारचें म्हणून म्हटलें आहे. ह्या तिहींत यथार्थ बोलणाऱ्या पुरुषाच्या भाषणास उपदेश असें नांव दिलें आहे. संदेहरहित, पहिल्यानें अनुभविलेल्या पदार्थाचें स्मरण बरोबर ठेवणारा आणि स्वतांवर प्रीति न ठेवणाऱ्या लोकांचेंही दुःख पाहून दुःख पावणारा पुरुष आप्त म्हटला आहे. अशा गुणामुळें त्यानें केलेलें भाषण प्रमाण धरावें. वातादिकाच्या प्रकोपानें वेडसर, अम्मल केल्यामुळें मस्त, आणि मूर्ख यांचीं, पाहिलेल्या आणि न पाहिलेल्या पदार्थांच्या निरूपणाविषयींचीं भाषणें अप्रमाण समजावीं. स्वतां आपल्या इंद्रियापासून आणि मनापासून बाह्य आणि आभ्यंतर पदार्थांचा अनुभव होणें हें प्रत्यक्ष प्रमाण म्हटलें आहे. युक्तीची ज्यास अपेक्षा आहे अशा तर्कास ( म्हणजे अग्नि नसेल तर धूमही नसेल अशा प्रकारचा विचार ) अनुमान प्रमाण म्हणतात. या तीन प्रकारच्या ज्ञानानें पहिल्यानें, परीक्षा करून, हा अमुक रोग असा केलेला निश्चय निर्दोष म्हणावा. जाणण्यासारख्या सर्वच पदार्थांचें ज्ञान एक देशावरून बरोबर होऊं शकत नाहीं. या तीन प्रकारच्या ज्ञानापैकीं मुख्य व पहिलें म्हटलें म्हणजे आप्तोपदेश हेंच गणावें. त्यानंतर प्रत्यक्ष आणि अनुमान या ज्ञानानीं परीक्षा करण्यासारख्या

रोगाची परीक्षा करितां येते. निस्संदेह पुरुषानें पहिल्यानें न दाखविलेला पदार्थ प्रत्यक्ष अथवा अनुमानानें जाणतां येत नाहीं; जसें कीं हा घट अशा प्रकारें पहिल्यानें घट जाणणाऱ्या पुरुषानें घटाचें स्वरूप दाखविलें नसेल तर प्रत्यक्षानें. अथवा अनुमानानें तो घट जाणतां येत नाहीं. म्हणून असें सिद्ध होतें कीं प्रत्यक्ष आणि अनुमान यांच्या द्वारा परीक्षा दोन प्रकारची आहे. वर सांगितल्याप्रमाणें केवळ प्रत्यक्षानें किंवा अनुमानानें जाणावयाचा पदार्थ बरोबर जाणतां येत नाहीं; म्हणून बुद्धिमान लोक उपदेशासहित या दोन प्रकारच्या परीक्षेची अपेक्षा धरतात. या उपदेशादि तीनही ज्ञानांनीं, हा रोग अशा प्रकारें कोपला आहे, अशा प्रकारें जन्मला आहे, याचें स्वरूप असें आहे, त्याची स्थिति अशी अशी आहे, अशा अशा वेदनांनीं तो युक्त आहे, अमुक आकृतीचा आहे, अशा प्रकारच्या शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध यांनीं युक्त आहे, त्याचा अमुक उपद्रव आहे, तो अशा प्रकारें वाढतो, अशा प्रकारें कमी होतो, अशा प्रकारें त्यास निरोध करितां येतो, अशा प्रकारें तो जोरावतो, त्याचें अमुक नांव आहे आणि त्यास अशा प्रकारची औषधें देण्यासारखीं आहेत—अशा प्रकारें प्रत्येक रोगाचें वैद्यास ज्ञान असावें. अमुक रोगाची अशा प्रकारें प्रवृत्ति अथवा अमुक रोगाची चिकित्सा करूं नये अशा प्रकारें उपदेशावरून त्याची माहिती होते. प्रत्यक्ष प्रमाणानें रोगाच्या स्वरूपाचा निश्चय करण्याची इच्छा असेल तर वैद्यानें आपल्या इंद्रियांनीं रसाशिवाय रोग्याच्या शरीरांतील सर्व इंद्रियांचे जे अर्थ ( म्ह० शब्द, स्पर्श, रूप आणि गंध ) त्यांची परीक्षा करावी; ती अशी कीं आतड्यांचा गुरगुराट, सांधे मोडणें, आणि बोटें मोडणें वगैरे शरीरांतील शब्दाची श्रोत्रेंद्रियानें परीक्षा करावी. रोग्याच्या शरीरांतील वर्ण, स्थिति, प्रमाण, कांति, प्रकृति;

विकृति आणि दुसरींही डोळ्यांनीं समजण्यासारखीं चिन्हें यांची चक्षुरिंद्रियानें परीक्षा करावी. जरी रसाचें प्रत्यक्षज्ञान रसनेंद्रियानें (जिभेनें) होतें तरी रोग्याच्या शरीरांतील रसाची परीक्षा अनुमानानें करावी. रोग्याच्या डोकीच्या केसांमध्यें जेव्हां उवा व लिखा होऊन बाहेर पडतात तेव्हां त्याच्या शरीरांत रस नाहीं असें समजावें. रोग्याच्या शरीरावर माशा भणभणाट करितात तेव्हां त्याच्या शरीरांत मधुर रस आहे असें जाणावें. तसेंच रक्तपित्त रोगामध्यें असा संशय येतो कीं या रोगांत हा रुधिरासारखा द्रव पदार्थ दिसतो तें तांबडें पाणी आहे कीं तांबडें पित्त आहे? हा संशय नाहींसा करणारा तो तांबडा द्रव-पदार्थ कुत्र्यापुढें अथवा कावळ्यापुढें टाकावा. त्यानीं जर तो भक्षिला तर तें तांबडें पाणी आहे आणि न भक्षिला तर तें तांबडें पित्त आहे असें समजावें. अशा प्रकारें रोगातुराच्या शरीरांतील इतर रसांचेंही अनुमान करावें. प्रकृतीनें आणि विकृतीनें रोग्याच्या शरीरांत येणाऱ्या गंधाची परीक्षा नाकानें हुंगून करावी. आणि स्वाभाविक व विकारजन्य रोग्याच्या शरीरांतील स्पर्शाची स्पर्शने-द्रियानें परीक्षा करावी. तसेंच मुखांतील रसाची परीक्षा रोग्याला हकिगत विचारून करावी. कारण कीं त्याच्या तोंडांत आपली जीभ घालून परीक्षा करितां येत नाहीं. रोग्याच्या शरीरांतील दुसऱ्याही कित्येक पदार्थांची परीक्षा अनुमानानेंच होऊं शकते. जसें कीं जठराग्नि पाचनशक्तिवरून, बळ कसरतीवरून, श्रोत्रादिक इंद्रियें शद्बादिकाच्या ग्रहणानें, ज्ञान उद्योगावरून, रजोगुण संगतीवरून, मोह अज्ञानावरून, क्रोध तंटेबखेड्यावरून, शोक दीनतेवरून, हर्ष आनंदावरून, प्रीति संतोषावरून, भय खेदावरून, धैर्य खेदाच्या अभावावरून, पराक्रम उत्साहावरून, स्थिति भ्रांतीच्या अभावावरून श्रद्धा अभिप्रायावरून, धारणा स्मरणशक्तीवरून, भान त्याच्या

पाशीं आलेल्या लोकांचीं नांवें घेण्यावरून, स्मृति आठवणीवरून, लज्जा संकोचावरून, स्वभाव एकत्र राहिल्यानें, द्वेष नाकारण्यावरून, उपाधि पाठलागावरून, धैर्य अस्थिरपणावरून, वश्यता नोकरी करण्यावरून, अवस्था वयावरून, सात्म्य उपशयावरून ( ह्म० अमुक वस्तु असल्याशी मानवे किंवा मानत नाहीं हें ती वस्तु त्याला खाऊं घातल्यानें समजतें ), व्याधीची उत्पत्ति विशेष वेदनेवरून, गुप्त लक्षणाचा व्याधि उलट उपाय केल्यानें, दोषाचें प्रमाण विरुद्ध क्रियेवरून, आयुष्याचा क्षय मृत्युसूचक शास्त्रांत सांगितलेल्या चिन्हांवरून, मनुष्याचें कल्याण धर्माच्या कामाकडील प्रवृत्तीवरून, आणि सत्व गुण मनांत विकार न आल्यावरून, ओळखतां येतात त्यामुळें या सर्व गोष्टी अनुमानगम्य होत. अशा प्रकारें वर सांगितलेल्या आप्तोपदेशादिक तीन प्रमाणांनीं व आपल्या बुद्धीनें रोगाचा निश्चय करावा. मग काय करावयाचें त्या कार्याचा निश्चय करावा. रोगाची परीक्षा करतेवेळीं फारच सावधगिरी ठेविली पाहिजे. कारण कीं सहसा अतिवीर्यवान औषध परीक्षेवांचून देण्यांत आलें, तर तें अल्पबलवान रोग्याचें नुकसान करितें. अल्पबलवान रोगी अति वीर्यवान औषध, अग्निकर्म, किंवा क्षारकर्म, किंवा शस्त्रकर्म, कांहींही सहन करूं शकत नाहीं; ह्मणून अल्पबलवान रोग्याला विषाद न वाटेल असें मृदु आणि उत्तरोत्तर गुरु असें औषध दिलें पाहिजे. विशेषेंकरून स्त्रियांस अशाच औषधांची जरूर असते. कारण कीं त्यांचें हृदय मृदु आणि विक्लव असतें व त्या अधिक सुकुमारही असतात. आतां बलवान रोग्याला बलवान रोगावर अल्पबल औषध दिलें असतां तें निष्फळ होतें, ह्मणून रोग्याची परीक्षा प्रकृति; विकृति, सार, सात्म्य, सत्व, आहारशक्ति, व्यायामशक्ति आणि वय यावरून करावी. मनुष्यांच्या दोषित

प्रकृतीचा आधार गर्भशरीरावर असतो ह्मणजे कित्येक मनुष्यांची प्रकृति वातल, कित्येकांची पित्तल, कित्येकांची श्लेष्मल असते, कित्येकांची संसृष्ट (ह्म० दोन दोन दोषांनीं युक्त) व कित्येकांची समधात असते. वात हा रूक्ष, लघु, चल, बहु, शीघ्र, शीत, परुष व विषद् गुणाचा असतो. त्याचा रूक्ष गुण असल्यामुळें वातुल मनुष्य रूक्ष आणि ठेंगणा असतो. त्याचा शब्द रूक्ष, धीर, आणि फुटलेला असतो, व तो जाग्रण जास्त सहन करूं शकतो. लघुगुणामुळें वातुल मनुष्याच्या चेष्टा, आहार व विहारही फार लघु असतात. चल गुणामुळें सांधे, अस्थि, भोंवई, दाढी, ओठ, जीभ व मस्तक वगैरे अनवस्थित असतात. बहुगुणामुळें त्याच्या शरीरांत बारिक बारिक नाडीही जास्त असतात. शीघ्रगुणामुळें त्यास भय, आरंभ, क्षोभ, प्रीति व अप्रीति हीं लौकर घेरतात. शीतगुणामुळें त्यास थंड पदार्थ सोसत नाहींत. परुष गुणामुळें त्याचे केश, मिशा, नखें, दांत, तोंड व दुसरे अवयव कठिण असतात. आणि विषद् गुणामुळें त्याचे शरीरावयवही विषद्च असतात. असे एकंदर गुण असल्यामुळें वातुल पुरुष फार करून अल्प बलवान, अल्पायुषी, आणि अधन्य असतो.

पित्ताचे गुण उष्ण, तीक्ष्ण, द्रव, विस्र, अम्ल व कटु असे आहेत. उष्ण गुणामुळें पित्तल मनुष्याचीं गात्रें सुकुमार असतात, त्याच्या शरीरावर बारिक बारिक पुळ्या फार असतात, त्याला भूक तहान फार लागते, त्याचे केश लौकर पिकतात व शरीरावर वळ्या पडतात. त्याला मिशा, रोमराजि आणि केस मृदु, अल्प आणि पिंगट असे येतात. तीक्ष्ण गुणामुळें त्याचा पराक्रमही तीक्ष्ण असतो, अग्नि प्रदीप्त असतो, अन्नपाणी जास्ती पचतें आणि क्लेशही जास्त सहन करवतात. द्रव गुणामुळें त्याचे सांधे व मांस शिथिल आणि मृदु असतात, आणि त्यास घाम, मूत्र आणि मळ जास्त होतो.

विस्र गुणामुळें त्याचा ऊर, काख, तोंड, मस्तक आणि शरीर यांतून दुर्गंध निघतो. कटु व अम्ल गुणांमुळें त्यास शुक्र आणि मैथुनेच्छा हीं दोनही फार थोडीं असतात; तसेंच मुलेंबाळेंही थोडींच होतात. अशा गुणांचा योग असल्यावरून पित्तल प्रकृतीच्या मनुष्याचें बळ, आयुष्य, ज्ञान, धन आणि उपजीविकेचें साधन हीं मध्यम होत.

कफाचे गुण स्निग्ध, मृदु, मधुर, सार, सांद्र, मंद, स्तिमित, गुरु, शीत, पिच्छल आणि अच्छ असे आहेत. स्निग्ध गुणामुळें कफप्रकृतीच्या मनुष्याचें आंग स्निग्ध असतें. मृदु गुणामुळें त्याची दृष्टि निर्मळ असते आणि शरीर कोमल आणि शुद्ध असतें. मधुर गुणामुळें त्यास शुक्र आणि मैथुनेच्छा फार असते, व पोरें बाळें पुष्कळ होतात. सार गुणामुळें त्याचें शरीर मजबुत असतें. सांद्र गुणामुळें त्याच्या शरीराचे सर्व अवयव पूर्ण वृद्धीला पावलेले असतात. मंद गुणामुळें त्याच्या चेष्टा व आहारविहारही मंद असतात. स्तिमित गुणामुळें त्यास आरंभ, क्षोभ व विकार फार उशीरां होतात. गुरु गुणामुळें त्याची गति फार बळकट व मंद असते. शीत गुणामुळें त्यास भूक, तहान, संताप आणि स्वेद हीं थोडथोडीं प्राप्त होतात. पिच्छल गुणामुळें शरीराचे सांधे बळकट असतात आणि अच्छ गुणामुळें त्याचें दर्शन, तोंड, स्वर, वर्ण, हीं सगळीं दुसऱ्याचें मन संतोषित करतील अशीं असतात. याप्रमाणें गुणांचा योग असतां कफप्रकृतीचा मनुष्य, धनवान, बळवान, विद्यावान, आयुष्यवान आणि कांतिमान असतो. तो श्रेष्ट जाणावा.

मनुष्य संसृष्ट प्रकृतीचा असेल तर त्याचीं लक्षणें संसृष्ट असतात आणि समधात प्रकृतीचा असेल तर सर्व गुणांनीं युक्त असतो. याप्रमाणें प्रकृतीवरून परीक्षा करावी.

आतां विकृति हें विकाराचें नांव आहे. त्या विकाराची परीक्षा

हेतु, दूष्य, दोष, प्रकृति, देश, काळ, विशेष, बळ, आणि चिन्ह यांवरून करावी. जोंपर्यंत या हेत्वादिकांचें बळ लक्षांत आलें नाहीं, तोंपर्यंत व्याधीचें बळ विशेष समजलें जात नाहीं. ज्या व्याधीचे गुण दूष्य, दोष, प्रकृति, देश, काळ, सात्म्य, हेतु, बळ आणि चिन्ह हे अत्यंत असतात तो बलवान समजावा. वर सांगितल्याच्या उलट असतील तर थोडा बलवान समजावा. आणि हेत्वादिकांच्या मध्यम बळानें व्याधीही मध्यम बळाचा ह्मणून समजावा. त्याची सारावरूनही परीक्षा होते. हें सार मनुष्याच्या शरीरांत आठ प्रकारानें राहिलें आहे. ते प्रकार पुढें लिहिल्याप्रमाणें:—

त्वक्सार, रक्तसार, मांससार, मेदःसार, अस्थिसार, मज्जासार, शुक्रसार आणि सत्वसार. यांत जे मनुष्य त्वक्सार असतात त्यांची त्वचा स्निग्ध, श्लक्ष्ण, मृदु, प्रसन्न, सूक्ष्म, अल्प, गंभीर, सुकुमार, रोमावलीयुक्त आणि चकचकणारी असते. ही त्वक्सारता आयुष्याला वाढविणारी, आणि सुख, सौभाग्य, ऐश्वर्याचा उपभोग, विद्या आणि आरोग्य या गोष्टी प्राप्त आहेत असें सुचविते.

रक्तसार पुरुषाचे कर्ण, नेत्र, मुख, जिव्हा, कोष्ठ, मणि, पादतल, नखें, ललाट आणि मेहन हीं स्निग्ध, लाल आणि शोभायमान असतात. ही रक्तसारता सुख, कुशाग्र बुद्धि, मनस्वीपणा, सुकुमारपणा, साधारण बळ, आणि क्लेश सहन न करणें हे गुण दाखविते.

मांससार मनुष्याचा शंख (ह्म० कानशिलें), ललाट, कृकाटिका (ह्म० मान), नेत्र, गंडस्थळ, हनवटी, कूस, उर, काख, वक्षःस्थळ, हात, पाय आणि सांधे हे भाग मांसल आणि पुष्ट असतात. ही मांससारता क्षमा, धृति, अलोलता, वित्त, विद्या, सुख, सरलता, आरोग्य, बळ आणि दीर्घायुष्य यांस दाखविते.

मेदःसार मनुष्याचा वर्ण, स्वर, नेत्र, केश, लव, नख, दांत, ओठ,

मूत्र आणि विष्ठा ही फार करून स्निग्ध असतात आणि ही मेदःसारता वित्त, ऐश्वर्य, सुखोपभोग, दान, सरलता आणि मृदूपचार या गोष्टी दाखविते.

अस्थिसार मनुष्याची खोट, जानु (गुडघा), बोटें, गळसरी, दाढी, मस्तक, अस्थि, नख आणि दांत ही अग्रभागीं जाडीं असतात. हीं मनुष्यें थोड्या उत्साहाचीं, कामांत कुशल, क्लेश सहन करणारीं, दृढ शरीराचीं, आणि आयुष्यवान असतात.

मज्जासार मनुष्याचें आंग सूक्ष्म आणि बलवान असतें, वर्ण आणि स्वर स्नेहाळ असतो, सांधे स्थूल व गोल असतात, आणि हीं मनुष्यें दीर्घायुषी, बलवान, शास्त्रज्ञ, धन, मुलेंबाळें आणि सन्मान यांस सेवणारीं, सौम्य प्रकृतीचीं, सौम्य दृष्टीनें पहाणारीं असतात, आणि त्याचे डोळे जणों दुधानें भरले असावे असे हर्षयुक्त असतात.

शुक्रसार मनुष्य, प्रसन्न आणि स्निग्ध वर्णाचे व स्वराचे, देदीप्यमान, पुष्ट माड्या आहेत ज्यांच्या असे, स्त्रियांस प्रिय आणि स्त्रियांवर अतिप्रीति ठेवणारे, बलवान, आणि सुख, आरोग्य, वित्त, सन्मान यांस भोगणारे, व मुलाबाळांनी युक्त असे असतात.

सत्वसार मनुष्य स्मृतिमान, भक्तिमान, कृतज्ञ, पंडित, पवित्र, उत्साहयुक्त, दक्ष, धीर, रणांगणीं पराक्रम दाखविणारे, खेदरहित, स्थिर चित्ताचे, गंभीर बुद्धिवान आणि कल्याणमार्गाविषयीं आग्रही असे असतात.

वर सांगितलेल्या सर्व सारांनीं युक्त मनुष्य अतिबलवान, गौरवयुक्त, क्लेश सहन करणारे, कल्याणाविषयीं आग्रही, स्थिर शरीराचे, चांगल्या रीतीनें चालणारे, खणखणीत, स्नेहाळ, आणि गंभीर स्वर आहे ज्यांचा असे, सुख, ऐश्वर्य, वित्त, सन्मान, उपभोग, यांसही सेवणारे, रजोगुणरहित, मंद विकाराचे, स्वतांसारख्याच मुलाबाळांचे

आणि दीर्घकाळ जगणार असे असतात. याहून उलट स्वभावाचे मनुष्य असार समजावे.

ह्या आठ प्रकारच्या सारमनुष्यांच्या बळाचें विशेष ज्ञान व्हावें ह्मणून वैद्यानें पहिल्यानें ते जाणले पाहिजेत. नाहीं तर केवळ शरीराच्या दर्शनानेंच वैद्य गोंधळतो. कारण कीं, मनुष्य पुष्ट असला तर तो बलवान वाटतो, रोड असला तर निर्बळ वाटतो, मोठ्या शरीराचा असला तर बलवान भासतो, आणि शरीर लहान असलें तर दुर्बळ भासतो. पण असा कांहीं नियम नाहीं. जगांत शरीर लहान असतां व रोड असतांही मनुष्य बलवान असतात. या ठिकाणीं मुंगीचा दृष्टांत बरा आहे. मुंगी स्वतां लहान आकाराची असतां मोठें ओझें उचलूं शकते. यासाठीं तिच्यांत बळ अधिक आहे असें समजतात. मनुष्याची सारविशेषावरून परीक्षा करून मग चिकित्सा करावी. असें सांगितलें आहे. आतां सात्म्यावरून परीक्षा करावी असेंही सांगितलें आहे. ह्मणून सात्म्याचें स्वरूप समजणें अगत्याचें आहे. जें आपण नेहमीं खातों तें आपल्यास मावूं लागलें तर त्यास सात्म्य असें ह्मणतात. यांत ज्या मनुष्यास तूप, दूध, तेल आणि मांसरस भावतात, अथवा सर्वच रस भावतात, ते बलवान, क्लेश सहन करणारे, दीर्घकाळ जगणारे असे असतात. तसेंच ज्यास बुळबुळीत पदार्थ भावतात, अथवा एकच रस भावतो तो मनुष्य, फार करून अल्प बळवान, थोडे क्लेश सहन करणारा, थोड्या आयुष्याचा. आणि निर्धन असतो. घृतादिक पदार्थांप्रमाणें बुळबुळीत पदार्थांवर प्रीति ठेविणारेही मध्यम बलवान असतात.

आतां सत्वावरून परीक्षा करावी असें ह्मटलें आहे. एथें सत्व ह्मणजे मन, आणि तें मन प्रवर, मध्य आणि अवर असल्यामुळें मनुष्यही प्रवरसत्व, मध्यमत्व आणि अवरसत्व असे तीन प्रकारचे

होतात. त्यांत प्रवरसत्व मनुष्य फार थोडे आणि त्यांविषयीं सार-प्रकरणीं बोलत असतां खुलासेवार सांगितलेंच आहे. लहान शरीराचे मनुष्यही, निज आणि आगंतुक निमित्तानें उत्पन्न झालेल्या मोठ्या पीडा भोगीत असतांही पीडारहित दिसतात. मध्यमसत्वाचे मनुष्य, इतराचें दुःख ऐकून आपल्या मनाला निश्चल करितात. तसेंच दुसरें कोणी येऊन त्यांस धीर दिला तर ते धीर धरतात. हीनसत्व मनुष्यें तर आपल्या आपण किंवा कोणाच्याही सांगण्यानें धीर धरूं शकत नाहींत. शरीर मोठें असलें तरी थोडीशी सुद्धां वेदना ते सहन करूं शकत नाहींत. तसेंच भयंकर पदार्थ, शत्रु, बीभत्सयुक्त आणि विकृतियुक्त पदार्थ यांच्या गोष्टी ऐकण्यांत भय, शोक, लोभ, मोह यांनीं युक्त होतात. ढोराचें अथवा मनुष्याचें मांस किंवा रक्त पाहून, खेद, विवर्णता, मूर्च्छा, उन्माद, भ्रम आणि पतन यांतून एखादा तरी विकार अनुभवतात अथवा मरणही पावतात.

आतां आहारशक्तीवरून पुरुषाची परीक्षा कशी करावी तें सांगतों. जे फार खातात व पचवितात त्यांस बलवान समजावें आणि तसें होत नसेल तर त्यांस निर्बळ समजावें.

व्यायामशक्ति म्हणजे कसरतीच्या कामीं मनुष्याची प्रवृत्ति आहे किंवा नाहीं यावरून तो सबळ अथवा निर्बळ आहे हें ओळखावें.

आतां वयावरून परीक्षा करावी म्हणून सांगितलें आहे. तें वय बाल्य, मध्यम आणि जीर्ण अशा प्रकारें तीन प्रकारचें आहे. त्यांत सोळा वर्षेपर्यंत पूर्णपणें धातु प्रौढ नसल्यावरून सुकुमार, क्लेश सहन न करणारा आणि पूर्णपणें बलहीन असून, कफप्रधान जी अवस्था तें बाल्य म्हणावें. तीस वर्षेपर्यंत धातूच्या गुणाच्या दिनप्रतिदिन अभिवृद्धीमुळें प्रगट होणारें बळ, वीर्य, पौरुष, पराक्रम, ग्रहण, धारण, स्मरण, वचन, आणि विज्ञान, या गोष्टी ज्याच्या ठिकाणीं अधिक

असतात त्या बळवंतास मध्यम वय असें ह्मणावें; आणि जेव्हां शरीरांतून धातूंचे गुण कमी होऊं लागतात आणि वायु मळूं लागतो, तेव्हां तें जीर्ण वय समजावें. ही बळहीन अवस्था शंभर वर्षेपर्यंत टिकूं शकते असें ह्मटलें आहे. आणि कोणी शंभराहूनही अधिक वर्षें जगला तर त्याच्या बळाची परीक्षा वरीलप्रमाणेंच करून त्याच्या बळाच्या, प्रवर, मध्यम आणि अवर अशा स्थितीचा विचार करावा. प्रकृतीचें बळ जसें तीन प्रकारचें आहे तसें विकृतीचेंही तीन प्रकारचें आहे. यावरून दोषबळाचेंही अनुमान करतां येतें. अशा प्रकारें रोग्याच्या शरीराचें बळ व रोगाचें बळ अशा दोहोंची परीक्षा करावी. नंतर औषधाचा तीक्ष्णपणा, मध्यमपणा आणि मृदुपणा ही पाहून, ज्याला जें औषध योग्य असेल तें द्यावें.

**वात, पित्त, आणि कफ**—हे तीन दोष देहाच्या उत्पत्तीचें कारण होत असें ह्मटलें आहे, आणि क्रमें करून शरीराच्या खालच्या, मधल्या आणि वरच्या भागामध्यें राहून हे वातादिक, जसें घराला स्तंभ उचलून धरतात, तसें मनुष्याच्या शरीराला धारण करितात. यावरून शरीरास कित्येकजण त्रिस्थूण (ह्मणजे तीन खांबल्याचें) असें ह्मणतात. जेव्हां हे वातादिक बिघडतात तेव्हां नाशाचें कारणही तेच होतात. हे तीनही वातादिक आणि चौथें रुधिर मिळून हे चार पदार्थ, शरीरांत उत्पत्ति, स्थिति आणि लय या अवस्थामध्यें संयुक्त असतात. गत्यर्थक व गंधार्थक धातूवरून वात शब्द आला आहे. संतापार्थयुक्त तप धातूपासून पित्त शब्द निघाला आहे आणि आलिंगनार्थ श्लिष् धातूपासून श्लेष्मा (कफ) शब्द निघाला आहे. यापैकीं थोडक्यांत ह्मटलें तर वात हा श्रोणि (कटिपश्चाद् भाग) व गुदस्थान यांत राहिला आहे. नाभीच्या खालीं व श्रोणीच्या आणि गुदस्थानाच्या वर पक्काशय राहिला आहे. पक्का-

शय आणि आमाशय यांच्या मध्यें पित्त राहिलें आहे. आमाशयामध्यें कफ राहिला आहे. आणखी वातादिकांची दुसरींही पांच पांच स्थानें सांगितलीं आहेत. त्यापैकीं वाताची स्थानें वातव्याधीमध्यें सांगितलीं आहेत. पित्ताची स्थानें पांच–यकृत्, प्लीहा, हृदय, दृष्टि, आणि त्वचा; आणि कफाचीं स्थानेंही पांच–उर, शिर, व कंठाचे तीन सांधे. सम्यक् योगानें असलेल्या शरीरांत हीं वातादिकांचीं स्थानें होत. जसे सूर्य, चंद्र आणि वायु आदान (घेणें), विसर्ग (सोडून देणें), आणि विक्षेप (मांडून ठेवणें) अशा कार्यांनीं जगाचें धारण करितात, तसे वात, पित्त, आणि कफ हेही शरीराचें धारण करितात. येथें एवढेंच लक्षांत ठेवावयाचें कीं जठराग्नि पित्तापासून निराळा आहे अथवा पित्तच जठराग्नि आहे? या प्रश्नाचें समाधान असें आहे कीं जठराग्नि पित्तापासून निराळा नाहीं; तर पित्त तोच जठराग्नि म्हटला आहे. पित्तधातूमध्यें अग्निगुण प्रधान असल्यामुळें दहन करण्याची म्हणजे पचविण्याची शक्ति त्याचे ठिकाणीं पाहून अग्निशब्द त्यास लावितात इतकेंच. म्हणून जेव्हां जठराग्नि क्षीण होतो तेव्हां पित्तळ द्रव्याचा उपयोग करावा आणि तो अत्यंत वृद्धि पावतो तेव्हां शीतळ द्रव्याचा उपयोग करावा. यावरून पित्तापासून जठराग्नि निराळा असें होत नाहीं. जठराग्नीच्या नांवानें ओळखलें जाणारें हें पित्त, पक्काशय आणि आमाशय यांच्या मध्यें राहून, चार प्रकारचा आहार पचवितें आणि रस, दोष, मूत्र आणि पुरीष यांचे विभाग करितें. हेंच आपल्या ठिकाणीं राहून, आपल्या बळानें दुसऱ्या पित्तस्थानांतील व शरीरांतील अग्नीचें काम करितें. या पित्ताचें 'पाचक अग्नि' असें नांव आहे. हें यकृत् आणि प्लीहा यांत राहिलें आहे. त्याचें रंजक अग्नि असें नांव असून तें रस धातूला लाल करून त्याचें रुधिर असें नांव पाडतें. हृदयांत

जें पित्त आहे त्याचें नांव साधक अग्नि असें आहे. हा साधक अग्नि इच्छित मनोरथाला साधनीभूत होतो. डोळ्यांत जें पित्त असतें त्याचें लोचक अग्नि असें नांव ठेविलें आहे. हा लोचक अग्नि रूपाचें ग्रहण करण्याचा अधिकार पावला आहे. कातडीमध्यें जें पित्त राहिलें आहे त्याचें नांव भ्राजक अग्नि. तोच अभ्यंग, परिषेक, अवगाह व अवलेपन यांच्या द्रव्यास पचवितो आणि स्पर्शाचें भान करतो. हें पित्त तीक्ष्ण, द्रव, पूति (गंधयुक्त), नील, पीत, उष्ण, कटुरस (तिखट), विदग्ध (जाळणारें) आणि अम्ल असें आहे. आमाशय नांवाचें कफाचें स्थान पित्ताच्यावर राहिलें आहे. ह्मणून उंच गतीच्या पित्ताचें तेज, जसें सूर्याचें तेज चंद्र धारण करितो, तसें हेंही धारण करितें. त्याचा आधार चार प्रकारच्या आहारावर आहे. त्यामुळें त्यांत असलेला आहार पाण्यानें भिजून पचण्यास योग्य होतो. हें स्थान मधुर, पिच्छल (बुळबुळित) आणि प्रक्लेदि (आहाराला भिजविणारें) असें असल्यामुळें त्यांतील कफ मधुर आणि शीतल गुणांनीं युक्त असतो. तेथेंच ह्मणजे हृदयांत राहिलेला कफ आपल्या दुसऱ्या ठिकाणचें आणि शरीराचें पाण्यामुळें होणारें कार्य संपादितो. उरःस्थळामध्यें राहिलेला कफ पाठणाच्या वरल्या भागीं चिकटून राहिला असतो, आणि अन्नरसासहित आपल्या पराक्रमानें हृदयालाही चिकटून राहिला आहे. जिव्हेचें मूळस्थान जो कंठ त्यांत असलेला कफ, तो आपल्या सौम्यपणामुळें जिव्हेकडून रसज्ञान चांगल्या प्रकारें करवितो. मस्तकांत राहिलेला कफ स्नेह आणि संतर्पण यांच्या अधिकाराप्रत पावला असल्यामुळें सर्व इंद्रियांस आपल्या बळानें तृप्त ठेवितो, आणि सांध्यांत राहिलेला कफ सांध्याच्या कामामध्यें अडचण येऊं देत नाहीं. हा कफ श्वेत, गुरु, स्निग्ध, पिच्छल, व शीत आहे. तसेंच जर दाह पावला नसेल

तर तो मधुर असतो व जळलेला असेल तर खारट असतो. वर सांगितले आहे की रंजक अग्नि रसधातूला लाल करतो तेव्हां त्यास रुधिर असे ह्मणतात. या रक्ताचें स्थान यकृत आणि प्लीहा हीं होत, आणि तेथें राहून तो दुसऱ्या रुधिराच्या ठिकाणास पुष्टि देतो. रुधिर अत्यंत उष्ण नाहीं आणि शीतही नाहीं पण मधुर, स्निग्ध, रंगानें तांबडें, जड, वाणेरडें आणि पित्तासारखें दाह करणारें आहे.

चिकित्सा काळ—वर वात, पित्त आणि कफ या प्रकरणांत दोषसंचयाची जी जी स्थानें सांगितलीं त्या त्या स्थानीं दोष एकत्र होतात. तेथें एकत्र झालेल्या दोषांचीं चिन्हें अशीं कीं, कोठ्याची स्तब्धता आणि पूर्णता, शरीराचा पिवळेपणा, उष्णतेची कमतरता, जडपणा, गुरुत्व, आलस्य आणि ज्यांच्या योगानें दोष उत्पन्न होतात त्या पदार्थांवर अरुचि इत्यादि. या दोषांचा संचयरूप प्रथम चिकित्सेचा काळ समजावा.

बळवंताबरोबर तंटा, अत्यंत मेहनत, मैथुन, अध्ययन, प्रपतन, प्रधावन (धांवणें), प्रपीडन, अभिघात, लंघन, प्लवन (उडी मारणें), तरण (पोहणें), आणि रात्रीचें जागरण, तसेंच पिसाळलेल्या हत्तीवर अथवा घोड्यावर रमणें, पंथ चालणें इत्यादि विकारांमुळें आणि कटु, कषाय, तिक्त, रूक्ष, लघु, शीत वीर्य, शुष्कशाक (उसरी), वाटाच्या शेंगा, मठ, वरी, नागली, मूग आणि मसूर यांचा आहार केल्यानें, आणखी लंघनानें व खायाची वेळ बदलल्यानें आणि अधोवात, मूत्र, मळ, शुक्र, वमन, शिंक, ढेंकर आणि अश्रु यांचा वेग रोधून धरल्यानें वायु कोपतो. आणि शीत जळ व वारा यामुळें ग्रीष्म ऋतूच्या शेवटीं, सकाळीं व संध्याकाळीं खाल्लेलें अन्न पचल्यावर वायु कोपतो. क्रोध, शोक, भय, श्रम, उपवास, दाह, मैथुन इत्यादि अत्यंत विहारानें आणि लघु, विदाही, तिळांचें तेल, कुळिथ,

तिखट, आंबट, खारट, तीक्ष्ण, उष्ण, सर्षप, अळशी आणि हिरवी भाजी वगैरे खाल्ल्यानें, तसेंच गोऱ्हा, मासळी, बकरी, मेंढी इत्यादिकांचें मांस खाल्यानें आणि दहीं, ताक, सायटें, मसूर व आंबट फळें खाल्यानें पित्तप्रकोप होतो. उष्ण पदार्थानें, उष्णकाळीं, वर्षाऋतु संपतां संपतां, दुपारीं, मध्यरात्रीं आणि अन्न पचनाचे वेळीं पित्त कोपतें. तसेंच दिवसास निद्रा केल्यानें, मेहनत न केल्यानें, आळसानें, मधुर,अम्ल, खारट, थंड,स्निग्ध, गुरु, पिच्छिल,अभिष्यंदि, हायनक (उभ्या वर्षांत पिकणारें धान्य), उडिद, चवळी, गहूं, तीळ, तिळांचे पदार्थ, दहीं आणि उसाचे पदार्थ इत्यादिकांच्या उपयोगानें कफ कोपतो. शीतळ पदार्थांनीं, शीतळ हवेंत कामानें, वसंतऋतूंत, पूर्वाण्ह समयीं, प्रदोष समयीं आणि जेवल्यावरही कफ प्रबळ होतो. पित्ताला कोपविणाऱ्या पदार्थांमुळें, द्रव, स्निग्ध, गुरु भोजन केल्यानें, दिवसास निजल्यानें, क्रोधानें, अग्नीनें, उन्हानें, मेहनतीनें, कोठें लागल्यानें, अजीर्णांत जेवल्यानें, आणि विरुद्ध भोजन केल्यानें रुधिर कोप पावतें. दोषाशिवाय रुधिर कधींही कोप पावत नाहीं. त्यामुळें वातादिक दोषाला कोपविण्याचा काळ ह्मटला ह्मणजे रुधिराला कोपविण्याचाच काळ समजावा. या चारही प्रकोपावरून पोटांत सुई टोंचल्याप्रमाणें पीडा, तहान, जळजळ, अन्नावर अरुचि आणि उमासे येतात. हा कोपण्याचा वेळ ह्मणजे चिकित्सेचा दुसरा काळ समजावा.

कुपित झालेले हे वातादिक चार दोष, एका भांड्यांत पीठ आणि पाणी एकत्र करून रात्रभर ठेवलें असतां तें जसें दरदरून फुगतें तसे विस्तार पावतात. यद्यपि वायूमध्यें चैतन्य नाहीं तरी त्याला गति असल्यामुळें तो पित्तादिकाला हालवितो आणि ह्मणूनच त्यांत रजोगुण जास्त असतो, आणि हा रजोगुणच सर्व पदार्थांचा प्रवर्तक आहे. जसा पाण्याचा मोठा सांठा अत्यंत वृद्धि

पावल्यानें पाळ फोडून इतर पाण्याबरोबर मिळून चोहोंकडे पसरतो, त्याचप्रमाणें रुधिरासहित दोष, एक दोन अथवा तीनही, संचय पावून कोपतात, आणि आपली मर्यादा सोडून इतर दोषांबरोबर मिळून शरीरांत फैलावतात. ते अशा रीतीनें कीं वात, पित्त, श्लेष्मो, रुधिर, वातपित्त, वातकफ, पित्तकफ, वातरक्त, पित्तरक्त, कफरक्त, वातपित्त आणि रुधिर, वातकफ आणि रुधिर, पित्तकफ आणि रुधिर, वातपित्त आणि कफ, आणि वातपित्त कफ आणि रुधिर याप्रमाणें पंधरा भेद होतात. अत्यंत न कोपलेला दोष नाडीमध्यें गुप्तपणें राहिला असतो, तो दूर करण्याचा उपाय न होईल व ज्यास्त कुपित होण्याचें यत्किंचितही कारण उद्भवेल तर त्या वेळीं तो लागलाच कुपित होऊन व्याधि उत्पन्न करतो. याप्रमाणें कोप पावून शरीरांत पसरणाऱ्या वातादिक चार रोगांपैकीं वायूचें चिन्ह भलत्या मार्गानें चालणें व पोट फुगणें हें आहे. पित्ताचीं चिन्हें, जळजळ होणें, शरीरांतून धूर निघणें, आणि जीव सोसणें हीं होत. तसेंच कफाचीं चिन्हें अन्नावर अरुचि, अपचन, अंग दुखणें आणि ओकारी येणें हीं होत. हा चिकित्सेचा तिसरा काळ समजावा.

वातादिक चार दोष कुपित होऊन निराळ्या स्थानीं जाऊन निरनिराळ्या व्याधि उपजवितात. जेव्हां ते कुपित होऊन उदरांत शिरतात तेव्हां गुल्म, विद्रधि, जलोदर, अग्नीची मंदता, पोट फुगणें, विशूचिका, आणि अतिसार इत्यादि रोग उत्पन्न होतात. जेव्हां ते बस्तींत शिरतात, तेव्हां प्रमेह, अश्मरि, मूत्राघात व मूत्राचे अनेक प्रकारचे रोग उत्पन्न होतात. शिश्नांत शिरतात तेव्हां उपदंश व शुक्रदोष इत्यादि रोग होतात. गुदेमध्यें राहिले असतां भगंदर व अर्श इत्यादि रोग उद्भवतात. वृषणांत शिरले असतां त्याची वृद्धि करितात. ऊर्ध्वजत्रुगत दोष वरच्या भागाच्या रोगाला उत्पन्न

करितात. कातडी, मांस आणि रक्त यांत शिरले असतां ते क्षुद्र रोग, कुष्ठ, विसर्प इत्यादि रोगांसही प्रगट करितात. जर हे कुपित दोष मेदांत शिरले तर गांठ, अपचन, अर्बुद, गंडमाळा आणि अलजी हे रोग उद्भवतात. अस्थींत शिरले असतां विद्रधि आणि अनुशयी इत्यादि रोग प्रगट करितात. पायांत राहिले तर श्लीपद, वातरक्त, वातकंटक इत्यादि रोगांस जागा देतात आणि सर्व आंगांत राहिले असतां ज्वरास आणि सर्वांग रोगांस उत्पन्न करितात. अशाप्रकारें निरनिराळ्या ठिकाणीं शिरलेल्या वातादिकांच्या पूर्वरूपादिक चिन्हांवरून त्या त्या ठिकाणच्या रोगाचा निदानभागांत समावेश होतो. पूर्वरूप प्रगट झाल्यावर जे इलाज करावयाचे तो चिकित्सेचा चवथा काळ ह्मणावा.

शोफ, अर्बुद, ग्रंथि, विद्रधि, विसर्प ज्वर आणि अतिसार यांचीं चिन्हें प्रगट झाल्यावर जे उपाय करावयाचे, तो चिकित्सेचा पांचवा काळ समजावा.

दोष उद्भवून व्रण उत्पन्न होतो तेव्हां जे उपाय करावयाचे तो त्याचा साहावा काळ समजावा.

रोग झाल्याबरोबर उपाय न केला आणि पुष्कळ दिवसपर्यंत तसेंच चालविलें तर रोग साध्य असला तरी असाध्य होतो. याप्रमाणें दोषांचा संचय, प्रकोप, प्रसर, स्थान, संश्रय, व्यक्ति आणि भेद यांस जो यथार्थ जाणतो तो वैद्य ह्मणावा. दोष एकत्र होण्याच्या वेळीं जर उपाय झाले तर दुःखदायक अवस्थेला रोग पोंचत नाहीं. वातादिक चार, तीन, दोन, आणि एक अशा दोषांनीं झालेल्या संसर्गांतील कुपित दोष हा दुसऱ्या कुपित दोषांमागून जातो. संसर्गांत आणि सन्निपातांत जो दोष बलवान असतो त्याचा उपाय पहिल्यानें दुसरे दोष कुपित होणार नाहींत अशा रीतीनें

करावा. त्यानंतर इतर दोषांवर उपाय करावे. कुपित वातादिक दोषांच्या अतिदुःखदायक शेवटल्या अवस्थेला व्रण असें नांव दिलें आहे. त्याचें कारण हें आहे कीं कठिण पदार्थांत आलेल्या व्रणाप्रमाणें देह आहे तोंपर्यंत तो नाश पावत नसून आवरणरूप आहे.

द्रव्यभेद—पृथ्वी, जल, तेज, वायु आणि आकाश यांच्या समुदायापासून जगांतील सर्व पदार्थ उत्पन्न झाले आहेत. आणि ज्या द्रव्यांत ज्या भूताची अधिकता असेल, तो त्या नांवानें ओळखावा. असा कीं हा पार्थिव ( पृथ्वीसंबंधीं ) हा आप्य ( जळासंबंधी ) हा तैजस ( अग्निसंबंधी ), हा वायव्य ( वायुसंबंधी) आणि हा आकाश्य (आकाशासंबंधी); याप्रमाणें द्रव्याला नांवें दिलीं आहेत. त्यांत जें द्रव्य स्थूल (जाड), सार (दृढ), सांद्र (घट्ट), मंद, स्थिर, खर, गुरु, कठिण आणि वाणेरडें. कांहीं कषाय रसाचें आणि बहुधा मधुर रसाचें असतें, त्याला पार्थिव ह्मणजे पृथ्वीशीं विशेष संबंध ठेवणारें समजावें. जें द्रव्य स्थैर्य (स्थिरपणा), बळ आणि सत्व (समुदाय) यांची वृद्धि करणारें व नीच गतियुक्त असतें, तसेंच जें शीत, निश्चल, स्निग्ध, मंद, गुरु, प्रवाही, सांद्र (घट्ट), मृदु, पिच्छल (बुळबुळित), रसयुक्त, कांहींसें कषाय, अम्ल आणि लवण आणि फार करून मधुर असतें, तें आप्य ह्मणजे जळाशीं विशेष संबंध ठेवणारें असें जाणावें. हें आप्य द्रव्य, स्नेह व प्रल्हादन, क्लेदन आणि संधानाला पृथक करणारें असें असतें. जें द्रव्य उष्ण, तीक्ष्ण, सूक्ष्म, रूक्ष, खर, लघु, विशद ( निर्मळ ) अधिक रूपगुणयुक्त, कांहींसें अम्ल व लवण, तिखट रसाचें प्राधान्य धरणारें, व फार करून स्वभावानेंच उंच गतियुक्त असतें तें तैजस ह्मणजे अग्नीशीं अधिक संबंध ठेवणारें असें समजावें. हें द्रव्य दहन, पचन, दारण (फोडणें), तापन, प्रकाशन, प्रभादायक आणि वर्णक एवढीं

कामें करितें. जें द्रव्य सूक्ष्म, रुक्ष, खर, शिशिर, लघु, विशद, अधिक गुणयुक्त, जरासें कडवट आणि फार करून कषाय रसाचें असतें, तें वायवीय ह्मणजे वायूशीं अधिक संबंध ठेवणारें असें समजावें. जें द्रव्य श्लक्ष्ण ( चिकट ), सूक्ष्म, मृदु, व्यवायी ( विरघळणारें ), अस्फुट रसाचें आणि शब्द गुणानें प्रधान असें असतें, तें आकाशीय ह्मणजे आकाशाशीं अधिक संबंध ठेवणारें असें जाणावें. हें द्रव्य कोमलता, छिद्र आणि हलकेपणा यांस उत्पन्न करतें.

वरील प्रमाणें जगांतील सगळे पदार्थ औषधिरूपच आहेत. ह्मणून युक्तीनें पदार्थांची परीक्षाकरून द्रव्यें वापरलीं असतां तीं आपलें वीर्य, बळ आणि प्रभाव यांनीं आपलें कार्य उत्तम रीतीनें करितात. हीं द्रव्यें जे वेळीं कार्य करितात त्या वेळास "काळ" असें ह्मणतात. जें कार्य करतात त्यास "कर्म" अशी संज्ञा आहे. जेणेंकरून कार्य करितात त्यास "वीर्य" ह्मणतात. जेथें करतात त्यास "अधिकरण" ह्मणतात. ज्या प्रकारें करतात त्या प्रकाराला "उपाय" असें ह्मणतात, आणि ज्याला प्रगट करतात त्यास "फळ" अशी संज्ञा आहे. त्यांत जेवढीं विरेचनादि द्रव्यें सांगितलीं आहेत त्यांच्या ठिकाणीं पृथ्वीचे आणि पाण्याचे गुण अधिक असतात, ह्मणून या दोहोंत गुरु नांवाच्या गुणाचीं विरेचन द्रव्यें खालीं जातात; ह्मणजे असें अनुमान करितां येतें कीं विरेचनद्रव्यांत खालीं गमन करविणारे गुण अधिक असले पाहिजेत ; ह्मणून त्यांस अधोगुणभूयिष्ट असें ह्मणतात. वमनद्रव्यांमध्यें अग्नीचे आणि वायूचे गुण अधिक असतात. हे दोन्ही पदार्थ हलके असल्यामुळें त्यांनीं युक्त अशीं वमनद्रव्यें वर चढतात. त्यावरून त्यांस ऊर्ध्वगुणभूयिष्ठ असें नांव दिलें आहे. वर आणि खालीं गति असणाऱ्या द्रव्यांस उभयगुणभूयिष्ठ असें नांव दिलें आहे. दोष

शमविणाऱ्या द्रव्यांत आकाशाचा गुण अधिक असतो. संग्राहक ( पकडणारीं ) द्रव्यें, वायूमध्यें शोषण गुण अधिक असल्या कारणानें, वायुचा गुण अधिक असणारीं अशीं झटलीं आहेत. तसेंच जठराग्नीला प्रदीप्त करणाऱ्या द्रव्यांत अग्नीचे अधिक गुण असतात, असें समजावें. दोषाला उसकटून काढणाऱ्या लेखन नांवाच्या द्रव्यांत वायूचे आणि अग्नीचे गुण अधिक असतात. शरीराला पुष्टि देणाऱ्या बृंहण नांवाच्या द्रव्यांत पृथ्वीचे आणि पाण्याचे गुण अधिक असतात. पृथ्वी, अग्नि आणि पाणी यांनीं बनलेल्या द्रव्याचा उपयोग वायूच्या व्याधींला दूर करतो. पृथ्वी, पाणी आणि वायु यांनीं बनलेल्या द्रव्यांचा उपयोग पित्ताच्या प्रकोपाला शांत करतो. आकाश, अग्नि आणि वायु यांनीं बनलेल्या द्रव्याचा उपयोग वायूला वाढवतो. अग्नीनें बनलेलें द्रव्य पित्ताला वाढवितें. तसेंच पृथ्वी व पाणी यांनीं बनलेल्या द्रव्यांचा उपयोग कफ वाढवितो. याप्रमाणें निरनिराळ्या गुणांचें आधिक्य अथवा दोन दोन गुणाचें आधिक्य कसें असतें, हें तपासून पाहून ज्या दोषावर जें औषधिद्रव्य लागू पडेल त्याचीच योजना करून दोष नाहींसा करावा आणि शीत, उष्ण, स्निग्ध, रुक्ष, मृदु, तीक्ष्ण, पिच्छल आणि विशद अशा प्रकारें वर सांगितलेल्या आठ वीर्य नांवाच्या गुणांत तीक्ष्ण आणि उष्ण हे दोन गुण अग्निसंबंधी होत. शीत आणि पिच्छिल हे दोन गुण जलसंबंधी होत. स्निग्ध नांवाचें वीर्य, पृथ्वी आणि पाणी यांच्या विशेष भागांनीं युक्त असतें. मृदुपणा हा जळ आणि आकाश यांच्याशीं अत्यंत संबंध ठेवणारा आहे. रूक्ष नांवाच्या वीर्यांत वायूचें प्राधान्य आहे. विशद वीर्यामध्यें पृथ्वीचे आणि पवनाचे गुण अधिक असतात आणि गुरुपाक आणि लघुपाक यांत क्रमेंकरून ज्यांत ज्याचे गुण अधिक आहेत असें वर सांगीतलें

आहे त्यांत उष्ण व स्निग्ध पाक वाताला हरण करणारा आहे. शीत, मृदु, आणि पिच्छिल पाक पित्ताला हाणतो. तीक्ष्ण, रुक्ष आणि विशद पाक श्लेष्माला हाणतो. गुरुपाक पित्ताला हाणतो आणि लघुपाक श्लेष्माला हाणतो. त्यांतही मृदु, शीत आणि उष्ण असे तीनही प्रकारचे पाक स्पर्शेंद्रियानें जाणतां येतात. पिच्छिल आणि विशद हे दोन पाक चक्षुरिंद्रियानें ग्रहण करतां येतात. शीत आणि उष्ण पाक सुखदुःखाला उपजिवणारे असल्यामुळें तद्दाग जाणतां येतात. गुरुपाक मळ आणि मूत्र साफ झाल्यानें आणि कफ उसकटून निघण्यानें लक्षांत येतो. लघुपाक मळाला आणि मूत्राला पकडल्या-वरून आणि वायूला कोपविल्यावरून ध्यानांत येतो. यापैकीं सारख्या गुणांनीं युक्त अशा भूतांमध्यें रसाचा विशेष जाणण्यासारखा असतो; जसें कीं, मधुर आणि गुरु रस पृथ्वीचा आहे आणि मधुर व स्निग्ध रस जळाचा आहे इत्यादि. यावरून द्रव्याचे वर्णिलेले गुण देहांतही असतात, ह्मणून देही याच्या देहाची स्थिति, वृद्धि, आणि क्षय यांचें कारण द्रव्यच होय असें उघड सिद्ध होतें.

**रस**—पंच महाभूतांपासून उत्पन्न होणारा, चार प्रकारचा, षड्-रसांनीं संयुक्त, दोन प्रकारच्या अथवा आठ प्रकारच्या वीर्यानें युक्त, व गुणांनीं गुंफित, खाल्लेला आहार नीटपणें पचविल्यानें त्याचा जो तेजोमय सारांश उत्पन्न होतो त्यास रस ह्मणतात आणि तो हृदयांत असतो. हृदयांतील हा रस, ऊर्ध्व गमन करणाऱ्या दहा, खालीं प्रसार पावणाऱ्या दहा, आणि अडव्या चालणाऱ्या चार, अशा चोवीस धमनींत प्रवेश करून प्रारब्ध कर्माच्या स्थितीपर्यंत सगळ्या शरीराला हमेष तृप्त करतो, वाढवतो, धारण करतो, निभा-वून नेतो आणि जिवंत ठेवतो. क्षय, वृद्धि आणि विकार यांहींकरून या रसधातूची शरीरांतील गति अनुमानावरून समजावी. शरीराचे

सर्व अवयव, वातादिक दोष, रुधिरादिक धातु, विष्टादिक मळ आणि पक्वाशयादिक आशय यांत गति उत्पन्न करणाऱ्या या रसामध्यें अग्नीचा गुण प्रधान आहे, किंवा चंद्राचा गुण प्रधान आहे, असा प्रश्न उत्पन्न होईल. तेव्हां असें जाणावें कीं, द्रवरूप हा रस स्नेहन, जीवन, तर्पण आणि धारण इत्यादिकांवरून चंद्रगुणप्रधान असावा असें दिसतें. हा जलमय रस, यकृत आणि प्लीहा नांवाच्या दोन गाठींत प्राप्त होऊन शरीरांतील अग्नीनें तांबडा होतो, तेव्हां त्यास रुधिर अशी संज्ञा दिली आहे. व रुधिरावस्थेला पावलेला हा रस, स्त्री बारा वर्षांची झाली असतां योनींतून रुधिररूपानें बाहेर येतो, तेव्हां त्यास रज असें म्हणतात. याचा पन्नास वर्षांच्या वयाला क्षय होतो. स्त्रीच्या रजोरूप रुधिरामध्यें अग्नीचे गुणही आहेत. त्यामुळें तें, अग्नीचा व चंद्राचा गुण प्रधान आहे ज्यांत, अशा गर्भाला कारणीभूत होतें. पण कित्येक तर रजोरूप या रक्तालाच पंचभूतात्मक म्हणतात. कारण कीं या रजामध्यें दुर्गंध, द्रवत्व, रक्तपणा, चलन, आणि हलकेपणा क्रमेंकरून पृथ्व्यादिक पंचमहाभूतांचे गुण दिसून येतात. याप्रमाणें रसापासून रुधिर, रुधिरापासून मांस, मांसापासून मेद, मेदापासून अस्थि, अस्थीपासून मज्जा आणि मज्जेपासून शुक्र ( वीर्य ) उत्पन्न होतें. या सर्व धातूंस अन्नपानाचा रस पुष्टि देणारा आहे. तेव्हां शरीरांतील सर्व धातूंचें आदिकारण रस असल्यामुळें बुद्धिवान पुरुषानें आळस सोडून योग्य आहारविहारानें रसाचें संरक्षण करावें. हा रस रक्तादिकांच्या क्रमानें पुरुषाच्या शरीरांत वीर्यरूप आणि स्त्रीच्या शरीरांत रजोरूप दिसून येतो. हें शुक्र आणि रज स्त्रीपुरुषांच्या शरीरांत लहानपणापासूनच असतें. तथापि तें फुलाच्या कोंवळ्या कळींत वसणाऱ्या सुगंधाप्रमाणें सूक्ष्मतेमुळें प्रगट होत नाहीं; जेव्हां तरुणावस्था येते तेव्हां विकास पावलेल्या

पुष्पाच्या सुगंधाप्रमाणें स्त्रीपुरुषांच्या शरीरांत रज आणि शुक्र या रूपानें तो प्रगट होतो. शुक्र आणि रज यांस उपजिवणारा हा रसधातु, वृद्ध मनुष्याचें शरीर जरेनें पिकून गेलें असल्यामुळें त्यास पुष्ट करूं शकत नाहीं.

**औषध घेण्याचे दहा काळ**–निर्भक्त, प्राग्भक्त, अधोभक्त, मध्यभक्त, अंतराभक्त, सभक्त, सामुद्र, मुहुर्मुहुर, ग्रास, आणि ग्रासांतर असे औषध घेण्याचे दहा काळ आहेत. त्यांत अन्नाशिवाय केवळ औषध घेणें त्यास निर्भक्त ह्मणतात. अन्नाच्या आवरणावांचून हें औषध अत्यंत वीर्यवान असल्यामुळें तत्काळ रोगाचा नाश करतें. पण हें औषध जर वृद्ध, बाळक आणि स्त्री सेवन करील तर तीं परम ग्लानि पावतील, इतकेंच नव्हे तर त्यांच्या बळाचाही आणखी क्षय होईल. अन्न खाण्याच्या पूर्वीं औषध खाल्यावर जेवणें त्यास प्राक्भक्त असें ह्मणतात. या वेळीं दिलेलें औषध त्वरित पक्व होतें, बळाला हाणित नाहीं व अन्नाचें आवरण वर आल्या मुळें बाहेर पडत नाहीं, आणि बळाला उपजवितें. यासाठीं वृद्ध, बाळक, भयभीत आणि स्त्री यांस तर याच वेळीं औषध द्यावें. जेवल्यावर जें औषध सेवावयाचें असतें तें अधोभक्त जाणावें. शरीराच्या वरच्या भागांतील अनेक रोग तें नाहींसें करतें, आणि बळाची अभिवृद्धि करितें. अर्धें जेवल्यावर औषध पिऊन, फिरून उरलेलें जेवण जेवावें तें मध्यभक्त समजावें. या वेळीं घेतलेलें औषध शरीराच्या मध्यभागीं असलेल्या अनेक रोगांस दूर करतें. सकाळच्या जेवणाच्या आणि संध्याकाळच्या जेवणाच्या मध्यें जें औषध घ्यावयाचें तें अंतराभक्त ह्मटलें आहे. या वेळीं घेतलेलें औषध ह्रदयास हितकर, बळवृद्धिकर, जठराग्नीला अत्यंत दीपित करणारें असें असतें व सर्वांसच पथ्य आहे. अन्न शिजविते वेळींच त्यांत

टाकलेलें औषध सभक्त ह्मणावें. हें स्त्री, बळहीन पुरुष, औषधाविषयीं अरुचि धरणारे सर्व लोक, बालक आणि वृद्ध यांस 'पथ्यकर' ह्मटलें आहे. जेवल्यापूर्वी आणि जेवल्यानंतर जें घ्यावयाचें तें औषध सामुद्ग समजावें. शरीराच्या वरच्या व खालच्या भागीं पसरलेल्या दोषाच्या शांतीसाठीं हें औषध अति.उत्तम ह्मणून सांगितलें आहे. अन्नाबरोबर अथवा अन्नाशिवाय वारंवार जें औषध घ्यायचें ·असतें, त्यास मुहुर्मुहुर अशी संज्ञा दिली आहे. तें श्वास, कास, वांति आणि उचकी यांवर योजावें. घासांत मिळवून अथवा एक घास-भर अन्न खाल्यावर औषध घेऊन फिरून घासभर अन्न जेवावयाचें, व असा औषध संपेपर्यंत क्रम ठेवावयाचा या प्रकारास ग्रासांतर असें ह्मणतात. हें श्वासादिक रोगांवर, अवलेहादिकांच्या रूपानें योजिलें असतां सेवन करणारा रोगरहित होतो. विष्ठा आणि मूत्र यांचा त्याग केल्यावर इंद्रियें निर्मळ झालीं, शरीर हलकें झालें, ढेकर साफ आला, शरीर स्वच्छ झालें, अन्नावर रुचि आली, उदर शिथल झालें आणि भूकही लागली ह्मणजे वैद्याची संमति घेऊन ज अन्न घ्यावयाचें त्यास ग्रासकाळ ह्मणतात.

**मरणाचीं चिन्हें**–जेव्हां शरीराच्या आणि शीलाच्या प्रकृतीमध्यें विकृति दिसते, तेव्हां मरण जवळ आलें असें समजावें. सर्व लोकांस समजतील असे उल्कापात होत नसतांही, अदृश्य अनेक प्रकारचे शब्द आणि जवळ नसतांही समुद्र, शहर आणि मेघ यांचा कलकलाट जर अकस्मात ऐकूं येऊं लागली आणि खरें भाषण ऐकूं येईना तर, आणि गांवच्या पशूंचा आणि वनच्या पशूंचा आवाज विपरीत ऐकूं येऊं लागला, तसेंच शत्रूच्या शब्दांवर प्रीति आणि मित्राच्या भाषणावरून कोप उत्पन्न होऊं लागला, तसेंच अकस्मात बहिरेपणा प्राप्त झाला, तर तो मनुष्य आसन्नमरण

ह्मणजे ज्याचें मरण जवळ आलें असा समजावा. उष्ण पदार्थ शीत आणि शीत पदार्थ उष्ण भासूं लागले, घटकोघटके ज्याचा स्वभाव बदलूं लागला, ज्याच्या मनांत दाह होऊं लागला, ज्याचें शरीर नेहमीं ऊन रहातें आणि थंडीनें थरथरत असतें, कोणी येऊन मारलें असतां किंवा अंगाचा भाग तोडला असतां कळत नाहीं, स्वतांचें शरीर धुळीनें भरलेलें भासतें, शरीराचा वर्ण बदलतो अथवा शरीरावर सुरकुत्या पडतात, स्नान करून चंदनाच्या गंधाचा लेप केल्यावर हिरवी माशी अंगावर येऊन बसते, आणि शरीर एकाएकीं सुगंधी होऊन जातें, अशीं चिन्हें जेव्हां होतात तेव्हां आयुष्य सरलें असें समजावें. ज्यास मधुर इत्यादि रस विपरीत जाणवतात ( गोडाच्या ठिकाणीं कडू ), तसेंच सांगितल्या क्रमानें प्यालेले रस ज्याच्या शरीरांत दोषांची वृद्धि करितात आणि न खाण्यासारखे पदार्थ खाल्ल्यानें ज्याचे वातादिक दोष आणि जठराग्नि, असावी तशा समान अवस्थेला प्राप्त होतात किंवा जेवणाचे वेळीं अन्नाचे मधुरादिक रस ज्यास कळत नाहींत, त्याचें आयुष्य सरलें असें समजावें. ज्यास सुगंधी पदार्थ दुर्गंधी, आणि दुर्गंधी पदार्थ सुगंधी असे भासतात; किंवा ज्यास गंधच मुळींच कळत नाहीं, त्याचें आयुष्य सरलें ह्मणून समजावें. ज्या मनुष्यांस शीतोष्णादिक दोन दोन पदार्थ विपरीत ( शीताला उष्ण, उष्णाला शीत ) भासतात, तसेंच काळ, अवस्था, आणि दिशा यांचेंही विपरीत ज्ञान होतें ( उगवतेस मावळत आणि मावळतेस उगवत, सकाळाला संध्याकाळ आणि संध्याकाळाला सकाळ असें भासतें ); त्याच प्रमाणें इतर पदार्थही उलट सुलट दिसतात; ज्यास साधनावांचून दिवसाचे तारे दिसतात आणि रात्रीस आगीच्या गोळ्याप्रमाणें सूर्य दिसतो, दिवसास सूर्य चांद्रम्याप्रमाणें भासतो; मेघावांचून इंद्र धनुष्य आणि विजा दिसतात, निर्मळ

आकाशांत विजांनीं युक्त असे काळे ढग ज्यास दिसतात; पृथ्वीही, धूर, धुकें आणि वस्त्र यांनीं वेढल्याप्रमाणें भासते; तसेंच सर्व ब्रह्मांड पेटल्याप्रमाणें अथवा पाण्यांत बुडून गेल्याप्रमाणें ज्यास भासूं लागतें; ज्यास नक्षत्रांसहित अरुंधतीचा तारा दिसत नाहीं; तसेंच ध्रुवाचा तारा आणि आकाशगंगाही ज्यास दिसत नाहीं; त्या मनुष्यास गतायुष्य जाणावें. चंद्रास उजेडामध्यें, आरशांत आणि पाण्यांत आपली पडच्छाया ज्यास दिसत नाहीं अथवा दिसली तर ती एकांग किंवा हीनावयव, विकृतियुक्त आणि इतर प्राण्यांच्या आकाराची दिसते; कुत्र्याप्रमाणें, कावळ्याप्रमाणें, कंक पक्ष्याप्रमाणें, गिधाडाप्रमाणें, प्रेताप्रमाणें, यक्षाप्रमाणें, राक्षसाप्रमाणें, पिशाच्याप्रमाणें आणि सर्पाप्रमाणें वेगळ्या आकाराची आपली पडच्छाया ज्यास दिसूं लागते आणि धुरावांचूनच आगीचा भडका मोरांच्या कंठाप्रमाणें ज्यास निळा दिसतो, तो मनुष्य या लक्षणांवरून दुखणेकरी असला तर मरण पावतो, व चांगला असला तर दुखणेकरी होतो. आपल्या शरीराच्या स्वाभाविक स्थितीहून उलटी स्थिति भासूं लागली तर ती मरण सुचविते. उदाहरणार्थ काळ्याचें पांढरें, पांढऱ्याचें काळें, तांबड्याचें इतर वर्णाचें, स्थिर असेल त्याचा अस्थिरपणा, मृदु असेल त्याचा कठीणपणा, चल असेल त्याचा अचलपणा, अचलाचा चलपणा, जाड्याचें बारीक आणि बारिकाचें जाड, लांबचें आखूड आणि आखूड असेल तें लांब, पडण्यासारखें नसेल त्याचें पडणें आणि पडण्यासारखें असेल त्याचें न पडणें, आणि एकाएकीं अंगीं शीतपणा, उष्णपणा, स्निग्धपणा, रूक्षपणा, जडपणा, विवर्णपणा ( अंगाचा रंग बदलणें आणि कळा लागणें ) तसेंच त्रासावांचून आपआपल्या ठिकाणींच शरीराच्या अवयवांचें धडधडणें, भ्रम पावणें, पडल्याप्रमाणें भासणें, बाहेर निघून आल्याप्रमाणें वाटणें, आंत

दबून जाणें, तसेंच अवयव एकदम जड होणें अथवा हलकें होणें, हीं सर्व लक्षणें मरणाचीं होत. एकाएकीं शरीरांत पोंवळ्याप्रमाणें तांबडा वर्ण उत्पन्न होणें अथवा विकलांग ( लंगडेपणा, थोटेपणा इत्यादि ) उत्पन्न होणें हींही मरणाचींच चिन्हें होत. कपाळावर नाडीचें दर्शन, नाकावर पुरळाची उत्पत्ति, सकाळीं कपाळावर घर्मबिंदु येणें, नेत्ररोगावांचून अश्रु गळणें, शेणाच्या भुसकुटाप्रमाणें उडणाऱ्या धुळीचें दर्शन, तसेंच डोक्यावर कपोत ( कवडा ) वगैरे पक्ष्यांचें बसणें हींही मृत्यूचीं लक्षणें होत. अन्नपान न करणाऱ्या मनुष्याच्या शरीरांतून मूत्र आणि विष्टा यांची अत्यंत प्रवृत्ति आणि अन्नपान करणाऱ्या मनुष्याच्या शरीरांतून मूत्रविष्ठांची अप्रवृत्ति, स्तनाचें मूळ, हृदय, आणि उरःस्थळ या ठिकाणीं शूळाची उत्पत्ति, कटिभागीं शून्यता, अर्धांगाला सूज, दोहीं बाजूला शोष, बसून गेलेला, घरघर करणारा आणि खोल गेलेला स्वर, आणि दांत, मुख, नख आणि शरीरावर काळ्या काळ्या चट्ट्यांची उत्पत्ति हीं चिन्हें मृत्यूचीं समजावीं. ज्याचे कफाचे बडके, विष्टा आणि वीर्य पाण्यांत बुडतें, ज्याच्या दृष्टीच्या मंडळांत निरनिराळ्या विकाराचीं रूपें दिसतात, ज्याचें शरीर आणि केश तेल चोपडल्यावांचूनच तेलकट दिसतात, जो शरीरानें रोड असतांही अन्नावर द्वेष आणि अतिसार यांनीं पीडलेला असतो, जो खोकल्याचे ठसके खात असतो ज्याची तहान भागत नाहीं, ज्याला फेणयुक्त रक्ताची ओकारी होते, ज्याचे हात पाय आणि तोंड हीं मेहरतात, ज्याच्या पायाच्या पोटऱ्या आणि खांदे सुकून गेले आहेत, जो तापानें पीडलेला आहे, जो सकाळीं खाल्लेलें अन्न संध्याकाळीं ओकून टाकतो व खाल्लेलें अन्न जशाच्या तसेंच पातळ होऊन बाहेर पडतें, त्यास लौकरच मरण येतें. बोकडाप्रमाणें गडबडत जो पृथ्वीवर पडतो, ज्याचे मानेचा कांटा मोडून

पडतो, ज्याचें सर्व शरीर आर्द्र असतां हृदयस्थान सुकून जातें, जो मातीच्या पिंडाला फोडतो, लाकडानें लाकूड तोडतो, आणि बारीक बारीक पिंजोळ्या करतो, जो खालचा ओठ चावतो व वरचा चाटतो, जो कान आणि केश यांस तोडीत असतो, जो ब्राह्मण, गुरु, देव-मित्र आणि वैद्य ह्यांचा द्वेष करतो, ज्याच्या जन्मपत्रिकेंत अनिष्ट-कारक ग्रहांची दशा आली आहे, ज्याच्या जन्मनक्षत्राला वक्रग-तीचे ग्रह आकाशांत दबवितात, ज्याची जन्मराश, उल्का आणि अशनी यांनीं हाणली गेली आहे.आणि ज्याचे घरांत स्त्रीचे ठिकाणीं, शयनाचे ठिकाणीं, आसनाचे ठिकाणीं, चालण्यांत, वाहनांत आणि उपकरणांत ( सामग्रींत ) विरोध उत्पन्न झाला आहे, त्यास तत्काळ मृत्यु येणार ह्मणून समजावें. ज्याच्या शरीरांत औषध चालू असतां ही रोगाची वृद्धि होते आणि मांस व बळ हीं दिवसेंदिवस कमी होत आहेत, ज्याच्या शरीरांतील मोठा व्याधि चटकन बरा झाला आहे, जो खातो पुष्कळ पण खाण्याचें रूप शरीरावर दिसत नाहीं; अशाचें आयुष्य थोडें उरलें ह्मणून समजावें.

असाध्य व्याधि—कित्येक व्याधि अशा आहेत कीं ज्या रोग झाल्यावर ( तापांत, उचकींत इत्यादि ) रसायनावांचून नाहींशा होत नाहींत. वातव्याधि, प्रमेह, कुष्ठ, अर्श, भगेंद्र, अश्मरी (मूतखडा), मूढगर्भ (पोटांतच गर्भ सुकून जाणें), आणि जलोदर हे आठ रोग औषध केल्यानेंही फार करून बरे होत नाहींत. त्यांतही ज्या रोगांत बळाचा आणि मांसाचा क्षय झाला असेल, श्वास लागला असेल, तहान लागत असेल, ओकारी होत असेल, ताप आणि मूर्छा येत असतील, अतिसार झाला असेल आणि उचकी लागली असेल,तर वैद्यानें उपाय न करावा हेंच बरें. शून्य झाल्यामुळें ज्याची कातडी मेहेरली आहे, जो वाकडा झाला आहे आणि थरथराट आणि

कापरें यांनीं पीडलेला आहे, तो मनुष्य या वातव्याधींतून बचावत नाहीं. वर सांगितलेल्या रोगानें युक्त व अत्यंत पुवाचा स्राव होत आहे आणि पुटकुळ्यांनीं फारच पीडलेला आहे अशा प्रमेहाच्या रोग्याचा प्रमेह रोग त्याचा नाश करतो. ज्याची कातडी फाटून गेली आहे, ज्याच्या सर्वांगांतून पू स्रवत आहे, ज्याचे डोळे तांबडे लाल झाले आहेत, ज्याचा स्वर बसला आहे, आणि केलेलीं स्नेहादि पांच कर्में ज्याच्या शरीरांत कोणत्याही प्रकारचा फायदा करीत नाहींत, अशा कोडाच्या रोग्याला हा रोग मरण आणल्यावांचून सोडीत नाहीं. तृषा, अरुचि, आणि शूल यांनीं पीडलेला, ज्याच्या शरीरांतून नेहमीं पुष्कळ रक्त स्रवत असतें तसेंच मूत्र व अतिसार यांनीं संयुक्त अशा अर्शरोगी मनुष्यास तो रोग मरण आणितो. ज्याच्या बेंबीचा भाग आणि वृषण अत्यंत शून्य झालें आहे, मूत्र निरोधल्यामुळें ज्याला अत्यंत पीडा होत आहे, आणि लघवीचे वेळीं मूत्राबरोबर आंतून बारिक बारिक तुकडे बाहेर पडतात, असा मूतखड्याचा रोगी फार दिवस जगत नाहीं. गर्भाच्या स्थानीं चिकटून राहिलेला, योनीचें आवरण करणारा आणि उपद्रवासहित मूढ गर्भ स्त्रियांस मरण आणतो. ज्या उदररोगी मनुष्याच्या दोन बाजू मोडतात, खाणें आवडत नाहीं, सुजेनें आणि परसाकडण्यानें जो पीडलेला आहे, तसेंच ज्याचें उदर पाणी काढून टाकल्यावर फिरून भरतें, अशा जलोदररोग्याला वैद्यानें औषध देऊं नये. जो बेशुद्ध झाला आहे, तडफडत आहे, बसला केला तर पडतो, आणि थंडीनें पीडलेला व ज्यास उदरामध्यें जळजळत आहे असा तापाचा रोगी त्या तापानेंच मरण पावतो. ज्याचे केश थरारले आहेत, ज्याचे डोळे लाल भडक झाले आहेत, व ज्यास चक्कर येत आहे, हृदयांत शूळ निघत आहे, मुखानें श्वासोच्छ्वास घेत आहे आणि ज्याचें शरीर रोड झालें आहे

अशा रोग्याचा ज्वर त्याचा नाश करतो. ज्याचे डोळे अंध झाले, जो थरथर कांपूं लागला, जो अत्यंत झोप घेऊं लागला, आणि ज्याचें रुधिर व मांस क्षीण झालें अशा ज्वररोग्याचा ज्वर नाशकारक समजावा. श्वास, शूळ आणि तृषा यांनीं पीडिलेला, ज्वर भरलेला, दुर्बळ आणि रोड झालेला आणि अवस्थेनें वृद्ध असा अतिसाराचा रोगी त्वरित मरण पावतो. ज्याचे डोळे पांढरे आले, ज्याला अन्न रुचत नाहीं, ज्याला उच श्वास लागला, आणि ज्याला कष्टानें वारंवार पुष्कळ शौचास होतें असा क्षयरोगीही मरण पावतो. श्वास, शूळ, तृषा, अन्नावर अरुचि, पोटांतील गांठ दबून जाणें, आणि रोड होणें, हीं लक्षणें पोटांत गांठ आलेल्या रोग्यास जीवंत ठेवित नाहींत, ज्याचें पोट भरून येऊन फुगतें, ज्याच्या शरीरांतील रक्तस्राव अकस्मात् बंद पडला, जो ओकारी, उचकी, आणि तृषा यांनीं पीडला आहे, आणि ज्याला वेदनांनीं आणि श्वासानें घेरलें आहे असा विद्रधि रोग झालेला मनुष्य जगत नाहीं. ज्यांचीं नखें, दांत आणि डोळे हीं सर्व पांढरीं झालीं, आणि ज्याला सर्व पदार्थ पांढरे दिसूं लागले असा पंडुरोगीही जगत नाहीं. ज्याला ओकारीवाटे रक्त पडतें, ज्याचे नेत्र अत्यंत तांबडे लाल आले, आणि ज्यास दिशाही तांबड्या दिसूं लागल्या असा रक्तपित्ताचा रोगी मरण पावतो. जो खालीं पहात रहातो अथवा उंचावरच पहात रहातो, ज्याच्या शरीरांतील मांस आणि बळ क्षीण झालें आहे, ज्याला झोप येत नाहीं असा उन्माद वायु झालेला मनुष्य निश्चयानें मरण पावतो. ज्याला वारंवार वायूचे झटके येतात, जो क्षीण झाला, ज्याच्या भोंवया वाकडे तिकडे चाळे करितात व डोळे भ्रमण पावतात, असा वायु झालेला रोगीही मरण पावतो.

**रोग्यास उपाय करते वेळीं आयुष्याची परीक्षा**—रोग्यास उपाय करणाऱ्या वैद्यानें प्रथम त्याच्या आयुष्याची परीक्षा करावी. आयुष्य असेल तरच व्याधि, ऋतु, अग्नि, वय, देह, बळ, सत्व, सात्म्य, प्रकृति, औषध आणि देश हीं जाणण्याविषयीं प्रयत्न करावा. ज्या रोग्याचे हात, पाय, कुशी, पाठीचा कणा, स्तन, पुढले दांत, तोंड, काख आणि कपाळ हे अवयव मोठे झाले आणि बोटाचीं पेरें, उच्छ्वास, डोळे आणि हात लांब झाले, भोंवई, स्तनाचा मध्यभाग आणि वक्षस्थळ हे अवयव विशाळ झाले, जांघा, लिंग आणि मान ज्याची आंखूड झाली, ज्याचें सत्व, स्वर आणि नाभि गंभीर झाली, ज्याच्या स्तनाचा भाग खालीं आणि गांठलेला आहे, ज्याचे अंगावरील केस जाड झाले, ज्याच्या गळ्याच्या पाठीमागचा भाग पुष्ट आहे, आणि स्नान करून अंगाला चंदन लावल्यावर ज्याचें डोकें प्रथम सुकतें आणि मग क्रमाक्रमानें इतर अवयव सुकतात, व ऊर शेवटीं सुकतो अशीं लक्षणें ज्याचीं असतील त्यास पुष्कळ आयुष्य आहे ह्मणून समजावें, आणि अशा रोग्यासच उपाय करण्यास वैद्यानें हातांत घ्यावें. वर सांगितलेल्या लक्षणांपैकीं कित्येक असतील आणि कित्येक त्याच्या उलट असतील, तर त्या रोग्यास मध्यमायु (ह्म०मध्यम आयुष्याचा) समजावा. तसेंच वरील लक्षणांहून तमाम उलटीं लक्षणें ज्यास आहेत असा रोगी अल्पायु (ह्म० थोड्या आयुष्याचा) जाणावा. ज्याचे सांधे, नाडी आणि बारीक नाडी मांसांत बुडालेली असते, ज्याच्या शरीराचा बांधा मजबूत असतो, ज्याचीं इंद्रियें उत्तम प्रकारें स्वकार्यें करतात, जन्मापासून ज्याला रोग झाला नाहीं, ज्याचें शरीर, ज्ञान, व विज्ञान हीं सर्व हळुहळू पुष्टि पावलीं आहेत, त्यास दीर्घायु समजावें. ज्याच्या डोळ्याच्या खालच्या भागीं स्पष्ट रेषा आहे, ज्याचे पाय आणि कान

मांसळ आहेत, आणि ज्याच्या नाकाचें अग्र उंच आहे, अशा लक्ष-णाचा मनुष्य मध्यमायु ह्मणजे त्यास सुमारें सत्तर वर्षे आयुष्य आहे असें समजावें. ज्याच्या बोटाचीं पेरें आंखूड आहेत, लिंग मोठें आहे, पाठीचा कणा अरुंद आहे, कान आणि नाक लांब आहेत, बोलते वेळीं व हसते वेळीं ज्याच्या हिरड्या दिसतात आणि जो भ्रमिष्टा सारखा पहातो, त्यास अल्पायुषी जाणावें ह्मणजे सुमारें पंचवीस वर्षे आयुष्य आहे असें जाणावें.

याप्रमाणें परीक्षा करून चिकित्सा केली असतां, वैद्यास यश येतें. मनुष्याच्या शरीरांत वातादिक दोषाशिवाय कोणताही व्याधि उत्पन्न होत नाहीं. यास्तव वैद्यकशास्त्रांत जे रोग सांगितले नाहींत, त्यांतही लक्षणांवरून वातादिकांचा निर्णय करावा आणि त्याची योग्य चिकित्सा करावी. जर शीत ऋतु असेल तर पहिल्यानें शीताचें नि-वारण केल्यावर आणि उष्ण ऋतु असेल तर उष्णाचें निवारण केल्यावर मग पुढील उपाय सुरू करावे. रोग कितीही साध्य असला तरी जेव्हां चिकित्सा करावयास पाहिजे तेव्हां ती न झाली आणि जेव्हां चिकित्सा करावयास नको तेव्हां ती झाली, किंवा चिकित्सा अधिक उणी झाली तर रोग बरा होत नाहीं. कुपित दोषाला जी शमविते आणि नव्या उपद्रवांस उपजूं देत नाहीं, तिचें नांव चिकित्सा. जी एका रोगास बरा करून दुसऱ्या रोगांस उत्पन्न करिते, तिला चिकित्सा ह्मणतां येत नाहीं. वैद्यानें रोग्याच्या जठराग्नीचाही तपास करावा. तो जठराग्नि सम, विषम, तीक्ष्ण आणि मंद असा चार प्रका-रचा आहे. जो अग्नि पचनसमयीं अन्न पचवितो, तो सम ह्मणावा. जो कोणा वेळीं अन्न चांगल्या प्रकारें पचवितो आणि कोणावेळीं आध्मान, शूळ, उदावर्त, अतिसार, पोट फुगणें आणि आंतड्यांत करकर आवाज इ. विकार उत्पन्न करून अन्न पचवितो तो विषम जाणावा. जो अग्नि

अत्यंत खाल्लेल्याही अन्नाला लौकर पचवून टाकतो त्यास तीक्ष्ण ह्मणावें. हा तीक्ष्ण अग्नि जेव्हां अन्नाला पचवून वशांत आणि ताळून शोष उत्पन्न करतो, तेव्हां त्यास अत्यग्नि ह्मणतात. जो अग्नि थोडकें खाल्लेलें अन्नही पचविण्यास फार वेळ लावतो आणि शरीरांत अनेक प्रकारचे उपद्रव उत्पन्न करतो, त्यास मंदाग्नि ह्मणावें. ज्याच्या शरीरांत वर सांगितल्याप्रमाणें विषमाग्नि असतो त्याला फार करून वातप्रकोपाचे व्याधि घेरतात. तीक्ष्ण अग्निच्या मनुष्याला पित्ताचे व्याधि होतात आणि मंदाग्नि पुरुषाला कफप्रकोपाचे रोग उत्पन्न होतात. ज्याच्या शरीरांत समाग्नि असतो त्यानें आपली समावस्था न ढाळण्याविषयीं सावधगिरी ठेवावी. विषमअग्निच्या मनुष्यानें स्निग्ध व अम्लपदार्थांचा अधिक उपयोग करावा.तीक्ष्ण अग्नीच्या मनुष्यानें मधुर, स्निग्ध आणि शीतल पदार्थांचा उपयोग करावा आणि रेचक घ्यावें. याचप्रमाणें अत्यंत अग्नीच्या मनुष्यानें ह्मशीचें दूध, तूप, दहीं खावें. आणि मंदाग्नीच्या पुरुषानें कटु, तिक्त, आणि कषाय ह्या पदार्थांचा उपयोग करून ओकारी होईल असें औषध घ्यावें. अन्न पचविणारा आणि अन्न रसाला ग्रहण करणारा जठराग्नि साक्षात् ईश्वरच होय. तो सूक्ष्मपणामुळें शरीरापासून पृथक् करून दाखवितां येत नाहीं. या अग्नीला स्वस्थानीं असणारे प्राण, अपान आणि समान नांवाचे वायु फुंकर घालतात आणि प्रदीप्त ठेवतात. आतां बाल, मध्यम आणि वृद्ध अशा मनुष्याच्या तीन अवस्था सांगितल्या आहेत. त्यांत सोळा वर्षांच्या आंतली बाल्यावस्था मानतात. हें बाळपण, केवळ दुधावर राहण्याचा, दूध आणि अन्न या दोहोंचा उपयोग, करण्याचा, आणि केवळ अन्नावरच राहण्याचा काळ असें तीन प्रकारचें आहे. त्यांत एक वर्षाचें मूल दूध पितें. दोन वर्षांचें दूध आणि अन्न खातें आणि त्यानंतर तें केवळ अन्नावरच उपजीवन करितें. सोळा वर्षांपासून तों सत्तर वर्षांप-

र्यंत जी अवस्था ती मध्यमावस्था म्हटली आहे. तिचे भेद वृद्धि, यौवन, संपूर्णता आणि हानि या प्रकारें चार आहेत. त्यांत वीस वर्षांपर्यंत वृद्धि, तीस वर्षांपर्यंत यौवन, चाळीस वर्षांपर्यंत संपूर्णता आणि त्यापुढें क्रमाक्रमानें सत्तर वर्षांपर्यंत हानि अशा प्रकारें या चार अवस्था होत. शेवटल्या अवस्थेंत शरीरांतील पदार्थ दिन प्रतिदिन घटत जातात. नंतर दिन प्रतिदिन धातु, इंद्रियें, बळ, वीर्य आणि उत्साह क्षीण झाल्यामुळें वलित आणि पलित झालेला, खोकला आणि श्वास इत्यादि उपद्रवांनीं पीडलेला, सर्व प्रकारच्या कामांला असमर्थ झालेला, जुन्या घराप्रमाणें ओढवस्तीस आलेला आणि दुःखानें त्रास झालेला असा मनुष्य वृद्ध समजावा. ह्या एका पुढील एक अवस्थांमध्यें हानि सोडून औषधाचें प्रमाण अधिक करावें. बाल्यावस्थेंत कफाचें, मध्यमावस्थेंत पित्ताचें आणि वृद्धावस्थेंत वायूचें आधिक्य असतें. यास्तव ही गोष्ट ध्यानांत ठेवून चिकित्सा करावी. बालक आणि वृद्ध यांस अग्नि, क्षार, आणि विरेचन यांपासून दूर ठेवावें. आणि यदाकदाचित् या तिहींनीच बरा होईल असा रोग त्यास असला तर हे तीनही पदार्थ फारच हलके हातानें योजावे. देह, स्थूल, कृश आणि मध्यम असा तीन प्रकारचा आहे. त्यांत स्थूल देहाला रोड करावें, रोड असेल त्याला पुष्ट करण्याचें औषध द्यावें आणि मध्यम स्थितीचें शरीर जेणेंकरून कृश होणार नाहीं व स्थूलही होणार नाहीं अशा रीतीनें त्याचें रक्षण करावें.

**रोग्याचें बळ तपासण्याचें अगत्य**—वैद्यानें रोग्याचें बळाबळ अवश्य तपासावें; कारण कीं बलवान पुरुषाचीच सर्व क्रियांकडे प्रवृत्ति असल्यामुळें शरीरांतील सर्व पदार्थांत बळच श्रेष्ठ होय. कित्येक मनुष्य शरीरानें पुष्ट असतांही बळहीन असतात, आणि कित्येक रोडके दिसत असतांही बळवान असतात. यास्तव त्यांजपा-

सून श्रम करवून त्यांच्या बळाबळाचा नीट तपास करावा. मनुष्याचा आंगचा सत्व गुण दुःखाच्या आणि उदयाच्या ह्मणजे सुखाच्या वेळीं त्यास घाबरवित नाहीं. सत्वगुणी मनुष्य आपलें मन वश ठेवून मोठमोठीं संकटेंही सोसूं शकतो. रजोगुणी मनुष्य आपल्या इष्टमित्रांनीं दिलेल्या धैर्यानें संकटें सहन करतो. आणि तमोगुणी मनुष्यास संकट मुळींच सोसवत नाहीं. ह्मणून चिकित्सा करते वेळीं वैद्यानें सात्विकादिक गुणांचीही परीक्षा केली पाहिजे.

देश, काळ, ऋतु, व्यायाम, उदक, दिवसा निजणें, आणि रस इत्यादि पदार्थ प्रकृतीला विरुद्ध असतांही जर ते पीडा करीत नाहींत, तर ते त्या मनुष्यांस सात्म्य होत असें समजावें. साहा रसांतून जो रस ज्याला सुखदायक होतो आणि जे श्रम सुखकारक वाटतात तो रस आणि ते श्रम त्या मनुष्यास सात्म्य होत.

आनूप, जांगल आणि साधारण असे कोणत्याही देशाचे तीन प्रकार होतात. त्यांत जो देश अधिक पाणथळ, उंच सखल असून ज्यांत नद्या पुष्कळ, पर्जन्य वृष्टि पुष्कळ, तसेंच ज्यांत कोमल आणि थंड वायु वाहात असतो, ज्यांत मोठे मोठे पुष्कळ पर्वत आणि वृक्ष असतात, ज्यांतील मनुष्यें लुसलुशीत, कोमल आणि पुष्ट शरीराचीं असतात, तसेंच जो कफजन्य व वातजन्य व्याधींचें निवासस्थान होय, त्या प्रदेशास अनूप असें ह्मटलें आहे. जेथील जमीन आकाशाप्रमाणें श्याम रंगाची असते, जेथें वृक्ष कोठें कोठें मात्र असून त्यास कांटे फार थोडे असतात, जेथें पर्जन्यवृष्टि थोडी असल्यामुळें विहिरी, तलाव यांच्या पाण्याचाच वापर असतो, जेथें उष्ण आणि भयंकर वायु वाहात असतो, ज्यांत कोठें कोठें लहान लहान टेपाडें मात्र आढळतात, जेथें मनुष्यें मजबूत आणि रोड शरीराचीं असतात आणि जेथें फार करून वात आणि पित्त यांच्या प्रकोपापासून उद्भवणारे रोग

होतात, तो देश जांगल असें म्हटलें आहे. जेथें वर लिहिलेल्या दोनही देशांची लक्षणें दिसतील त्या देशास साधारण असें म्हटलें आहे. साधारण देशास शीत, वृष्टि, ऊन आणि वायु हीं समसमान असतात आणि मनुष्याच्या शरीरांतील वातादिक दोषही समसमान असतात म्हणून अशा प्रदेशास साधारण म्हटलें आहे. पाण्यांत उत्पन्न झालेल्या जंतूला भुईवर आणलें असतां तो पूर्वीप्रमाणें बळकट वाढत नाहीं, त्याचप्रमाणें जो मनुष्य ज्या देशांत उत्पन्न झाला तेथून त्यास काढून दुसऱ्या देशांत नेलें असतां तोही बळहीन बनतो आणि त्याच्या शरीरांत दोष माजून कुपित होतात. म्हणून स्वदेशांतच देशकृत व्याधि मनुष्यांस बाधत नाहींत. याप्रमाणें सर्व प्रकारचा विचार करून जो वैद्य रोग्याची चिकित्सा करतो तोच त्यास मृत्यूच्या पाशांतून सोडवितो.'

**स्नेहन**—शोधन औषधें देण्यापूर्वीं स्नेहन आणि स्वेदन यांची जरूर आहे; कारण त्यांवांचून शोधन द्रव्य व्यर्थ होय. स्नेहन औषधें अनेक प्रकारचीं आहेत. त्यांत तूप, तेल, वसा ( चरबी ) आणि मज्जा ( हाडांतून निघणारा स्नेह ) हीं चार मुख्य होत. सर्व प्रकारच्या तेलामध्यें तिळाचें तेल फार चांगलें. एरंडेल रेचकांमध्यें उत्तम. वर सांगितलेल्या चार प्रकारच्या स्नेहन द्रव्यांमध्यें तूप हें उत्तम स्नेहन द्रव्य आहे. कारण कीं तूप वात आणि पित्त यांस हरतें, रस शुक्र आणि कांति यांस हितकर आहे, आणि शरीराला मृदु करणारें आहे. तेल कातडीला लुसलुशीत करतें. तें उष्ण आहे, स्थिर करणारें आहे, आणि योनिरोगाचें शोधन करणारें आहे. वसा ही विद्ध, भग्न, आहेत, आणि भ्रष्ट अशा योनिसंबंधी आणि कर्ण, व मस्तक यासंबंधीं रोग दूर करण्यांत व पुरुषत्वाची वृद्धि करण्यांत उपयोगी आहे. मज्जा ही बळ, शुक्र, रस आणि

श्लेष्मा यांस वाढविणारी आहे. ती विशेषेंकरून हाडांस बळ देणारी आहे. तूप स्नेहनासाठीं शरदृऋतूंत प्यावें. तेल वर्षाऋतूंत आणि वसा व मज्जा यांचा उपयोग वसंतऋतूंत करावा. प्रधान, मध्यम आणि ऱ्हस्व अशा स्नेहनाच्या तीन मात्रा आहेत. ज्यांस तूप फार खाण्याची संवय असेल, ज्यांस भूक तहान सहन करतां येतात. ज्यांचा जठराग्नि प्रबळ असेल, ज्यांस गुल्मरोग झाला असेल, ज्यांस भूक, तहान सहन करतां येतात, ज्यांचा जठराग्नि प्रबळ असेल, ज्यांस मूत्रकृच्छ्राचा रोग जडला असेल, तसेंच ज्यांस बद्धकोष्ठाचा रोग झाला असेल, त्यांनीं प्रधान ह्मणजे मोठ्या मात्रेचा उपयोग करावा. ज्यांस कोड झालें असेल, वातरक्ताचा रोग असेल, जे फार थोडें खाणारे असतील व ज्यांचा कोठा मृदु असेल, त्यांनीं स्नेहनाची मध्यम मात्रा घ्यावी. जे वृद्ध, बाळक अथवा नाजुक प्रकृतीचे असतील, ज्यांचा अग्नि मंद झाला असेल, ज्यांस ज्वर, अतिसार, अथवा कास हे रोग झाले असतील, त्यांनीं स्नेहनाची ऱ्हस्व ह्मणजे हलकी मात्रा घ्यावी. आतां ज्यांची प्रकृति वातपित्ताची असेल, ज्यांस वातपित्ताचा विकार झालेला असेल, ज्यांची इच्छा डोळ्यांचें तेज प्राप्त व्हावें अशी असेल, ज्यांस घाय लागलेले असतील, जे दुर्बळ, वृद्ध किंवा बाळक असतील, ज्यांस दीर्घायुष्याची इच्छा असेल, तसेंच बळ, रंग आणि चांगला स्वर यांची इच्छा असेल, ज्यांस कांतीची व इंद्रियांच्या बळाची इच्छा असेल, ज्यांची स्मृति आणि बुद्धि क्षीण झाली असेल, आणि ज्यांस शस्त्रापासून, विषापासून, अथवा अग्निपासून पीडा झाली असेल त्यांस स्नेहनामध्यें तूप प्यावयास द्यावें. ज्यांची वात प्रकृति असेल आणि जे वात व्याधीनें पीडले असतील, ज्यांचा श्लेष्मा आणि मेद वाढला असेल, ज्यांस बळाची, हलकेपणाची आणि दृढपणाची इच्छा असेल, ज्यांच्या पोटांत कृमि झाले

असतील आणि ज्यांचा कोठा कठिण असेल आणि ज्यास लिहिण्याचें काम जास्त पडत असेल, त्यांनीं थंड वेळीं स्नेहन ह्मणून तेल घ्यावें. ज्यांस वारा आणि ऊन हीं सोसावीं लागत असतील, जे प्रकृतीनें रूक्ष व ज्यांस ओझीं उचलण्याचें काम पडतें, त्याचप्रमाणें ज्यांस हमेश फिरावें लागत असेल, ज्यांचें वीर्य व रुधिर सुकून गेलें असेल, ज्यांच्या अस्थीच्या स्नायूंमध्यें, मर्मामध्यें आणि कोठ्यांमध्यें रोग असेल, ज्यांचें अग्निबळ फार असेल आणि ज्याला वसा सात्म्य असेल, अशा पुरुषानें स्नेहन करण्यामध्यें वसेचा उपयोग करावा. जे वात रोगानें पीडले असतील, ज्यांचें उदर कठिण असेल, ज्यांचा अग्नि प्रबळ असेल, आणि ज्यांस अनेक प्रकारचे क्लेश सहन करावे लागत असतील, त्यांनीं स्नेहनामध्यें मज्जेचा उपयोग करावा.. स्नेहनाचा उपयोग पिण्यामध्यें, अनुवासन बस्तीमध्यें, शिरोबस्तीमध्यें, उत्तर बस्तीमध्यें, नस्यामध्यें, कर्णपूरामध्यें, शरीराचा अभ्यंग करण्यामध्यें, आणि भोजनामध्यें करावा. ज्यांस अजीर्णाचा विकार असेल, उदराची विकृति असेल, ज्यांस ताप येत असेल, जे दुर्बळ, स्थूल आणि मूर्च्छेनें, मदानें, ओकारीनें व तृषेनें पीडले असतील, ज्यांस बस्ती देण्यांत आली असेल, तसेंच ज्यांकडून वमन किंवा विरेचन करविलें असेल, त्यांनीं स्नेहपान करूं नये. जी स्त्री अपुऱ्या दिवशीं प्रसूत झाली असेल तिलाही स्नेहपान निषिद्ध आहे. याप्रमाणें ज्यांनीं स्नेहपान करूं नये ह्मणून सांगितलें असेल त्यांजकडून तें करविलें असतां अनेक प्रकारचे रोग उत्पन्न होतात, आणि जे रोग अगोदरच आले असतील ते कृच्छ्रसाध्य होतात. ज्यांचें उदर मृदु असतें, त्यांजकडून तीन दिवस स्नेहन करवावें; आणि ज्यांचें उदर कठिण असेल, त्यांस सात दिवसपर्यंत स्नेहन करवावें; आणि तूप, तेल, वसा आणि मज्जा यांचें स्नेहन अनुक्रमें

तीन, चार, पांच आणि साहा दिवसपर्यंत करावें. सात दिवसांनीं स्नेहन अन्नाप्रमाणेंच सात्म्य होतें; ह्मणून सातव्या दिवसानंतर त्याचा गुण किंवा अवगुण कांहींच दिसत नाहीं. वर स्नेहनाच्या ज्या तीन मात्रा सांगितल्या त्यांत उत्तम मात्रा एका पळाची, मध्यम मात्रा तीन कर्षांची आणि हीन मात्रा दोन कर्षांची जाणावी. शीत काळामध्यें स्नेहनाचा उपयोग दिवसा करावा व उष्णकाळामध्यें रात्रीस करावा. तुपाचें स्नेहन केल्यावर ऊन पाणी प्यावें; तेलाचें स्नेहन केल्यावर यूष ( डाळीचें सार ) प्यावें आणि वसा व मज्जा यांचें स्नेहन केल्यावर मंड प्यावा. स्नेहनाचा ज्यास कंटाळा असेल त्यांना, मुलांना, वृद्धांना, नाजुक व रोड मनुष्यांना आणि तृषाक्रांताला स्नेहन करविण्याचें असेल तर त्यांस तें भाताबरोबर द्यावें. अत्यंत स्नेहन केल्यानें, अथवा स्नेहन प्याल्यानंतर कसरत केल्यानें, स्नेहन जर न पचलें तर ऊन पाणी प्यावयास देऊन वांति करवावी. स्नेहन प्याल्यावर अजीर्णाची शंका आली तर ऊन पाणी प्यावयास द्यावें. स्नेह प्याल्यावर वायु एकसारखा वाहूं लागला, अग्नि प्रदीप्त झाला, मळ स्निग्ध आणि नरम झाला आणि शरीर मृदु व ग्लानिरहित झालें, तर स्नेहन मानवलें असें जाणावें. परंतु स्नेहन केल्यावर अन्नावर अरुचि झाली, तोंडांतून लाळ गळूं लागली, उदरांत दाह होऊं लागला, रेच होऊं लागले, शरीर पिंवळें पडलें आणि सुस्ती आली, तर स्नेहनाचा अतियोग झाला असें समजावें. स्नेहन केल्यावर कसरत, अति शीत पदार्थ सेवन, मळमूत्रादिकांच्या वेगाचा अवरोध, जागरण, दिवसा निद्रा, कफकारक पदार्थ आणि रुक्ष अन्न यांचा त्याग करावा.

**स्वेदन**—स्नेहन करविल्यानंतर स्वेदन क्रिया करविण्याची जरूर आहे. स्वेद ह्मणजे घाम. तो आणण्याचे चार प्रकार आहेत. वाळु इत्यादिकांची पुरचुंडी बांधून ती ऊनऊन करून शेकविल्यानें

आंगांतून घाम काढणें ही एक रीत. हीच्या योगें श्लेष्मा नाहींसा होतो. कोणत्या तरी पदार्थाचा काढा करून त्याचा वाफारा देऊन घाम आणणें ही दुसरी रीत. हिनेंही कफाचा नाश होतो. ज्या मार्गी रोग झाला असेल त्यावर कांहींतरी बांधून घाम आणणें ही तिसरी रीत. हिनें वाताचा उपशम होतो. प्रवाही पदार्थांची योजना करून घाम आणणें ही चौथी रीत, व ती वातपित्ताचा उपशम करणारी आहे. ह्या चारी रीतींना अनुक्रमें ताप, उष्ण, उपनाह आणि द्रव अशीं चार नावें वैद्यशास्त्र जाणणाऱ्यांनीं दिलीं आहेत. यथायोग्य स्नेहन करविल्यावर स्वेदन करविलें असतां मनुष्याला मूत्रपुरीष बाधत नाहींत. शुष्क लाकडालाही स्नेहन व स्वेदन, करविल्यानें तें सुद्धां कोमल होतें. मग जिवंत मनुष्याला शास्त्र रीतीप्रमाणें ह्या क्रिया झाल्यावर तो रोगरहित होईल ह्यांत काय नवल? ज्या पुरुषास व्याधि झाली असेल, तो पुरुष बळवान, अथवा त्याचा व्याधि बळवान असेल तर थंडीच्या ऋतूंत त्याच्या आंगांतून सपाटून घाम काढवावा. तसेंच तो जर मध्यम असेल तर मध्यम प्रमाणानें घाम काढवावा. ज्या पुरुषास नस्य देण्याची जरूर असेल, ज्याला बस्तीचा उपयोग करणें जरूर असेल, तसेंच ज्याला शोधन औषध देण्याची जरूर असेल, त्याला पहिल्यानें स्वेदन करविण्याची अत्यंत जरूर आहे. वर लिहिलेल्या स्वेदनाच्या चारींपैकीं कोणतीही क्रिया करणें ती खाल्लेलें अन्न पचल्यानंतर व जेथें वारा थंडी नाहीं अशा ठिकाणीं नेऊन करवावी. स्नेहन करविल्यानें जो दोष रसादिक सात धातुगत आहे, तो त्यांतून निघून उदरांत जाऊन पातळ होऊन गुदद्वारा बाहेर निघतो. स्वेदन केल्यावर पित्ताचा प्रकोप झाला, मूर्छा आली, शरीरांत पीडा होऊं लागली दाह जाणवूं लागला, आणि आंगाच्या ज्या भागावर स्वेदनक्रिया झाली असेल तो भाग रोड आणि दुर्बळ झाला ह्मणजे अतिस्वेदन झालें

आहे असें समजावें. या प्रमाणें अतिस्वेदन झाल्याचीं चिन्हें दिसून येतील तर ग्रीष्म ऋतूंत उष्णता दूर करण्यासाठीं जे उपचार करण्यांत येतात ते करावे. ज्याला मद्य पिण्याची संवय असेल त्याला, गर्भिणी स्त्रीला, रक्तपित्ताच्या रोग्याला, पित्ताच्या विकृतीच्या रोग्याला, अतिसार झालेल्याला, ज्यास मधु प्रमेह व पित्त प्रमेह झाला असेल त्याला, थकलेल्याला, ज्याची शुद्धि नाहींशी झाली त्याला, तृषाक्रांताला, भुकेलेल्याला क्रोधाविष्टाला (म्हणजे ज्या वेळीं क्रोध आला असेल त्या वेळीं), ज्याला कामला रोग झाला असेल त्याला, उदररोग्याला, उरःक्षत रोग झाला असेल त्याला, दुर्बळाला, आणि ज्याची कांति हीन झाली त्याला—या सर्व रोग्यांस स्वेदन करवूं नये. थंडी, खोकला, उचकी, श्वास, कर्णशूळ, डोकें दुखणें, स्वरभेद, गलग्रह, अर्दित, एकांग पक्षघात किंवा सर्वांग पक्षघात, पोट फुगणें, मूत्रकृच्छ्र आणि सर्वांग विकार इत्यादि रोगांवर स्वेदन करविण्याची जरूर आहे. घाम येऊन गेल्यावर अंगाला तेल चोळून ऊन पाण्यानें स्नान करवावें, हलकें अन्न खावयास द्यावें, आणि कसरत करवूं नये.

**वमन**—शरद, वसंत आणि वर्षा ह्या ऋतूंमध्यें सुज्ञ वैद्यानें मनुष्यांस वमन करवावें. त्यांतहा जो मनुष्य बळवान त्याला, कफाचा प्रकोप झाला आहे असा, धैर्यवान, ज्याला वमन मानवत होतें असा, ज्याला ओकाऱ्या येत असून वमन होत नाहीं असा—या सर्वांस बहुतकरून वमन करवावें.

**विष दोष**—स्त्रियांच्या अंगावरच्या दुधाचा रोग, जठराग्नीची मंदता, श्लीपद, अर्बुद, हृद्रोग, कुष्ठ, विसर्प, अजीर्ण, भ्रम, विदारिका, अपची, कास, श्वास, पीनस, अंडवृद्धि, अपस्मार, ज्वर, उन्माद, रक्तातिसार, नासापाक, तालुपाक, ओष्ठपाक, कर्णस्राव, द्विजिव्हक, गलशुंडी, अतिसार, पित्तरोग, श्लेष्मरोग, मेदोरोग आणि अरुचि

यांमध्यें रोग्याकडून वमन करवावें. त्यांतही तिमिररोगी, गुल्मरोगी उदररोगी, रोडका, अतिवृद्धि, गर्भिणी, स्थूल, क्षतानें पीडलेला, मदात्ययरोगी, बालक, रूक्ष, भुकेला, ज्याला निरूहबस्ति दिला आहे असा, उदावर्त रोगी, ऊर्ध्वरक्तवाही ( रक्तपित्ताच्या प्रकोपानें मुखमार्गें रक्त पडत आहे असा ), अतिशय ओकारीनें पीडलेला, केवळ वायुरोगी, पांडुरोगी, कृमिरोगी आणि अत्यंत उंच स्वरानें अभ्यास वगैरे केल्यामुळें ज्याचा स्वर बसून गेला आहे असा–यांस वमन करविणें योग्य नाहीं. अजीर्णानें अथवा विषदोषानें पीडलेल्यांस आणि कफानें व्यापलेल्यांस ज्येष्ठमधीचा काढा देऊन वमन करवावें परंतु ज्यांची प्रकृति कोमल आहे अशांस आणि जे रोड, वृद्ध, बाळक आणि भित्रे आहेत त्यांस वमन कधींच करवूं नये.

ज्यांस वमन करवावयाचें असेल त्यांस पहिल्यानें स्नेहनविधि व स्वेदनविधि करवून, असात्म्य, व श्लेष्मल पदार्थ खाऊं घालून व दोष कुपित करून, नंतर आकंठ, कांजी, दूध,ताक अथवा दहीं प्यावयास द्यावें. ह्मणजे वमन करविणारीं औषधें चांगलीं लागू पडतात. वमन-द्रव्यांमध्यें सैंधव आणि मध यांचा योग सर्वोत्तम आहे. वमनद्रव्य चिळस आणणारें असेल तर तें चालेल; परंतु विरेचन औषध मात्र दिसण्यांत चांगलें असेंच असावें. एक कुडव, वमन-द्रव्य एक आढक पाण्यामध्यें उकळून अर्धें राहिल्यावर ओकारी करवावयाची असेल त्या रोग्यास प्यावयास द्यावें. काढा प्यावयास देऊन वमन करविणें असेल तर त्याचें प्रमाण मोठें ह्मटलें तर नऊ प्रस्थ, मध्यम साहा प्रस्थ आणि लहान तीन प्रस्थ जाणावें. कल्क, चूर्ण आणि अवलेह हीं द्यावयाचीं असतील तर त्यांचें प्रमाण मोठें तीन पळांचें, मध्यम दोन पळांचें आणि लहान एक पळाचें समजावें. पित्त पडे तोंपर्यंत आठ ओकाऱ्या झाल्या तर उत्तम, साहा ओकाऱ्या झाल्यातर मध्यम,

व चार ओकाऱ्या झाल्यातर कनिष्ठ वेग जाणावा. वमन, विरेचन, आणि रुधिरमोक्ष या क्रियांमध्यें साडे तेरा पळांचा एक प्रस्थ धरावा. कफप्रधान पुरुषाला वमनाचें औषध तीक्ष्ण पदार्थांशीं मिळवून द्यावें, पित्तप्रधान पुरुषाला मधुर आणि शीतवीर्य पदार्थांशीं मिळवून द्यावें, आणि वातयुक्त कफविकार ज्याला असेल त्याला स्वादु, लवण, अम्ल आणि उष्ण वीर्य पदार्थांबरोबर मिळवून द्यावें. कफ विकारामध्यें पिंपळीबरोबर सैंधवाचें चूर्ण मिळवून ऊन पाण्याबरोबर द्यावें, पित्त विकारांत कडु दोडकी, अडुळसा आणि कडुलिंब यांचें चूर्ण थंड पाण्याबरोबर द्यावें,कफयुक्त वातरोगामध्यें मदनफळाचें चूर्ण दुधाबरोबर द्यावें, अजीर्ण झालें असतां सैंधव ऊन पाण्यामध्यें खाऊन ओकारी काढवावी. वमनद्रव्य दिल्यावर रोग्यास गुडघ्या इतक्या उंचीवर बैठकीवर बसवून एरंडाच्या पानाचें देंठ घशांत घालून त्याजकडून वैद्यानें ओकारी काढवावी आणि ओकारी येते वेळीं कपाळ आणि दोन्ही कुशी हीं हळुहळु चोळावीं. चांगली सडसडून उलटी न झाली तर रोग्याच्या शरीरांत प्रसेक (तोंडांत चूळ सुटणें), हृदयांत दाबल्यासारखें वाटणें, अंगावर गांधी उठणें, व कंडु उत्पन्न होणें इत्यादि विकार होतात. ओकाऱ्या वाजवीपेक्षां फाजील झाल्या तर तहान, उचकी, ढेंकर इत्यादिकांनीं पीडा उत्पन्न होणें, बेशुद्ध अवस्था होणें, तोंडांतून जीभ बाहेर निघून येणें, डोळे खोल जाणें, व जबडे भारयुक्त होणें, रक्त पडणें किंवा रक्ताची ओकारी येणें, आणि घशांत खवखवणें इत्यादि विकार होतात. वमनाचा अतियोग झाला असतां त्याच्या शांतीकरितां हलकेंसें रेचक द्यावें. ओकारी होतां होतां जीभ खोल गेली असेल तर ती ठिकाणावर येण्यासाठीं तोंडांत स्निग्ध, अम्ल, लवण, हृद्य, घृत, क्षीर आणि मांसरस यांचा घोट धरावा, आणि हा घोट धरण्यापूर्वीं

एखादें आंबट फळ खावयास द्यावें. ओकारीमुळें बाहेर निघून पड-लेल्या जिभेवर तीळ आणि द्राक्षें यांच्या कल्काचा लेप करून आंत बसवावी. बाहेर निघालेल्या डोळ्यांवर तूप लावून हलक्या हातानें ठिकाणावर बसवून चेपीत रहावें. शरीर जाडें व भारयुक्त झालें असेल तर स्वेद आणणाऱ्या आणि वातकफाला हरणाऱ्या औषधाचे थेंब नाकांत घालावे. रक्ताची ओकारी होत असेल तर रक्तपित्ताच्या प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें उपाय करावे. आंवळकटी, रसवंती, वाळा, भाताच्या लाह्या, आणि चंदनाचें पाणी यांचा मंथ, घृत मध आणि शर्करा हीं घालून प्यावयास दिला असतां तृष्णा इत्यादि विकार जे वमनाच्या अतियोगानें उत्पन्न झाले असतील ते दूर होतात. जर मोठी उलटी होईल, तर हृदय, कंठ, आणि मस्तक यांची शुद्धि, जठराग्नि प्रदीप्त होणें, शरीर हलकें वाटणें, आणि कफाच्या व पित्ताच्या प्रकोपाचा नाश होणें वगैरे प्रकार होतात. चांगलीशी उलटी होऊन जठराग्नि प्रदीप्त झाल्यावर तिसरे प्रहरीं मूग, राते तांदूळ अथवा साळीचे तांदूळ अथवा आवडेल तो मांसरस ह्यांचा आहार करावा. जर ओकारी चांगली झाली असेल तर तंद्रा, निद्रा, तोंडाचा दुर्गंध, कंड सुटणें, ग्रहणीरोग आणि विषदोष यांच्या पीडा होत नाहींत. ओकारी झाल्यानंतर एक दिवस शहाण्या मनुष्यानें अजीर्ण, शीतळ पाणी पिणें, कसरत, मैथुन, शरीराला तेलाचें मर्दन करणें आणि क्रोध इत्यादि क्रियांचा त्याग करावा.

**विरेचन**—वमन करविण्याचा जो काळ वर सांगितला आहे तोच विरेचनाचाही समजावा. वर सांगितल्याप्रमाणें स्नेहन आणि स्वेदन हे विधि केल्यावर विरेचन द्यावें. पित्त विकार, आमवायु, उदर, आध्मान वायु, आणि बद्धकोष्ठ या विकारांवर विशेषतः विरेचन द्यावें. लंघन आणि पाचन या उपायांनीं दोषाची शांति झाली

असतांही वेळानुसार ते दोष पुनः कोपतात; परंतु विरेचनानें त्यांची शुद्धि झाली असतां ते पुन्हा प्रगट होत नाहींत. जीर्णज्वर, वातरक्त, भगंदर, अर्श, पांडुरोग, उदररोग, ग्रंथि, हृद्रोग, अरोचक, प्रमेह, योनिरोग, गुल्मरोग, प्लीहा, व्रण, विद्रधि, ओकारी, विस्फोटक, विषूचि, कुष्ट, कर्ण रोग, नाना रोग, मस्तक रोग, मुखरोग, गुदा रोग, शिश्न रोग, उपदंशादिक रोग, यकृत, मूत्र, नेत्र रोग, कृमि रोग, वात रोग, शूळ, आणि विषरोग यांनीं पीडलेल्या रोग्यांस विरेचन हटकून द्यावें. बाळ, वृद्ध, क्षीण, भ्यालेला, थकलेला, तृषाक्रांत, स्थूल, गर्भिणी स्त्री, ज्याला नुकताच ताप आला आहे असा, नुकतीच प्रसूत झालेली स्त्री, ज्याचा अग्नि मंद झाला आहे असा आणि ज्याला मदात्यय रोग झाला आहे असा--इतक्या मनुष्यांस विरेचन देऊं नये. मृदु, मध्यम आणि तीक्ष्ण असे विरेचनाचे तीन भेद आहेत. ज्याची प्रकृति फार पित्तल आहे, त्याला मृदु विरेचन द्यावें. ज्याची प्रकृति फार श्लेष्मल आहे त्यास मध्यम आणि ज्याची प्रकृति फार वातुला आहे त्यास तीक्ष्ण रेचक द्यावें. विरेचनानें रोग्यास तीस वेळ शौचास झालें तर तें तीक्ष्ण प्रमाण समजावें; वीस वेळ झालें तर मध्यम; आणि दहा वेळ झालें तर तें मृदु प्रमाण जाणावें. जर मृदु मात्रा (ह्म० औषध घेण्याचें प्रमाण) देणें असेल तर द्राक्षा, दूध आणि एरंडेल यांचा जुलाब द्यावा. मध्यम मात्रा देणें असेल तर निशोत्तर, कटुकी आणि बहाव्याचा मगज हीं विरेचनामध्यें द्यावीं. आणि तीक्ष्ण मात्रा देणें. तर काळ्या शेराच्या चीक, जेपाळ व पिसोळा यांचे रेचक द्यावें. विरेचन द्रव्यांचा काढा करून जुलाब द्यावयाचा असेल तर दोन पळ प्रमाणानें दिला असतां उत्तम रेच होतात, एक पळ प्रमाणानें मध्यम, अर्धा पळ प्रमाणानें मृदु होतात. विरेचन द्रव्याचा कल्क, मोदक आणि चूर्ण या रूपानें देणें असेल तर मध आणि तूप ह्यांच्या बरोबर एक

कर्ष अथवा एक पळ पर्यंतही देण्यास हरकत नाहीं. • रेचक लागू पडल्यावर मूग व तांदुळाची खिचडी तुपाबरोबर खावी आणि थंड पाणी, तेल, मर्दन, परिश्रम आणि मैथुन यांचा त्याग करावा.

**बस्ति**—अनुवासन आणि निरूह असे बस्तीचे दोन भेद आहेत. त्यांत केवळ स्नेहन द्रव्याचा जो बस्ति देतात त्यास अनुवासन बस्ति म्हणतात; आणि काढा, दूध व तेल मिळून त्यांची जी पिचकारी गुदस्थानांत मारतात तिला निरूह बस्ति म्हणतात. यांत प्रथम निरूह बस्ति दिल्यावर जो बस्ति देतात त्याला उत्तर बस्ति म्हणतात. याशिवाय मात्रा बस्ति म्हणून एक बस्ति आहे तो अनुवासन बस्तीचाच एक भेद आहे. अशा प्रकारें बस्तीचे एकंदर चार भेद होतात. यांत मात्रा बस्तीच्या द्रव्याचें प्रमाण दोन किंवा एक पळ जाणावें. जो रोगी रूक्ष, तीक्ष्ण, प्रखर जठराग्नीचा आणि केवळ वातप्रकोपी असेल त्याला अनुवासन बस्ति देणें योग्य आहे. कोडी प्रमेही, स्थूल व उदररोगानें पीडित अशाला अनुवासन बस्ति देणें योग्य नाहीं. तसेंच अजीर्ण, उन्माद, तृष्णा रोग, शोथ, मूर्छा, अरुचि, श्वास, कास आणि क्षय यांनीं पीडिलेल्या रोग्याला अनुवासन बस्ति देऊं नये; तर आस्थापन ( निरूह ) बस्ति द्यावा. जर उत्तम रीतीनें बस्ति दिला असेल तर शरीराला पुष्टि, चांगला रंग, बळ, आरोग्य आणि आयुष्याची वृद्धि यांची प्राप्ति होईल. वसंत ऋतूंत मध्याकाळीं अनुवासन बस्ति द्यावा. आणि ग्रीष्म, वर्षा व शरत्काळ यांत रात्रीस अनुवासन बस्ति द्यावा. फार तूप घातलेलें अन्न खावयास देऊन अनुवासन बस्ति देऊं नये. कारणकीं दोहों द्वारांनीं एकाच दिवशीं शरीरांत घेतलेला स्नेह मदास व मूर्च्छेस उत्पन्न करितो. तसेंच अत्यंत रूक्ष अन्न खाल्ल्यावर दिलेला बस्ति रोग्याच्या बळाची आणि वर्णाची हानि करतो. लहान प्रमाणानें दिलेले अनुवासन व निरूह

बस्ति जसें पाहिजे तसें कार्य करूं शकत नाहींत आणि अधिक प्रमाणानें दिलेल्या वस्तु, पोटफुगी, आलस्य आणि अतिसार यांस उत्पन्न करितात. यासाठीं समान प्रमाणाचा नेहमीं उपयोग करावा. याप्रमाणें अनुवासन बस्तीचीं तीन प्रमाणें आहेत. उत्तम बळवान मनुष्याला साहा पळांचें प्रमाण, मध्यम बळाच्या मनुष्याला तीन पळांचें आणि हीन बळाच्या मनुष्याला दीड पळाचें प्रमाण सांगितलें आहे. स्नेहामध्यें शतावरी व सैंधव यांचें चूर्ण मिळवून, तें मिश्रण उत्तम मध्यम आणि हीन बळाच्या मनुष्यांस अनुक्रमें साहा, चार आणि दोन मासे द्यावें. रेचक घेऊन सात दिवस झाले असतील, शरीरांत बळ आलें असेल, आणि जर रोगी अनुवासन बस्तीला योग्य असेल, तर त्याला जेवूं घालून मग अनुवासन बस्ति द्यावा. ज्याला अनुवासन बस्ति द्यावयाचा त्याच्या शरीराला तेलाचें मर्दन करावें, ऊन पाण्याची आंघोळ घालावी, वैद्यशास्त्रांत सांगितल्याप्रमाणें अन्न खाऊं घालावें आणि जेवल्यावर खूप हालचाल करवावी. याप्रमाणें करून शौचास व मुतावयास साफ होऊन अधोवायु उतरल्यावर रोग्यास स्नेह बस्ति द्यावा. याचा प्रकार असा आहे कीं ज्याला बस्ति द्यावयाचा असेल त्याला डाव्या कुशीवर निजवावा, डावा पाय लांब करवावा, उजवा पाय मोडून पोटाशीं द्यावा, गुदद्वाराला तेल लावून बस्तिशस्त्राचें तोंड आंत शिरवावें, मग बस्तिशस्त्राचें तोंड दोऱ्यांनीं बांधून डाव्या हातांत तें धरून ठेवून उजव्या हातानें हळुहळू दाबावें. या वेळीं ज्याला बस्ति द्यावयाचा त्याला ढेंकर, खोकला, अथवा शिंक घेऊं देऊं नये. तीस चुटक्या वाजत तोंपर्यंत बस्ति यंत्र दाबीत राहावें. अशा प्रकारें स्नेह शरीरांत प्रविष्ट झाल्यावर त्यास सरळ निजवावें आणि शंभर चुटक्या वाजत तोंपर्यंत हालूं चालूं देऊं नये. मग हात पाय लांब करून निजविलेल्या त्या मनुष्याच्या तळहातावर तीन वेळ हळुहळू

मुक्या द्याव्या. त्यानंतर पोटरीच्यामध्यें तीन वेळ तसेंच करावें आणि कटिपश्चात् भागींही ताडन करावें. अशा प्रकारें बस्ति देण्याचें काम संपल्यावर रोग्यास सुखानें निद्रा घेऊं द्यावी. बस्ति दिल्यावर वारा सरणें व शौचास होणें यासहित गुदद्वारानें स्नेह बाहेर पडला तर अनुवासन बस्ति उत्तम लागू पडला असें जाणावें. याप्रमाणें स्नेह पडून गेल्यावर भूक लागली ह्मणजे तिसरे प्रहरीं रोग्याला हलकेंसें अन्न खाऊं घालावें. अनुवासन बस्ति दिलेल्या मनुष्याला दुसरे दिवशीं जरासें ऊन पाणी प्यावयास द्यावें अथवा धणे व सुंठीचा काढा स्नेहाच्या पीडेचा प्रतीकार करण्यासाठीं द्यावा. अशा प्रकारें साहा सात अथवा नऊ वेळां बस्ति द्यावा. अनुवासन बस्तिनंतर निरूह बस्ति देण्याविषयीं सांगितलें आहे. पहिला बस्ति बस्तिस्थानाला व पाठणाला स्निग्ध करतो. दुसऱ्या वेळचा बस्ति मस्तकांतील वायूला हरतो. तिसऱ्या वेळचा बस्ति बळ आणि कांति देतो. चौथ्या आणि पांचव्या वेळचा बस्ति क्रमानें रस, धातु, आणि रुधिर यांस सुधारतो. साहावा बस्ति मांस आणि सातवा मेद यांस स्निग्ध करतो. आठवा आणि नववा अनुक्रमें मज्जेला आणि शुक्राला सुधारतो. हा नववा बस्ति दुप्पट ह्मणजे अठरा वेळ दिला असतां मनुष्याच्या शुक्रगत सर्व दोषांस दूर करतो. छत्तीस वेळा दिला असतां हत्ती किंवा घोडा काखेंत घालून उडी मारण्या इतका पराक्रम आणि देवतासदृश कांति देणारा आहे असें समजावें. रूक्ष शरीराच्या व वातानें पीडलेल्या मनुष्याला नेहमी स्नेहनाचा बस्ति द्यावा आणि याच्या उलट प्रकृतीच्या मनुष्याला निरूह बस्ति द्यावा. त्यानें त्याच्या पीडा दूर होतील. रूक्ष मनुष्याला अल्प प्रमाणानें दिलेला स्नेह बस्ति जसा पुष्कळ दिवसपर्यंत सुखदायक होतो त्याचप्रमाणें स्निग्ध मनुष्याला अल्प प्रमाणानें दिलेला निरूह बस्तिही चांगला ह्मणून सांगितला

आहे. बस्ति दिल्यावर केवळ स्नेह तत्काळ बाहेर पडला तर दुसरा निरूह बस्ति द्यावा. वमनविरेचनादिकांनीं शरीराची शुद्धि केल्या-शिवाय दिलेल्या बस्तीचा स्नेह मळासहित बाहेर न आला तर शरीरांत शिथिलपण, पोट फुगणें, श्वास, शूळ, आणि पक्काशयांत जडपणा वाटतो. असे विकार वाटतांच तीक्ष्ण निरूह बस्ति द्यावा आणि तीक्ष्ण द्रव्यानें युक्त फलवर्तिकेचा प्रवेश गुदद्वारा करावा. नंतर असें तीक्ष्ण रेचक द्यावें कीं तेणेंकरून वायूचें अनुलोमन होईल आणि स्नेह व मळ बाहेर येईल. या विकारावर तीक्ष्ण नस्य द्यावें असेंही सांगितलें आहे. अनुवासन बस्तीचा स्नेह उदरांत राहून गेला तरी ज्या रूक्ष मनुष्याला चालेल त्याला अन्योपाय करून तो पाडण्याची आवश्यकता नाहीं. रात्र आणि दिवस निघून गेलें असतांही जर मळासहित स्नेह पडला नाहीं आणि विकार वाटूं लागला तर विरेचन द्यावें. परंतु दुसऱ्यांदा स्नेहबस्ति देऊं नये. गुळवेल, एरंडेल, पूतिक (एक प्रकारचा करंज वृक्ष) भारंग, अडुळसा, रोहिष, शतावरी, काटाशेरि आणि गुंज हे सर्व पदार्थ एकेक पळ प्रमाण घेऊन, यव, उडीद, अतसी, बोर आणि कुळीथ हीं आठ आठ रुपये भार घ्यावीं आणि हे सर्व पदार्थ चार द्रोण पाण्यांत कढवून एक द्रोण शेष राहिल्यावर त्यांत एक आढक तेलांत जीवनीय गणांत सांगितलेलीं औषधें वांटून तीं घालावीं. मग त्याचा अनुवासन बस्ति द्यावा. या योगानें सर्व प्रकारचे वातरोग दूर होतात. योग्य प्रकारें बस्ति लागू न झाला तर शहात्तर प्रकारचे विकार उत्पन्न होतात. वर सांगितलेल्या बस्तींतही खाण्यापिण्यासंबंधे पूर्वी सांगितलेल्या बस्तीचा विधि पाळावा.

निरनिराळ्या कारणांमुळें निरूह बस्तीचे अनेक भेद होतात व या भेदांवरून ऋषींनीं त्यांस निरनिराळीं नांवें दिलीं आहेत. निरूह बस्तीचें "आस्थापन बस्ति" असें नांव पडण्याचें कारण असें कीं

बिघडलेल्या सर्व धातूला ताळ्यावर आणून तो आपआपल्या ठिकाणीं स्थापन करतो. निरूह बस्तीचें प्रमाण सव्वा प्रस्थ ह्मणून सांगितलें आहे. मध्यम प्रमाण ह्मणजे एक प्रस्थ आणि तीन कुडव हें अगदीं हीन प्रमाण ह्मटलें आहे. अत्यंत स्निग्ध, उरःक्षत रोगी, उपटलेल्या दोषांनीं युक्त, रोड, ज्याचें पोट फुगतें, ज्याला ओकाऱ्या होतात, ज्याला उचकी लागते, ज्याला अर्श पीडा करीत आहे, कास व श्वास यांनीं जो घेरला आहे, ज्याचें गुदस्थान सुजलें आहे, जो अतिसार रोगी, ज्याला विषूचिका व कुष्ट रोग जडला आहे, तसेंच गर्भिणी स्त्री, मधुमेहाचा रोगी आणि जलोदररोगी या सर्वांस आस्थापन बस्ति देणें योग्य नाहीं. वातव्याधि, उदावर्त, वातरक्त, विषम ज्वर, मूर्च्छा, तृष्णा, उदर, आनाह, मूत्रकृच्छ्र, मुतखडा, फार दिवसांचा रक्त प्रदर, जठराग्नीची मंदता, प्रमेह, शूल, अम्लपित्त, आणि हृद्रोग इत्यादि विकार ज्यांस आहेत त्यांस निरूह बस्ति द्यावा.

शौचास जाऊन आल्यावर स्नेहविधि व स्वेदविधि करवून अनशेपोटीं मनुष्याला दुपारीं प्रहरामध्यें अनुवासन बस्तीप्रमाणेंच निरूह बस्ति द्यावा. निरूह बस्ति दिल्यावर बस्ति घेणाराला उभ्या पायांनीं बसलें ठेवावें. दोन घटका बसविल्यावरही बस्ति बाहेर आला नाहीं तर रोग्याला विरेचन द्यावें अथवा क्षार, गोमूत्र, अम्ल आणि सैंधव एकत्र करून त्यांचा फिरून निरूह बस्ति द्यावा. ह्मणजे पहिल्या बस्तीचें द्रव्य मळासहित बाहेर पडेल. निरूह बस्ति दिल्यावर क्रमें करून विष्ठा, पित्त, कफ आणि वायु बाहेर पडला आणि शरीर हलकें वाटूं लागलें ह्मणजे बस्ति उत्तम लागू पडला असें समजावें. ज्याला दिलेल्या बस्तीनें थोडथोडा वेग आला आणि मळ व वायुही थोडथोडाच बाहेर येऊं लागला, तसेंच मूत्राची पीडा, जडपणा आणि अरुचि हीं भासूं लागलीं तर दिलेला बस्ति बरोबर दिला गेला नाहीं

असें समजावें. आस्थापन बस्ति व स्नेहबस्ति जर बरोबर लागू पडेल तर शरीर हलकें होतें, मन प्रसन्न होतें, व व्याधीचा नाश होतो. या अनुवासन आणि आस्थापन बस्तीच्या प्रमाणेंच निरूह बस्तीचीही इतिकर्तव्यता समजावी. दोन वेळां, तीन वेळां, चार वेळां, निरूह बस्ति, दोषांचें मान पाहून, द्यावा. तो असाः–वायूच्या प्रकोपावर स्नेहसहित एक द्यावा; पित्ताच्या प्रकोपावर दुधासहित दोन; व कफप्रकोपावर कषाय, कटु व रूक्ष द्रव्यांच्या रसाच्या क्रमानें रसाला जरा ऊन करून तीन बस्ति द्यावे पित्त, कफ, आणि वायु यांच्या रोग्याला क्रमेंकरून, क्षीर, यूष ( मुगाच्या पाण्याचें सार ) आणि मांसरस यांचा निरूह बस्ति द्यावा. आणि नंतर अनुवासन बस्ति द्यावा. कोमळ प्रकृतीच्या व वृद्ध मनुष्याला व बाळकाला मृदु बस्ति द्यावा. कारण तीक्ष्ण बस्ति त्याच्या बळाचा व आयुष्याचा क्षय करतो. प्रथम आंत असलेल्या दोषांस उसकटून काढतील अशा द्रव्यांचा बस्ति द्यावा. मध्याला दोषहारक द्रव्यांचा बस्ति द्यावा, आणि त्यामागून दोषाचें शमन करणाऱ्या द्रव्यांचा बस्ति द्यावा. एरंडाच्या बिया, ज्येष्ठमध, पिंपळी, सैंधलोण, वेखंड आणि पलाश बीज यांच्या कल्काचा बस्ति दोषांना उसकटणारा आहे. शतावरी, ज्येष्ठमध, बेलफळ, इंद्रजव, कांजी व गोमूत्र यांचा बस्ति दोषाला हरणारा आहे. शोधन द्रव्यांचा क्काथ तसेंच त्यांचें चूर्ण, स्नेह व सैंधव इतके पदार्थ एकत्र करून दिलेला बस्ति तो शोधन बस्ति ह्मणतात. गवलाकाचरी, ज्येष्ठमध, मोथा, रसांजन, व क्षीर यांचा बस्ति दिल्यानें दोषाचें शमन होतें; ह्मणून त्याला शमनबस्ति ह्मणून ह्मटलें आहे. त्रिफळा ( ह्म० हरडा, बेहडा व आंवळकटी ) यांचा काढा, गोमूत्र, मध व क्षार यांनीं संयुक्त उषकादि गणाचें चूर्ण घालून दिलेला बस्ति दोषाचें लेखन करतो ह्म० त्याला

खोदतो. पुष्टिदायक पदार्थांचा काथ आणि मधुर द्रव्याचें चूर्ण तुपाशीं आणि मांसरसाशीं एकत्र करून त्याचा बस्ति दिला असतां तो शरीराला पुष्टि देणारा आहे. बोर, नारिंगी, शेलु, सावरी, धमासा, आणि सुंठ हे सर्व पदार्थ दुधांत उकळून त्यांत मध, तसेंच बकऱ्याचें, व मेंढराचें व हरिणीचें रक्त घालून त्याचा बस्ति दिला असतां त्यास पिच्छिल बस्ति असें ह्मणतात. याचें प्रमाण बारा पळ आहे. एकअक्ष (.ह्म० एक रुपयाभार) सैंधव, दोन प्रसृति मध, तीन प्रसृति स्नेह आणि ज्या रोगाची निवृत्ति अमुक औषध करील, त्या औषधाचें चूर्ण एक प्रसृति हे सर्व पदार्थ एकत्र करतून चार प्रसृति उरले ह्मणजे त्याचा निरूह बस्ति द्यावा. वातप्रधान रोगामध्यें चार पळ मध, साहा पळ स्नेह, पित्तप्रधान रोगांमध्यें चार पळ मध आणि तीन पळ स्नेह, आणि कफप्रधान रोगामध्यें साहा पळ मध, चार पळ स्नेह, बस्तीच्या द्रव्यामध्यें घालावा. आठ पळ एरंडाच्या मुळाचा काथ चार पळ मध, चार पळ तेल, अर्धा पळ शतपुष्प आणि अर्धे पळ सैंदेलोण, हे सर्व पदार्थ एकत्र करून त्याचा बस्ति दिला असतां तो मधुतैलक या नांवानें प्रसिद्ध आहे. या बस्तीनें मेद, गुल्म, कृमि, प्लीहा, मळ, उदावर्त या रोगांचा नाश होतो आणि बळ व कांति हीं प्राप्त होतात. शुक्र वाढतें, शरीराची पुष्टि प्राप्त होते आणि जठराग्नि प्रदीप्त होतो. मध, तूप, दूध आणि तेल हे सर्व पदार्थ एक प्रसृति, तसेंच पळस आणि सैंधेलोण एकेक अक्ष घेऊन, एकत्र करून बस्ति दिला असतां, तो अग्नि दीपन करतो. एरंडमुळाचा काढा, मध, तेल, सैंधेलोण, वेखंड, पिंपळी जायफळ हे सर्व पदार्थ एकत्र करून दिलल्या बस्तीला युक्तरस असें ह्मणतात; आणि तो सर्व रोगांवर दिला तरी चालतो. पंचमूळ (बेलशिवण काकच अरणि आणि अरलु) यांचा काढा, तेल, पिंपळी, मध, सैंधव आणि ज्येष्ठी मध यांच्या बस्तीला सिद्ध बस्ति म्हणतात

आणि तो सर्व रोगांवर चालतो. निरूह बस्ति घेणाऱ्या मनुष्यानें ऊन पाण्यानें स्नान करावें; दिवसा निजूं नये, अजीर्ण होऊं देऊं नये, याशिवाय बाकीचा सगळा विधि स्नेह बस्तींतल्या सारखा समजावा.

आतां उत्तम बस्तीमध्यें स्नेहाचें प्रमाण, पंचवीस वर्षांच्या वयाच्या मनुष्याला दोन कर्ष सांगितलें आहे; तसेंच पंचवीस वर्षांनंतर त्याचें एक पळ प्रमाण सांगितलें आहे. आस्थापन बस्तीनें शुद्ध झालेल्या आणि स्नानभोजनानें तृप्त केलेल्या मनुष्याला गुडग्या एवढ्या ऊंच आसनावर बसवून त्याच्या लिंगाच्या छिद्रामध्यें तेलांत बुडवलेली नळी हळूहळू साहा अंगुळें शिरवावी आणि बस्ति दाबावा. नंतर हळूहळू नळी बाहेर काढून घ्यावी. असें केल्यावर आंत ओतलेला स्नेह बाहेर निघून आला म्हणजे स्नेहबस्तींतल्यासारखा उपचार करावा. स्त्रियांस योनींतल्या द्यावयाच्या बस्तीच्या स्नेहाचें प्रमाण दोन पळें लिहिलें आहे. मुलास द्यावयाच्या बस्तींतल्या स्नेहाचें प्रमाण दोन कर्ष लिहिलें आहे. स्त्रीला उताणी निजवून दोनही गुडगे उंच करवून बस्ति द्यावा; या बस्तींतला स्नेह बाहेर न निघाला तर शोधनीय गणांत सांगितलेल्या औषधाच्या काढ्याचा फिरून बस्ति द्यावा. अथवा योनिमार्गांत फलवर्तीचा उपयोग करावा. बस्तिस्थानीं जळजळ सुटेल तर वड आदि करून क्षीर वृक्षाच्या काढ्याचा बस्ति द्यावा. हा उत्तर बस्ति दिल्यानें पुरुषाचा शुक्रदोष आणि स्त्रीचा रजोदोष नाश पावतो. परंतु प्रमेहाच्या रोग्याला हा बस्ति देऊं नये. हा बस्ति बरोबर पोहचला असतां मेहन म्ह० गुदस्थानचे सगळे रोग दूर होतात. गुदस्थानावर तूप चोळून रोग्याच्या अंगठ्या एवढी व जाडी वात एरंडेल तेलांत भिजवून वर सांगितल्याप्रमाणें अधोद्वारांत शिरवावी; हिला फलवर्ती असें म्हणतात.

**नस्य**—नासिकेनें ग्रहण करण्याला योग्य अशा औषधाला नस्य आणि नावन अशीं दोन नावें दिलीं आहेत. नस्याचे रेचन आणि स्नेहन असे दोन भेद आहेत. त्यांत रेचनानें कर्षण ( रोडकेपणा ) प्राप्त होतें आणि स्नेहनानें बृंहण (पुष्टि) मिळतें. कफाचा नाश करण्यासाठीं सकाळीं नस्य द्यावें. पित्ताचा नाश करण्यासाठीं दुपारीं आणि वाताच्या उपशमार्थ संध्याकाळीं नस्य द्यावें. फार करून नस्य दिवसा द्यावें आणि रोगाचा जोर फार दिसल्यास रात्रीं देण्यासही हरकत नाहीं. भोजनाच्या अंतीं दुर्दिनाच्या ( ढगांनीं आकाश व्याप्त असेल त्या ) दिवशीं, उपवासाच्या दिवशीं, नुकतीच थंडी आली असेल तेव्हां गर्भिणी स्त्रीला, विषदोष असलेल्याला, अजीर्ण झालेल्याला, ज्यानें बस्ति घेतला त्याला, स्नेह उदक व आसव प्यालेल्याला, क्रोधानें व शोकानें व्याप्त असलेल्याला, तृषेनें पीडलेल्याला, वृद्ध आणि बालक यांस, वेगाचा निरोध करणाराला, स्नान करणाराला, अथवा स्नान करण्याची इच्छा धरणाराला नस्याचा उपयोग वर्ज्य होय. आठ वर्षांच्या वयानंतर आणि ऐंशीं वर्षांच्या आंत नस्यकर्म करावें. आतां विरेचन नांवाचें नस्य, तीक्ष्ण द्रव्याच्या चूर्णाचे प्रमाणें करून, तीक्ष्ण असे तेल अथवा स्वभावानें तीक्ष्ण द्रव्य घालून सिद्ध केलेल्या स्नेहाचें, काढ्याचें आणि रसाचें देत असतात. दोन्ही नाकाच्या छिद्रांमध्यें आठ, सहा आणि चार बिंदु घालावयाचे. हा क्रम उत्तम, मध्यम आणि कनिष्ट प्रमाण ह्मणून सांगितला आहे. नस्यकर्मांत एक शाण ( ह्म० २४ गुंजा ) तीक्ष्ण औषध, एक जवा एवढा हिंग, एक मासा सैंधेलोण, आठ शाण दूध, तीन कर्ष पाणी आणि एक कर्ष मधुर द्रव्य यांचा उपयोग करावा. या रेचन नस्याचे, अवपीड व प्रधमन नांमें दोन भेद आहेत. त्यांपैकीं जो जेथें माफक पडेल तेथें तो योजावा. तीक्ष्ण द्रव्य द्रवद्रव्यांमध्यें वांटून त्यांतून

पिळून घेतलेला रस, यास अवपीड नांवाचें नस्य ह्मणतात. तीक्ष्ण द्रव्याला फार बारीक वाटून किंवा कुटून त्याचें चूर्ण साहा बोटें लांबीच्या पोकळ नळींत घालून व ती नळी नाकांत शिरवून दुसऱ्या कोणी मनुष्यानें तोंडानें तींतून फूक मारावी. ह्मणजे तें चूर्ण मस्तकांत उतरतें; या नस्याचें प्रधमन असें नांव आहे. ऊर्ध्वजत्रुगत रोग. कफानें स्वराचा क्षय झाला असा रोग अरोचक, थंडी,मस्तकशूळ, पीनस, सूज, अपस्मार, वायु व कोड या रोगांवर विरेचन नस्य द्यावें. भि-त्र्याला, स्त्रियांस, दुर्बळाला व बालकाला तो बहुधा स्नेहाबरोबर मिळवून विरेचन नस्य द्यावें. गल रोगामध्यें, सन्निपातामध्यें, निद्रा-रोगामध्यें, विषम ज्वरामध्यें, मनोविकारांच्या रोगावर व कृमि वि-कारामध्यें अवपीड नस्य द्यावें. बेभान अवस्था होऊन गेली असेल आणि दोषाचा जोर फारच असेल, तर रोग्यास प्रधमन नस्य द्यावें. कारण कीं तें अत्यंत तीक्ष्ण असतें. गूळ, सुंठ, पिंपळी, आणि सैंधेलोण हे सर्व पदार्थ पाण्यांत वांटून त्यांचें नस्य करविलें असतां नेत्र, कान, नासिका आणि डोकें यासंबंधी तमाम रोग बरे होतात; तसेंच दाढी, मान, गळा, भुजा आणि पाठीचा कणा या भागीं उत्पन्न झा-लेले रोगही यापासून बरे होतात. मोहाच्या लाकडाचा आंतला गर्भ, पिंपळी, वेखंड, मिरीं व सैंधेलोण ही औषधें जराशा ऊन पाण्यांत वांटून नस्य केल्यास बेशुद्धि नाहींशी होते, तसेंच वायु, वेड, सन्नि-पात व अपतंत्रक नामें रोग वगैरे दूर होतात. सैंधेलोण, पांढरीं मिरीं, सरशव व कठ हे जिन्नस बोकडाच्या मुतांत वांटून नस्य केलें असतां तंद्रेचा नाश होतो. सैंधेलोण, वेखंड, मिरीं, पिंपळी, सुंठ, कंकोळ, लसूण, गुग्गुळ व कायफळ यांस रोहित नांवाच्या माशाच्या पि-त्ताची भावना देऊन, त्याच्या चूर्णाचें प्रधमन नस्य द्यावें. आतां बृंहण नस्याचें मर्श आणि प्रतिमर्श असे दोन भेद आहेत. मर्शाची

तर्पण करणारी सुमारें दोन रुपये भार मात्रा उत्तम लागू पडेल ह्मणून सांगीतलें आहे; एक रुपया भार घेतल्यास मध्यम आणि अर्धा रुपया भार घेतल्यास हीन प्रमाण म्हटलें आहे. नाकाच्या एकेक रंध्रांत वर सांगीतलेल्या प्रमाणांस अनुसरून व दोषांचें बळा-बळ पाहून नस्याचे बिंदु घालावे. एक दिवस अथवा दोन दिवस अंत-रानें नस्य द्यावें; अशा प्रकारें तिसऱ्या, पांचव्या व सातव्या दिवशीं नस्य द्यावें. सशी नांवाचें शिरोविरेचन समजून न दिल्यानें, दोष उपटून अथवा दोषांच्या क्षयानें अनेक प्रकारच्या व्याधि उत्पन्न होतात. दोष उपटून व्याधि उत्पन्न झाली असली तर ती दूर करण्या-साठीं वमनाचें विरेचन द्यावें. आणि क्षयाच्या विकारांवर पाहिजे तसें बृंहण करावें. मस्तक, नाक आणि नेत्र यासंबंधी रोगांवर, सूर्यावर्तावर, अर्धे भेदकावर, दंत रोगावर, हीनबळतेवर, मानेच्या, हाताच्या व कांखेच्या रोगांवर, मुखाच्या कोरडीवर, कर्णनादावर, वात व पित्त याच्या रोगांवर अलौकिक विरमुळ्यावर तसेंच, मस्तकाचे, दाढीचे, व मिशीचे केश गळून चाई लागल्यावर, मधुर द्रव्याशीं कढविलेल्या तेलाचें नस्य फार हितकारक आहे. दुध घालून शर्करेचें व तुपांत पर-तलेल्या केशराचें नस्य दिल्यानें वातपित्तजन्य व्याधि नाहींसे होतात; तसेंच भ्रुकुटी, शंख, नेत्र, मस्तक व कान यांच्या व्याधीवर व सूर्यावर्त आणि अर्धभेदक यावरही हें गुणावह आहे. एरंडेल, नारायण तेल, आणि माष आदि करून पदार्थांनीं साधलेलें तूप यांचें नस्य सुद्धां वरील वातपित्तजन्य व्याधीस दूर करतें. वातनिवर्तक औषधींनीं साध-लेल्या तेलाचें नस्य वात व्याधीवर द्यावें. तसेंच कफ व पित्त यांस शांत करणाऱ्या औषधींनीं साधलेल्या स्नेहाचें नस्य कफ पित्तावर द्यावें. पित्त रोगाच्या उपशमासाठी तुपाचें व चरबीचें नस्य योजावें. उडीद, कौंच्या, रास्ना, बळदाणा, एरंड, रोहिष आणि आसोंदरा यांच्या

काढ्यांत हिंग व सेंधेलोण टाकून सोसेल इतके ऊन ऊन बिंदु नाकांत सोडावे, म्हणजे कंपसहित, पक्षघात, अर्दित वायु, हनुस्तंभ, आणि अपबाहुक नांवाचा रोग नाश पावतो. प्रतिमर्श नस्याचे नाकाच्या एकेक रंध्रांत स्नेहाचे दोन दोन बिंदु टाकावे असें प्रमाण सांगितलें आहे. आंगठ्या जवळच्या बोटाचें मधलें पेर स्नेहांत बुडेल इतकें घालून बाहेर काढून जेवढा बिंदु गळेल तेवढ्या बिंदूला या प्रकरणांत बिंदु अशी संज्ञा दिली आहे. आणि अशा आठ बिंदूंस शाण अशी संज्ञा दिली आहे या शाणाप्रमाणें मर्श नांवाचें नस्य करावें म्हणून सांगितलें आहे. प्रतिमर्श नस्य फक्त दोन बिंदूंचें सांगितलें आहे. सकाळीं तोंड धुतल्यावर, घरांतून बाहेर निघते वेळीं, कसरत केल्यावर, थोडेंसें चालून आल्यावर, मैथुन समाप्त केल्यावर, शौचास जाऊन आल्यावर, डोळ्यांत अंजन घातल्यावर, तोंडांत चूळ घेतला असतां, जेवल्यावर, दिवसा निजून उठल्यावर, वांति झाल्यावर, किंवा संध्याकाळचे वेळीं हें प्रतिमर्श नांवाचें नस्य द्यावयास सांगितलें आहे. नाकामध्यें स्नेहाचे बिंदु घातले असतां ते घशांत येऊन दाह करूं लागले तर तोंडावाटे ते थुंकून टाकावे. परंतु गिळूं नयेत. क्षीण, तृषेनें अथवा तोंडास कोरड पडल्यानें पीडलेला, बालक आणि वृद्ध अशांस हें प्रतिमर्श नस्य द्यावें. जत्रूच्या वरच्या भागीं झालेल्या रोगावर हें नस्य प्रशस्त आहे. तसेंच शरीरावरील आणि विशेषें दाढी, मिशा आणि मस्तक यांवरील केश पांढरे झाल्यास ते यानें काळे होतात आणि इंद्रियें बळकट होतात. बेहडा, निंब, शिवणा, हरडा, अथवा मालकांकणीचें तेल काढून त्याचे बिंदु नाकांत सोडल्यानेंही केस पांढरे झालेले काळे होतात. नस्य देण्याचा विधि असा आहे कीं जेथें फार वारा नसेल व धूळ उडत नसेल अशा ठिकाणीं तोंड धुऊन व धूमपान करून शुद्ध

आलेल्या कपाळाच्या आणि गळ्याच्या भागीं स्वेदन विधि केल्यावर लांब मान करून आणि हात पाय ताणून उताणा निजविल्यावर, ज्याला नस्य द्यावयाचें असेल त्याचे डोळे वस्त्रानें झाकून, नाक वर करून, वैद्यानें शिंपीनें अथवा सोन्याच्या पात्रानें तेलाचे ऊन ऊन बिंदु नाकांत सोडावे. त्या वेळीं नस्य घेणारानें डोकें हालवूं नये, राग आणूं नये. शिंक येऊं देऊं नये. इतकेंच काय पण हसूं नये किंवा बोलेंही नये. कारण कीं असें करण्यानें ज्या जागीं नस्य जावयाचें तेथें न जातां खोकला, पडसें, थंडी आणि मस्तकाचे व नेत्राचे रोग उत्पन्न होतात. नस्याचा टाकलेला स्नेहबिंदु, गुडघ्या भोंवतीं हात फिरविण्याच्या पांच, सात अथवा दहा आवृत्ति होत (गुडघ्या भोंवतीं हात फिरवितांना जेथून आरंभ केला तेथें तो परत आला म्हणजे एक आवृत्ति आली असें समजावें) तों पर्यंत नाकाच्या मुळाशीं राखावे. त्यानंतर रोग्यानें बसलें राहून नासिकाद्वारें ते स्नेह बिंदु दोहों बाजूस शिंकरून टाकावे; पण समोरच थुंकूं नयेत. नस्य द्रव्य बाहेर निघून गेल्यावर मनाला संताप व क्रोध व राग येऊं देऊं नये आणि झोप न येतां गुडघ्या सभोंवतीं हाताच्या शंभर आवृत्ति होत तों पर्यंत उताणें निजून राहावें; तसेंच विरेचन नस्य दिल्यावरही धूमपान करणें आणि तोंडांत चूळ भरून वमणें हें हितकारक आहे. या नस्याचे सम्यग्योग, हीन योग, आणि अतियोग असे तीन योग शास्त्रकारानें सांगितले आहेत. जर सम्यग् योगानें मस्तकाची हवी तशी शुद्धि आली तर शरीर हलकें, मन प्रसन्न, नाडी शुद्ध, व्याधि निवृत्त व इंद्रियें प्रफुल्लित होतात. हीन योगाच्या नस्यानें कंडू, चिकटपणा, नाडी जड वाहाणें, आणि कफाचा स्राव असे प्रकार घडतात. आणि नस्याच्या अतियोगानें मेंदूमधून मस्तुलुंग नांवाचा पदार्थ असतो तो बाहेर पडतो आणि वायूचा कोप

होऊन इंद्रियें अस्वस्थ होतात व मस्तक शून्य होतें. हीन योगानें व अतियोगानें घडणाऱ्या उपद्रवाला दूर करण्यासाठीं कफ व वात यांच्या प्रकोपाला शांत करणारीं औषधें योजावीं. सम्यग् योगाच्या नस्याच्या प्रयोगानंतर नाकांत तुपाचा बिंदु जर जास्त झाला तर कफाचा स्राव, मस्तक जड होणें, इंद्रियांची अस्वस्थता वगैरे विकार होतात. त्यांस शांत करण्यासाठीं मग रूक्ष पदार्थ योजावे. म्हशीचें दहीं वगैरे अभिष्यंदि पदार्थांचा आहार नस्य घेणारानें करूं नये. याप्रमाणें शरीरशुद्ध्यर्थ वमन, विरेचन, नस्य, निरूह आणि अनुवासन अशीं पांच कर्में करावीं म्हणून सांगितलें आहे.

**धूमपान**—शमन, बृंहण, रेचन, कासहा, वामन आणि व्रण धूपन अशा प्रकारें धुराचे साहा भेद आहेत. त्यांत शमन धूम, मध्य आणि प्रायोगिक अशा दोन नांवानीं प्रसिद्ध आहे. बृंहणाचींही दोन नांवें स्नेह आणि मृदु. रेचनाचींही दोन नावें आहेत—शोधन आणि तीक्ष्ण. थकलेला, भित्रा, दुःखित, बस्ति दिलेला, दाळक घेतलेला, रात्रीस जागरण करणारा, तृषित, दाहानें पीडलेला. उदररोगी, नम्र मस्तक झालेला, तिमिररोगी, ओकाऱ्या काढणारा, पोटफुगीनें पीडलेला, उरःक्षतानें व प्रमेहानें व्यापलेला, पंडुरोगी, गर्भिणीस्त्री, रूक्ष शरीर असलेला, रोड, ज्यानें दूध, मध, तूप आणि मद्य प्यालें असा, तसेंच ज्यानें अन्न, दहीं आणि मत्स्य खाल्लें असा, बाळक, वृद्ध आणि क्षीण हीं मनुष्यें धूमपान करण्याला लायक नाहींत. अवेळीं धूमपान केल्यानें विकार उत्पन्न होतात. त्यांच्या शमनासाठीं घृत-पान, नस्य, अंजन, तर्पण, उंसाचा रस, द्राक्ष, दूध अथवा साखरेचें पाणी, तसाच मधुर आणि खारट मांसरस हेही प्यावयास द्यावे. बारा वर्षांवर आणि ऐंशीं वर्षांच्या आंतील मनुष्यास धूमपान द्यावें. जर धूमपानाचा चांगला उपयोग होईल, तर खोकला, श्वास, पडसें,

मानेची, दाढीची आणि मस्तकाची पीडा, तसेंच वाताचे आणि कफाचे विकार हाणून पडतात. धूमपानाच्या उपयोगानें वाणी, मन आणि इंद्रियें प्रसन्न रहातात. केश आणि दांत पडत नाहींत आणि तोंड सुगंधित रहातें. धूमाची नळी तीन खंडांची, तीन पर्वांची, करांगुळीच्या एवढी जाड, आणि चवळीचा दाणा आंत राहील एवढ्या मोठ्या तोंडाची असावी. शमनधूमाची नळी रोग्याच्या चाळीस अंगुली एवढी लांब असावी. तसेंच मृदु धूमाची, रोग्याची बत्तीस अंगुळें लांब असावी. तीक्ष्ण धूमामध्यें चोवीस अंगुळें, कासघ्नामध्यें सोळा अंगुळें, वामन धूमामध्यें दाहा अंगुळें आणि व्रण धूमामध्येंही दहा अंगुळांचीच नळी असावी; परंतु त्याची स्थूलता वाटाण्याच्या दाण्या एवढी व तोंडाचें छिद्र कुळिथाच्या दाण्याएवढें असावें. बारा अंगुळें लांखंडाच्या काडीवर पाण्यांत वाटलेल्या धूम द्रव्यांचा जाडा थर करून सावलींत तो सुकवावी. मग काडी काढून घेऊन स्नेहामध्यें भिजविलेल्या त्या औषधाच्या नळीला चिलमींत घालून व विस्तवानें पेटवून तोंडानें ओढावी म्हणजे धूमपान करतां येतें. आणि अशा रीतीनें घेतलेला धूर परत तोंडावाटे बाहेर टाकावा. नंतर नाकाच्या दोहों रंध्रांवाटे धूम ओढून तोंडावाटे बाहेर टाकावा. शेवयाच्या संपुटामध्यें धूमद्रव्य घालून व तीं अग्नीनें पेटवून आणि वरल्या भागीं मधोमध पाडलेल्या छिद्रांतून नळीवाटे व्रणाला धूम द्यावा. शमन धूमामध्यें एला आदि करून गणामध्यें सांगितलेलीं औषधें घ्यावीं. मृदु धूमामध्यें स्नेहयुक्त राळ घ्यावी. रेचन धूमामध्यें तीक्ष्ण औषधांचें चूर्ण, कासघ्न धूमामध्यें भुईरिंगणीचें आणि तिकाचें चूर्ण, वामन धूमामध्यें स्नायूचें आणि कातडीचें, व व्रण धूमामध्यें निंब, वेखंड इत्यादिकाचें चूर्ण घ्यावें. इतर प्रकारच्या धूम्याही रोगशांत्यर्थ घरामध्यें करण्यासारख्या आहेत. मोराचीं पिसें, कडुलिंबाचीं पानें,

भुईरिंगणीचीं फळें, मिऱ्यें, हिंग, जटामांसी, कापशीचें बोंड, बकाऱ्याचे केस, सापाची कांत, मांजराची विष्टा आणि हस्तिदंताचा चुरा यांत जरासें तूप घालून घरामध्यें धुरी केल्यानें बालकास होणारे सर्व प्रकारचे उपद्रव बरे होतात. तसेंच भूताची पीडा, पिशाच्याची बाधा आणि ज्वराचा झपाटा यांचाही नाश होतो. ज्या गोष्टी विरेचन नस्यामध्यें वर्ज्य म्हणून सांगितल्या आहेत, त्या धुमपानविधीमध्येंही वर्ज्य म्हणून समजाव्या.

**गंडूप आणि कवल**- गंडूप आणि कवल हे स्नैहिक, शमन, शोधन आणि रोपण अशा प्रकारें चार प्रकारचे आहेत. वातप्रधान रोगामध्यें स्निग्ध किंवा उष्ण द्रव्यानें स्नैहिक गंडूप व कवल द्यावा. स्वादु आणि शीत द्रव्यानें पित्तप्रधान रोगामध्यें शमन; कफप्रधान रोगामध्यें कटु, अम्ल, उष्ण आणि लवण अशा द्रव्यांनीं शोधन; आणि व्रणामध्यें कषाय पित्त आणि मधुर अशा द्रव्यांनीं जरासें उष्ण, अशा रोपण नांवाचे गंडूप आणि कवल हितकारक आहेत. तोंड भरून घेतल्यावर तोंडांत घेतलेला पदार्थ तोंडांत इकडे तिकडे हलूं शकत नाहीं, तेव्हां त्या क्रियेला गंडूप असें म्हणतात; आणि तो जर हलूं शकला तर त्यास कवल असें म्हणतात. त्यांतही खाण्याचा पदार्थ पातळ असला तर त्यास गंडूप म्हणतात आणि बुकटी असली तर त्यास कवल असें म्हणतात. गंडूपामध्यें जें द्रव द्रव्य असेल त्यांत एक कोल ( म्ह० आठ आणे भार ) चूर्ण घालावें आणि कवलामध्यें एक रुपया भार चूर्ण घालावें. पांच वर्षांनंतर कोणासही गंडूप व कवल योजावा. बरोबर बसलेल्या मनुष्याच्या कपाळावर व गळ्यावर घामाचे बिंदु येत तों पर्यंत, दोषाचें प्रमाण पाहून, तीन पांच अथवा सात गंडूष मुखांत धारण करण्यास द्यावे. अथवा मुखांत धारण केलेला पदार्थ कफानें चिकट झाला, नाकांतून

आणि डोळ्यांतून पाणी येऊं लागलें, तर प्रकुपित दोष शांत होई तों पर्यंत तोंडामध्यें गंडूष धरावा. वातप्रकोपामध्यें देण्यास योग्य अशा स्नैहिक गंडूषामध्यें तिळाचें चूर्ण, पाणी, दूध अथवा स्नेह योजावे. पित्तप्रकोपावर द्यावयाच्या शमन नामक गंडूषामध्यें तीळ, नील कमळ, तूप, साखर, दूध आणि मध हे पदार्थ योजावे. या गंडूषानें तोंडाची होणारी आग शांत होते. तोंडांत आलेल्या व्रणाच्या निवृत्तीसाठीं मधाचा गंडूष धारण करावा. त्यानें तोंड स्वच्छ होतें. व्रण भरतात आणि दाह व तृष्णा शांत होते. विष, क्षार आणि अग्नि, यांनीं भाजलेल्या तोंडांत तुपाचा अथवा दुधाचा गंडूष धारण करावा. दांत हालत असले तर तेल आणि सैंधलोण एकत्र मिळवून त्यांचा गंडूष तोंडांत द्यावा. शोष आणि तोंडाची विरसता उत्पन्न झाली तर ती कांजीच्या गंडूषानें बंद होते. सैंधलोण, सुंठ, पिंपळी, मिरें आणि मोहऱ्या ह्यांचा गंडूष तोंडांत धारण केला असतां कफविकार दूर होतो. हरडा, बेहडा आंवळकठी आणि मध यांच्या गंडूषानें कफ, रुधिर आणि पित्तविकार नाश पावतात. दारुहळद, गुळवेल हरडा, बेहडा आणि आंवळकठी, द्राक्ष, जाईचीं पानें, जवस हे सर्व पदार्थ पाण्यांत घालून तें साहावा भाग राही तों उकळावें मग थंड झाल्यावर त्यांत मध घालून गंडूष धारण केल्यानें त्रिदोषजन्य मुखपाकाचा नाश होतो. ज्या औषधाचा गंडूष द्यावा ह्मणून सांगितलें त्याच औषधाचा कवल आणि त्याचेंच प्रतिसारण करावयाचें आहे. बिजोऱ्याच्या ततूंत सैंधलोण, सुंठ, पिंपळी आणि मिरीं हीं घालून यांचा कवल केला असतां तो जडता आणि कफवातापासून उत्पन्न झालेली अरुचि दूर करतो.

**प्रतिसारण**—बोटांच्या चिमटींत येईल इतका कल्क, अवलेह अथवा चूर्ण अशा प्रकारें प्रतिसारणाचे तीन भेद आहेत. त्यांतून

जे मुखरोगाला लायक असतील तेवढ्याचा मात्र येथें उपयोग करावयाचा. कवठ, दारुहळद, मंजिष्ठ, पहाडमूळ, कुटकी, गोरोचन, तेजबळ, नागरमोथा, आणि लोध्र यांचें चूर्ण केलें असतां त्यास प्रतिसारण ह्मणतात. हें चूर्ण बोटावर घेऊन तोंड आणि दांत घासले असतां दांतांतून येणारें रक्त, दांतांची पीडा, सूज, ठणका इत्यादि विकार बरे होतात. वर सांगितलेल्या गंडूषादिकांचा हीन योग झाला असतां कफ उपटून आंबट, गोड इत्यादि रसांची अज्ञानता आणि अरुचिही उत्पन्न होते. तसेंच अतियोगामुळें तोंड येणें, कोरड पडणें, तृषा लागणें आणि अस्वस्थपणा इत्यादि विकार होतात. गंडूषादिकांचा उपयोग बरोबर झाला तर व्याधीचा नाश होऊन मन प्रसन्न होतें, शरीर हलकें वाटतें, तोंड साफ होतें, आणि इंद्रियें निर्मळ होतात.

**कषाय**—स्वरस, कल्क, क्वाथ, हिम आणि फांट अशा प्रकारें कषायाचे पांच भेद आहेत. ते, उत्तरोत्तर एकाहून दुसरा हीन ह्मणून ह्मटले आहेत. न बिघडलेल्या आणि जमिनींतून नुकत्याच खणून काढलेल्या औषधीस ठेंचून, कुटून, फडक्यांत गाळून पिळून काढलेला जो रस तो स्वरस होय. ताजी औषधि मिळत नसली तर सोळा रुपये भार सुकलेल्या औषधीचें चूर्ण घेऊन व त्याच्या दुप्पट नींत पाणी घालून, एक दिवसरात्र भिजत ठेवून मग गाळून, घेतलेला जो रस त्यासही स्वरस ह्मणतात. अथवा सुकलेल्या औषधीचा कल्क आठपट पाणी घालून उकळविल्यावर चौथा भाग पाणी शिल्लक राहू द्यावें, या पाण्यासही स्वरस असें ह्मणतात. ठेंचून घेतलेल्या चार रुपये भार शुष्क औषधीद्रव्यामध्यें सोळापट पाणी घालून, मातीच्या भांड्यांत कढवावें; मग जो आठवा भाग शेष राहील त्यास शृत, क्वाथ, कषाय आणि निर्व्यूह अशीं नांवें दिलीं आहेत. हें शेष जरा-

जर ऊन आहे तोंच रोग्यास प्यावयास द्यावें. वातानें पीडलेल्यास काढा द्यावयाचा, त्यांत चौथा भाग खडीसाखर घालावी, व मध घालणें असेल तर सोळाव्या भागाइतकी घालावी. पित्ताच्या रोग्याला द्यावयाच्या काढ्यामध्यें खडीसाखर घालणें तर आठवा हिस्साच घालावी आणि मधही आठवा हिस्साच घालावी. कफरोग्याला द्यावयाच्या काढ्यांत खडीसाखर सोळावा हिस्सा आणि मध चौथा हिस्सा घालावी. काढ्यामध्यें जिरें, गुग्गुळ, क्षार, लवण, शिलाजित, हिंग आणि सुंठ, पिंपळी, मिरें यांतून कोणताही पदार्थ काढ्यांत घालणें आला तर तो चोवीस गुंजाभार घालावा. आणि दूध, तूप, तेल, गूळ, मूत्र आणि दुसरा कोणताही द्रव पदार्थ, तसेंच कल्क आणि चूर्ण यांतून कोणताही पदार्थ घालणें आलें तर, एक रुपयाभार घालावा. काढा कधीच केव्हां त्यावर झाकण ठेवूं नये; कारण कीं झाकण ठेवल्यानें तो काढा रोग्यास पचूं नये असे गुण त्यांत येतात. चार रुपये भार, ठेचलेलें औषध मृत्तिकेच्या पात्रांत घालून, त्यांत ऊन पाणी घालावें व थंड आल्यावर तें गाळून घ्यावें. या पाण्यास फांट अशी संज्ञा आहे. आणि तें घेण्याचें प्रमाण आठ रुपये भार आहे. फांटामध्यें मध, खडीसाखर, गूळ इत्यादि काढ्यांत टाकण्यास सांगितलेले पदार्थ घालावयाचे असतील तर त्यांचें प्रमाणही तेथें सांगितल्याप्रमाणेंच समजावें. चार रुपये भार औषध घेऊन ठेचावें व तें चोवीस रुपये भार पाण्यांत घालून रात्रभर मातीच्या भांड्यांत ठेवून द्यावें; मग सकाळीं गाळून घ्यावें, या पाण्यास हिम अथवा शीत कषाय असें नांव दिलें आहे. हें घेण्याचें प्रमाणही फांटाइतकेंच आहे. ताज्या औषधीमध्यें अथवा सुकलेल्या औषधीमध्यें पाणी घालून वाटल्यानें जी आकृति तयार होते तीस कल्क, प्रक्षेप आणि अवाप अशींही नांवें आहेत. कल्क घेणें तो एक

रुपया भार घ्यावा. कल्कांत मध, तूप आणि तेल हे पदार्थ दुप्पट घालावे. खडीसाखर आणि गूळ हे समभाग आणि द्रव पदार्थ चौपट घालावे. याप्रमाणें पांचही स्वरसादिकांची इतिकर्त्तव्यता समजून घेऊन व त्यांत घालावयाच्या पदार्थांचें प्रमाण लक्षांत ठेवून योजना करावी

**दोषाची गति**—एकत्र मिळणें, स्थिर होऊन राहणें, आणि वाढणें असे दोषाच्या गतीचे तीन प्रकार आहेत. तसेंच ऊर्ध्व गति, अधोगति आणि तिर्यग् गति असे आणखीही तीन प्रकार आहेत. मळाशय, शाखा व मर्म, आणि हाडांचे सांधे यामध्येंही दोष शिरत असल्यामुळें, आणखीही तीन प्रकार होतात. पित्तादिकाच्या क्रमानें चय, प्रकोप आणि प्रशम होतात. त्यांचा काळ वर्षा आदिकरून साहा ऋतु जाणावे. त्याचीही गति कालकृत ह्मणून समजावी. आतां प्राकृत आणि वैकृत असेही दोषाच्या गतीचे भेद करतां येतात. पित्त, वाफेप्रमाणें होऊन, खाल्लेल्या अन्नास पचवितें पण तें कोपलें असतां अनेक विकार उत्पन्न होतात. आपल्या स्वस्थ अवस्थेमध्यें, निर्मळ कफ हा विकृति पावतो तेव्हां त्याला मळ ह्मणतात. शरीरांतील कफाला ओज असेंही नांव आहे. तें बिघडलें, ह्मणजे दुःखदायक होऊन, बळ हरण करतें. सर्व मनुष्यांमध्यें प्राणरूप एक वायु आहे आणि तो जेव्हां बिघडतो तेव्हां अनेक रोगांस उत्पन्न करतो.

**षड्रस**—चिकित्सा करते वेळीं प्रत्येक व्याधीचें कारण, पूर्व रूप, रूप, उपशय, संख्या, प्राधान्य, विधि, विकल्प, बळ आणि काल-विशेष हीं जाणून, नंतर रोग्याच्या शरीरांतील दोष, त्याला उचित औषधें, देश, काल, बळ, शरीर, आहार, सार, सात्म्य, सत्व, प्र-कृति आणि अवस्था यांचें प्रमाण वैद्यानें स्थिर मनें करून बरोबर जाणून घ्यावें. मग करावयाचा असेल त्या क्रियेचा विचार करावा, कारण कीं अटकळ करून चालणारा वैद्य व्याधि दूर करूं शकत

नाहीं. यास्तव दोषादिकांचें प्रमाण लक्षांत यावें ह्मणून रसासंबंधी गुणदोष आणि विकारांची उत्पत्ति याविषयीं विचार येथें लिहितों.

मधुर, अम्ल, लवण, कटु, तिक्त आणि कषाय असे साहा रस आहेत. त्यांची योजना बरोबर झाली तर ते शरीरांत आरोग्य वाढवितात. आणि अनुचित योजना झाली तर दोष उत्पन्न करतात. हे दोष वात, पित्त आणि कफ यांस अनुलक्षून तीन प्रकारचे आहेत. वातादिक प्रकृतीचे प्रकार विकार पावले नसतील तर ते शरीरास उपकारक होतात: आणि विकृत झाले असतील तर शरीरांत अनेक प्रकारचे रोग उत्पन्न करतात. त्या वातादिकांपैकीं एकेक दोषाला तीन तीन रस उत्पन्न करतात आणि तीन तीन त्यास शमवितातही. त्यांतही, कटु, तिक्त आणि कषाय हे रस वात उत्पन्न करतात. मधुर, अम्ल आणि लवण हे रस वाताला शमवितात. कटु, अम्ल आणि लवण हे रस पित्त उत्पन्न करतात: व मधुर, तिक्त आणि कषाय हे रस पित्ताला शमवितात. मधुर, अम्ल आणि लवण हे कफ उत्पन्न करतात व कटु, तिक्त आणि कषाय हे त्याला शमवितात. सगळ्या रसांपैकीं जो रस वातादिक दोषांशीं समान गुणाचा असेल तो त्या दोषाला वाढवितो आणि विपरीत गुणाचा रस त्याला शमवितो. यास्तव हे साहाही रस वैद्यानें जाणणें आवश्यक आहे. रस जसे साहा आहेत तसे दोष तीन आहेत. रस एक दुसऱ्याशीं मिळाल्यानें त्यांचे असंख्य भेद होतात. त्यांतही अनेक रसांच्या द्रव्यांमधील आणि अनेक दोषांपासून उत्पन्न झालेल्या विकारांमधील रसाचे आणि दोषाचे निरनिराळे प्रभाव जाणून, नंतर द्रव्याचे व विकाराचे प्रभाव समजून घ्यावे. अशा प्रकारें प्रभावादिक निरनिराळे प्रकार जाणल्यानें समुदायाचा प्रभाव लक्षांत येत नाहीं. ह्मणून समुदायांतील समुदायाच्या

प्रभावाचें स्वरूप सुद्धां जाणून घेण्यास योग्य आहे. समुदायाचें स्वरूप जाणल्यानंतर, रस, द्रव्य आणि विकार यांचे प्रभाव समजून घ्यावे.

**द्रव्यप्रभाव**—तेल, तूप आणि मद्य हे पदार्थ, क्रमें करून, वात, पित्त आणि श्लेष्म यांची शांति करणारे आहेत. त्यांतही तेल व स्नेह हे उष्णत्व आणि गुरुत्व या गुणांनीं युक्त आहेत. ह्मणून त्यांच्या नित्य उपयोगानें वाताचा विकार बरा होतो. कारण कीं वायु, हा रूक्षपणा, शीतलपणा व लघुता असे विरुद्ध गुण धारण करतो. तसेंच मधुर, शीत आणि मंद या गुणांनीं युक्त जें तूप तें, आपल्याशीं विरुद्ध अशा अमधुर, उष्ण व तीक्ष्ण या गुणांनीं युक्त जें पित्त त्याला दूर करतें. तसेंच रूक्षता, तीक्ष्णता आणि कषायत्व हे गुण आपल्या ठिकाणीं असल्यामुळें, मद्य हीं स्वतांशी विरुद्ध जे स्निग्ध, मंद आणि मधुर असे गुण त्यांनीं युक्त अशा कफाला जिकतें. याप्रमाणें ज्या द्रव्याचे गुण, दोषाच्या गुणांहून विरुद्ध असतात, तें द्रव्य त्या दोषाला जिकतें. सर्व द्रव्यांमध्येंही पिंपळी, क्षार, आणि लवण या द्रव्यांचा उपयोग जास्त झाल्या असतां नुकसान करतो. कारण कीं पिंपळी ही, तिखट, मधुर, विपाकी आणि अत्यंत गुरु अशी नाहीं. तशीच ती स्निग्ध, उष्ण आणि प्रक्लेदी (ह्म० पदार्थाला मृदु करणारी) अशी आहे. ह्मणून ही जरी औषधीरूप आहे तरी नेहमी सेवन करण्यास योग्य नाहीं. कारण कीं ती लागलीच शुभ आणि अशुभ फळ प्रगट करील. नेहमी उपयोग केल्यानें ती शरीरांत दोष उत्पन्न करील. ती गुरु आणि प्रक्लेदी असल्यामुळें कफाला जागृत करते. उष्णपणामुळें पित्ताला कोपवितें; आणि स्नेहाच्या उष्णतेच्या अल्पतेमुळें वातासही ती धड शांत करूं शकत नाहीं. व ती दुसऱ्या एखाद्या योग्य पदार्थाशीं योजली असतां मात्र हितकारक आहे. ह्मणून नुस्ती पिंपळीच एकटी फारशी सेवीत जाऊं नये.

उष्णता तीक्ष्णता, आणि लघुता यांनीं संयुक्त असा क्षार नांवाचा पदार्थ पहिल्यानें शरीरांतील पदार्थाला मऊ करतो आणि मग शुद्ध करतो. म्हणून पचवणें, जाळणें आणि फोडणें येवढ्या कामांत त्याचा उपयोग करावा असें शास्त्र सांगतें. क्षाराचें अत्यंत सेवन झाल्यानें केश, नेत्र, हृदय आणि पुरुषत्व यांचा नाश होतो. ज्या गांवा, ज्या नगरीं व ज्या देशांत क्षाराचा फार उपयोग करण्याचा परिपाठ असेल तेथील म्हाणारे लोक, फार करून प्रान्य व नीच देशच्या लोकांप्रमाणें आंधळे, नपुंसक, हडहडलेले, म्हातान्या-सारखे आणि हृदयांतील व्यथेनें पीडलेले असे वनतील. या कारणा-स्तव क्षाराचा फार उपयोग निषिद्ध होय. तो उष्णता, तीक्ष्णता, अत्यंत गुरुता या गुणांनीं रहित आणि अत्यंत स्निग्धतेनेंही रहित आणि प्रक्लेदी (पदार्थास मऊ करणारा) असा असल्यामुळें, घट्ट पदार्थाला शिथिल करण्यामध्यें त्याची योजना करावी. क्षार फार खाल्यानें शिथिलता आणि दुर्बळता उत्पन्न होते. ज्या गांवचे, नगरचे आणि देशचे लोक लवणाचा फार उपयोग करतात ते ग्लान, मांसानें व रक्तानें शिथिल आणि क्लेश सहन न करणारे असे असतात. उदा-हरणार्थ बाल्हीक, सौराष्ट्र, सौवीरक आणि सिंधु देश येथील लोक. हे लोक दुधाशींही मिठाचा उपयोग करतात. पहा कीं पृथ्वीचे जे विभाग क्षारयुक्त आहेत तेथें वनस्पति, औषधी, लता वगैरे वृक्ष फारसे उगवत नाहींत आणि उगवले तरी तेजोहीन आणि दुर्बळ असतात. यावरूनही अनुमान होतें कीं लवणानें नेभळेपणा उत्पन्न होतो. यास्तव मीठ फारसें खाऊं नये. ज्या मनुष्याला मिठाची संवय लागली तोही हडहडलेला, मस्तकाला चाई लागलेला, पांढरे केश झालेला, आणि कातडीला सुरकुत्या पडलेला असा असतो. म्हणून मिठाची संवय असलेल्या मनुष्यानेंही तें हळूहळू सोडून द्यावें,

आणि अधिक खाण्याचा परिपाठ तर ठेवूंच नये. जेथें जेथें सात्म्य हा शब्द आला असेल तेथें तेथें त्याचा अर्थ ज्याला जो पदार्थ मानवतो तो त्याला सात्म्य असा समजावा. हें सात्म्य प्रवर (श्रेष्ठ) अवर (अश्रेष्ठ) आणि मध्यम अशा रीतीनें तीन प्रकारचें आहे. एकेक रसाच्या व सर्व रसांच्या उपयोगानें हें सात्म्य सात प्रकारचें होतें. त्यांतही सर्व रसांचें सात्म्य (मानवणें) प्रवर (उत्तम) म्हणून ह्मटलें आहे, आणि एकेक रसाचें सात्म्य तें अवर (अधम) असें सांगितलें आहे. वर लिहिल्याप्रमाणें प्रवर आणि अवर हे दोनही गुण ज्यांत असतील तें मध्यम सात्म्य समजावें. त्यांतही अवर आणि मध्यम सात्म्यांतून प्रवर सात्म्य संपादन करावें; अर्थात साहाही रस मानवतील असें करावें. या सर्वांचें सात्म्य, खालीं सांगितलेलीं आहाराचीं स्थानें पाहिल्यावांचून अहितकारक फळ देणारें होतें.

**आहाराचीं आठ स्थानें**—प्रकृति, करण, संयोग, राशि, देश, काळ, उपयोग, संस्था व उपयोक्ता अशीं भक्ष्याचीं आठ स्थानें सांगितलीं आहेत. यांत, प्रकृति हें स्वभावाचें नांव आहे. भक्षायाला लायक औषध व द्रव्यांतील गुरुत्वादिक गुणांचा योग यांसच प्रकृति म्हणावें; जसें कीं उडदामध्यें व डुकराच्या मांसामध्यें गुरुपणा आणि मुगामध्यें व हरिणाच्या मांसामध्यें लघुपणा हे स्वभावसिद्धच आहेत, तेव्हां हें प्रकृतिरूप अन्नाचें स्थान ह्मटलें आहे. स्वाभाविक द्रव्याला जो संस्कारविशेष करावा लागतो त्यास करण असें ह्मणतात. कोणताही गुण उत्पन्न करणारी क्रिया करावी लागते तिला येथें संस्कार अशी संज्ञा दिली आहे. हा गुण जळ आणि अग्नि यांच्या संयोगानें, शुद्ध करण्यानें, चुरडण्यानें, देश, काळ आणि वास यांच्या संसर्गानें द्रव्यामध्यें, उत्पन्न होतात. दोन किंवा अधिक

द्रव्याच्या एकीकरणाला संयोग असें ह्मणतात. या संयोगानेंही द्रव्यांत एक प्रकारचा विशेष गुण उत्पन्न होतो. उदाहरणार्थ तूप आणि मध समान भाग घेऊन एकत्र केल्यानें त्यांचा विषरूप परिणाम होतो. मध, मत्स्य आणि दूध यांच्या संयोगापासूनही विषरूप परिणाम आलेला आढळतो. राशि (समूह) हा सर्वग्रह आणि परिग्रह अशा भेदें करून दोन प्रकारचा आहे. तो प्रमाण आणि अप्रमाण यांच्या फळाचा निश्चय करतां यावा ह्मणून या प्रकरणांत घेतला आहे. दूध, भात, भाकरी आणि भाजी वगैरे खाण्याचे सर्व पदार्थ मिळून मला एवढें अन्न लागतें अशा प्रकारें खाण्याच्या प्रमाणाची जी कल्पना तिला सर्वग्रह ह्मणतात आणि या पदार्थांपैकीं एकेक पदार्थ पृथक् पृथक् प्रमाणानें ग्रहण करणें त्यास परिग्रह अशी संज्ञा आहे. अन्नद्रव्याचें जें उत्पत्तिस्थान तो देश समजावा. त्या देशाचा विचार केला असतां असें लक्षांत येतें कीं अमुक देशांत उत्पन्न झालेलें अन्न अमुक देशांतील लोकांस मानवेल किंवा न मानवेल हें, देशाचा विचार केला असतां, निश्चयें सांगतां येतें. काल नित्य आहे ह्मणजे साधारणपणें नेहमीं चालूच आहे; आणि आवस्थिक ह्मणजे स्थितिविशेषावरून सांपण्यास योग्य असा (जसें कीं अमुक मनुष्य पन्नास वर्षांचा आहे इत्यादि) अशा प्रकारें दोन प्रकारचा मानिला आहे. त्यांत आवस्थिक काळाला विकाराची अपेक्षा आहे; जसें कीं सज्वर मनुष्याला तीन दिवसांचा प्रमाणभूत जो पहिला काळ तो लंघनाला योग्य ह्मणून ह्मटला आहे इत्यादि. आणि जो काळ ऋतूच्या माहात्म्याची अपेक्षा धरतो तो नित्यग असें ह्मणतात; जसें कीं थंडीच्या दिवसांत मानवणारें अन्न उन्हाळ्यांत मानवत नाहीं, यावरून उन्हाळा आणि हिवाळा असे निरनिराळे काळ आहेत असें समजतें. याप्रमाणें आहार करण्याचे जे नियम त्यांस उपयोग असें ह्मणतात.

या उपयोगाला पचण्याची अपेक्षा असते. म्हणजे जोंवर अन्न पचलें नाहीं तोंवर फिरून अन्न खाण्याची इच्छा होत नाहीं इत्यादि अन्न खाणारा जो पुरुष तो उपयोक्ता समजावा. ज्याच्या ठिकाणीं सात्म्य आहे म्हणजे ज्यास एकच रस मानवतो व ज्याला सर्वच रस मानवतात, त्याला या प्रसंगीं घेण्याचें कांहीं कारण दिसत नाहीं. म्हणून एक रस ज्याला मानवतो त्याला उपयोक्ता असें नांव दिलें आहे. याप्रमाणें आठ प्रकारच्या अन्नाच्या विधानाचे भेद जी दाखवितात त्यांस स्थानकें किंवा आयतनें असें म्हणतात. या अन्नाच्या स्थानकांचे विशेष, शुभाशुभ फळ देणारे व परस्परांस उपकार करणारे असतात. ते जाणण्याची नेहमीं काळजी घ्यावी आणि हें जाणून हितकारक आहारच ग्रहण करावा. आवडीमुळें अथवा चुकीनें स्वतांला प्रिय खरें परंतु परिणामीं दुःखदायक असें भोजन करूं नये किंवा असले इतर पदार्थही खाऊं नयेत. हें अन्नाचें विधान रोग्याला व रोगरहिताला ही हितकारक असल्यामुळें त्यांच्या उभयतांच्याही नित्य विचारास पात्र आहे. फार करून उष्ण, स्नेहयुक्त, प्रमाणयुक्त वीर्यानें परस्परांशीं अविरुद्ध, उत्तम स्थळीं आणि उत्तम उपकरणसहित (म्हणजे चटणी, कोशिंबिरी वगैरे तोंडी ला वावयास घेण्याच्या पदार्थांसहित) भोजन करावें. तें फार सावकाश नसून, बोलल्यावांचून अथवा हसल्यावांचून व जेवणावर चित्त ठेवून जेवावें. तसेंच जेवते वेळीं जठराग्नीच्या बळाबळाकडेही लक्ष असूं द्यावें.

**भोजनाच्या साहा गुणांचा विस्तारपूर्वक विचार**—खाण्याचे पदार्थ उन्हन असावे. कारण कीं उन्हन अन्न स्वादिष्ट लागतें. जेवल्यावर अभिवृद्धि करण्यास योग्य अशा जठराग्नीला वाढवितें, लौकर पचतें, वायूला अधोगत करतें, आणि कफाला शोषून घेतें. तें

स्नेहानें ( म्ह० तूप, तेल वगैरे ओशट पदार्थांनीं ) युक्त असावें; कारण कीं त्याच्या योगानें स्वादिष्टपणा वाढतो. जेवल्यावर तें अभिवृद्धि करण्याला योग्य अशा जठराग्नीची अभिवृद्धि करतें. लौकर पचलें जातें, वायूला अधोगत करतें. शरीराच्या बांध्याला सुदृढ करतें. बळ वाढवितें आणि शरीराची कांति सुंदर करतें. तसेंच अन्न खाण्यानेंही कांही मुकर प्रमाण असावें म्हणजे वात, पित्त आणि कफ यांस दाबून तें केवळ आयुष्याची वृद्धि करण्यालाच पात्र होतें, आणि मळशुद्धि साफ होते. जठराग्नि हीन होत नाहीं व पोटामध्यें कांहीं पीडाही होत नाहीं. पहिल्यानें खाल्लें अन्न पचल्यानंतरच नेहमी दुसरें खावें; कारण कीं अजीर्णामध्यें फिरून खाल्ल्यानें पूर्वीच्या अर्धवट पचलेल्या अन्नाच्या रसावरोबर नवीन खाल्लेल्या अन्नाचा रस मिसळून त्यापासून अनेक प्रकारचे रोग होतात. आणि पचल्यावर खाणाऱ्या मनुष्याच्या शरीरांत वातादिक दोष आपापल्या स्थानें सोडित नाहींत, वरून बसतात. तेणें करून जठराग्नि प्रदीप्त असतो, ढेकर साफ येतात आणि हृदय शुद्ध असतें. म्हणूनच क्षुधा लागल्यावर अन्नरस ग्रहण करणाऱ्या नाडींचीं तोंडें मोकळीं असतात. तेव्हां मूत्र, पुरीषादिक मळाचा त्याग केल्यावर मग भोजन करावें म्हणजे सर्व शरीरगत धातु न बिघडतां खाल्लेलें अन्न आयुष्याची वृद्धि करणारें होतें. वीर्यानें परस्पराशीं अविरुद्ध असें अन्न खावें; त्याचें कारण असें कीं विरुद्ध वीर्यानें अन्न खाल्ल्यानें होणारे उपद्रव होणार नाहींत. उत्तम स्थितीमध्यें असतां अन्न खावें; वाईट ठिकाणीं जेवावयास बसलें असतां मन किचकिळतें व तेणेंकरून शरीरास विकार जडतात. ते विकार उत्तम स्थळीं बसल्यानें जडणार नाहींत. तसेंच जेवतांना वर सांगितलेली उपकरणसामग्रीही बरोबर असावी. जेवतांना घाई अगदीं करूं

नये; कारण घाईनें अन्न बरोबर चावतां येत नाहीं. त्यामुळें त्याचा लौकर रस होण्यास व शरीरांत पसरण्यास फार अडचण पडते, व अन्न खाण्यापासून होणारे साहा लाभ त्यांस प्राप्त होत नाहींत. याचप्रमाणें फार सावकाशपणेंही जेवूं नये; कारण कीं सावकाश खाणाराला जेवण पुरेसें होत नाहीं. ह्मणून प्रमाणाहून अधिक अन्न खाण्यांत येतें. खाण्याचे पदार्थ थंडगार होतात आणि त्यामुळें ते पचावे तसे पचत नाहींत. जेवणें तें फार न बोलतां व न हसतां जेवणाकडे लक्ष्य ठेवून जेवावें; कारण असें न केलें तर घाईघाईनें जेवल्याचे जे दोष तेच येथेंही उत्पन्न होतात. अमुक पदार्थ आपणाला मानवतो कीं नाहीं याचा विचार करून तो खावा; कारण या गोष्टीचा विचार ज्याचा त्यानेंच केला पाहिजे. त्यांत दुसऱ्याची मदत किंवा मसलत कांहीं कामास येणार नाहीं.

सूक्ष्माः सद्गुरुसेवकैर्कविदिता ये वै चिकित्साक्रम-
प्रक्रांता अपि तत्र तत्र विषये नो विस्तराद्वर्णिताः।
ते धन्वंतरिरत्नकेऽत्र कलिताः प्रायो विचारा मया
यानालक्ष्य विदग्धतामनभवेन्मुग्धाऽपि लोकावलिः ॥



# पारिजात रत्न ४थें.

अंकोल- ग्राही, तिखट, स्निग्ध, विषदोष हरणारा, व शोधन करणारा आहे; त्याचें फळ थंड, कफहर, आणि पुष्टि करणारें आहे.

अगस्ता- थंड, रूक्ष, कडू, पित्तहर, कफहर, आणि पडसें व चातुर्थिक ताप यांचा नाश करणारा आहे.

अगरु- सुगंधि, तिखट, कडसर, वातहर, उष्ण, त्वचेला हितकर, आणि नेत्ररोग, कर्णरोग, वायु व कफ एवढ्यांचा नाश करणारा आहे.

अघाडा- तिखट, कडू, तीक्ष्ण, मस्तकाचें व मुखाचें शोधन करणारा, जठराग्नीला प्रदीप्त करणारा, रुचि आणणारा, व अर्श, शूळ, उदररोग, मेद व छातीचे रोग यांचा नाश करणारा असा आहे. तांबडा अघाडा-रूक्ष, शीतळ आणि फार करून वरल्या प्रमाणेंच त्याचे इतर गुण आहेत. त्याचें बीज-मधुर, जड, रूक्ष, रुधिरदोषाचा व पित्तजन्य व्याधींचा नाश करणारें आहे. काळा अघाडा विषदोष व त्वचादोष दूर करतो.

अतिविष- अति कडवट, जरासें उष्ण, ग्राही, पचन करणारें, ओकारींत, कफातिसारांत, आमांत, विषदोषांत आणि ज्वरांत उपयोगी आहे. हर्ष, सन्निपातादि रोग व बाळकाचा रोग यांचा नाश करतें.

**अफू**—मळावष्टंभ करणारी, कफहर, वायुनें व पित्तानें भर लेली, व मद, मोह यांस उपजविणारी आणि खऱ्या पुरुषत्वाचा नाश करणारी आहे.

**अभ्रक**—पांढरा, तांबडा, पिंवळा व काळा असा चार प्रकारचा आहे. हा मधुर, थंड, तुरट, आयुष्याची व वीर्याची वृद्धि करणारा, त्रिदोष हरणारा, आणि परमा, कोड, कृमिदोष, विषदोष व प्लीहा (कोठू) यांचा नाश करणारा आहे. औषधांत वापरावयाचा तो अभ्रक काळा असावा.

**अडुळसा**—कडवट, कास, श्वास, क्षय व ज्वर यांस हरणार, हृदयाला हितकर, हलका, थंड, व रुधिरदोषाचा नाश करणारा आहे.

**अळशी**— कडू, मधुर, स्निग्ध, पिकल्यावर तिखट, उष्ण, कफ व पित्त यांचा नाश करणारी आहे.

**अशोक**—कडू, ग्राही, तुरट, मधुर, पुष्टि देणारा, वर्ण चांगला करणारा, सुगंधि, गुप्त मांसा जोडणारा, आणि तृषा, दाह, कृमिविकार व विषदोष यांचा नाश करणारा असा आहे.

**अहाळिव**—वातहर, कफहर, मळ व रुधिरदोष यांस दूर करणारें, बळ देणारें, आणि पुष्ट करणारें असें आहे.

**अर्क (रुई)**—हिचे दोन भेद आहेत—एक पांढरी व एक तांबडी, दोनही जाती वातहारक, कृमिहारक, तीक्ष्ण, आणि अर्श व कफ यांचा नाश करणाऱ्या आहेत. रुईचा चीक—कृमिदोष, कोड व उदररोग यांस हरणारा आहे.

**आकाश वेल**—मलावरोध करणारी, स्निग्ध, तुरट, कडवट, डोळ्यांस हितकर, कफहारक, पित्तहारक, जठराग्नि प्रदीप्त करणारी व आमाचा नाश करणारी आहे.

**आंबेहळद**—वायुकारक, थंड, मधुर, पित्तहर, कडू, व खरजीचा नाश करणारी.

**आंबा**—कफहारक, ग्राही, व्रणाला हितकर, वातहारक, आणि रम्याला व रुधिर विकाराला दूर करणारा आहे. **हिरवें फळ** आंबट, रूक्ष, व रक्तदोष उत्पन्न करणारें आहे. **पिकें फळ** मधुर, वीर्यास वाढविणारें, व बळ देणारें आहे. **कोय**—कांहीशी आंबट असून, वांति, अतिसार व हृदयांत होणारी जळजळ यांस बंद करणारी आहे. चिरंबुटी (ह्मणजे अगदीं लहान फळ) तुरट, आंबट, व पित्तकर आहे.

**आलें**—मळाचा भेद करणारें, गुरु, तीक्ष्ण, उष्ण, तिखट, पिकलें असतां मधुर, रूक्ष, वायु व कफ यांस हरणारें, आणि जठराग्नीला प्रदीप्त करणारें आहे.

**आंवळा**—मधुर, आंबट, दृष्टीला हितकर, वीर्य वाढवणारा, दीर्घ जीवन देणारा, रुचि उत्पन्न करणारा, स्वराला हितकर, त्रिदोषहारक आणि वांति, व्रण, प्रमेह, सूज, शोष, मूत्रकृच्छ्र, जडता, तृषा, विषदोष, कोड, अतिसार आणि वाळंतरोग यांचा नाश करणारा आहे.

**आसंध**—बळ देणारा, रसायनरूप, तुरट, कडू, वीर्यवर्धक, आणि वातदोष, कास, श्वास, क्षय, शिबें व सूज यांचा नाश करणारा असा आहे.

**कचोरा**—तिखट, शीतवीर्य, सुगंधि, अजीर्ण नाहींसें करणारा, रुचिकर, जठराग्नीला प्रदीप्त करणारा, आणि कास, श्वास, अर्श, कोड, वायु, कफ व कृमि यांचा नाश करणारा आहे.

**कण्हेर**—कण्हेरीच्या तीन जाति आहेत—पांढरी, तांबडी व पिंवळी. त्यांपैकीं **पांढरी व तांबडी कण्हेर**—उष्णवीर्य, तिखट, खाल्ल्यास विषासारखी आणि कृमिदोष, कोड व व्रण यांस बरें करणारी आहे. **पिंवळी** कण्हेर—कडवट, तिखट, तुरट, हलकी, शोधन करणारी, आणि कफ, सूज, रुधिरविकार, व्रण व कोड यांचा नाश करणारी आहे.

**कर्टोलें**—रुचि उत्पन्न करणारें, शौचास साफ करणारें, रूक्ष, थंड आणि कफ, पित्त आणि मूतखडा यांचा नाश करणारें आहे.

**कदंब**—व्रण बरा करणारा, शीतळ, विषदोष व सूज नाहींशी करणारा आणि दूध वाढविणारा आहे.

**कांपल**—जीर्णज्वर, वातरक्त, रक्तगुल्म, उदररोग, व्रण, मूतखडा व प्रमेह यांचा नाश करणारा असून, रेचन, उष्ण, कडवट, कृमि, कुष्ठ आणि विषदोष यांस दूर करणारा, कफहारक आणि पित्तहारक आहे.

**कपुरी मधुरी, सारवा, श्वेत उपलसरी**—वीर्य वाढविणारी, मधुर, थंड, सुगंधी, आणि कोड, खरूज, विषदोष, घाम, ताप व दाह यांचा नाश करणारी आहे.

**कमळ**—थंड, मधुर, वर्णाला सुधारणारें, व रुधिरविकार, विस्फोटक, विसर्प, दाहा, तृषा पित्त व कफ यांचा नाश करणारें आहे. **पांढरें कमळ**—थंड, मधुर, कफ व पित्त यांचा नाश करणारें आहे. **तांबडें व श्याम कमळ** याहून जरा कमी गुणांचें आहे.

**कमळकाकडी**—कडवट, तुरट, गोड, जड, मलावरोध करणारी, वीर्यवृद्धि करणारी, बळ देणारी, आणि रुधिरविकार, दाह व पित्त यांचा नाश करणारी आहे.

**करंज**—चामडीचा दोष, मूळ व ज्वर हरणारा, भेद करणारा व तिक्त आहे. त्याचें फळ कृमिज, कोड आणि विसर्प यांस जिंकणारें आहे. व त्याच्या तेलाचे गुणही तसेच आहेत.

**करवंद**- अत्यंत उग्र, रुचिकर, तृषा, आंबट देकर आणि पित्त यांस जिंकणारें आहे.

**कस्तूरी**—सुगंधी, डोळ्यांस हितकर, चर्माचें शोधन करणारी, आणि मुखरोग, तृष्णा, ओकारी, उश्वास आणि वात यांचा नाश करणारी आहे.

**कापशी**- मधुर, उष्ण, व वातहर आहे.

**कापूर**—तिक्त, कटु, सुगंधी, शीतल, कोमल, डोळ्यांस हितकर, रुक्ष, लघु, वीर्यवृद्धि करणारा आणि प्रमेह, कृमिरोग, गलरोग, कर्णरोग, नासारोग, मुखरोग, क्षयरोग, उदररोग तृषा व मूत्रकृच्छ्र यांचा नाश करणारा आहे.

**कायफळ** तुरट, कडवट, तिक्त, आणि मुखरोग, कास, श्वास व ज्वर यांचा नाश करणारें आहे.

**कारलें** कडवट, व कफ, वात, रुधिरविकार, परमा, ताप व पांडुरोग यांस हरणारें आहे.

**काव ( मानकाव )**—ही वर्णाला सुधारणारी असून कषाय, नेत्रास हितकर व कफाचें शोधन करणारी आहे.

**काम (कमई)**—पाकावस्थेंत गोड, थंड, कडवट, मधुर, आणि मूत्रकृच्छ्र, रुधिरविकार, आणि पित्तजन्य रोग यांचा नाश करणारा आहे.

**काळें जिरें**—रुक्ष, तीक्ष्ण, उष्ण, तिखट, अग्नीला प्रदीप्त करणारें, वातहारक, कफहारक, वीर्यवृद्धिकर, बळ देणारें आणि डोळ्यांस हितकर असें आहे.

**काळीपाठ**—हलकी, तिखट, व कफ, पित्त, शूळ, ज्वर आणि अतिसार यांस हाणणारी आहे.

**कारवी**—रुचिकर, कडवट, मलशुद्धि करणारी, आणि अर्श, आम, विषदोष व व्रण यांचा नाश करणारी आहे.

**काकडशिंगी**—कषाय, कडवट, उष्ण, आणि कफ, वात, कास, श्वास, उचकी व ज्वर यांस हरणारी आहे.

**काळा भोपळा**—वीर्याची वृद्धि व पुष्टि करणारा, जड, आणि रुधिरविकार, पित्त व वायु यांचा नाश करणारा आहे.

**कांदा**—वाताला जिंकणारा, पुष्टि देणारा, गुरु व रुधिरविकार उत्पन्न करणारा आहे. **पांढरा कांदा**—याचा रस व पाकावस्थेंत मधुर व पुष्टि देणारा आहे.

**कांकडी**—रक्तपित्त आणि ओकारी यांस हरणारी व मूत्रास आणि बस्तीला शोधणारी आहे. पिकलेली पित्तकारक व वायुला व कफाला हरणारी आहे.

**कांग**—ग्राही, कषाय, शीतळ, कडवट, आणि दाह, पोटशूळ, मुखाची दुर्गंधी, रक्तपित्त व ज्वर यांस हरणारे आहेत.

**कांटे आशरी**—कडवट, मधुर, केश रंगविणारी, उष्ण, कफहर, वातहर, स्निध, आणि रक्तपित्ताचा नाश करणारी अशी आहे.

**किराईत**—कडू, शीतळ, लघु, रूक्ष, कफ, पित्त, कास, ज्वर आणि श्वास यांस हरणारा आहे.

**कुसुंब**—कफहारक, आणि रक्तपित्त व मूत्रकृच्छ्र यांचा नाश करणारा आहे.

**कुळिथ**-दाह, पित्त आणि रुधिर यांस उत्पन्न करणारे, पाकावस्थेंत तुरट, तिखट, आणि कास, श्वास, उचकी, मूतखडा इत्यादि रोगांचा नाश करणारे आहेत.

**कुकडवेल**—ओकारी करणारी आणि ज्वर, कास, श्वास व कफ यांस हरणारी अशी आहे. तिचें फळ मळ बाहेर काढणारें, कडू, आणि क्रमी, शूळ व अर्श यांचा नाश करणारें आहे.

**कुंद**-स्वादिष्ट, जड, रूक्ष, उष्णवीर्य, तिखट, आणि कामला, मूत्र, क्रमि, तमक, श्वास यांचा नाश करणारा आहे.

**कुमुदिनी** - मधुर, रूक्ष, गुरु, लवण, आणि रुधिरविकार, पित्त व कफ यांचा नाश करणारी आहे.

**कुवाड (टाकळा)**-लघु, मधुर, रूक्ष, हृद्य, शीतल, त्रिदोषहर, आणि वायटा, क्रमि, कोड, व श्वास यांस नाहींसीं करणारा आहे. त्याचें फळ उष्ण, तिखट, आणि खरूज, कोड, गोळा, खोकला, क्रमिदोष आणि श्वास यांचा नाश करणारें आहे.

**कुड्याची माळ**-तिखट, आणि प्लीहा, कफदोष, अर्श व पित्तातिसार यांचा नाश करणारी आहे.

**कुटकी**-भेद करणारी, रूक्ष, कडवट, पाकावस्थेंत तिखट, हलकी, कफ पित्त आणि ज्वर यांची पीडा दूर करणारी, कंठाचें शोधन करणारी, जठराग्नीला प्रदीप्त करणारी, हृदयाला हितकारक आणि कास, श्वास, रुधिरविकार, प्रमेह आणि दाह यांचा नाश करणारी अशी आहे.

**कुचला**-कडू, थंड, वायुहारक, व मळावरोध करणारा असून रुधिरविकार दूर करतो.

**केवडा**—सुगंधी, मधुर, हलका, कडवट, तिखट, आणि

कफहर असा आहे. **पिंवळा केवडा**—कडवा असून डोळ्यांस हितकर आहे

**केशर**—तीक्ष्ण, वर्णाला हितकर, सुगंधी, तिखट, कफ व वात यांस हाणणारें, आणि व्रण, वमन व चामखीळ यांचा नाश करणारें आहे.

**केळ**—मधुर, शीतल, पित्तहारक आणि मृदु आहे. तिचें **फळ**—स्वादिष्ट, रक्तपित्ताला हरणारें, रुचिकर, पुष्टि देणारें आणि गुरु आहे.

**कोरफड**—डोळ्यांस हितकर, पुष्टिकारक आणि वृषणवृद्धि, कोड, रुधिरदोष, विष यांचा नाश करणारें आहे.

**कोकंब—आंबट कोकंब**—उष्ण व वायूचा नाश करणारें आहे. **पिकलेलें कोकंब**—हलकें, तुरट, रुचि उत्पन्न करणारें, आणि अर्श, हृद्रोग, वायुगोळा व तृषा यांचा नाश करणारें आहे.

**कोद्रू**—वायुकारक, मळावरोध करणारे, थंड आणि कफ व पित्त यांचा नाश करणारे आहेत.

**कोष्ट**—उष्ण, तिखट, मधुर, वीर्याची वृद्धि करणारें, कडवट, हलकें, वातहारक, कफहारक, व खोकला, रुधिरविकार, कोड आणि पिसर्प यांचा नाश करणारें असें आहे.

**कोळिस्ता**—वीर्यवृद्धि करणारा, कडवट, मधुर, थंड, आणि नेत्ररोग, अश्मरी ( मूतखडा ) व रुधिरदोष यांस हरणारा आहे.

**कोबी**—मधुर आणि वीर्याची वृद्धि करणारी आहे.

**कोहळा**—कोंवळा **कोहळा**—थंड, जड, आणि मळावरोध करणारा आहे. जून **कोहळा**—जठराग्नीला प्रदीप्त करणारा आणि वायूचा नाश करणारा आहे.

**कुहिली**–मधुर, स्वादिष्ट, पुष्टि देणारी आणि रुधिरविकार, वात व कफ यांस हरणारी अशी आहे.

**कंकोडी**–तिखट, हृदयाला हितकर, सुगंधी, कफ आणि वात यांस जिंकणारी अशी आहे. **वांझ कंकोडी**–विष, व्रण, कफ व वात यांस हरणारी आहे.

**कंकोळ**–पुष्टि देणारा, मधुर आणि रक्तपित्ताला हरणारा असा आहे.

**कवठ हिरवें**–मळावरोध करणारें, हलकें, तुरट व मळाला सरकाविणारें असें आहे. **पिकलेलें फळ**–गुरु असून, तृषा, वात आणि पित्त यांस दूर करणारें आहे.

**खजूर**–पुष्टिकारक, स्वादिष्ट आणि कृमि, व पित्त यांचा नाश करणारा आहे. मोठ्या खजुराच्याहून लहान्या खजुरामध्यें थोडे कमी गुण आहेत.

**खरखोडी** ( गोडी )–मधुर, स्निग्ध, शीतळ, त्रिदोषहारक, डोळ्यांस हितकर आणि बळ देणारी अशी आहे.

**खसखस**–मैथुनशक्तीची वृद्धि करणारी, बळ देणारी, गुरु, कफकारक आणि वाताला शमविणारी आहे.

**खडी साखर**–थंड, हलकी व मधुर असून रुधिरविकार, पित्त, तृष्णा, अतिसार व वात यांचें शमन करते.

**खरबूज**—जड, थंड, ग्राही असून, दृष्टीची शक्ति व वीर्य यांस हरणारें आहे. **पिकलें टरबूज**–पित्तकारक, वायुहारक, व कफहारक आहे.

**खारीक**—जाडी,—रुचिकर, गुरु, मधुर, पुष्टि देणारी, आणि वीर्य वाढविणारी आहे. *सुकी* **खारीक**—*रुधिरविकार, पित्त, दाह आणि मूर्च्छा यांस नाहींशी करणारी आहे.*

**खैर**—*रुचिकर, तुरट, कडू, थंड, दांताला हितकर, आणि मेद, कफ, कोड व गळ्याचा रोग यांस शमविणारा आहे.* **श्वेतसार** नांवाचा पांढरा **खैर**—वर्णाला हितकर व मुखरोग आणि रुधिरविकार यांस नाहींसा करतो. **दुर्गंधी खैर**—गरम, तुरट व मुखरोग, दंतरोग वगैरे यांचा नाश करतो.

**गजपिंपळी**—रोचन, दीपन, उष्ण, गुरु व गळ्याचा रोग, कृमि, वायु आणि कफ यांचा नाश करते.

**गोकर्ण**—पांढऱ्या किंवा काळ्या फुलांची अशी दोन प्रकारची आहे; ती शीतळ, कषाय, तिखट, कंठाला हितकर, त्रिदोषहर असून, कोड, मूत्ररोग, सूज, व्रण, व विषदोष यांचा नाश करते.

**गलतुरा**—मळावरोध करणारा, पिकल्यावर कडू असून, मूत्रघात, मूतखडा, योनिरोग व वातरोग यांचा नाश करतो.

**गळजिभी**—थंड, मळावरोध करणारी, वायुहारक, पित्ताचा व कफाचा नाश करणारी, हृद्य, हलकी, तुरट व कडू असून, ताप, खोकला, परमा, व व्रण यांचा नाश करते.

**गहूं**—जड, वीर्यवृद्धि करणारा, कफकारक, मळशुद्धि करणारा व बळ देणारा आहे.

**गाजर**—तीक्ष्ण, मधुर, कडू, उष्ण, मळावरोध करणारें असून, अर्श, कफ, वायु व संग्रहणी यांचा नाश करतें.

**गुळी**—केशांला हितकर, रेचक व कडू असून, व्रण, कोड, मस्तकरोग, उदररोग, उदावर्त आणि आमवायु यांचा नाश करते.

**गुळवेल**–अतिसार नाहींसा करणारी, बाळकाचे रोग दूर करणारी, कडू, त्रिदोषहारक, दीपन असून ज्वर, तृष्णा, दाह, कामळा, वातरक्त, मेद, रक्तपित्त व कृमि, कृच्छ्र यांचा नाश करते. आणि तुपाच्या अनुपानानें वाताला, गुळाच्या अनुपानानें पित्ताला, मधीच्या अनुपानानें कफाला आणि तेलासहित सुंठीच्या अनुपानानें आमवाताला शमविणारी आहे.

गुग्गुळ–वातदोष, कोड, आम, प्रमेह, मेद, कफदोष, सूज, नेत्ररोग, आणि दुष्ट व्रण यांस वश करतो, बळाची वृद्धि करतो व वीर्याला वाढवितो. जुना गुग्गुळ लेखन करणारा आहे. गुग्गुळ सेवन करणाऱ्यानें आंबट, तीक्ष्ण, कच्चें किंवा नासक्या पदार्थांचें सेवन करूं नये; तसेंच ऊन, मेहनत आणि मद्य यांचा त्याग करावा.

गुलाब–सुगंधी, हृद्य, शीतळ, लघु, वर्णाला सुधारणारा, मळशुद्धि करणारा, व वीर्यवृद्धि करणारा असून रुधिरविकार मोडतो.

गुंज–हिच्या दोन जाति, एक तांबडी व दुसरी पांढरी. दोनही जातींची गुंज–केशांला हितकर, तीव्र, विषसहित असून, कीलाश व उंदरी यांचा नाश करते.

गूळ–मधुर, मूत्राची व रक्ताची शुद्धि करणारा, स्निग्ध, वाताला हरणारा असून मेद, शुक्र व कफ यांचा नाश करतो. जुना गूळ अत्यंत गुणवान आहे. आणि शुद्ध केलेला गूळ स्वादिष्ट व वातरक्ताला हरणारा आहे.

गेळ–वांतिकारक, मधुर, कडवट, मळाला उकरून काढणारें, लघु, शरीराची शुद्धि करणारें असून, त्वग्रोग, वायु, कफ, व विष यांस शमवितें.

**गोखरू**—शीतळ, मधुर, जठराग्नीला प्रदीप्त करणारें, स्वादिष्ट, पुष्टि देणारें व वायूला जिंकणारें असून, मूत्रकृच्छ्र, उरोरोग, परमा, मूतखडा, कास व श्वास यांचा नाश करतें.

**गोरखमुंडी**—तिखट, गरम, हलकी, मधुर असून, पांडुरोग, योनिरोग, कोड, आणि गुदद्वारचा रोग यांचा नाश करते. **मोठी गोरखमुंडी**—हिचेही गुण वरील प्रमाणेंच जाणावे.

**गोरोचन**—थंड, स्वेदक्रियेमध्यें उपयोगी, डोळ्याला हितकर, कडू, तिखट असून कृमिदोष व विषदोष यांचा नाश करतें.

**गंगेटी**—स्निग्ध, मधुर, आयुष्यवृद्धि करणारी, मूत्रकृच्छ्र दूर करणारी, क्षतक्षीणास हितकर व बळ देणारी आहे.

**गंधक**—दीपन, तीक्ष्ण, दुर्गंध, आणि कृमिदोष, व कातडीचे विकार घालविणारा आहे.

**घगरा**—रसांत कडू, कफहारक, वातहारक, व वमन करविणारें आहे.

**घेवडा**—जड, थंड, पाकावस्थेंत मधुर व बळ देणारा असून वात व पित्त यांचा नाश करतो. **काळा घेवडा**—कफपित्ताला उत्पन्न करणारा, जड, उष्ण, जठराग्नीला मंद करणारा, व बद्धकोष्ट करणारा आहे.

**चणकखार**—पाकावस्थेंत तिखट, तुरट, थंड असें असून खरूज, व्रण, ओकारी, तहान, खोकला, व अरुचि यांचा नाश करणारें आहे.

**चतुरम्ल**—अम्लवेतस ( एक जातीचें लिंबू ), कोकंब, लांब, मोठें लिंबू आणि वाटोळें आंबट लिंबू हीं एकत्र केल्यानें चतुरम्ल

बनतें : त्याचे गुण, सदर पदार्थांचे जे गुणदोष त्या त्या सदराखालीं लिहिले आहेत तेच आहेत.

**चवळी**-मधुर, जड, तुरट, तृप्ति देणारी व बळ देणारी असून रुचि आणणारी आहे.

**चतुरूषण**-सुंठ, पिंपळी, मिरें, व पिंपळमूळ हे चारही पदार्थ एकत्र केल्यानें चतुरूषण बनतें. त्याचे गुण, "त्रिकटु" सारखेच आहेत.

**चवक**—रोचन, दीपन व उष्ण, गुरु व विशेषें करून गुदस्थानच्या व्याधींचा नाश करणारा आहे.

**चारवेल**-वातरक्ताला हरणारी, उष्ण, पुष्टि देणारी, मळ उसकटून साफ करणारी, बळ देणारी व सूजेचा नाश करणारी आहे.

**चारदाणे**—मेथी, अशेरी, काळेजिरें, आणि **जवाण हे** चारही पदार्थ एकत्र केल्यानें चारदाणे बनतात. यांचें चूर्ण नेहमीं सेवन केल्यानें अजीर्ण, शूळ, वातरोग व पोट फुगणें वगैरे विकार बंद होतात.

**चारोळे**-स्निग्ध व जड असून, **यांचें माल** मधुर, **पुष्टि** देणारें व पित्त आणि वात यांस हरणारें आहे.

**चित्रक**—दीपन, तिखट, हलका, पाचक, रूक्ष, उष्णवीर्य असून, क्षामदोष, अर्श, खोकला व कोड यांचा नाश करतो.

**चिबूड**-रूक्ष, मधुर व जड असून कफ व पित्त यांस **दूर** करणारें आहे. परंतु **पिकलेलें** चिबूड पित्तकारक व उष्ण आहे.

**चिमेड**-डोळ्यांस हितकर, कषाय व व्रण बरा करणारी **आहे.**

**चिली**—मधुर, पाकावस्थेंत तिखट, जठराग्नीला प्रदीप्त करणारी, रुचिकर, हलकी असून वीर्य वाढविते व बळ देते.

**चिंच—कच्चें फळ**—आंबट, पित्त वाढवणारें, आणि लघु आहे. **पिकें फळ**—मधुर, आंबट, भेदी, नाडीला पकडणारें, वाताला जिंकणारें, व ताहान, हिक्का, कृमिरोग आणि वांति यास दूर करणारें आहे.

**चीड**—उष्णवीर्य, दीपन करणारी व वातकफाला हरणारी आहे.

**चोपचिनी**—उष्ण, जठराग्नीला दीपन करणारी, मळमूत्राला साफ करणारी असून वातरोग, पोटफुगी, शूळ, बद्धकोष्ठ, अपस्मार व उन्माद यांचा नाश करते.

**चंपक**—कडू, तुरट, मधुर, तिखट, शीतळ, मनोहर व सुगंधी असून, कफ, पित्त, व विष यांस हरतो.

**चंदन**—कडवट, थंड, रूक्ष व पुष्टिदायक असून कास, श्रम, शोष, तृषा, रुधिरविकार, पित्त व दाह यांची शांति करतो.

**जटामांसी**—कडू, तुरट, मधुर, थंड, बळ देणारी व कोड, दाह, आणि विसर्प यांचा नाश करणारी आहे.

**जळजांबू**—रूक्ष, शीतळ, वायूला कोपविणारा व कोडाचा नाश करणारा आहे.

**जवखार**—लघु, सूक्ष्म, जठराग्नीला प्रदीप्त करणारा असून संग्रहणी, गुल्म, पांडु, प्लीहा, पोटफुगी, गळरोग, श्वास, अर्श, मूतखडा, मूत्रकृच्छ्र, कौलू, छातीचे रोग यांचा नाश करतो.

**जवाण**—जठराग्नीला प्रदीप्त करणारा, उष्ण, तीक्ष्ण आणि गुल्म व शूळ यांस बरा करणारा आहे.

**जवस**–मधुर, मळशुद्धि करणारा आणि ज्वर, ओकारी, कफपित्त व विसर्प यांस दूर करणारा आहे.

**जस्वनाचें फूल**–पंड व दृष्टीची मंदता नाहींशी करणारें आहे.

**जायफळ**–तीक्ष्ण, उष्ण, रुचिकर, जठराग्नीला प्रदीप्त करणारें, पित्तहारक, कफहारक असें असून, शिरोरोग, दुर्गंध, श्वास, कास, व हृदयाचे रोग यांचा नाश करतें.

**जायपत्री**–तिखट, स्निग्ध, तोंडाची रुच आणि मळशुद्धि करणारी, मधुर, गरम व रुचिकर असून, कास, श्वास, तृषा, विषदोष, व वांति यांचा नाश करते.

**जाई**–सुगंधी असून कफ, पित्त, रुधिरदोष, व्रण, व कृमिदोष यांचा नाश करते.

**जांभळी**–कषाय, मधुर, ग्राही असून वाताला कोपविते. तिचें फळ–जांभळें, वातुळ, ग्राही, स्वादिष्ट, अम्ल असून, कफपित्ताला जिंकतें. आणि **क्षुद्र जांभळ**–कषाय असून हृदयांत दाब देतें.

**जिरें** ( पांढरें ) तिखट, कफहारक, वातहारक, गंधाढ्य, रूक्ष, हलकें, डोळ्यांस हितकर असून, ओकारी व मळ यांस दूर करतें.

**जुई**–कडू, हलकी, पाकावस्थेंत तिखट, व रुधिरदोष, मुखरोग, नेत्ररोग, आणि दंतरोग यांचा नाश करणारी आहे. **पांढरी मोठी जुई**–रक्तपित्त, पिकलेला व्रण, कोड यांस बरी करते. **हिचें फूल**–डोळ्यास हितावह, सुगंधी, मनोहर, शीतळ, व खेदाचा नाश करणारें आहे.

**ज्येष्टीमध**–स्वादिष्ट, स्निग्ध, मधुर, व्रणाचें शोधन करणारी, रोपण करणारी, पुष्टी देणारी, स्वर व वर्ण यांस हितावह आणि तृष्णा, रक्तपित्त, विषदोष, रुधिरदोष, ओकारी यांचा नाश करते.

**झेंडू**–मधुर, पित्तहारक, गुरु, थंड, जठराग्नीला प्रदीप्त करणारा असून, कास, श्वास, ज्वर व कृमिदोष यांस दूर करतो.

**टांकणखार**—जठराग्नीला प्रदीप्त करणारा असून रुक्ष आहे.

**टांको**–वायुकारक, थंड, व गुरु असून, रुधिरविकार, श्वास व कफ यांचा नाश करणारा आहे.

**टेंभुरणी–कच्चें फळ**–वायुकारक, हलकें व थंड असून, मळावरोध करणारें आहे. **पिकलेलें फळ**–जड व मधुर असून परमा, रुधिरविकार व पित्त यांचा नाश करणारें आहे.

**टेटू**–ग्राही, दीपन करणारा, कफहारक, कोड दूर करणारा, जठराग्नीला प्रदीप्त करणारा आणि कषाय आहे.

**डिकेमाली**–कडू, गरम, च्छातीचे रोग व बद्धकोष्ट यांस दूर करणारी आहे.

**तळवणी**—थंड, कडवट, रुक्ष आणि जंतु, प्रमेह, व कफ यांस हरणारी आहे.

**तगर**–मधुर, स्निग्ध, व लघु असून वात, कफ, रुधिरदोष व विषदोष यांचा नाश करते.

**तमाल**—कषाय असून, दाह व विस्फोट यांचा नाश करतो. **त्याचीं पानें**-मधुर, उष्ण आणि वातरक्त, अरुचि व पडसें याचा नाश करतो.

**ताड**—कोड, कृमि, व रक्तपित्त यांचा नाश करणारा, रुचिकर व वीर्यवृद्धि करणारा आहे.

**तालीसपत्र**—तीक्ष्ण, उष्ण आणि वात, कफ व क्षय यांचा नाश करणारें आहे.

**तांदुळजाची भाजी**—रूक्ष, शीत, पाकावस्थेंत मधुर असून रक्तपित्ताला हरणारी आहे.

**तांदुळ** हलका, बळ देणारा, वर्ण चांगला करणारा, व पथ्यकर आहे.

**त्रिकटु**—सुंठ, पिंपळी व मिरीं या तिहींच्या एकत्र चूर्णास त्रिकटु, त्रूषण व त्र्योष असें म्हणतात. तें कास, श्वास व परमा यांस बरें करतें व जठराग्नीला प्रदीप्त करतें.

**त्रिफळा**-हरडा, बेहडा व आंवळकटी हीं एकत्र केल्यास त्याला हें नांव आहे. तो जठराग्नीला प्रदीप्त करतो, रुचि आणतो व कफ, पित्त, परमा, आणि कोड यांचा नाश करतो.

**तीळ**—काळे, पांढरे, व तांबडे असे तीन जातीचे आहेत. ते तिखट, कडवट, तुरट, मधुर, स्वादिष्ट, स्निग्ध, बळ देणारे व केशाला सुधारणारे आहेत.

**तुळस**—पांढरी व काळी अशी दोन जातीची आहे. दोन्ही जाति-तिखट, कडवट, जठराग्नीला प्रदीप्त करणारी व कोड, मूत्रकृच्छ्र, रुधिरविकार आणि दाह यांचा नाश करणारी आहे.

**तुरटी**—उष्ण व तुरट असून, कानकिरळी, कोड, व्रण यांस बरी करते.

**तुती–पिकलेली**–थंड व मधुर असून पित्त व वात याचें शमन करते. **कच्ची**–जड, आंबट, उष्ण व रक्तदोष उत्पन्न करणारी आहे.

**तेजबळ**–जठराग्नीची मंदता, विषदोष व कफदोष यांचा नाश करणारें असून उष्ण व रुचि आणणारें आहे.

**तोंडलें**–सौम्य असून कास, श्वास व ज्वर यांस हरतें.

**थोर**–उन्माद, उदररोग व प्लीहा यांचा नाश करतो.

**दशमूळें**–बृहत्पंचमूळें व लघुपंचमूळें अशीं मिळून दशमूळें होतात. त्यांचा काढा-त्रिदोषहारक असून वातरोग, शिरोरोग, कास, श्वास, व उचकी यांचा नाश करतो.

**दाळिंब**–अम्ल, कषाय, मधुर, वातघ्न, ग्राही, दीपन, स्निग्ध, उष्ण, व रुचिकर आहे.

**दर्भ**—त्रिदोषहर, मधुर, शीतळ, आणि मूतखडा, प्रदर व रुधिरदोष यांचा नाश करणारा आहे.

**दालचिनी**–हिच्या दोन जाति आहेत–एक जाडी व दुसरी-पातळ; जाड्या दालचिनी–कफहर, वातहर, तिखट, आणि हृद्रोग, अर्श, अरुचि, आणि कृमिरोग यांचा नाश करते. पातळ दालचिनी तिखट, सुगंधी, वीर्याला वाढविणारी आणि शोष, तृषा, वात व पित्त यांस दूर करणारी आहे.

**दुपारवेल**–लघु, मलावरोध करणारी, कफकर असून, वात-पित्ताला दूर करते.

**दुधे भोपळा**–कडू व गोड असा दोन प्रकारचा आहे. **गोड दुध्या**–जड व पुष्टिकारक आहे. **कडू दुध्या**–ताप, खोकला इत्यादिकांस बरा करतो.

**नरवेल**-कडवट, तिखट, तुरट व उष्ण असून सर्पविष, कोळी किड्याचें विष, विंचवाचें विष, उंदराचें विष, कृमिदोष, ताप, व व्रण यांचा नाश करतो.

**नखला** याच्या दोन जाति आहेत नखला व नखली (लहान नखला) या दोहोंचे गुण सुगंधी, व्रणाला भरणारा, तोंडाची दुर्गंधी नाहीशी करणारा, रुचकर व कोड हरणारा असा आहे.

**नागकेशर** कषाय, रूक्ष, उष्ण व लघु असून, त्वग्रोग, दाताची दुर्गंधी, ताप, ओकारी, तृषा, उचकी, व कोड याचा नाश करतें.

**नागरवेल** (विड्याचेंपान) तिखट, उष्ण व रेचक असून, मुखदुर्गंध, कफ व श्रम यांस हरतें.

**नारंगी**–सुगंधी, मधुर, अम्ल व रोचक असून विशद आहे. तिचें फळ वातहर व गुरु आहे.

**नारळ** गुरु, स्निग्ध, बळ व मांस देणारा, आणि बस्तीचें शोधन करणारा आहे. **जुना नारळ** जड व बद्धकोष्टकर असून, दाह व पित्त उत्पन्न करणारा आहे.

**नागरमोथा**–ग्राही, कडवट, कफहारक.

**निगड**–दोन जाति-काळ्या फुलांची व पांढऱ्या फुलांची. दोहींचे गुण–कडवट, कषाय, हलकी, तिखट, डोळ्यास हितावह असून, कोड, कृमिदोष, अरुचि, व ताप यांचा नाश करते.

**निशोत्तर**–पांढरी, काळी व तांबडी अशी तीन प्रकारची आहे. **पांढरी**, उष्ण, रूक्ष, मधुर व रेचक असून, वात, पित्त, ताप, उदररोग व सूज यांचा नाश करते. **काळी**–अतिरेचक असून, मूर्च्छा, दाह, भ्रम, व मद यांचा नाश करते. **तांबडी**–कफ व कृमि दोष यांस हरणारी असून, रूक्ष, मधुर, रेचक आणि हृद्रोग व गुदा-रोग यास दूर करते.

**पळस**–जठराग्नीला प्रदीप्त करणारा, वीर्याला वाढविणारा, तिखट, कडू, उष्ण, व तुरट आहे. त्याचें **फूल**–मधुर व गंधरहित आहे. त्याचें **बीज**–स्निग्ध आणि कृमिदोष आणि कफाला नाहींसें करणारें आहे.

**पद्मिनी**–सुगंधयुक्त, रूक्ष, शीतळ, वायुकारक, आणि पित्त, रुधिरविकार, व कफ यांचा नाश करणारी आहे.

**पडवळ**–पाकदशेंत तिखट, पुष्टि देणारें, रुचिकर, कफ व पित्त यांस नाशणारें, स्वादिष्ट व त्रिदोषहारक आहे.

**पाताल तुंबडी**–कफ व पित्त यांस हरणारी आणि वीर्याची वृद्धि करणारी आहे.

**पारस पिंपळी**–स्निग्ध, तुरट, मधुर व वीर्याची वृद्धि करणारी आहे.

**पादेलोण**–खारट, कफाला वर आणणारें, वायूला अधोगत करणारें, जठराग्नीला प्रदीप्त करणारें, व शौचास साफ करणारें असें आहे.

**पाषाणभेद**–तुरट व कडवट असून, मुतखडा, मूत्रकृच्छ्र, योनि-रोग, प्रमेह, कवळू, हृद्रोग, व्रण आणि शूळ यांचा नाश करितो.

**पिठवणी**–स्थिरगुणाची असून पित्त, कफ आणि अतिसार यांस दूर करते.

**पिवळा चंदन** सुगंधी असून सुरमे वगैरे यांचा नाश करणारा आहे.

**पित्तपापडा** कफ, पित्त, तृषा आणि ज्वर यांस दूर करतो.

**पिलु**– ( लघु पिलु ) आंबट, पाकदशेंत तुरट, थंड, व लघु असून कफ, पित्त, रक्तविकार आणि कंठरोग यांचा नाश करिते. **मोठी पिलु** त्रिदोषहर, स्वराला सुधारणारी, कडू, वीर्यवर्धक व नेत्राला हितकर अशी आहे.

**पिंपळी** ( गजपिंपळी ) जठराग्नीला प्रदीप्त करणारी, वीर्य वाढवणारी, पाकावस्थेंत मधुर, तिखट असून वात, कफ, उदररोग, ताप, परमा, अर्श, शूळ, कास, श्वास यांस दूर करते.

**पिंपळमूळ** भेदन, दीपन, तीक्ष्ण, उष्ण, रूक्ष, रुचिकर, व पित्त कोपविणारें असें असून, श्वास, क्षय व कृमि यांचा नाश करतें.

**पिंपळ** शीत, कषाय, रूक्ष, वर्ण सुधारणारा असून, रक्तपित्त आणि कफ यांचा नाश करतो.

**पुष्करमूळ** तिखट, व कडवट असून, उचकी, श्वास, कास व कुशीतील शूळ यांस दूर करतें.

**पंचवल्कल** वड, पिंपळ, पारोसा पिंपळ, उंबर व पिंपळी या पांच वृक्षांच्या साली एकत्र केल्या असतां त्या मिश्रणास पंचवल्कल असें म्हणतात. त्याचा गुण–ग्राही, लघु, आणि कषाय असा आहे.

**पंचाम्ल**-अम्लवेतस, कोकम, लांब मोठें लिंबू, वाटोळें आंबट लिंबू, आणि महाळुंग ह्या पांचाच्या मिश्रणास पंचाम्ल असें ह्मणतात. त्याचे गुण त्या त्या पदार्थांच्या लिहिलेल्या गुणांवरून जाणावे.

**फणस**-स्निग्ध, शीतळ, तृप्तिकर, मांस आणि बळ यांस वाढविणारा असून, वायु, व्रण आणि रक्तपित्त यांचा नाश करतो. **कच्चें फळ**-तुरट व गुरु असून, वायु आणि दाह उत्पन्न करितें.

**बचनाग**-( पांढरा ) कोड, दुष्टव्रण, अर्श व विषदोष यांस हरतो ; पण तो स्वतः विषरूप आहे.

**बकुळ**-( फूल ) सुगंधी, मधुर स्निग्ध असून, दांत बळकट करणारें आहे.

**बट मोगरा**-लघु, कडवट व थंड असून, रुधिरविकार दूर करतो.

**बटाटा**-मधुर, थंड, गुरु, रूक्ष व बळप्रद असून रक्त दोष दूर करतो.

**बदाम**-स्निग्ध, वीर्यवर्धक असून, वातहारक आहे. त्याचा गर्भ-वीर्यकर आणि मधुर आहे.

**बहुफळी**-कडवट, तीक्ष्ण, उष्ण, कफहर असून, छातीचे आणि मूत्राशयाचे रोग, अर्श आणि कृमिविकार यांचा नाश करिते.

**बळदाणा**-पुष्टिकारक, वीर्यवर्धक, वातहारक आहे. ( **मोठा बळदाणा** ) त्रिदोषहर असून विषम ज्वर दूर करतो.

**बडिशेप**-कफहर व वातहार असून, शूळ, प्रमेहातिसार, मंदाग्नित्व, योनिशूळ व कृमिदोष यांचा नाश करते.

**बीही**—पथ्यकर, मृदु, गुरु, मधुर, शीतळ, असून ताप, हृद्रोग, रुधिरविकार व उदावर्त यांचा नाश करतो. त्याचें **फळ**—मधुर, बळ देणारें, रुचिकर व मळशुद्धि करणारें असून वात, पित्त, व आम यांस जिंकितें.

**बाभळ**—ग्राही असून, कोड, कृमिविकार आणि विस्फोट दूर करितें.

**बावची**—कडवट, मधुर, पाकावस्थेंत तिखट, उग्रगंधी, रुची-कर, केशवर्धक असून, कोड, व्रण, मूत्र, कास, श्वास यांचा नाश करते.

**ब्राम्ही**—मंद, आयुष्य देणारी, बुद्धिवर्धक, कषाय, कडवट व लघु आहे.

**बिवबा**—पाचक, तीक्ष्ण, तुरट, पाकावस्थेंत तिखट, जठरा-ग्नीला प्रदीप्त करणारा, वीर्यवर्धक असून, कृमिदोष, उदररोग, मूत्र व पोटफुगी यांस दूर करतो.

**बेल**—(मूळ) मधुर, लघु, त्रिदोषहर असून वांतीला शमवितें. (कच्चें फळ) स्निग्ध, ग्राही, दीपन असून, वाताला व कफाला दूर करतें. (पिकलेलें फळ) मधुर व गुरु असून दाह, वात, पोटफुगी यांस दूर करितें.

**बेहडा**—कषाय, पाकावस्थेंत मधुर, रूक्ष व उष्ण असून, डोळे व स्वर यांस हितकर व कृमि व खोकला यांचा नाश करतो.

**बोर**—(पिकलेलें) गोड, (मोठें बोर) शीतळ, शौचास करणारें, जड, वीर्यवर्धक असून पुष्टि देतें. पिकलेलें व लहान बोर मळावरोध करणारें, उष्ण, रुचिकर आणि जड आहे. **चणेबोर** आंबट, स्निग्ध, किंचित गोड असून, वात आणि पित्त यांचा नाश

करतें. सुकलेलीं सर्व प्रकारचीं बोरें–अग्नीला प्रदीप्त करणारीं व हलकीं असून, ग्लानि, रुधिरविकार आणि तहान यांचा नाश करतात.

**बोलसरी**–(बकुलवृक्ष) लहान व मोठी अशी दोन प्रकारची. त्यांत **लहानीचे गुण**–तुरट, व पाकावस्थेंत तिखट असून, शिर्बे, कोड, कृमिदोष, दंतरोग यांचा नाश करिते. **मोठी**–कडवट, तिखट असून, योनिशूळ, तृषा, दाह आणि रुधिरविकार यांचा नाश करते.

**बोळ**–अतिउग्र, शोधन करणारा व कफ हरणारा आहे.

**भारंग**–तिखट, कडवट, रुचिकर, लघु, तुरट, जठराग्नीला प्रदीप्त करणारी असून, कफ, वात, उचकी, खोकला, रुधिरविकार आणि ताप यांस हरणारी आहे.

**भांग**–कफहर, बद्धकोष्ट करणारी, हलकी, पित्तकर असून मोह, बहुभाषित्व आणि उन्मत्तपणा यांस उत्पन्न करते.

**भुईरिंगणी**–हिचे उभी व बैठी असे दोन प्रकार आहेत. त्यांपैकीं **उभी रिंगणी**–तिखट, कडवट, उष्ण, मळावरोध करणारी असून, दांतांचा व तोंडाचा विरसपणा, अरुचि, ताप, कोड, व शूळ यांचा नाश करते. **बैठी रिंगणी**–कडवट, जठराग्नीला प्रदीप्त करणारी असून, पडसें, श्वास, व छातीचे रोग यांचा नाश करते. दोहों प्रकाराच्या **रिंगणीचीं** बोंडें लघु, जठराग्नीला प्रदीप्त करणारीं असून, खोकला, कृमिरोग, ताप व खरूज यांचा नाश करतात. बैठ्या भुईरिंगणीची पांढऱ्या फुलांची एक जात आहे, तिचे गुण बैठ्या रिंगणीचे गुणासारखे जाणावे. पण तिचा विशेष गुण हा आहे कीं ती स्त्रियांच्या गर्भाचें रक्षण करणारी आहे.

**भूर्जपत्र**–तुरट असून, पित्त, रुधिरविकार, व कर्णरोग यांचा नाश करणारें आहे.

**भोकर** थंड, स्वादिष्ट व रुक्ष आहे.

**महाळुंग**- कंठाचें शोधन करतें : आंबट व लघु असून, कास, श्वास, अरुचि, तृष्णा यांस दूर करितें.

**मका**-तुरट, कफहर, पित्तहर, आणि मळावरोध करणारा आहे.

**मठ**-पाकावस्थेंत मधुर व वायुकारक असून, कफपित्त, ताप, शौचास फार होणें यांचा नाश करणारा आहे.

**मध**-हलकी, मधुर, थंड, रुक्ष, डोळ्यांस व स्वरास हितावह, जठराग्नीला प्रदीप्त करणारी, शरीरांत कोमळता उत्पन्न करणारी असून, कास, श्वास, कोड, अर्श, रुधिरविकार, प्रमेह, कृमिदोष, व क्षय यांचा नाश करतें.

**मनशीळ**-तिखट, कडवट, लेखन असून, कास, श्वास, रुधिरदोष, विषदोष, व कफ यांचा नाश करतो.

**मरवा** कषाय, तीक्ष्ण, उष्ण, लघु, सुगंधी, वातहारक-कफहारक व रुचिकर आहे. **पांढरा मरवा**-तिखट, उष्णवीर्य, रुचिकर असून, मुख व जीभ यांस सुगंधित करतो.

**मसूर**-पाकावस्थेंत मधुर, बद्धकोष्ठ करणारी, थंड व हलकी असून, पित्त व ताप यांस दूर करते.

**माहुली**-मोहाचीं फुलें-हृद्य, मधुर, गुरु, नस्य करण्याला योग्य, वीर्यवर्धक व बळ देणारीं आहेत.

**मालकांकणी**-तिचीं फळें, कडवट, तिखट, उष्णवीर्य, जठराग्नीला प्रदीप्त करणारीं व बुद्धिवर्धक असून, कफाला व वाताला हरणारीं आहेत.

**माका**-डोळ्यांस हितकारक. केशास काळे करणारा. रूक्ष. उष्ण, रसायनरूप व बळ देणारा आहे.

**मिरीं, हिरवीं मिरीं**-पाकावस्थेंत मधुर, तिखट, स्वादिष्ट व गुरु आहेत. **सुकीं मिरीं**-पित्ताला कोपविणारीं. तीक्ष्ण. उष्ण. रोचन, दीपन असून, वात व कृमिदोष यांचा नाश करतात.

**मुरमांसी**-थंड, मधुर, हलकी. कषाय. वर्णाला चांगला करणारी असून, ताप, खोकला व कोड यांस बरें करते.

**मुसळकंद**-मधुर, कडवट, रसायनरूप, जड. वातहर. उष्णवीर्य, पुष्टिदायक. वीर्यवर्धक व गुदरोगाचा नाश करणारा आहे.

**मुळा**-गुरु, तीक्ष्ण, पाकावस्थेंत व रसानें. तिखट व उष्णवीर्य आहे.

**मुरुडशेंग**—वायूला कोपविणारी असून. कास. श्वास. नेत्रशूळ, व व्रण यांचा नाश करते.

**मूग**-हलका, रूक्ष. बद्धकोष्ठकर, डोळ्यांस हितकर, व ताप नाहींसा करणारा आहे. **रानमूग**-कषाय. मधुर. पुष्टिकारक. बद्धकोष्टकारक असून, ताप. दाह, आणि अर्श यांचा नाश करतो.

**मेण**-व्रण, विसर्प, कुष्ठ, व वातरक्त यांचा नाश करतें.

**मेथी**-वातहर, कफहर व ताप काढणारी आहे.

**मोगरा**-शीतवीर्य, स्वादिष्ट, कषाय. कफ व वायु यांस कोपविणारा, सुगंधि व पित्ताचा नाश करणारा आहे.

**मोगरी**-शीतळ, हलकी, आणि कफ, पित्त, शिरोरोग आणि विषदोष यांचा नाश करणारी आहे. **तिचें फूल**-मनोहर व अत्यंत सुगंधयुक्त आहे.

**मोचरस**–कषाय, स्निग्ध, तुरट, व वीर्यवर्धक आहे.

**मोरचूत**–पाकावस्थेंत तिखट, डोळ्यांस हितावह, कषाय व विषरूप आहे.

**मोरवेल**–जड, मधुर, मळाला उत्पन्न करणारी असून, पित्तरक्त, तृष्णा, दाह, शोष, प्रमेह, छातीचा रोग, व पित्त यांस हरणारी आहे.

**मोहरी** मोहरी व काळी मोहरी असे हिचे दोन भेद आहेत. **दोहोंचे** गुण जठराग्नीला प्रदीप्त करणारी, तीक्ष्ण व उष्ण असून खरूज, कृमि, कोड, पित्त, व कफ यांचा नाश करते.

**मंजिष्ठ** स्वराला हितकर, वर्ण सुधारणारा, मधुर, तुरट, कडवट असून, कोड, शोफ, पडसें, सूज, योनिरोग, नेत्ररोग, कान किरळी, प्रमेह व व्रण यांचा नाश करतो.

**रतवेल**–वीर्यवर्धक, नेत्राला हितावह, रूक्ष, तुरट, थंड असून, रक्तपित्त, अतिसार व दाह यांचा नाश करते.

**रक्तचंदन**–शीतळ लघु, मधुर, कडवट, नेत्राला हितावह, वीर्यवर्धक असून, ओकारी, तृषा, रुधिरदोष, पित्त व ज्वर यांचा नाश करतो.

**रताळें**–स्निग्ध, बळ देणारें, बद्धकोष्ट करणारें व जड आहे.

**रसवंती**—दारुहळदीचा काढा करून त्यांत तितकेंच दूध घालून तो कढवावा, तीन चतुर्थांश उरला म्हणजे त्याला रसवंती किंवा रसांजन असें म्हणतात. त्याचे गुण–डोळ्यांस हितावह, कषाय, मधुर, गर्भाची वृद्धि करणारा असून, रक्तपित्त, विषदोष, ओकारी, उचकी, व प्रदर यांचा नाश करतो.

**राजगिरा**—रूक्ष, हलका, थंड, वायुवर्धक असून, रुधिरदोष, पित्त, व कफ यांस दूर करतो.

**राण**—राण वृक्षाचें फळ-वीर्यवर्धक, जड, थंड, स्निग्ध, बळ देणारें असून, रुधिरविकार, मद, मूर्च्छा, व तृषा यांचा नाश करते.

**रास्ना**—उष्ण, कडवट, गुरु, पचविणारा असून, वात, कफ, सूज, खोकला, श्वास, उदररोग, शूळ व रुधिरविकार यांचा नाश करतो.

**राळ**—थंड, जड, कडवट, कषाय, बद्धकोष्ठकर असून, रुधिरविकार, ताप, कानकिरळी, कोड, व्रणवशूळ यांचा नाश करते.

**रिठा**—त्रिदोष हरणारा, आणि गर्भाला पाडणारा आहे.

**रिंगणी**—स्वादिष्ट, तीक्ष्ण, जठराग्नीला प्रदीप्त करणारी, उष्ण असून, वात, कफ, श्वास व कास यांस शमविते.

**रूपामुखी**—नेत्राला हितावह, वीर्यवर्धक, पाकावस्थेंत मधुर, असून कोड, उदररोग, पांडुरोग व विषदोष यांचा नाश करते.

**रोहिडा**—वातरक्त, प्लीहा, गुल्म, व उदररोग यांचा नाश करतो. **रगतरोहिडा**—रुचिकर, रक्त शुद्ध करणारा, व शीतळ असून कृमीचा नाश करतो.

**रोहिष**—( रोशेल गवत ) कषाय, विरस, कासाचा नाश करणारा, लघु व उग्र आहे. त्याचा **भूतृण** म्हणून एक भेद आहे, **त्याचे गुण**—कडवट, तिखट, उष्णवीर्य, जठराग्नीला प्रदीप्त करणारा, व नेत्राला हितावह आहे.

**लवण—कृत्रिम**—जठराग्नीला प्रदीप्त करणारें, रेचक, खारट, कफकर, व वाताला हरणारें आहे.

**लवाळा**-सुगंधी, मनोहर, कडवट, हलका, थंड, व त्रिदोषहर असून, कर्णरोग, नेत्ररोग, व मुखरोग यांचा नाश करतो.

**लवंग**—तिखट, पाचक, वातपित्ताला हरणारी, हृदयाला हितावह व विषरोगाचा नाश करणारी आहे.

**लसूण**—तिखट, उष्णवीर्य, बळ देणारी, कृमीचा नाश करणारी, रसायनरूप, व हाडाला सांधणारी आहे. लसूण खाणारानें श्रम, क्रोध, ऊन, फार पाणी, दूध व गूळ यांचा त्याग करावा.

**लाजाळू**—तुरट, कडवट, व थंड असून, रक्तपित्त, अतिसार, व योनिरोग यांचा नाश करते.

**लाख**—कषाय, कफहर, रंग चांगला करणारी अशी असून, रुधिरविकार, व कृमिदोष यांचा नाश करते.

**लिंबू**-**आंबट लिंबू** पाचक, तीक्ष्ण, गुरु, व काहींसें आंबट असून तृषा, शूळ, कफ, ओकारी व कृमिदोष यांचा नाश करते. **साखर लिंबू**-अरुचि, तृषा, रुधिरविकार, पित्त व सर्पाचें विष यांचा नाश करतें. **वाटोळें आंबट लिंबू**-जठराग्नीला प्रदीप्त करणारें व हलकें आहे.

**लोध्र** नेत्रांस हितावह, कषाय, ग्राही, व रूक्ष असून, कफ, पित्त, रुधिरदोष व अतिसार यांस दूर करतें.

**वड**-शीत, कषाय, स्तंभन, रूक्ष, गुरु, वर्ण चांगला करणारा असून, दाह, व्रण, कानकिरळी, व योनिरोग यांस शमवितो.

**वरधारा**-तीक्ष्ण व उष्णवीर्य असून, कफ, आमवात व मूत्र यांचा नाश करते.

**वंशलोचन**–कषाय, मधुर, व रूक्ष असून, वीर्याला वाढवितें, बळ देतें व कास, श्वास, व क्षय यांचा नाश करतें.

**वाटाण**–मधुर, रूक्ष व थंड आहे.

**वायवर्णा**–कडवट् असून, कृमिरोग, मूतखडा व वातशूळ यांचा नाश करतो.

**वाराहीकंद**–रसानें व पाकावस्थेंत तिखट, उष्णवीर्य, पुष्टि-दायक असून, कफ, प्रमेह, कोड, आणि कृमिदोष यांचा नाश करतो.

**वाल**–रूक्ष, मधुर, पाकावस्थेंत, आंबट, व रेचक आहे.

**वावडिंग**–रूक्ष, उष्ण, व कडवट असून, वात, कफ कृमि रोग व उंदिराचें विष यांस बरें करतें.

**वाळा**–शीतळ, रूक्ष, हलका व जठराग्नीला प्रदीप्त करणारा असून, ओकारी, तृष्णा, कानकिरळ व अरुचि यांस दूर करतो. **काळा वाळा**–शीतळ असून, विषदोष, रुधिरदोष, रक्तपित्त व दाह यांची शांति करणारा आहे.

**विकळ**–स्वादिष्ट व दीपन असून, कामळा व रुधिरविकार यांस दूर करतो.

**विदारीकंद**–शीतळ, पुष्टि देणारा, मधुर, स्निग्ध, रक्तपित्ताला हरणारा, दुधाची व वीर्याची वृद्धि करणारा, स्वर व वर्ण यास चांगलें करणारा, बळ देणारा, रसायनरूप, व वाताची शांति करणारा आहे.

**वेळूवेल**–स्निग्ध, थंड, वीर्यवर्धक, बळ देणारी व रुचिकर असून, वायु आणि पित्त यांस दूर करिते.

**वेखंड**—तिखट, दीपन करणारें, बुद्धिवर्धक असून, कफ, वात, शूळ, पोटफुगी, उन्माद, कृमिदोष व वायु यांचा नाश करतें. **खुरासानी वेखंडाचेंही** हेच गुण आहेत. वाताचा नाश करण्याचा पराक्रम यास अधिक आहे.

**वेत**—शीतळ असून, दाह, अर्श, रुधिरविकार व योनिरोग यांचा नाश करतो.

**वेलची**—हिच्या दोन जाति-एक लहान व दुसरी मोठी. लहानीचे गुण—रसानें तिखट, हलकी, थंड, वातहर, कफहर आणि कास, श्वास, अर्श व मूत्रकृच्छ्र यांचा नाश करणारी असे आहेत. मोठी वेलची रसानें व पाकानें तिखट, जठराग्नीला प्रदीप्त करणारी, उष्ण, रूक्ष, हलकी आणि छातीचे रोग, मुखरोग, शिरोरोग, वांति व खोकला यांचा नाश करणारी आहे.

**वेळूवंश**—मधुर, कषाय, शीतळ, मळाला उकरून काढणारा, व मूत्राशयाला शुद्ध करणारा असून, कफ, पित्त, रुधिरदोष, कोड, व्रण, व सूज यांचा नाश करतो.

**शंखावळी**—कडवट, स्वादिष्ट, रेचक व वीर्यवर्धक असून कोड, कृमिदोष, व विषदोष यांचा नाश करते.

**शतावरी**—हिचे शतावरी व महाशतावरी असे दोन भेद आहेत. त्यापैकीं शतावरीचे गुण—कडवट, पुष्टिदायक, नेत्रांस हितावह व स्वादिष्ट असून, वातपित्ताचें हरण करते. **महाशतावरी**—बुद्धिवर्धक व शीतवीर्य असून, संग्रहणी, अर्श व नेत्ररोग यांस दूर करते.

**शरपुंखा**—हलका, कषाय व कडवट असून, प्लीहा, कोड, कास व श्वास यांचा नाश करतो.

**शांमा**—रूक्ष असून, वायु, कफ व पित्त यांस हरते.

**शिलाजित**–कडवट, शीतवीर्य,सुगंधी, कफहर व वातहर आहे.

**शिलारस**—सुगंधी, कडवट, तिखट, वीर्यवृद्धिकर, व स्वराला हितावह असून कोड व रुधिरविकार यांचा नाश करतो.

**शिवणी**—स्वादिष्ट, कडवट व केशवर्धक असून, रक्तपित्त, ज्वर व वातरक्त यांचा नाश करते.

**शिरस पांढरा**—कांहीसा उष्णवीर्य, कफहर व वातहर असून, तांबडा–स्निग्ध, तीक्ष्ण, उष्ण व तिखट आहे.

**शमि**–गुरु, उष्ण, केशांचा नाश करणारी व श्वास, अर्श, कृमि, आणि कोड यांस हरणारी आहे.

**शिरोळें**—कफार्शाला हरणारें, व पक्काशयाचें शोधन करणारें आहे. **गोड शिरोळें**–रक्तपित्ताचा व वायूचा नाश करणारें आहे.

**शेवगा**—पांढरा, तांबडा व काळा, असा तीन प्रकारचा आहे; त्या तिहींचे गुण–तीक्ष्ण, स्वादिष्ट व तिखट असून वात, सूज, व दृष्टीची मंदता यांचा नाश करतो. त्याची **साल**–डोळ्यांस हितावह आहे. **फुलें**–उष्ण, तिखट व कृमिघ्न आहेत. **शेंग**–जठराग्नीला प्रदीप्त करणारी असून, कोड श्वास व शूळ यांचा नाश करते. **तांबड्या फुलाचा**–तिखट, स्वादिष्ट व क्षारयुक्त असून, वात, सूज व दृष्टिमांद्य यांचें शमन करतो.

**शेंदूर**—तिखट व उष्णवीर्य असून, व्रणाचा नाश करतो.

**शेवंती**—डोळ्यांस हितावह, सुगंधी, बळ देणारी, कषाय व कोमळ आहे.

**शेपा**- तिखट, मधुर व गुरु असून, वात, योनिशूळ, अग्निमांद्य व कृमिदोष यांचा नाश करते.

**षड्षण**—सुंठ, पिंपळी, पिंपरीमूळ, चवक, चित्रक, व मिरीं हे साहा पदार्थ एकत्र केल्यानें षड्षण होतें. तें विषदोषाचें शमन करतें व उष्ण, रूक्ष, असून पंचकोळाप्रमाणे याचे गुण आहेत.

**सागरगोटी**—तुरट, त्रिदोषहारक आणि रुधिरविकार, ओकारी, तृषा, अरुचि आणि मूत्र यांचा नाश करणारी आहे. सागरगोटीचें फळ—थंड, तुरट, हद्य आणि कफविकार व रुधिरविकार यांचा नाश करणारें आहे. तिचें फळ—कंठ सुधारणारें, पित्तहारक, आणि शौचाचा विकार आणि रुधिरविकार यास बरें करणारें आहे.

**साखर**—शीतवीर्य, स्निग्ध, हृदयाला हितकर, मुखाला प्रिय, नेत्राला हितकर, शरीराला व वीर्याला पुष्टि देणारी अशी आहे व अत्यंत बळ देणारी आहे.

**संचळ खार**-रेचक, जठराग्नीला प्रदीप्त करणारा व रुचिकर असून वात, पोटफुगी व शूळ यांचा नाश करतो.

**सताप**—स्निग्ध, तुरट, उष्ण, व जठराग्नीला प्रदीप्त करणारा असून, कोड, रुधिरविकार, कृमिदोष, व्रण व कफ यांचा नाश करतो.

**समुद्र फेण**—डोळ्यांस हितावह असून, पित्त, कफ, विषदोष व कर्णरोग यांस बरें करतो.

**समुद्रशोष**—कोड व विषदोष यांचा नाश करतो.

**सालवण**—मधुर, गुरु, कडवट व पुष्टिदायक असून, विषदोष, ज्वर, खोकला व शोष यांचा नाश करतो.

**साग**—कषाय व शीत असून, व्रण, रक्तपित्त, रूक्षता व कफ यांस हरतो.

**साजीखार**—जठराग्नीला प्रदीप्त करणारा, रूक्ष व तीक्ष्ण असून, कफ, कृमिदोष, गुल्म व शूळ यांचा नाश करतो.

**सांबर**—मधुर, थंड, व पुष्टिदायक असून, रुधिरविकार व रक्तपित्त याचा नाश करते.

**सुंठ**—पाकावस्थेंत मधुर, तिखट, पुष्टिदायक, उष्ण, रोचन, जठराग्नीला प्रदीप्त करणारी व स्वराला हितावह असून, वातकफ बद्धकोष्ट, पोटफुगी व शूळ यांचा नाश करते.

**सुरमा**—शीतळ, कषाय, डोळ्यांस हितकर, कफहर व लेखन आहे.

**सुवर्णक्षीरी**—कडवट असून, कृमिदोष, पित्त व कफ याचा नाश करते.

**सुपारी-फळ**—रूक्ष, थंड, जड, तुरट, जठराग्नीला प्रदीप्त करणारें व रुचिकर असून, कफ व पित्त यांचें शमन करतें.

**सूर्यमुखी**—कफ, पित्त, प्रमेह व कृमिदोष यांस दूर करते.

**सुरण**—दीपन, रुचिकर व पथ्य असून कफ, प्लीहा, व गुल्म यांचा नाश करतो. त्यांतही विशेषें करून अर्शरोग्याला फार हितावह आहे.

**सेंधेलोण** अथवा **सैंधव**--स्वादिष्ट, लघु, डोळ्यांस हितावह, पुष्टिदायक, रुचिकर, जठराग्नीला प्रदीप्त करणारें व त्रिदोषहर आहे.

**सोनामुखी-पांढरी**—वर व खालीं शरीराला स्वच्छ करणारी असून, खोकला, उदररोग, व कोड यांचा नाश करते.

**हरभरे**—हलके, तुरट, रूक्ष, मळावरोधक, वायुकारक असून, रुधिरविकार, ताप, पित्त, व कफ यांस दूर करणारे आहेत.

**हरपर रेवडी**-(फळ) रुचिकर, जड, रूक्ष, मधुर, तुरट, व आंबट असून अर्श, पित्त व कफ यांचा नाश करते.

**हंसराज**-शीतळ, जड, व्रणाला रुजविणारा असून, रुधिरविकार, विषदोष, अतिसार, दाह व किरळी यांस बरें करतो.

**हळद**-तिखट, कडवट, रूक्ष, उष्ण, रंगाला हितावह असून प्रमेह, त्वग्रोग, सूज, खरूज, कोड व व्रण यांचा नाश करते.

**हाडसंधी**—हाडाला सांधणारी, रूक्ष, मधुर, लघु, वीर्यवर्धक व नेत्ररोगाचा नाश करणारी आहे.

**हिंग**—उष्ण, पाचन, जठराग्नीला प्रदीप्त करणारा, तिखट, व स्निग्ध असून, शूळ, अजीर्ण, व पोटफुगी यांस हरतो व पित्ताला वाढवितो.

**हिरडा**—बाळकांच्या पोटांत राहून कोणत्याही प्रकारची विकृति न होऊं देणारा, रसायनरूप, दीपन व त्रिदोषहर असून, शूळ व वातरक्त यांचा नाश करणारा आहे. सारांश, सर्व रोगांचें शमन करणारा असून कषाय, अम्ल, मधुर, कटु व तिक्त, बुद्धिवर्धक, शरीरवर्धक व पुष्टिदायक आहे.

**हिंगूळ**—पांढरा, पीवळा व तांबडा असा तीन प्रकारचा आहे. तो पांढऱ्याहून पींवळा व पींवळ्याहून तांबडा असा उत्तरोत्तर अधिक गुणावह आहे. तो-तिखट, कडवट, व तुरट असून, नेत्ररोग, कोड, कामळा, ताप व कफपित्तादि यांचा नाश करतो.

तें निर्वीर्य असतें ह्मणून त्या वेळीं विषाची चिकित्सा सामान्य उपायांनीं केली तरी चालेल. यावरून असेंही लक्षांत येईल कीं वर्षा आणि शरदृतु शिवाय हेमंत, शिशिर, वसंत आणि ग्रीष्म या ऋतूंत त्याचें बळ मध्यम असतें, ह्मणून त्या त्या ऋतूंत मध्यम उपायांची योजना झाली तरी चिंता नाहीं.

**विषाचीं स्थानकें**—वर ह्मटल्याप्रमाणें स्थावर आणि जंगम असे विषाचे दोन भेद आहेत. त्यांपैकीं स्थावर विषाचीं स्थानकें दहा, आणि जंगम विषाचीं सोळा आहेत. मूळ, पत्र, फळ, पुष्प, साल, क्षीर ( चीक ), मधला गाभा, गोंद, धातु आणि कंद हीं स्थावर विषाचीं ठिकाणें होत. जरी स्थावर विष पत्रफलादिकांत असतें तरि मूळांत असलेलें विष फार जाज्वल्य असतें. मूळांतील विष खाण्यांत आलें असतां पायांत वळ येणें, बडबड आणि मोह हीं होतात. पत्रांतील विषानें उत्क्रासे येणें, श्वास लागणें, पायांत वळ येणें हे विकार उत्पन्न होतात. फळांतील विषानें वृषणामध्यें सूज, दाह आणि अन्नद्वेष पडतो. पुष्पांतील विषानें ओकारी, पोट फुगणें, मोह ( बेशुद्ध पडणें ) हे विकार होतात. साल आणि चीक यांतील विषानें तोंडाला फेंस येतो, . शौचास पातळ होतें आणि जीभ वाकडी वळते. मधल्या गाभ्यांतील आणि गोंदांतील विषानें तोंडाला दुर्गंध, शरीराला खरखरीतपणा, मस्तकामध्यें शूळ आणि तोंडांतून लाळ पडणें इत्यादि विकार होतात. धातुगत विषानें हृदयामध्यें पीडा, मूर्च्छा आणि ताळूचा दाह हे विकार होतात. फार करून हें विष दीर्घकाळें करून नाश करतें. कंदांतील विष, सर्व स्थावर विषांपेक्षां अतितीक्ष्ण गुणांचें असतें. जंगम विषाचीं स्थानकें, दृष्टि, निश्वास, दाढ, नख, मूत्र, मळ, शुक्र, लाळ, आर्तव, अस्थि, पित्त वगैरे सोळा आहेत. केवळ पहाण्यानें आणि

फुंकर मारल्यानें प्राण्याच्या आंगांत विषाचा प्रवेश करविणारे कांहीं देवी सर्प आहेत. पृथ्वीवर जे सर्प आहेत त्यांच्या दाढेंत विष असतें. मांजरें, कुत्रीं, पाण-घोडा, मगर, मासे, बेडूक, पाली आणि दुसरेही कित्येक प्राणी यांच्या दाढेंत व नखांत विष असतें. उंदराच्या वीर्यामध्यें विष असतें, कोळी वगैरे प्राण्यांचें विष लाळ, मूत्र, मळ, नख, वीर्य व रज यांत असतें. व विंचवाचें विष त्यांच्या कांट्यामध्यें असतें. माशी वगैरे प्राणी आपल्या तोंडानें चावून विष बाहेर टाकतात. विषानें मेलेल्या प्राण्याच्या आणि वाट नामक मत्स्याच्या अस्थींमध्यें विष असतें. शकुली मत्स्य, रक्तराजि मत्स्य आणि चरकी मत्स्य यांच्या पित्तामध्यें विष असलें आहे. सूक्ष्म तुंड आणि उच्चीटिंग नांवाच्या विंचवाच्या आणि भ्रमराच्या चोंचीमध्यें विष असतें. किडे आणि सर्प यांच्या मृत देहामध्यें विष असतें. याशिवाय दुसरींही न सांगितलेलीं विषें मुख दंशाच्या विषामध्यें गणावीं.

**महाविषें आणि उपविषें**—सोमल, हालाहल, काळकूट इत्यादिकांस महाविष असें ह्मणतात. आणि अफू वगैरे पदार्थांस उपविष संज्ञा आहे. ब्रह्मपुत्र आणि प्रदीपन वगैरे विषांचीं नांवें आणि लक्षणें शास्त्रांत आढळतात. परंतु तीं विषें कशीं आहेत याचा मुद्दापत्ता कांहीं लागत नाहीं.

**स्थावर विषें आणि यांचे दोन भेद**—स्थावर विषामध्यें सोमल, अफू, बचनागाचें मूळ, कुचला वगैरेंचा समावेश होतो. त्यांतही सोमल, रसकापूर, तांब्याचा गंज वगैरे धातु विषें होत आणि अफू, धोत्रा, कुचला वगैरे वनस्पति विषें होत.

सर्प, किडे, उंदीर, कोळी वगैरे लाळ असलेले जीव; विंचु, पाली, विषारी जळू, विषारी मासे, विषारी बेडूक, मगर, विषारी

कुत्रे, सिंह, वाघ, कोल्हे, जिराफ, अस्वल वगैरे दाढा असलेले विषारी प्राणी यांच्या दाढांमध्यें असलेलें विष जंगम विष ह्मणतात.

**कृत्रिम विष, गरळ**—वर सांगितलेल्या स्थावर व जंगम अशा दोन प्रकारच्या विषाशिवाय आणि अनेक प्रकारच्या औषधांतील व औषधांत योजिलेल्या पदार्थांतील विषाखेरीज, तिसऱ्याच प्रकारचें विष तयार करतां येतें; यास गरळ असें नांव आहे. तें दोन अथवा अधिक पदार्थ एकत्र मिळवून उत्पन्न करतां येतें. या कृत्रिम विषांत जसे पदार्थ घातले असतील त्याप्रमाणें तें ताबडतोब अथवा कित्येक दिवसांनीं नाश करणारें असें बनतें. हें विष सूज, पांडु, उन्माद आणि उदररोग वगैरे दोष उत्पन्न करतें.

**स्थावर व जंगम विषापासून होणारे विकार**—स्थावर विष हें ज्वर, उचकी, दांत आंबणें, घसा धरणें, तोंडाला फेंस येणें, ओकारी, अरुचि, श्वास, मूर्च्छा वगैरे विकार उत्पन्न करितें, आणि जंगम विष, झांपड, आलस्य, खेद, दाह, शरीरावर फोड, रोमांच थरारणें वगैरे प्रकार उत्पन्न करतें. या दोनही प्रकारच्या विषांतून स्थावर विष शरीराच्या वरल्या भागीं पीडा करितें आणि जंगम विष खालच्या भागीं प्रकट होतें. यावरून असें दिसतें कीं केव्हां केव्हां स्थावर विष जंगम विषाचा, व जंगम विष स्थावर विषाचा प्रतिकार करण्यास समर्थ आहे.

**विष खाल्लेल्या मनुष्याची परीक्षा**—ज्याचें पोट फुगलें आहे, शरीरांतील रक्त उष्ण झालें आहे, अंग शिथिल झालें आहे, वेदना होत आहेत, आणि तोंडांतून फेस पडत आहे, अशा मनुष्यानें विष खाल्लें आहे असें समजावें. विषाचा पहिला वेग रस नामक धातूला दूषित करतो आणि तृषा, मोह, दंत हर्ष, लाळ, ओकारी

आणि खेद वगैरे विकार प्रगट करतो. दुसरा वेग रक्ताला दूषित करून भ्रम, कंप, मूर्च्छा, जांभई, अंगांत चमचमाट आणि डोळ्यांस अंधेरी वगैरे विकार प्रगट करतो व तेणें करून शरीर निस्तेज बनतें. तिसरा वेग मांसाला दूषित करून शरीरावर चट्टे, गांठी, खरूज आणि सूज प्रगट करतो. चौथा वेग वायूला कुपित करून, ओकारी, दाह, अंगशूळ आणि मूर्च्छा उत्पन्न करतो. पांचवा वेग, हिरवा पिंवळा रंग दिसूं लागणें, अंधाऱ्या येणें, वगैरे विकार प्रकट करतो. साहावा वेग उचकी आणतो. सातवा वेग शरीराची हालचाल बंद करतो आणि आठवा वेग मृत्यु देतो. याप्रमाणें विषाचे आठ वेग मनुष्याच्या शरीरांत उत्पन्न होऊन आणि चतुष्पाद प्राण्यांच्या शरीरांत चार वेग उत्पन्न होऊन त्यांस मरण प्राप्त होतें. पशूच्या शरीरांत जेव्हां पहिला वेग येतो तेव्हां तो दुःखित होऊन गोलांट्या खाऊं लागतो. दुसऱ्या वेगानें कांपूं लागून शून्य होतो. तिसऱ्या वेगानें तो खाणें खात नाहीं आणि चौथ्या वेगानें वात उत्पन्न होऊन मरण पावतो. पक्ष्यांच्या शरीरांत जेव्हां विषाचा पहिला वेग प्रगट होतो, तेव्हां पक्षी शून्यचित्त होऊन जणूं ध्यानस्थ बसला असावा असा दिसतो, दुसऱ्या वेगामध्यें भोवांड उत्पन्न होतें आणि तिसऱ्या वेगानें त्याचा पिसारा विस्कटून जाऊन तो मरण पावतो.

**विषाचा गुण**- विष हलकें, रूक्ष, लौकर पसरणारें, तीक्ष्ण, उष्ण, सूक्ष्म, अव्यक्त रसाचें (म्ह० ज्यांत साहा रसांपैकीं एकही रस स्पष्ट जाणवत नाहीं) व न पचणारें, विशद, आणि प्राणस्थानाचें तोंड उघडणारें अशा दहा गुणांनीं युक्त असतें.

या दहा गुणांमुळें तें शरीरांत लौकर पसरतें, मर्मस्थानाचा भेद करितें, मोठ्या कष्टानें त्यावर उपाय लागू पडतात आणि इतकेंही

करून त्याच्या पसरण्याच्या दोषाला कोठेंच प्रतिबंध करतां येत नाहीं. शरीरांत शिरल्यावर तें प्रथम रक्त बिघडवितें, नंतर वात पित्त आणि कफ यांस दुष्ट करतें, आणि शेवटीं हृदयांत शिरून देहाचा नाश करतें.

**दोषाच्या स्थानांत विषाची स्थिति**–विष हें वातप्रकृतीच्या मनुष्याच्या वातस्थानांत शिरून वाताला कोपवितें आणि कफ-पित्ताला थोडें कोपवितें: वाताला कोपविल्यावर तृषा, मूर्च्छा, मोह, अरुचि, घसा धरणें, ओकारी, तोंडाला फेंस येणें इत्यादि उपद्रव उत्पन्न करतें. पित्तप्रकृतीच्या मनुष्याच्या पित्तांत शिरून तें पित्ताला कोपवितें, व वातकफाला थोडें कोपवितें; त्यामुळें तृषा, कास, ज्वर, ओकारी, खेद आणि अत्यंत दाह हे विकार उद्भवतात. आणि कफ-प्रकृतीच्या पुरुषाच्या कफस्थानांत शिरून तें कफाला चेतवितें. मात्र वातपित्ता थोडें चेतवितें; त्यामुळें श्वास, घसा धरणें, खरूज, लाळ पडणें आणि ओकारी वगैरे विकार उत्पन्न करतें.

**दूषि विष**—जें विष जुनाट झालें असेल अथवा खाल्यावर केलेल्या विषहर उपायांनीं दबून गेलें असेल, अथवा उत्पत्तीच्या वेळीं दावानल, वायु आणि ऊन यांहीं करून सुकून गेलें असेल, अथवा स्वतांच गुणानें हीन असेल, तर त्या विषास दूषि विष असें म्हणतात. या दूषि विषाचा परिणाम अल्प असल्यामुळें तें लक्षांत येत नाहीं. तें कफांत वेटाळून राहून शरीरांत पुष्कळ वेळपर्यंत रहातें. अशा प्रकारच्या विषानें पीडलेल्या पुरुषाचा मळ व शरीर विवर्ण होतात; त्याच्या शरीरांत रक्त बिघडून रोग उत्पन्न होतात; तृषा आणि अरुचि ह्यांची पीडा त्यास होते; रोगी कासावीस होतो; त्याला ओकाऱ्या येतात; शब्द घोगरा होतो; आणि उदररोगाचीं चिन्हें दिसूं लागतात.

हें दूषि विष आमाशयांत असलें तर कफाचे व पित्ताचे विकार प्रगट होतात, आणि पक्वाशयांत असलें तर वाताचे व पित्ताचे विकार जाणवतात. या विषानें अंगावरची लोकर व डोक्याचे केश गळून पडतात. तेंच जर रसादिक साहा धातूंच्या ठिकाणीं राहिलें असलें तर धातुसंबंधीं अनेक विकार उत्पन्न करतें. या विषाला दूषि विष असें नांव देण्याचें आणखी कारण असें आहे कीं तें अजीर्ण, मेघ, थंडी, कुपथ्य भोजन इत्यादि विकारांनीं दुष्ट होऊन धातूला बिघडवितें. दूषि विषानें पीडलेल्यास प्रथम घाम येई अशीं औषधें देऊन व मग ओकारी व रेचन होणाऱ्या औषधांनीं शुद्ध करून, या विषास दूर करणारीं खालीं लिहिलेलीं औषधें मध घालून चाटवावीं. पिंपळी, रोहिश नांवाचें गवत, जटामांसी, लोध्र, वेलची, संचळ खार, मोथा, कट, जेष्ठीमध, रक्तचंदन आणि गेरू या औषधींचा योग दूषि विषाचा नाश करणारा आहे. तसेंच इतर विषांवरही या योगाचा अनुभव घेऊन पाहण्यासारखा आहे.

स्थावर विषाच्या वेगांत उत्पन्न होणारे उपद्रव—स्थावर विषाच्या पहिल्याच झटक्यांत जीभ काळी पडते, शरीर भारयुक्त बनतें, मूर्च्छा येते, ओकारी होते, व त्रास आणि भयही उत्पन्न होतात. दुसऱ्या झटक्याला कंप, घाम, दाह व कंठांत वेदना हे विकार होतात. या वेगांतच विष आमाशयांत पसरलें तर हृदयांतही वेदना होऊं लागतात. तिसऱ्या झटक्यांत टाळूला कोरड व आमाशयांत शूळ प्रगट होतो. हा झटका आलेल्या रोग्याचे डोळे ओढलेले, हिरवट, व जड होतात. या वेगांत हें विष पक्वाशयांत शिरलें म्हणजे टोंचण्यासारखी पीडा, पोट फुगणें, खोकल्याची ढास, आणि आंतड्यांत करकर शब्द अशीं लक्षणें होतात. चौथ्या झटक्यांत मस्तक जड होतें व वर सांगितलेलेही बहुतेक विकार

असतातच. पांचव्यांत, मुखांतून व नाकांतून कफ वाहूं लागतो, शरीर साफ काळें ठिक्कर पडतें, सांधेनी सांधे दुखतात, सर्व दोष कुपित होतात, आणि पक्काशयांत वेदना सुरू होतात. साहाव्यांत बेशुद्धि उत्पन्न होते व अतिसार होतो. शेवटीं सातव्यांत खांदा, कणा, कंबर यांच्या मध्यें मोडल्यासारखी वेदना होऊं लागून, रोग्यास लौकरच मरण प्राप्त होतें.

**विषाच्या वेगांत करावयाचे उपाय**–शरीरांत विषाचा पहिला वेग आल्याबरोबर रोग्याला पहिल्यानें ओकारीचें औषध द्यावें, डोक्यावर थंड पाणी शिंपडावें आणि मग मध व तूप यांत विषहर औषधें घालून तीं चाटवावीं. दुसऱ्या वेगामध्यें ओकारीचें औषध हें द्यावेंच व डोक्यावर पाणीही शिंपावें; पण आणखी विरेचन देऊन मग विषहर औषध द्यावें. तिसऱ्या वेगामध्यें विषहर औषध, पान, नस्य, अंजन हीं हितकारक सांगितलीं आहेत. चौथ्या वेगांत तुपाबरोबर मिळवून विषहारक औषध द्यावें. पांचव्यांत ज्येष्ठीमधीचा क्वाथ व मध हीं एकत्र करून द्यावीं. साहाव्यामध्यें अतिसाराच्या निवारणार्थ जे उपाय सांगीतले आहेत ते योजावे; आणि सातव्यांत अवपीड नांवाचें तूप आहे तें द्यावें, अथवा मूर्धस्थानीं कावळ्याच्या पायाच्या आकाराचें शस्त्र आहे त्यानें फाड करून त्यावर रुधिरयुक्त मांसाचा तुकडा ठेवावा.

कडू शिरोळें, चित्रक, काळीपाट, गुळवेळ, हरडा, शिरिष, पांढरा अघाडा, दोहों प्रकारची हळद, ज्येष्ठीमध, दोहों प्रकारची साटोडी, सुंठ, मिरीं, पिंपळी, दोन प्रकारची रिंगणी, उपलसरी, आणि खपाट, या औषधांच्या काढ्यांत कांजी तयार करून, ती थंड झाल्यावर, त्यांत तूप व मध घालून, वेगाच्या मध्यावर त्यानंतर

तिचा उपयोग करावा, ह्मणजे विषाचें निवारण होईल. परंतु हा उपाय योजण्यापूर्वी पहिल्यानें वमन व विरेचन देण्याची फार जरूरी आहे. शिवाय मोहडा, ज्येष्ठमध, पद्माचें लाकूड, केशर व चंदन यांच्या काढ्यांत तयार केलेली कांजीसुद्धां विषदोष नाहींसा करते.

**विषाच्या चिकित्सेचा सामान्य क्रम**—विष खाऊन मरण पावलेल्या मनुष्याच्या हृदयांत विष असतें. सर्पादिकानें चावलेला आणि विखारी शस्त्रानें भोसकलेला मनुष्य जेव्हां मरण पावतो तेव्हां विष त्यांच्या घायाच्या ठिकाणीं असतें. ज्यानें विष खाल्लें असेल त्याच्या शरीरांत मरणाच्या वेळचीं चिन्हें दिसूं लागलीं असलीं तर त्याची चिकित्सा वैद्यानें करूं नये. आणि पुढील सगळीं चिन्हें प्रगट झालीं नसलीं तर बेधडक करावी. यास्तव हीं चिन्हें कोणतीं तीं एथें सांगतों:—ओठ काळे पडणें, दांत शिथिल होणें, डोक्यावरील केश गळून पडणें, सर्वांग दुःखूं लागणें, तडफड करणें, शीतोपचारांनींही रोमांच न उभे राहणें, काठी मारली असतांनाहीं अंगावर वळ न उठणें आणि अंगांत सुई भोसकली असतांही रक्त बाहेर न निघणें वगैरे मरणाचीं चिन्हें होत. तीं न दिसूं लागत तोंच चिकित्सा करावी. राजमंदिरांमध्यें तर विषाची चिकित्सा करूंच नये अशी शास्त्रकारांची आज्ञा आहे.

**विषनिवृत्तीचे चोवीस उपाय**—मंत्र, अरिष्ट, उत्कर्तन, निष्पीडन, चूषण, अग्नि, परिषेक, अवगाहन, रक्तमोक्षण, वमन, विरेचन, उपधान, हृदयावरण, अंजन, नस्य, धूम, लेह, औषध, प्रशमन, प्रतिसारण, प्रतिविष, संज्ञासंस्थापन, लेप व मृतसंजीवन असे विष निवारण्याचे चोवीस उपाय सांगितले आहेत. त्यांची प्रत्येकाची रीत कशी आहे ती येथें लिहितों.

ज्या ठिकाणीं दंश झाला असेल त्याच्या खालीं व वरच्या आंगाला जोरानें घट्ट दोर बांधावा. त्यानंतर जर दंश मर्मस्थानीं भिनला नसेल तर ती जागा दाबून तींतून विष व रक्त पिळून काढावें; अथवा ती जागा शस्त्रानें खरवडून काढावी; अथवा जळवा लावाव्या; अथवा तुंबडी लावून रक्तस्राव करावा. कारणकीं विष-दंशानें प्रथमतः रक्त दूषित होतें आणि नंतर रोगी मरण पावतो. यासाठीं पहिल्यानें विषदूषित रक्त काढून टाकिलें तर मग जिवाची धास्ती फारशी राहत नाही. सुंठ, मीरीं, पिंपळी, घराचें धुरकट, हाळद, पंच लवण, काळा वाळा, रिंगणी, आणि वड, हे पदार्थ एकत्र उगाळून त्यांचा लेप दंशस्थानीं करावा म्हणजे दूषित रक्त स्रवतें आणि विषाचा वेग मंद होतो. मद, मूर्छा, खेद आणि हृदय यांतील पीडा हीं उत्पन्न होतात. म्हणून शीतोपचारानें विषार शांत करावा आणि रोमांच उभे राहतील इतका जोरानें रोग्याला पंख्यानें वारा घालावा. मूळ कापल्यानें वृक्ष जसा वृद्धि पावत नाहीं, आणि बांध घातल्यानें पाणी जसें पसरत नाहीं; त्याच प्रमाणें जों पर्यंत विष खोल गेलें नाहीं, तों पर्यंत शस्त्रानें जखम छाटून टाकल्यास विषाचा वेग वाढूं शकत नाहीं. जें विष कातडींत व मांसांत भिनलें, त्यावर डाग उजळावा. रक्तांत भिनलें असलें तर रक्ताचा स्राव करून तें काढून टाकावें. विष पिण्यांत आलें असलें तर तावडतोब वमन करवावें· आणि पिण्यांत आलेलें विष दुसरा वेग येऊन खालीं उतरलें तर रेचक देऊन बहिर्द्वारानें बाहेर पाडवावें. विष खाणाराच्या हृदयाचें रक्षण कसें होईल, याकडे पहिल्यानें लक्ष दिलें पाहिजे. जर हृदयामध्यें आवरण येऊं लागलें तर दूध, मध, तूप, गेरू अथवा शेणाचा रस यापैकीं जो पदार्थ मिळेल तो प्यावयास द्यावा; अथवा राख किंवा धूळ पाण्यांत कालवून प्यावयास द्यावी. मनुष्याचें

शरीर वांचविणें असेल तर शास्त्रकारांनीं कित्येक भयंकर उपायही सुचविले आहेत ते करावे. पंखांसहित कावळा चुरून पिळून त्याचा रस प्यावयास द्यावा, अथवा बकऱ्याचें रक्त प्यावयास द्यावें, ह्मणजे वमन होईल. तिसऱ्या वेगामध्यें क्षाराचा उपयोग करावा. आणि सूज हरणारे पदार्थ, मद्यांत अथवा पाण्यांत वांटून लेखनक्रिया उपयोगास आणावी. चवथ्या वेगांत कवठाचा रस, मध आणि तूप हीं एकत्र करून गाईच्या शेणाच्या रसांत पाजावीं. पांचव्या वेगांत कावळ्याच्या अंड्याच्या आणि शिरसाच्या रसानें अंजन करावें. साहाव्या वेगांत जेणें करून बेशुद्ध झालेला रोगी शुद्धीवर येईल असे उपाय करावे. गाईच्या पित्तानें युक्त अशी हळद, मंजिष्ठ, मिरीं आणि पिंपळी हे पदार्थ वाटून पाजले असतां तावडतोब उलटी होते. मोराचें पित्त अर्धा भाग आणि दुप्पट भाग पळसाचें बीज, हे दोन्ही पदार्थ एकत्र वांटून पाजल्यानें, विषारामुळें मरणाच्या स्थितीस येऊन पोंहोंचलेला रोगीही जिवंत होतो. वांग्याचें फाणित, वराचा घेरासो, गाईचें पित्त, आणि कडु लिंब हे पदार्थ एकत्र करून प्यावयास दिल्यानें वरील प्रमाणेंच उपयोग होईल. गाईच्या पित्तानें युक्त, तुळस, पिंपळमूळ, दोन प्रकारची हळद, मोहडा व कवट यांस एकत्र करून बनविलेल्या गोळ्या अथवा शिरसाचीं फुलें आणि कावळ्याच्या अंड्याचा बलक यांनीं बनविलेल्या गोळ्या यांचाही वरीलप्रमाणें उपयोग होतो. विषामुळें किंवा पाण्यांत बुडाल्यामुळें मरण प्राप्त झालेल्या मनुष्यास शुद्धीवर आणण्याकरितां खालीं लिहिलेल्या औषधांचा लेप, नस्य आणि पान हीं उत्तम आहेत. कपुरी, मधुरी पिंवळा वाळा, भरोष्ट, शिलाजित, गोरोचन, तगर, रोहिश नांवाचें तृण, केशर, जटामांशी, तुळशी, कठ, वाळा, भुईरिंगणी, शिरसाचीं फुलें, हळद, दारुहळद, चंदन, हिंग, पिंपळी, लाख, काळा वाळा, जंगली मूग,

बेलफळ, जेष्टमध, मदन फळ निगड, बाहवा, लोध्र, गवला, नरवेल, आणि वावडिंग, हे सर्व पदार्थ (ज्यास फुलें असतील ते फुलांसकट) घेऊन वांटावे व गोळ्या कराव्या. त्या सर्व प्रकारचा विषार हरणाऱ्या आहेत. विषानें मेलेल्यासही त्या उठवतात आणि ताप नाहींसा करितात. ह्या गोळ्या हुंगल्यानें, उगाळून आंगास लाविल्यानें, धारण केल्यानें, जाळून धूरी घेतल्यानें आणि त्यांच्याविषयीं गोष्टी ऐकल्यानेंही घरांतील भूतप्रेतांची पीडा, विषार, मिरकुटें, ढेकूण इत्यादि जंतु तशीच अलक्ष्मी, कावीळ, वाईट स्वप्नें, स्त्रियांचे दोष, अकाळ मरण, पाण्याचें भय, आणि चोरभय वगैरे शांत होतात. शिवाय धनधान्य, कार्यसिद्धि, पुष्टि, आयुष्यवृद्धि इत्यादिकांचीही प्राप्ति होते. या प्रयोगाचें नांव 'मृतसंजीवन,' आणि तो ब्रह्मदेवानें अमृत उत्पन्न करण्याच्या पूर्वींच प्रकट केला आहे.

वात, पित्त आणि कफ या तिहींतून ज्या ठिकाणीं विष असेल त्याला पहिल्यानें जिंकण्याचा यत्न करावा. ह्मणजे असा कीं वायूच्या स्थानीं जर विष असलें तर रोग्याला प्रथम घाम आणून नंतर दह्याबरोबर तगर व कवट यांचा कल्क प्यावयास द्यावा. पित्तस्थानीं विष आहे असें दिसलें तर तूप, मध, दूध, व पाणी हीं प्यावयास द्यावीं व रोग्याला त्यांच्यांत बसवावें. आणि कफस्थानी विष आहे असें आढळलें तर क्षाराचा उपयोग करावा, घाम काढावा, आणि शिरावाटे रक्तस्राव करावा. तसेंच दूषि विष जर रक्तांत आहे असें वाटलें तर शिरा घ्याव्या, वमनविरेचनादिक पंच कर्मे करवावीं. याप्रमाणें वैद्यानें विचार करून औषधाची योजना करावी. विषदिग्ध म्ह० विषारी शस्त्रानें जखमी झालेला मनुष्य वारंवार ग्लानि पावतो व विरुद्ध वर्ण धारण करतो. त्याच्या शरीराला मुंग्या आल्याप्रमाणें चुणचुण करतें. आणि कमर, कणा, मस्तक, कान

आणि सांधे यांत दुःखतें. जेथें विषारी शस्त्राचा घाय झाला असेल तेथून काळें रक्त निघतें. तृषा, मूर्च्छा आणि दाह हीं होतात. नजर काळी होते. आणि ओकारी, श्वास, व खोकला हीं उत्पन्न होतात. हा घाय चौफेर पिंवळा आणि रातां व मध्यें काळा असा असतो. त्यांत फार वेदना होतात, मांस काळें पडतें आणि पू स्रवतो. गांठ्यामारखें झालेलें तें मांस वारंवार फुटतें आणि त्यांतून पाणी स्रवतें. विषारी शस्त्रानें जर मर्मस्थानीं घाय झाला असेल तर हृदयांत आवरण होऊन रोगी मरण पावतो.

पायांत मल राहून गेला असेल तर तें काढून लोखंड तापवून घायावर डाग द्यावा. अथवा पळस, पांढरी गुळवेल, मंजिष्ठ आणि शिरस या पदार्थांचा क्षार बनवून तो जखमेवर लावावा म्हणजे तींतून पाणी झरेल. मग आगस्ता, काळी अनवशेक आणि भुईरिंगणी या निहींच्या मुळ्या वांटून व्रणावर लेप करावा. अशा जखमेची चिकित्सा जीवजिवाणूं चावून झालेल्या जखमेप्रमाणेंच करावी. जखमेंतील मांस कुजलें असलें तर पित्तामुळें झालेल्या विसर्परोगाप्रमाणें त्याची चिकित्सा करावी.

निरनिराळ्या जातींच्या प्राण्यांच्या विष्ठा, विरुद्ध अन्नाचें भस्म आणि अल्प पराक्रमाच्या विषांची यांच्या एकीकरणानें जें विष उत्पन्न होतें त्याला गर असें नांव पूर्वींच दिलें आहे. हें विष खाल्ल्यानें मनुष्य बोजट रंगाचा, रोड, मंदाग्नि युक्त, आणि खोकला श्वास व ताप यांनीं पीडलेला असा होतो. त्याचा वायु नेहमीं उलटगत असतो. त्याला गाढ झोप येत नाहीं. या मनुष्याचें पोट मोठें असतें, आणि यकृत आणि प्लीहा यांचे विकार झालेले असतात. त्याचा स्वर दीन असतो आणि शरीर रोड आणि सुस्त असतें.

आंगाला सूज येते, वारंवार पोट फुगतें आणि हात पाय सुकून जातात. आणि तो क्षयी बनतो. फार करून स्वप्नामध्यें कोल्हा, मांजर, मुंगुस, सर्प, माकड यांस पाहतो. तसेंच पाण्याचीं ठिकाणें आणि वृक्ष हीं सुकलेलीं पाहतो. आणखी जर तो मनुष्य गोऱ्या वर्णाचा असेल तर स्वप्नांत आपलें शरीर काळें पाहतो आणि काळा असला तर पांढरें पाहतो. त्याचीं इंद्रियें हीनशक्तीचीं बनतांत आणि स्वप्नांत आपलें शरीर, नाक, कान, डोळे यांनीं हीन असें पाहतो. या विषानें पोळलेल्या मनुष्याची जर लवकरच चिकित्सा न झाली तर वर सांगितलेल्या अथवा अशाच प्रकारच्या दुसऱ्या उपद्रवांनीं रोगी मरण पावतो. या गर नांवाच्या विषानें पीडलेल्या मनुष्यास प्रथम ओकारी करवावी, पथ्य अन्न खाऊं घालावें, माक्षिक आणि सुवर्ण या दोहोंचें चूर्ण एकत्र करून मध व खडीसाखर याबरोबर चाटवावें, अथवा मोरवेल, गुळवेल, पटोल, चवक, चित्रक, वेखंड आणि वावडिंग याचें चूर्ण ताक, ऊन पाणी किंवा महाळुंगाचा रस यांत घालून पाजावें. सर्व प्रकारच्या विषविकारांच्या शांत्यर्थ तुपासारखा दुसरा कोणताच उपाय नाहीं. त्यांतही वातप्रकृतीच्या विषावर तर तो मुख्यच उपाय आहे. कफस्थानचें विष साध्य समजावें, पित्तस्थानचें विष कष्टसाध्य आणि वातस्थानचें विष अत्यंत दुःसाध्य असतें, म्हणजे सरासरी असाध्य म्हणूनच समजावें. या प्रमाणें प्रकृति, देश, आणि काळ यांचा विचार करून विषग्रस्त रोग्याची योग्य चिकित्सा करावी.

**विषसंकट**—विषाची प्रकृति ( पित्त प्रकृति, ) काळ वर्षाकाळ, अन्न सर्षपादि दोष, पित्त, आणि दूष्य ( रक्त ) या पदार्थांचें **एकीकरण विषसंकट म्हणून सांगितला आहे. या विषसंकटामध्यें सांपडलेला मनुष्य शेंकडा एखाद बचावला तर बचावतो.**

# धातुविषाची आणि वनस्पतिविषाची चिकित्सा.

**सोमल**—हें प्रख्यात जबरें विष आहे. त्याला कोणतीही रुचि नाहीं. तरी जरा गुळचट आहे. ह्मणून अन्नांत मिसळून तें देण्यास विशेष सवडीचें असतें. सोमल पांढरा, तांबडा व हिरवा या रंगाचाही असतो. तो पोटांत गेल्यावर एक तासाच्या आंत त्याचीं लक्षणें दिसूं लागतात. आरंभीं चळ सुटून ओकारी येते; तसेंच पोटांत वेदना होऊं लागतात: थोड्या वेळानें शौचास होऊं लागतें; तहान फार लागते; डोळे जळजळतात; डोकें फार दुखुं लागतें; नाडी फार जलद चालते; पायांत पेंडके येतात; व शेवटीं रोगी शक्तिहीन होऊन मरण पावतो. सोमलाचा अंमल कित्येकांवर लवकर व कित्येकांवर हळूहळू चालतो. कोणाला शौचास व ओकाऱ्या होऊं लगतात; त्या झाल्या नाहींत तर त्याचीं चिन्हें कदाचित् पांचसात तासानंतरही जाणवूं लागतात. तरी अशीं उदाहरणें फार थोडीं. सोमल दुसऱ्या पदार्थांत घालून किंवा त्याचें केवळ बारिक चूर्ण करून दिलें असेल तर तें लवकर लागू पडून तावडतोब मृत्यु येतो. पण तुकडाचा तुकडा जर घशाखालीं उतरला असला तर वेळेनुसार बचावण्याची कांहीं आशा असते. विष खाऊन मेलेल्या मनुष्याचें शरीर फाडून तपासलें, तर पक्वाशयाचा दाह आल्याचें आढळतें, तसेंच आंतड्यांतील श्लेष्मावरणाचाही दाह दिसून येतो. घसा, तोंड व अन्नमार्ग हीं तांबडीं लाल झालेलीं दिसतात. शरीरांत बहुत करून सोमलाचे कण सांपडतात, व त्यांच्या आसपासचा भागही लाल झालेला आढळतो. कमींत कमी दोन गहूंभार सोमल पोटांत गेला असतां मरण प्राप्त होतें. सोमलाचें विष उतरण्यास रेचक व ओकारीचें औषध द्यावें. वर सांगितलेंच आहे कीं सोमलामुळें ओकाऱ्या व

रेच सुरू होतात. तथापि त्यांला जास्ती उत्तेजन मिळावें ह्मणून या औषधांची जरूरच आहे. आणखीही जास्त ओकाऱ्या होण्याची जरूर दिसली तर ऊन पाण्यांत मीठ विरघळून वारंवार पाजावें. आणि रेच होण्यासाठीं शुद्ध एरंडेल व दूध द्यावें. या वेळीं तहान लागेल ती शमविण्यास चुन्याची निवळ प्यावयास द्यावी.

**रसकापूर**—यानें तोंड, घसा, व अन्नमार्ग यांची त्वचा जळून तीवर चट्टे पडतात, गळ्याखालीं कांहीं जाऊं शकत नाहीं, व गेलेंच तर फार वेदना होतात. तसेंच ओकारी व रेच होऊन त्यांत रक्त पडतें. पोटांत शूळ उत्पन्न होतो, पोट सुजून जातें, व नाडी फार जलद चालते. कमींत कमी चार गहूंभार रसकापूर खाल्ल्यानें मरण प्राप्त होतें. त्यावर उपाय वरीलप्रमाणेंच योजावे.

**तांब्याचें विष**—याचे दोन प्रकार मुख्य आहेत. एक मोरचूत व दुसरा जंग. त्याची रुचि कळकट असल्यामुळें त्याचा उपयोग अपघात करण्यांत होत नाहीं. मोरचुतानें मरण आलें असलें तर पोटांत दाह आलेला व कोठें कोठें चट्टे पडलेले आढळतात. व आंतड्यांमध्यें मोरचुताचा रंग सांपडतो. त्यावर उपायही वरीलप्रमाणेंच होत.

**आफू**—आफूची रुचि कडवट असल्या कारणानें तिचा उपयोग इतर मनुष्याचा घात करण्यांत होऊं शकत नाहीं. परंतु आत्महत्या करण्यांत मूर्ख मनुष्य तिचा उपयोग करतात. आफू खाल्ल्यावर गुंगी येते, चक्कर येते, जीव कोंडल्याप्रमाणें वाटतें आणि हळूहळू बेशुद्धि प्राप्त होते. नाडी मंद व जड होते. डोळ्यांतल्या बाहुल्या संकोच पावतात. तोंड निस्तेज होतें. ओठ काळे पडतात. शौचास होणें बंद झाल्यामुळें पोट फुगतें. मस्तकांत पीडा सुरू होते व शेवटीं

मरण प्राप्त होतें. रोगी मेल्यावर हा रोगी आफू खाऊनच मेला याचा निश्चय करणें कठिण पडतें. परंतु जर होजरी तपासली तर तिला आफूचा वास येतो. कमींत कमी चार गहूंभार आफू पोटांत गेली तर तेवढी मरणास पुरी होते. आफूवर उतारा म्हटला म्हणजे ऊन पाण्यांत वांति होणारीं औषधें देऊन ओकाऱ्या काढविणें हाच आहे. देशी औषधांत वामक पदार्थ मीठ, सोनामुखी वगैरे आहेत. ओकारीला आफूचा वास येणें बंद होई तोंपर्यंत ओकाऱ्या येऊं द्याव्या. असें करतांनाही पुष्कळ सावधगिरी ठेवणें जरूर आहे. ज्यानें आफू खाल्ली असेल त्याला निजूं देऊं नये, शरीरावर थंड पाण्याच्या वळ्या टाकाव्या व स्थावर विषावर जे उपाय सांगितले आहेत ते करावे.

**कुचला**—कुचला खाल्ल्याचीं लक्षणें धनुर्वाताप्रमाणें होतात. हीं लक्षणें लौकरच दिसूं लागतात. अंगांतले स्नायु आखडल्यासारखे होतात. दांतखिळी बसते. वारंवार झटके येतात व रोगी तीन चार तासांत मरण पावतो. कमींत कमी तीन गहूंभार कुचल्याची पूड पोटांत गेल्यानें मरण येतें. यावर उपाय म्हटले म्हणजे ओकारी व रेच.

**भांग**—भांगेनें डोळे व तोंड तांबडें होतें, गुंगी येते, आणि खाणारा मनुष्य वेड्यासारखा हसतो, धावतो व शिवीगाळ करतो, व वेळानुसार शहाणपणाच्या गोष्टीही बोलतो. हिच्या वर उपाय ओकारी व रेच. साखर व दूध घातल्यावांचून नुसती कॉफी उकळून पांच पांच मिनिटांच्या अंतरानें घेत गेल्यासही भांग तावडतोब उतरते.

**काकमारी**—या विषानें प्रथम घेरी व बेशुद्धि उत्पन्न होऊन नंतर उचकी लागते. त्यावर उपाय वरीलप्रमाणेंच.

**बेहडा**—बेहड्याच्या आंतली बी विषारी आहे. तिचीं लक्षणें आफूच्या सारखींच होतात, व त्यावर उपायही आफूच्या उपायाप्रमाणेंच करावे.

**कण्हेर**—या विषानें घेरी, गुंगी, व बेशुद्धि वगैरे लक्षणें होतात. शरीर ओढल्याप्रमाणें भासतें. नाडी क्षीण वाहते, आणि शेवटीं श्वास कोंडल्यासारखा होऊन मृत्यु प्राप्त होतो. हें सगळें झाडच विषारी आहे, त्यांतही याच्या मुळ्या जास्तच विषारी आहेत. यावर उपाय ओकारी व रेच.

**बचनाग**—हा जबर विषारी आहे. त्याच्या मुळाचें चूर्ण तीस गहूंभार खाण्यांत आलें तर मरण येतें. आरंभींच तोंडामध्यें चुरचुर होते व आग होते. शरीर कांपूं लागतें, अंथेऱ्या येतात. हातापायांत पेंडके येतात, नाडी अनियमित चालते, श्वास मंद चालतो, व शक्ति क्षीण होते; आणखी मान लडबडूं लागते. मळ, मूत्र व नेत्र पींवळे होतात. आणि वाचा बसून मरण प्राप्त होतें यावर उपाय ओकारी व रेच हे मुख्य होत.

**तंबाकू**—ही फाजील खाण्यांत आली तर विषासारखीं चिन्हें दिसूं लागतात. तंबाकूनें मरण क्वचितच येतें. उपाय वरीलप्रमाणें.

**धोतरा**—या झाडाच्या सर्वच अवयवांमध्यें विष असतें. घातपात करण्याच्या कामीं बहुधा त्याचें बीजच वापरतात. त्यानें घसा सुकून जातो, तहान लागते, घेरी येते, डोळ्यांच्या बाहुल्या मोठ्या होतात, डोळे व तोंड हीं लाल होतात, बडबड सुरू होते, रोगी वेड्यासारखे चाळे करतो, कोणासही ओळखीत नाहीं, नाडी जलद वाहते, व शेवटीं बेशुद्ध होऊन तो मरण पावतो. धोतरा अतिशय खाण्यांत आला तरच मरण येण्याचा संभव आहे. वरील सर्व लक्षणें होऊन

बेशुद्ध झाल्यावर जर फिरून रोगी बडबड करूं लागला तर तें शुभ लक्षण जाणावें. मग हळुहळू तो शुद्धीवर येऊन विष उतरतें. याचीं लक्षणें दोन चार दिवस चालू राहतात. कमींत कमी त्याच्या चार किंवा पांच बिया खाण्यांत आल्या तर वरील चिन्हें होऊं लागतात, तरी मृत्यु येत नाहीं. याच्यावर उपाय म्हटले म्हणजे ओकारी व रेच हेच मुख्य होत. धोतऱ्यामुळें मेलेल्या मनुष्यास तपासलें तर अन्नाशयांत व आंतड्यांत वांग्याच्या व मिरच्यांच्या बियांप्रमाणें बिया सांपडतात. जर धोतऱ्याच्या बियांचें पीठ करून दिलें तर मात्र त्याची परीक्षा करणें कठिण पडतें. मग वरील चिन्हांवरूनच त्याची परीक्षा होऊं शकते.

गुंज—हें मोठें जबर विष आहे. जर ती फाजील खाण्यांत आली तर निजपासून ओकाऱ्यापलीकडे विषाचीं चिन्हें दृष्टीस पडत नाहींत. विशेष करून तिच्या सालींत विष असतें. चांभार लोक तिच्या पिठाची सुई बनवून ढोरागुरांस मारण्याच्या कामीं योजतात.

सर्पांचे भेद व त्यांच्या विषाराची चिकित्सा—दर्वीकर ( फणा असलेला ), मंडळी ( अंगावर चक्रें असलेला ) व राजीमान ( शरीरावर लिसरडें असलेला ) असे पृथ्वीवर मुख्यत्वें तीन जातीचे सर्प आहेत. त्यांचे पोटभेद अनेक आहेत. परंतु ते निरुपयोगी जाणून येथें लिहिले नाहींत. दर्वीकर आदीकरून तीनही जातीचे सर्पांचें विष यथानुक्रम वात, पित्त व कफ यांस कोपवितें. हे सर्प क्रमानें तरुणावस्थेंत, मध्यावस्थेंत आणि वृद्धावस्थेंत वर्षा, शीत, व ग्रीष्म या ऋतूंच्या चार चार महिन्यांमध्यें अधिक विषयुक्त असतात. व जातीशिवायचे सर्प ऋतुसंधींत ( गेल्या ऋतूच्या शेवटल्या सात दिवसांत व पुढील ऋतूच्या पहिल्या सात दिवसांत ) अधिक विषारी असतात.

चक्र, हल, छत्र, व अंकुश हीं चिन्हें धारण करणारा, शीघ्रगतियुक्त, व मोठी फडा असलेला जो सर्प त्यास दर्वीकर असें नांव दिलें आहे. ज्याला फडा नाहीं पण अनेक प्रकारचीं कोंडाळीं शरीरावर असतात, तसेंच जो वर खालीं होतो पण फार चालू शकत नाहीं, तो मंडली नामें सर्प जाणावा. ज्याचें अंग चिकट दिसतें व निरनिराळ्या रंगाचे ज्यांवर पट्टे असतात, ते राजीमान या नांवानें ओळखले जातात. गौवेर नामें सर्प चार पायांचा असतो व दर्वीकाराप्रमाणेंच विषारी असतो. व्यंतर नामें सर्प संकर-जातीचा असल्या कारणानें वात, पित्त व कफ या तिहींमही सार-ख्याच रीतीनें कोपविणारा आहे.

वर सांगितलेले सर्प आहारार्थी. भयामुळें, पाय लागल्या-मुळें, अंगांत विषाचा संचय जास्ती होऊन तेणें करून उत्पन्न झालेल्या माजामुळें, पापवृत्तीमुळें, वैरामुळें, आणि देव, ऋषि किंवा यम यांच्या आज्ञेमुळें, मनुष्यास दंश करतात. त्यांत आरंभींच्या कारणापेक्षां क्रमाक्रमानें पुढील कारणांनीं झालेल्या दंशांत विष अधिक असतें. वर सांगितलेल्या सर्पाच्या जाति व दंशाचीं कारणें जाणून जी चिकित्सा करणें ती करावी. व्यंतर नांवाचे सर्प पाप-वृत्तीचे असल्या कारणानें बहुधा रस्त्यांतच पडलेले असतात.

ज्या अवयवास सर्पानें दंश केला असेल, व जेथें त्याची फक्त लाळच दिसत असेल, पण दांताचा वण दिसत नसेल, तथच्या दंशास तुंडाहत असें नांव दिलें आहे. रक्ताशिवायच एक किंवा दोन वण दिसतील तर त्यास व्यालीढ असें नांव दिलें आहे. रक्ताची चिळकांडी फुटून दांताचे दोन वण दिसतील तर त्या दंशास व्यालुप्त असें नांव प्राणाचार्यांनीं दिलें आहे. तीनही दांत

मांसांत जाऊन खुपसले असतील व रक्ताची अविच्छिन्न चिळकांडी सुटली असेल तर त्या दंशास दष्टक असें नांव आहे. तसेंच चार दांत लागले असून रक्त वहात असलें तर त्या दंशास दष्टनिपीडित ह्मणतात. या सर्व दंशांमध्यें पहिले दोन निर्विष जाणावे ह्मणजे त्यांच्यापासून मनुष्यास विषार चढत नाहीं. तिसरा दंश कष्टसाध्य जाणावा, व शेवटला तर असाध्यच होय. समजुतीसाठींच दंशाचे वरीलप्रमाणें विभाग करण्यांत आले आहेत. सर्पाचें विष जोंवर रक्ताला स्पर्शलें नाहीं. तोंवर त्याची बाधा होऊं शकत नाहीं. पण त्याचा थोडाही अंश रक्ताशीं मिळाला कीं तो मग पाण्यांत टाकलेल्या तेलबिंदूप्रमाणें पसरत जातो.

भित्र्या मनुष्याच्या वरी प्रथम शरीरांतील वायु कोपून त्या स्थानीं सूज उत्पन्न होते. या सूजेस सर्पांगाभिहत या नांवानें ओळखतात. दुर्गस्थानीं अथवा अंधारांत कोणत्याही पदार्थानें अंग खरचटलें असतां, तेथें सर्प चावला अशी शंका उत्पन्न झाल्यानें सुद्धां उद्वेग, ज्वर, ओकारी, मूर्च्छा, दाह, ग्लानि, मोह, व अतिसार वगैरे उत्पन्न होतात. हें सगळें कृत्य शंकाविषाचें जाणावें. ज्या दंशामध्यें सुईनें टोंचल्याप्रमाणें पीडा होते, सूज येते व खरूज होते, तो दंश विषारी जाणावा. आणि तसें कांहीं जाणवलें नाहीं तर तो निर्विष जाणावा.

दर्वीकर नामें सर्पानें दंश केल्यावर पहिल्यानेंच त्याच्या विषाचा वेग प्रगट होतो तेव्हां व्रणांतून काळें रक्त निघतें, व चावलेल्या मनुष्याचें शरीर काळें पडतें, त्यावर मुंग्या चालत असल्याप्रमाणें भास होतो. दुसऱ्या वेगांत, अंगावर गांठी उठतात. तिसऱ्यांत डोकें जड होऊं लागतें, व व्रण कुजल्याप्रमाणें होऊन त्याला दुर्गंध

सुटतो. चौथ्या वेगामध्यें तोंडाला चूळ सुटतात व ओकाऱ्या होतात. पांचव्या वेगांत शरीराचे सांधेनी सांधे ढिले होऊन त्यांच्यांत वेदना उत्पन्न होतात. रोग्याला तंद्रा येऊन अंगाचा दाह होतो व उचकी उचलते. साहाव्या वेगांत हृदयांत दुखूं लागतें, शरीर जड होतें, मूर्च्छा येते व अतिसार उद्भवतो. आणि सातव्या वेगामध्यें विष वीर्यासहित रोग्याच्या मानेचा कांटा मोडून टाकतें. त्यामुळें तो निश्चेष्ट पडून मरण पावतो.

मंडली नामक सर्पाच्या दंशानें आलेल्या पहिल्या वेगामध्यें मनुष्याच्या शरीरांतलें रक्त पिवळें होतें व सर्वांगाला ठणका लागतो. दुसऱ्या वेगामध्यें सूज येते. तिसऱ्यांत वण कुजल्यासारखा होऊन घाम सुटतो, व तोंडास कोरड फार पडते. चौथ्यामध्यें ज्वर व दाह उद्भवतो. आणि पांचव्यांत सर्व शरीराचा दाह होतो.

राजीमान नामक सर्पानें डसलेल्या रोग्याचें रक्त पहिल्या वेगामध्यें पांढरें होतें. व त्यामुळें सर्व शरीर पांढरें पडतें. दुसऱ्या वेगामध्यें शरीर जड होतें. तिसऱ्यांत दंशाचा वण कुजल्यासारखा होऊन नाकांतून व डोळ्यांवाटे पाणी वाहूं लागतें. चौथ्यांत डोकें जड शिळेसारखें होतें. आणि पांचव्यांत मान ताठते. बाकीच्या दोन वेगांत शरीराचा भंग, थंडी वाजून ताप इत्यादि उपद्रव पहिल्याप्रमाणेंच होतात. यापैकीं पहिल्या पांच वेगांपर्यंतच रोगी आला असला तर त्याची चिकित्सा करावी. परंतु साहाव्यांत व सातव्यांत चिकित्सा न करावी हेंच बरें.

पाण्यांत राहणारे पाणसर्प, नुकत्याच केलेल्या स्त्रीसंभोगामुळें क्षीण झालेले, भय पावलेले, मुंगुसानें जिंकिलेले, आणि थंडी, ऊन, व्याधि, भूक, तहान व श्रम यांनीं पीडलेले, नुकतेच दुसऱ्या

ठिकाणाहून आलेले, नुकतीच कांत टाकण्यास आलेले, कुश औषधि व कांटेरी रान यांत फिरणारे, व देवस्थानांत राहणारे सर्प थोडे विषारी असतात.

स्मशानांतला किंवा भूतें असलेल्या वृक्षावरला सर्प ज्या मनुष्याला चावला असेल त्याची चिकित्सा करूंच नये. पंचमीच्या दिवशीं, कृष्ण व शुक्ल पक्षांच्या संधीला, अष्टमी, नवमी व संध्याकाळ, मध्यरात्र, मध्यप्रहर, या वेळीं, भरणी, कृत्तिका, मघा व आश्लेषा या नक्षत्रांवर जर सर्पदंश झाला असेल तर तो मनुष्य वांचण्याची आशा नाहीं. ज्याच्या मर्मस्थानीं दंश झाला तोही जगावयाचा नाहीं. दंश होतांच ज्या मनुष्याचें मुख व नेत्र पांढरे पडतात, डोक्याचे केस गळून पडतात, जीभ जड होते, वारंवार मूर्छा येऊं लागते, व श्वासोच्छ्वास मंद पडूं लागला, त्याची जगण्याची आशा धरूं नये. ज्याला सर्पदंश होऊन पोट फुगलें, ओकाऱ्या येऊं लागल्या, श्वास व खोकला हीं एकदम सुरू झालीं व हृदयांत शूळ उत्पन्न होऊं लागला, त्याच्या जीवाची आशा नाहीं. दंश होतांच ज्याच्या तोंडास फेस येऊं लागतो, बेशुद्ध पडतो, व शरीराचे सांधे शिथिल होतात, तो मनुष्य सुद्धां जगावयाची आशा नाहीं. हींच लक्षणें विष खालेल्या व विषारी शस्त्रानें जखमी झालेल्या मनुष्यास होतील तर त्याच्या जगण्याचीही आशा सोडावी. विषानें घेरलेल्या ज्या मनुष्याला तीक्ष्ण नस्य दिल्यानेंही शरीरांत चैतन्य दिसून येणार नाहीं, कर्णस्थानांत रक्त आढळणार नाहीं व काठी मारल्यानेंही अंगावर वळ उठणार नाहीं, तो अवश्य मरण पावेल. हीं वर सांगितलेलीं चिन्हें उत्पन्न झालीं नसतील तोंपर्यंत वैद्यानें रक्षेशिवाय झळझळीत निखाऱ्यांप्रमाणें नाश पावणाऱ्या रोग्याच्या कंठगत प्राणांचें रक्षण व्हावें म्हणून विषाच्या उताराचे उपाय योजावे.

वर सर्पविषाच्या अमुक वेगांत चिकित्सा करूं नये असें ह्मटलें आहे, त्यावरून एवढेंच घ्यावयाचें कीं सदहु स्थितींत विष उतरण्याचा संभव कमी आहे. तरी शेवटपर्यंत उपाय हे केलेच पाहिजेत. कारण चुकीनें किंवा हयगईनें रोग्याचें नुकसान होण्याला संभव असतो त्यास थारा मिळूं नये हें योग्य आहे.

सर्प चावल्यावर शंभर टिचक्या वाजविण्या इतका वेळ विष स्थिर राहून नंतर शरीरांत पसरतें व रुधिरादिक धातु दूषित करण्यास प्रारंभ करतें; म्हणून इतका काळ लोटला नाहीं तोंच दंश झालेला भाग कापून काढावा अथवा त्यावर डाग द्यावा, म्हणजे विष शरीरांत पसरणार नाहीं. दंश झालेल्या भागाच्या वरल्या आंगास रेशमाच्या सणाच्या किंवा सुताच्या बळकट दोऱ्यानें करकचून बांधावें म्हणजे नाडींतील रक्तप्रवाह बंद पडून शरीरांत विष पसरणार नाहीं. यानंतर चावल्या ठिकाणीं दाबून दाबून वीष बाहेर काढावें. जर दंश मर्मस्थानीं आला नसेल तर वरीलप्रमाणें उपाय केल्यानें शरीरांत विषाचा प्रसार होऊं शकत नाहीं.

मंडली नांवाचा सर्प पित्तप्रकृतीचा असल्या कारणानें त्याच्या शिवाय इतर सर्पांच्या दंशावर तापविलेल्या सोन्याच्या लोखंडाचा अथवा झळझळीत कोलिताचा डाग द्यावा, म्हणजे विष जागच्या जागीं जळून जाईल.

माती, भस्म, विषहारक औषध, अथवा शेण यापैकीं कोणतीही एक वस्तू अथवा या सर्वच वस्तू तोंडांत ठेवून दंशाची जखम तोंडानें चोखून चोखून विष थुंकून टाकावें ह्मणजे विषाचा वेग हटेल. विषहारक औषधांचा दंशावर आणि सर्वांगावर लेप केल्यानें, किंवा चंदन व वाळा यांचा लेप केल्यानें, किंवा मस्तकावर गार पाणी

मारल्यानें, विषाचा वेग बंद पडतो. विष रक्तांत मिसळलें असें नजरेस येतांच, शीर तोडावी व रक्त बाहेर काढून टाकावें. हा उत्तम उपाय होय. कारण कीं, अशानें रक्ताबरोबर विषही बाहेर पडतें. विषयुक्त रक्ताला दुर्गंध असतो आणि बिस्तवावर टाकलें असतां चटचट आवाज होतो. जोंवर अशीं चिन्हें रक्तांत दिसत असतील तोंवर रक्त काढीतच राहावें. कदाचित् सूज आल्या कारणानें शीर तोडतां येण्यास हातास लागत नसेल तर तुंबडी अथवा जळवा लावून रक्त ओढून घ्यावें. खराब रक्त काढून टाकल्यावर शीतकर औषधाचा लेप करावा म्हणजे चांगलें रक्त वाहण्याचें बंद होईल. वर लिहिल्याप्रमाणें करूनही जर रक्ताचा प्रवाह बंद न आला तर विषाच्या वेगामुळें मनुष्याच्या शरीरांत मूर्च्छादिक जे उपद्रव उद्भवतात ते शीतोपचारानें शांत करावे. प्रथम रोमांच उभे राहतील तेव्हां पंख्यानें वारा घालावा. विषयुक्त रक्त उरलें नाहीं म्हणजे तेच वेळीं विषाचा वेग बंद होतो ; मग शीतोपचार करण्याची जरूरच रहात नाहीं. विषाच्या तीक्ष्ण स्वभावामुळें तें हृदयांत प्रथम शिरतें. म्हणून हृदयाचें रक्षण अगोदर केलें पाहिजे. त्यास फक्त तूप किंवा तूप आणि मध किंवा तुपांत हृदयपीडानिवर्तक औषध घालून, तें पोटांत द्यावें, असें न केलें तर हृदयांत आवरण उत्पन्न होऊन कफ जमतो. हा कफ हृदय जड करतो आणि तेणें करून उश्वास येऊं लागतात. हीं लक्षणें दिसलीं म्हणजे हृदयांत आवरण जमलें आहे असें समजून विषहारक उपायांनीं शांति करावी.

सर्प, दोष, प्रकृति आणि स्थान इत्यादिकांचा विचार करून वर सांगितल्याप्रमाणें सामान्य चिकित्सा करूनही जर विषाचा वेग हटत नाहीं असें दिसलें, तर विशेष क्रिया करावी.

वर सांगिलेला दर्वीकर नांवाचा सर्प चावला तर निर्गुंडीचें मूळ, गरणी, पांढरी रिंगणी हीं सर्व औषधें वांटून पाजावीं आणि मध व कवठ हीं एकत्र करून त्यांचें नस्य द्यावें. काळा सर्प चावला असेल तर दंशस्थानांतून रक्त काढल्यावर नरवेल आणि स्थलकमळ यांचा लेप करावा. तांदुळजा, शिवणी, पांढरा अघाडा, गरणी, महाळुंग, व खडीसाखर या औषधांचें पान, अंजन आणि नस्य केल्यानें दर्वीकर आणि राजीमान नांवाच्या सर्पाचें विष शांत होतें. वांझ कर्कोटी, द्राक्ष, नेपाळी, पांढरी गरणी आणि आपटा हीं औषधें समभाग घेऊन, तुळशीचीं पानें, कवठ, बेलफळ आणि डाळिंब हीं अर्ध भाग घेऊन एकत्र करावीं, मग त्यांत मध घालावी. ह्या औषधानें मंडली नामक सर्पाचें विष उतरतें. पंच वल्क, त्रिफळा, नागकेशर, काळा वाळा, जेष्टमध, वाळा, खडी साखर, आणि दोन्ही प्रकारचीं कमळें या औषधांत मध घालून त्याचा लेप केल्यानें मंडली सर्पाचें विष उतरतें. शिवाय सूज, विसर्प आणि काहली हे विकारही मोडतात. शिवण, वडाची पारंबी, खडी साकर, मंजिष्ठ आणि जेष्टमध हे पदार्थ वांटून प्यावयास दिल्यानेंही मंडली नामक सर्पाचें विष उतरतें.

**विषारी किडे**—वर सांगितलेल्या सर्पांची विष्टा, मूत्र, वीर्य, अंडीं आणि कुजलेलें शरीर यांतून उत्पन्न होणारे किडे, वातादिक एकेक प्रकृतीप्रमाणें, तीन प्रकारचे आहेत. कित्येक मिश्रप्रकृतीचे ही असतात. यावरून किड्यांचे एकंदर चार भेद होऊं शकतात. त्यांत वातप्रकृतीच्या किड्यांनीं दंश केलेल्या मनुष्याला दंशस्थानीं टोचल्याप्रमाणें वेदना होतात. पैत्तिक किड्यांनीं चावलेल्या मनुष्याच्या दंशस्थानांतून स्राव फार होतो व आगही फार होते. पण पिकल्यावर आकारानें, पिकलेल्या पिलूच्या फळासारखा किंवा खजुराच्या अठी-

सारखा दिसतो. कफप्रकृति किडा चावला तर दंशस्थानीं पीडा थोडी होते व व्रण उंबराच्या फळाप्रमाणें असतो. तीनही दोषांनीं युक्त किड्यांच्या दंशांतून स्राव फार होतो व त्यांत वर सांगीतलेलीं सर्व लक्षणेंही दिसून येतात. हा दंश असाध्य म्हणून समजावा. किड्याच्या विषाचे वेगही सर्पविषाप्रमाणेंच असतात. कारण या किड्यांच्या विषानेंसुद्धां सूज, दुर्गंधी रक्त, मस्तक व डोळे जड होणें, मूर्छा, भ्रम, श्वास, व अत्यंत वेदना हीं उत्पन्न होतात. कोणत्याही जातीचा किडा चावो, तरी व्रणाच्या आसपास कड पडते, सूज येते, व चावलेल्या मनुष्याला ताप, कंडू व अरुचि उत्पन्न होते.

**विंचू**—विंचवाचें विष तीक्ष्ण असतें. तें अग्निप्रमाणें आग करतें, हळुहळू वर चढतें, व मग दंशस्थानीं स्थिर होतें. दंशस्थान अतिशय पीडाकारक, काळ्या रंगाचें, व जणों तावडतोब फुटेल असें होतें. गाईच्या कुजणाऱ्या शेणांतून, विषारी प्राण्याच्या दंशानें मेलेल्या प्राण्याच्या कुजणाऱ्या शरीरांतून व कुजलेल्या सर्पाच्या शरीरांतून, विंचू उत्पन्न होतात, व ते क्रमें करून मंदविषारी, मध्यम विषारी, व महाविषारी असे असतात. मंदविषारी विंचू व यासारखे किडे पिवळे, पांढरे, भुरे, कबरे, काळे, केसाळ, पंखाचे, तसेच तांबड्या व पांढऱ्या पोटाचे असे असतात. मध्यमविषारी किडे भुरकट पोटाचे, तीन पंखांचे, तांबड्या, पिवळ्या व गोऱ्या वर्णाचे, चित्रविचित्र रंगाचे व रक्तासारख्या लाल रंगाचे असे असतात. अधिक विषारी किडे हिरव्या काचेसारखे, तांबड्या, पांढऱ्या व काळ्या रंगाच्या शरीराचे तसेच एक किंवा दोन पंखांचे असतात. महाविषारी किड्यांनीं चावलेला प्राणी अवाचक, जड, ज्वरयुक्त, दंशव्रणांतून काळें रक्त

स्रवणारा, श्रोत्रादिक इंद्रियांनीं शब्दादिक विषयांचें ग्रहण न करणारा, घामानें थबथबलेला, मूर्छित, मुकटलेल्या तोंडाचा, विव्हळ वेदना भोगणारा, व शिथिल मांस झालेला असा होतो. या महाविषारी किड्यानें चावलेल्या मनुष्याला उपाय केले तरी क्वचितच कोणी वाचूं शकतो. उच्चिटिंग नांवाचे विंचू, वर सांगितलेल्या विंचवापेक्षां अधिक वेदना उत्पन्न करणारे असतात. ते लिंगाला स्तब्ध करतात, रोमांच उभारतात, व त्यामुळें शरीरांतून थंड घाम निघतो. उष्ट्रधूम, व रात्रीस फिरण्याच्या परिपाठावरून रात्रिक अशीं आणखीही नांवें यास प्राप्त झालीं आहेत. वातपित्ताचें ज्यांमध्यें आधिक्य आहे अशा किड्यांस "कणभोदर" अशी संज्ञा आहे. वर उष्ट्रधूम विंचवापर्यंत जे विंचवांचे प्रकार सांगितले, ते बहुत करून वात, पित्त व कफ प्रकृतीचे असतात. चावलेल्या मनुष्याला जीं जीं लक्षणें होतील, त्यांप्रमाणें त्यांची चिकित्सा करावी.

वातपित्त प्रकृतीच्या किड्यांच्या विषाचीं चिन्हें झालीं ह्मणजे हृदयांत पीडा, ऊर्ध्वश्वास, जाड्य, नाडी आंखडणें, हाडांच्या संधींत पीडा, डोकें फिरणें, पायांत पेटके येणें, शरीरावर काळसरपणा येणें इत्यादि होतात. पित्तकृतीच्या किड्यांच्या विषाचीं चिन्हें, बेशुद्धि, ऊन निःश्वास, हृदयाचा दाह, तोंड कडू होणें, मांस फुटणें, पूज व तांबडा पिंवळा वर्ण वगैरे होत. तसेंच कफप्रकृतीच्या किड्यांच्या विषाचीं चिन्हें ओकारी, अरुचि, वारंवार तोंडास चूळ सुटणें, लाळ पडणें, नाक वाहणें, तसेंच तोंडाच्या आंतला भाग थंड व गुळगुळीत लागणें वगैरे जाणावीं.

वातिक विषाच्या व्रणावर तिळाचा पेंड बांधावा, अंगाला तेल चोळावें, घाम आणावा व आणखीही बृंहणीय चिकित्सा करावी.

पैत्तिक विषाच्या व्रणावर चंदनादिक थंड पदार्थांचा लेप करावा, व शीतळ जळ शिंपडावें. आणि कफविष उतरण्यासाठीं लेखन, छेदन, स्वेदन, व वमन इत्यादि उपाय करावे.

वर सांगितलेल्या तीन प्रकारच्या किड्यांची चिकित्सा असें करून स्वेदन, आलेपन व सेचन यांहीं करून करावी. हा क्रम मूर्छित व सिकलेल्या दंश स्थानाच्या रोग्याचा वर्ज्य आहे. सर्व सविष प्राण्यांच्या दंशावर मनुष्याच्या मस्तकावरील केस, पिवळा शिरस, व जुना गूळ यांचा धूर देणें हें मोठें औषध आहे. याशिवाय विषहारक दुसरे उपायही करावे. उग्र विषारी किड्यांच्या दंशाची चिकित्सा सर्पाच्या दंशाच्या चिकित्सेप्रमाणेंच करावी. पहिल्यानें वमनविरेचन करवून जळजांभळाच्या सालीचा लेप केल्यानें सर्वच किड्यांचें विष उतरतें. त्याचे उपद्रव ह्मटले ह्मणजे सूज, दुःख, दाह, ज्वर इत्यादि; यांच्या निवारणार्थ मोत्यांचें चूर्ण करून त्याचा लेप फारच उत्तम गणला आहे.

उंदीर—लालन, चपळ, असित, श्वेत, चिचुंदरी वगैरे उंदराच्या कित्येक प्रसिद्ध व कित्येक अप्रसिद्ध अशा सर्व मिळून अठरा जाति आहेत. उंदरांचें वीर्य मनुष्याच्या ज्या अवयवावर पडतें किंवा वीर्यानें भरलेल्या आपल्या अंगानें उंदीर मनुष्याच्या ज्या अवयवाला स्पर्श करतो, तो अवयव प्रथम पांढरट होतो, नंतर त्यांत गांठी, सूज, कुजटपणा आणि कड वाजणें वगैरे चिन्हें दिसूं लागतात; तसेंच त्या मनुष्याला भ्रम, अरुचि, थंडी वाजून ताप येणें, अत्यंत पीडा, कंप, सांधे दुखणें, रोमांच उभे राहणें, हेही उपद्रव कित्येक वर्षे बाधत असतात. ओकारी होते वेळीं कफांत, गुरफाटलेलीं उंदराचीं पिलेंही सांपडतात. रोग्यास तहान फार लागते. उंदराचें विष सगळ्या शरी-

रांत पसरतें एवढेंच नाहीं पण वारंवार कोप पावतें. उंदीर चावल्यावर मूर्च्छा, सूज, अंगाच्या वर्णामध्यें फेरबदल, कुजणें, बहिरेपणा, ताप, डोकें जड होणें, लाळेबरोबर रक्त पडणें, व ओकाऱ्या होणें, हीं चिन्हें होऊं लागलीं म्हणजे उंदिराचें विष असाध्य झालें असें समजावें. तसेंच गुह्यस्थानीं शून्यत्व, ओठ फिकट होणें, उंदिराच्या आकृतीच्या गांठी अंगावर उठणें व चिचुंदरीच्या वासासारखा वास अंगास येणें अशीं चिन्हें ज्याला होऊं लागलीं त्याची चिकित्सा करूं नये.

उंदीर चावल्याचें लक्षांत येतांच त्यावर डाग द्यावा, म्हणजे वरील उपद्रव उत्पन्नच होणार नाहींत. मग त्या डागामधून स्राव होऊं द्यावा. व याप्रमाणें चांगल्या वाहल्यावर मग शिरीष, हळद, तगर, केशर व गुळवेल यांचा लेप करावा. तसेंच घराचा येरोसा, मंजिष्ठ, हळद व लवण यांचा लेप केल्यानेंही उंदिराचें विष उतरतें. व दंशस्थानीं कड बाजली असली तर तीही मोडते. त्यानंतर ती जखम अम्ल पदार्थानें धुऊन, मग निर्मळ पाण्यानें धुऊन काढावी. मग त्यावर काळी निशोत्तरा, भुईरिंगणी, बेलाचें मूळ, व गुळवेल यांचा लेप करावा. अथवा विष व सूज उतरणाऱ्या औषधांचा लेप करावा. किंवा शिर तोडावी. शिवाय कमळाच्या काढ्यानें किंवा शिरीष व अंकोल यांच्या काढ्यानें ओकारी काढावी. कडू शिराळें, नागरमोथा, मदनफळ किंवा कठ यांचें चूर्ण करून दह्यांत घालून, तें खावें व ओकारी काढावी. वेखंड, नागरमोथा, मदनफळ अथवा कोष्टकोळिंजन यास गाईच्या मुतांत वांटून पाजलें असतां अठराही प्रकारचें उंदिराचें विष उतरतें. विरेचन देण्याची जरूर दिसली तर निशोत्तर व त्रिफळा यांच्या कल्काचें विरेचन द्यावें. त्रिकटु गाईच्या

शेणाच्या रसांत वांटून अंजन करावें किंवा अंकोलाच्या मुळाचें चूर्ण करून व बकरीच्या मुतांत वाटून, त्याचा रस द्यावें व त्याचा वर लेपही करावा. यानेंही सर्व प्रकारचें उंदिराचें विष उतरतें.

कुत्रे—कुत्र्याच्या अंगांत कफाची अभिवृद्धि होते, तेव्हां अधिक कफयुक्त तीनही दोष, संज्ञेचें वहन करणाऱ्या नाड्यांमध्यें शिरून, संज्ञा हरण करून, त्याला अभिभवितात. यानें कुत्रें लाळयुक्त मुखाचें, आंधळें, बहिरें, वसलेल्या शेपटीचें, मांद्याचें व मुखाचें, मस्तकशूळामुळें पीडित होत्सातें, वहांकडे धावाधाव करतें; तेव्हां तें पिसाळलें असें म्हणतात. पिसाळलेलें कुत्रें मनुष्यास चावल्यास दंशस्थानांतून निर्जीव व काळें रक्त वाहतें. मग हृदयांत पीडा, मस्तकांत वेदना, ज्वर, स्तंभ, तृषा, व मूर्च्छा वगैरे चिन्हें उद्भवतात. पिसाळलेल्या कुत्र्याच्याप्रमाणेंच पिसाळलेल्या कोल्ह्याच्या विषादिकाचीही रीति जाणावी.

**कुत्रें आदिकरून प्राण्याची सविष व निर्विष अवस्था**—वर सांगितलेले प्राणी सविष अवस्थेमध्यें जर मनुष्यादिकास चावले तर त्यामुळें, सुया टोचल्याप्रमाणें ठुसठुस, शरीर निस्तेज होणें, अवयव बधिर होणें, कुजणें, ज्वर, भ्रम, दाह, पीडा, पिकणें, सूज, गांठी येणें, दंश फुटणें, फोड, लाल कड वाजलेलीं मंडळें उगवणें इत्यादि लक्षणें होतात. परंतु निर्विष अवस्थेंत, दंश झाला असतांही हीं चिन्हें होत नाहींत.

**असाध्य पिसाळलेपणा व जळसंत्रास**—पिसाळलेला प्राणी जेव्हां मनुष्यास किंवा इतर कोणा प्राण्यास चावतो तेव्हां त्यास आरशांत किंवा जळादिकांत तो पिसाळलेलाच प्राणी दिसूं लागतो, व त्याच प्राण्याच्या चेष्टा आणि शब्द करीत करीत तो प्राण

मोडतो. पिसाळलेला प्राणी चावला नसतांही, जरी केवळ पाहण्यानें किंवा शब्दानें किंवा स्पर्शानें फक्त कोणी घाबरून गेला असला तर त्यासही दंश झाल्यासारखीं लक्षणें होतात. तेव्हां त्यास "जळसंत्रास" असें नांव दिलें आहे. यांचा पिसाटपणा असाध्य जाणावा.

**पिसाळलेला प्राणी चावल्यास त्याची चिकित्सा.**— कुत्रें वगैरे पिसाळलेला प्राणी मनुष्यास चावल्यास दंशस्थानीं कढत कढत तुपानें शेकावें. नंतर उंदिर चावल्यास जे उपाय करावे म्हणून सांगितले आहेत ते करावे. जुनें तूप मिळेल तर तें पाजावें. परंतु विषप्रकरणांत पहिल्यानें सांगीतल्याप्रमाणें पिसाळलेल्या कुत्र्याच्या दंशाच्या विषारावर थंड पाण्याचें सिंचन करूं नये. रुईच्या चिकांत विरेचन पदार्थ घालून द्यावा. भाजलें तिळांचें चूर्ण व तेल रुईच्या चिकांत घालून प्यालें असतां पिसाळलेल्या कुत्र्याचें विष हटकून उतरतें.

**चतुष्पाद व द्विपाद प्राण्याचें विष व त्यावर उपाय**— चतुष्पाद प्राणी हत्ती, घोडा वगैरे आणि द्विपाद प्राणी मनुष्य. मयूर, कोंबडा वगैरे यांच्या दांतानें किंवा नखानें क्षत पडलें व त्यामुळें अत्यंत पीडा व ज्वर उत्पन्न झाला तर, कायफळ, साग, गळजिभी, कांटेरी लाजाळू, दोनही प्रकारची हळद व काव यांचा लेप करावा म्हणजे तेणें करून विषाची शांति होईल.

याप्रमाणें विषाचे सर्व भेद सांगितल्यावर आतां परस्परविरुद्ध प्रकृतीचें भक्ष्य एकत्र खाल्यानें जो विषासारखा परिणाम प्रगट होतो तोही विषार असेंच समजून त्याजविषयीं थोडकेंसें विवेचन येथें देणें जरूर आहे.

**विरुद्ध गुणाच्या पदार्थांच्या संयोगानें बनणारा विषयोग**—कित्येक द्रव्यें देहांतील रसादिक धातूंचा क्षय करित अस-

त्याकारणानें विरुद्ध म्हटलीं आहेत. आणखी कित्येक परस्परविरुद्ध गुणधर्माचीं द्रव्यें, एकत्र आल्यानें व संस्कारानें, तसेंच देश, काळ व मात्रा यांच्या योगानें, विषासारखी क्रिया करतात. यापैकीं ज्यांचा भक्ष्य पदार्थांत फार उपयोग होतो त्यांचें मात्र दिग्दर्शन येथें करतों.

ऊन केलेली मध, समभाग घेतल्यास मध व तूप, समभाग घेतल्यास अंतरिक्षजळ व तूप, एरंडेल व मध, मधावर ऊन पाणी पिणें, ताकांत शिजविलेलें कवठफळ, तशीच रात्रीची शिळी कोकमाचीची भाजी, हे सर्व पदार्थ परस्परविरुद्ध असल्यामुळें, ते एकदम खाण्यांत आल्यास मृत्यु येतो.

दुधाबरोबर मत्स्य खाऊं नयेत. कारणकीं हे दोनही पदार्थ स्वादानें मधुर, पाकावस्थेत मधुर, रसादिक धातूंस वाहवणाऱ्या नाड्यांस अडथळा आणणार व शीतोष्ण वीर्यवान असल्या कारणानें परस्परविरुद्ध वीर्याचे होत. म्हणूनच ते नाड्यांस अडकवून रक्तास दूषित करणारे आहेत. ते खाण्यांत आल्यानें रुधिरजन्य अनेक व्याधि उत्पन्न होतात.

शहरांत, कफप्रधान देशांत, आणि जळांत राहणाऱ्या जंतूंचें मांस, मध, तीळ, गुळ, दूध, उडीद, मुळा, पुष्पतंतु व भिजत घातलेले मूग इत्यादि एकत्र खाऊं नयेत. कारण हे बहिरेपणा, जडपणा, बोबडेपणा, मुकेपणा, कांपरें अथवा मरणही उत्पन्न करतात. मुळा व लसून इत्यादि पदार्थ खाऊन वर दूध पिऊं नये. कारण त्यानें कोड उठतें. दुधाबरोबर कोणताही आंबट पदार्थ खाऊं नये.

याप्रमाणें परस्परविरुद्ध गुणाच्या पदार्थांचें विवेचन थोडक्यांत केलें. परंतु सर्वच देशच्या मनुष्यांचे आहार एकसारखे नसतात.

म्हणून कोणत्या देशांत, कोणत्या मनुष्यांस कशा रीतीनें मिळालेले पदार्थ विषरूप होतात, तें सांगितल्यावर मग नांवनिशीवार पदार्थ सांगण्याची आणखी गरज उरत नाहीं. तेव्हां यांचें थोडक्यांत विवेचन खालीं लिहितों.

**अठरा प्रकारचा विरुद्ध विपर्याग**—जे पदार्थ शरीरांत प्रविष्ट झाल्यावर, कोणत्याही एखाद्या दोषाचा आश्रय करून, रीती-प्रमाणें बाहेर येत नाहींत ते सर्व पदार्थ विरुद्ध गुणवानच समजावे. तसेंच देश, काळ, अग्नि, मात्रा, सात्म्य, असात्म्य, अनिल, संस्कार, वीर्य, पोट, अवस्था, क्रम, परिहार, पाक, संयोग, हृदय, संपत आणि विधि यांनीं जें द्रव्य विरुद्ध होतें तें अहित म्हणजे विषासा-रखें गणून, त्याग करण्यास योग्य आहे.

जांगल देशांत रूक्ष, उष्ण, व तीक्ष्ण गुणाचे पदार्थ विरुद्ध होत. कफप्रधान आनूप (पाणथळ) प्रदेशांत स्निग्ध व शीतवीर्याच्या पदार्थांचें सेवन विरुद्ध समजावें.

शीत काळांत शीत वीर्याच्या व रूक्ष पदार्थांचें सेवन, तसेंच उष्णकाळांत तिखट व उष्ण वीर्याच्या पदार्थांचें सेवन विरुद्ध जाणावें.

तीक्ष्ण आदिकरून चार भेद असलेल्या अग्नीला प्रतिकूळ (तीक्ष्ण अग्नीमध्यें हलका व मंद अग्नीमध्यें जड) पदार्थ विरुद्ध होय. ज्या मनुष्याला उष्ण व तिखट पदार्थ मानवतो त्याला स्वादु व शीतवीर्याच्या पदार्थांचें सेवन हें सात्म्याला विरुद्ध आहे. जो पदार्थ ज्याला मानवत नाहीं त्याचा उपयोग त्याला करण्याचा प्रसंग आला म्हणजे तो असात्म्य विरुद्ध आहे. वात, पित्त व कफ यांच्या गुणाशीं विपरीत जे गुण त्यांनीं युक्त पदार्थांचें सेवन तें तशा

प्रकृतीच्या मनुष्याला हितकर आहे. परंतु त्याच्या उलट म्हणजे वात प्रकृतीच्या मनुष्याला वातल, पित्तप्रकृतीच्याला पैत्तिक व कफ प्रकृतीच्याला कफकर औषधाचें, अन्नाचें किंवा क्रियेचें सेवन दोषविरुद्ध आहे.

जो पदार्थ ज्या संस्काराला लायक नसेल त्याला तो संस्कार करून, खाण्यांत आणणें हा संस्कारविरुद्ध समजावा.

उष्णवीर्याच्या द्रव्याशीं शीतवीर्याचा पदार्थ भक्षण करणें हें वीर्यविरुद्ध आहे.

क्रूर (वायुप्रकृतीच्या) पोटाच्या मनुष्याला थोडें, मंदवीर्य, व भेदनशक्तिरहित द्रव्याचें सेवन, मृदु (पित्तप्रकृतीच्या) पोटाच्या मनुष्याला गुरु, भेदन करणारें व पुष्कळ द्रव्याचें सेवन कोष्ठ-विरुद्ध आहे.

मेहनत व कसरत करण्यामध्यें आसक्त असणाऱ्या मनुष्याला वायु कोपविणारें व अर्पितून उठलेल्या व आलस्यप्रधान पुरुषाच्या सेवनांत कफ कोपविणारें द्रव्यें आलीं तर तें अवस्थाविरुद्ध आहे.

विष्ठेचा व मूत्राचा त्याग केल्यावांचून व क्षुधा उत्पन्न झाल्या-वांचून, खाणें, तसेंच भूक लागल्यावर तावडतोब खाण्यास न मिळतां भूक निवाल्यावर जें भोजन करणें, तें क्रमविरुद्ध समजावें.

डुकर वगैरे जनावरांचें मांस भक्षण केल्यावर नंतर उष्ण पदार्थ सेवन करणें व तूप वगैरे प्याल्यावर मग थंड पदार्थ खाणें हीं दोनही परिहारविरुद्ध होत.

विषारी काष्ठांनीं शिजविलेलें, कच्चें व करपलेलें अन्न हें पाक-विरुद्ध समजावें.

आंबट पदार्थ दुधाशीं खाणें हें संयोगविरुद्ध आहे.

मनाला न आवडणारा पदार्थ खाणें हें हृदयविरुद्ध आहे.

ज्यांत रस उत्पन्न झाला नसेल अथवा एक प्रहर होऊन गेल्यामुळें जें रसहीन झालें अथवा जें कुजूं लागलें तें अन्न संपद्विरुद्ध होय.

भोजनाचे वेळीं जे तोंडीं लावण्याचे पदार्थ सांगितले आहेत ते, विधि सोडून, भक्षण करणें हें विधिविरुद्ध जाणावें.

**विरुद्ध अन्न खाल्ल्यानें होणारे उपद्रव व त्यांची चिकित्सा**—याप्रमाणें खाल्लेलें अन्न परिणामीं विषसमान झाल्यास विरुद्ध समजावें. जो मनुष्य प्रदीप्त अग्नीचा, तरुण, कसरत करणारा, व जो बळवान असेल, त्यानें न आवडणारें अन्न एक वेळ थोडेंसें खाल्लें तरी तें अवगुण करीत नाहीं. विरुद्ध अन्न खाल्ल्यानें षंढपणा, आंधळेपणा, विसर्प, जळोदर, विस्फोटक, उन्माद, भगंदर, मूर्च्छा, मद, पोट फुगणें, गलग्रह, पांडुरोग, आमविष, किलास, कुष्ठ, ग्रहणी, रक्तपित्त, ज्वर, पीनस, संतानदोष, आणि मृत्यु यांस तें उत्पन्न करणारें आहे.

विरुद्ध अन्न खाल्ल्यानें उत्पन्न झालेल्या व्याधींचा नाश विरेचन, वमन, शमन, व हितसेवन यांहीं करतात.

**मधुरादिक रसाच्या योगामुळें होणारी परस्परविरुद्धता**—मधुर व अम्ल रसाच्या पदार्थांचा योग, मधुर व लवण यांचा योग, तसाच मधुर व तिखट यांचा योग, रसाला व वीर्याला विरुद्ध आहेत. मधुर व कडवट पदार्थांचा योग, मधुर व तुरट पदार्थांचा योग तसाच अम्ल व लवण यांचा योग, हे रस व विपाक यांस विरुद्ध आहेत. आंबट व तिखट यांचा योग रसविरुद्ध आहे. आंबट व कडवट

पदार्थांचा योग रस व विपाक यांस विरुद्ध आहे. तसेंच आंबट व तुरट पदार्थांचा योग रस, वीर्य व विपाक यांस विरुद्ध आहे खारट व तिखट पदार्थांचा योग रस व विपाक यांस विरुद्ध आहे. खारट व कडवट पदार्थांचा योग व खारट व तुरट यांचा योग, रस, वीर्य व विपाक या तिहींसही विरुद्ध आहे. तिखट व कडवट पदार्थांचा योग रस व वीर्य यांस विरुद्ध आहे. तिखट व तुरट पदार्थांचा योग तसाच कडवट व तुरट रसाच्या पदार्थांचा योग रसाला विरुद्ध आहे.

अति स्निग्ध, अति उष्ण, व अति शीत पदार्थांचा समान योग त्याज्य होय. रस, वीर्य, व विपाक यांस ज्या द्रव्यांचा योग विरुद्ध म्हणून सांगीतला आहे, तो योगरहित असतां हितकर समजावा. बाकीच्या द्रव्यांचे हितकर व अहितकर असे दोन भेद होतात. रस, वीर्य व विपाक यांस विरुद्ध अशा पदार्थांचें सेवन करणारा मनुष्य व्याधि, इंद्रियांचा दुर्बळपणा व मरण यांप्रत पावतो. जें द्रव्य वात, पित्त व कफ या तिहींपैकीं कोणत्याही दोपास उत्तेजित करून, शरीरांतून बाहेर निघत नसेल, व आपापल्या रसानें परिपूर्ण नसेल अथवा बिघडलें असेल, तर तें विकार उत्पन्न करील असें समजावें.

**यत्संसर्गवशात् त्यजंति पुरुषा दीर्घायुषोऽप्यातुराः**
**प्राणाञ्जीवितरक्षणक्षमगतीन् सर्वेषु मुख्यास्थितीन् ।**
**तेषां स्थावरजंगमात्मकतया भेदद्वयालंबिनां**
**खेऽस्मिन् विषसंज्ञके सुविपुला व्याख्या विषाणां कृता ॥**



# अमृत रत्न ६ वें.

**भेषजाचे पर्यायशब्द**—चिकित्सित, व्याधिहर, पथ्य, साधन, औषध, प्रायश्चित्त, प्रशमन, प्रकृतिस्थापन, व हित हीं सर्व भेषजाचीं नांवें आहेत. भेषज, स्वस्थ व बळ देणारें, आणि रोग्याचा रोग दूर करणारें असें दोन प्रकारचें आहे. तसेंच त्याते वेळीं दुःखदायक व फार दिवसपर्यंत दुःखदायक असें अभेषज (निरुपयोगी औषध) ही दोन प्रकारचें आहे.

**रसायन व वाजीकरण औषधाचें स्वरूप**—वर सांगितलेल्या दोनही प्रकारच्या औषधांपैकीं जें औषध स्वस्थांला बळ देणारें त्यास रसायन व वाजीकरण म्हणतात. दुसरें औषध रोगाच्या निवृत्तीच्या कामीं फार करून उपयोगी असल्यामुळें त्यास रोगप्रशमन असें नांव दिलें आहे. वर "फार करून" असें लिहिलें आहे, त्यावरून त्या औषधाच्या दोन भेदांचें विशेष स्वरूप दिसून येतें. परंतु हीं दोनही प्रकारचीं औषधें दोन वेगवेगळीं कामें करतात.

**रासायनिक औषध सेवन केल्यानें होणारे फायदे**—रासायनिक औषध सेवन केल्यानें दीर्घ आयुष्य, स्मृति, मेधा, आरोग्य, युवावस्था, कांति, सुंदर वर्ण, उत्तम स्वर, देहाच्या व इंद्रियांच्या बळाचा उदय, वाक्सिद्धि, वीर्याची पुष्टि, व विनय हीं प्राप्त होतात. रासायनिक औषधाचा उपयोग प्रथम व मध्यम अवस्थेमध्यें करण्यास योग्य आहे. ज्याला असें औषध द्यावयाचें असेल तो मनुष्य दृढ मनाचा, प्रथम स्नेहन करणारा, शिरा काढविणारा, आणि वमन विरेचन घेऊन शुद्ध झालेला असा असला पाहिजे. जर पहिल्यानें

शरीराची शुद्धि केली नसली तर मळक्या वस्त्रावर रंग चढविण्या-प्रमाणें रसायनप्रयोग व वाजीकरणप्रयोग निष्फळ होतात. रसायन म्हणजे जें जरेचा (म्हातारपणाचा) व व्याधीचा नाश करतें तें. प्रस्तुत काळीं इंग्रेजी औषधाचा प्रचार वाढला व त्याचा प्रचार चालू करणारे डाक्टर लोक रसायनांचा निषेध करूं लागले, तेणें करून, रसायनाच्या उपयोगानें मनुष्यानें नुकसान होतें असा सर्वांचा समज झाला. परंतु याच कारणास्तव मनुष्यें निःसत्व व अल्पायुषी झालीं आहेत. रासायनिक औषधांच्या प्रयोगानें प्राचीन ऋषि हजारों वर्षें जगले व त्यांनीं मोटमोठीं पराक्रमाचीं कामें केलीं. याचीं उदाहरणें आपल्या प्राचीन शास्त्रामध्यें पुष्कळ आढळतात. आणखी प्राचीन वैद्यक ग्रंथावरूनही स्पष्ट दिसून येतें कीं रसायनाच्या प्रयोगानेंच वैखानस व वालखिल्य आदिकरून ऋषिजन दीर्घायुषी झाले. रसायनानें आलस्य दूर होतें, श्रमांचा परिहार होतो, व सर्व प्रकारचे रोग दूरच दूर राहतात. प्राचीन वैद्यक ग्रंथांमध्यें सांगितलें रसायन-प्रयोग पूर्वीच्या प्रमाणें प्रस्तुत कार्य करीत नाहींत असें म्हणतात. पण याचें कारण पाहिलें तर एवढेंच आहे कीं शास्त्रांत सांगितल्या विधीस धरून रसायनें करण्यांत येत नाहींत. त्यांवर जेवढा खर्च व जेवढे श्रम करणें जरूर आहे तेवढे पडत नाहीं. कारणकीं त्या-बरोबरच जगाच्या इतर कामांकडेही लक्ष देणें जरूर पडतें, व त्या-मुळेंच, अशा कामाकडे जेवढें लक्ष पुरविलें पाहिजे तेवढें पुरवलें जात नाहीं. ज्या ज्या ऋतुमध्यें जी जी औषधि घेतली पाहिजे त्या त्या काळीं ती संपादन केली जात नाहीं. प्रस्तुत औषध मिळ-वावयाच्या त्या वैद्य गांध्याच्या दुकानांतूनच घेतात, व त्यांच्यावर ते हल्लीं निर्वाह करतात; यामुळें सर्व कामाची वाण झाली आहे. आणि या व अशाच दुसऱ्या कारणांमुळें देशी वैद्यक उत्तमोत्तम

स्थितींतून हलक्या पायरीला येऊन पोंचलें आहे. आपल्या शास्त्रांत सांगीतलेलीं रसायनें व वाजीकरणाचे प्रयोग यांचा उपयोग न केल्यानेंच मनुष्याचें आयुष्य क्षीण झालें आहे; व याच कारणास्तव एथें रसायनांसंबंधी हें प्रकरण निराळें लिहिण्याची आवश्यकता दिसली. कारणकीं हें प्रकरण वाचून व यांत सांगीतलेल्या रसायन-प्रयोगांचा उपयोग करून मनुष्यें फिरून बळ, वीर्य व आयुष्य यांनीं संपन्न अशीं होतील अशी आशा आहे.

**पुरुषार्थ संपादन करण्याचें मुख्य साधन व त्याची जतन करण्याची आवश्यकता**—मनुष्यमात्राला धर्म, अर्थ, काम व मोक्ष हे चारही पुरुषार्थ संपादन करण्याची आवश्यकताच आहे, व त्याचें मुख्य साधन शरीर आहे. हें शरीर नीरोगी असून दीर्घायुषी होईल तरच पुरुषार्थांची प्राप्ति होईल. याच हेतूनें संपूर्ण वैद्यक शास्त्राची प्रवृत्ति झाली आहे. मनुष्याच्या शरीरांत वात, पित्त, व कफ हे तीनही दोष मुख्यत्वें करून वास करीत आहेत. हे तीनही दोष समान स्थितीमध्यें असले तरच ते शरीराला स्थितीवर ठेवतात. परंतु तेच कमी जास्ती झाले तर देहाचा नाश करतात. हे दोष, प्रत्येक दोन दोन महिन्याला ऋतु बदलतात तसतसे न्यूनाधिक अवस्थेला पात्र होतात. त्या वेळीं जर सावधगिरी ठेवली नाहीं तर हें शरीर अनेक रोगांस पात्र होईल. हें काळचक्र साहा ऋतूंचें आहे. हे ऋतु जसजसे बदलतील तसतसा आपण आपल्या आहारविहारांतही बदल केला पाहिजे. ऋतूंचें बदलणें हाच सृष्टीचा नियम; तो आपल्यास सुचवितो कीं प्रत्येक ऋतूमध्यें त्या त्या ऋतूला मानवेल अशाच रीतीनें वागून अहितकारक पदार्थांचा त्याग करून पथ्य पदार्थांचें सेवन केलें पाहिजे.

**वर्षाचीं साहा अंगें**—ऋतुभेदानें वर्षाचीं साहा अंगें असतात, व त्या प्रत्येकास ऋतु असें नांव आहे. त्यांत शिशिर, वसंत व ग्रीष्म हे मिळून उत्तरायण होतें व वर्षा, शरद् आणि हेमंत हे मिळून दक्षिणायन होतें. उत्तरायणांत सूर्य जगांतील रस शोषून घेतो. वायुसुद्धां तीव्र व रूक्ष वाहतो. यामुळें या तीनही ऋतूंत रसही रूक्ष, कडू, तुरट व तिखट असल्यामुळें माणसांचें बळही हीन असतें आणि दक्षिणायनांतल्या ऋतूंतील रस अम्ल, लवण आणि मधुर असल्यामुळें मनुष्याच्या बळाची वृद्धि होते. देशपरत्वें ऋतूंच्या गणनेंत फेरबदल पडतो, तरी आपल्या देशाच्या कालगणने-प्रमाणें मार्गशीर्ष आणि पौष हे दोन महिने हेमंत ऋतूचे धरून, क्रमानें दोन दोन महिने एक एक ऋतु याप्रमाणें, शिशिर वगैरे ऋतूंचे मान जाणावें. एक अहोरात्राच्या काळामध्यें साहाही ऋतूंचा समावेश होतो. दिवसाच्या पहिल्या भागांत वसंत, मध्या-न्हीला ग्रीष्म, दोन प्रहरानंतर शिशिर, संध्याकाळीं वर्षा, मध्यरात्रीं, शरद्, आणि पाहाटे हेमंत. याप्रमाणें प्रत्येक ऋतूचीं चिन्हें दिसून येतात. यास्तव एकया अहोरात्राच्या अवधींत सगळ्या वर्षाप्रमाणेंच थंडी, उष्णता व पाऊस यांचीं चिन्हें अनुभवास येतात व त्यामुळें दोषांची वृद्धि, कोप आणि शमन हे प्रकारही घडतात.

**हेमंत**—हेमंत ऋतूंत थंडी, स्निग्धता आणि पदार्थामध्यें गोडी हीं उत्पन्न होतात. जठराग्नि प्रदीप्त असतो त्यामुळें चांगल्या पौष्टिक पदार्थांचा आहार नसला तर शरीरांतील रस जळून तें शुष्क होतें आणि वायु कुपित होतो. यासाठीं मुख्यत्वें स्निग्ध, आम्ल आणि लवण या रसांचें सेवन करावें. कसरत करणें तर तिलाही हाच काळ उत्तम. या काळीं ऊबदार वस्त्रें वापरावीं, सकाळीं जेवावें,

आंगास तेल चोळावें व घरांत उष्णता करून उबेंत राहावें. गहुं, गूळ, तांदूळ, उडीद, वडे, नवें अन्न, तीळ, उत्तम केशर आणि कस्तूरी इत्यादि पदार्थांचें सेवन करावें. स्नान करणें तें ऊन पाण्यानें करावें. याप्रमाणें वर्तलें असतां हेमंत ऋतूची बाधा मनुष्यास महसा होणार नाहीं.

**शिशिर**—हा ऋतुही थंड असून अत्यंत रूक्ष आहे. यांत वायु आणि अग्नि हे वृद्धि पावतात. या ऋतूंतही मुख्यत्वें करून हेमंत ऋतूंतील नियम पाळावे.

**वसंत**—या ऋतूंत मधुरपणा, स्निग्धता आणि कफाची वृद्धि करण्याचा गुण हे पदार्थांमध्यें उत्पन्न होतात. शिशिर ऋतूंत मधुर आणि स्निग्ध भोजन केलें असल्यानें शरीरांत कफाचा जमाव होतो, तो वसंत ऋतूंतील सूर्याच्या किरणांच्या तापानें वितळून जातो आणि मग जठरांत पसरून तेथील अग्नीचा नाश करून, रोगांस उत्पन्न करतो. यास्तव या ऋतूंत वमन आणि विरेचन वगैरे तीक्ष्ण उपाय योजून कफ क्षीण करावा. हलकें आणि रूक्ष भोजन असावें, आंगास तैल चोळावें, व कसरत करावी; म्हणजे कफ कमी होईल. आणखी जला-शयानें युक्त, सुगंधित पुष्पांनी भरलेलें, व जेथें सुंदर पक्षी कोलाहल करीत आहेत अशा ठिकाणीं दुपारचा वेळ काढावा. मागल्या ऋतूंत कफाचा संचय झाला असेल त्याचा नाश व्हावा म्हणून जड, थंड, निकट, आंबट आणि मधुर पदार्थांचा त्याग या ऋतूंत करावा. तसेंच दिवसा निजूं नये आणि दाणागोटा जुना वापरावा. या ऋतूंत वमन आणि विरेचन घेण्याविषयीं सांगितलें आहे, तें एवढ्याचसाठीं कीं, उर आणि मेंदू हीं कफाचीं मुख्यस्थानें असल्यामुळें त्यांतून कफ काढून न टाकला तर तो वितळून पक्वाशयामध्यें येतो, व पोटांत मुरडा वगैरे विकार उत्पन्न करतो.

**ग्रीष्म**—हा ऋतु रूक्ष असून पदार्थांमध्यें तिखटपणा व पित्त उत्पन्न करतो. या ऋतूंत हळुहळू कफाचा क्षय होत जातो आणि वातची वृद्धि होते. यासाठीं खारट, तिखट, व आंबट पदार्थ, कसरत आणि ऊन यांचा त्याग करावा. आणि जे पदार्थ गोड, स्निग्ध, थंड, हलके आणि द्रवरूप म्ह० पातळ असतील त्यांचा आदर करावा. थंड पाण्याची आंघोळ करावी. साखर खावी. दूध प्यावें. खरबुजें, चिबूड वगैरे खावीं. चंदनाचा लेप करावा. गार पाणी प्यावें, दिवसा निजावें आणि पाण्यांत भिजविलेल्या पंख्याचा मंदमंद वारा घ्यावा. असें न केल्यास सूज, शिथिलता आणि मोह हीं उत्पन्न होतात.

**वर्षा**—या ऋतूंत थंडी, अग्नीची मंदता आणि वायूची वृद्धि हे प्रकार होतात. ग्रीष्म ऋतूंत मनुष्याचा अग्नि मंद झालेला असतो. तो वर्षा ऋतूंतील वातादिक दोषांमुळें अधिकच मंद होतो. त्यामुळें या ऋतूंत मंद आलेल्या अग्नीला प्रदीप्त करण्याची जरूर आहे. तसेंच विरेचन घेऊन शरीराची शुद्धि करावी. जुनें धान्य खावें, पावसाचें मानरें येईल त्या वेळीं खारट, आंबट, ओशट, कोरडें, हलकें आणि मध घातलेलें असें अन्न खावें. या ऋतूंत पायानें चालण्यापेक्षां वाहनांवर बसणें हितकारक आहे. उघड्या पायांनीं चालल्यानें पाय कुजणें, नारू वगैरे व्याधि उत्पन्न होतात. नदीचें पाणी वापरूं नये. मर्यादेबाहेर श्रम करूं नयेत व सूर्याचा ताप घेऊं नये. तसेंच दिवसास निजूं नये. या ऋतूंत शरीर ओलें असतें म्हणून तिखट, कडवट, व तुरट पदार्थ खाण्यांत यावे. शेक घ्यावा, अंग रगडून घ्यावें, दहीं खाणें असेल तर मिरीं वगैरे उष्ण पदार्थ घालून खावें, गहूं, तांदूळ, व उडीद खावे. विहिरीचें किंवा अधांतरीं धरलेलें पावसाचें पाणी प्यावें. त्यांतही सुरवातीला तर पावसाचें पाणी पिऊं नयेच. नदीच्या कांठीं राहूं नये किंवा जाऊं नये. आणि नित्य स्त्रीसमागम करूं नये.

**शरद्**—हा ऋतु उष्ण, पित्तकारक व मध्यम बळ देणारा असा आहे. या ऋतूंत भूक उत्तम लागते. यासाठीं मधुर, तुरट व कडू रसाचें व थंड आणि हलक्या पदार्थांचें ग्रहण करावें. दूध प्यावें. पांढरा ऊंस खावा. गहूं, मूग, तांदूळ, व जवस खावे. नदीचें पाणी प्यावें. कापूर, चंदन व फुलें व निर्मळ स्वच्छ वस्त्रें यांचा आदर करावा. ज्याची प्रकृति पित्तळ असेल त्यानें रेचक घ्यावें. बळवान् मनुष्यानें शिरा काढाव्या, दहीं खाऊं नये, कसरत करूं नये, बर्फ खाऊं नये, आणि उन्हांत जाऊं नये.

**कोणत्या ऋतूंत कोणते पदार्थांचें ग्रहण करावें व कोणत्यांचा त्याग करावा यांविषयीं विशेष फोड**—अमुक ऋतूंत अमुक रस सेवन करावा ह्मणून वर सांगितलें, त्यावरून असें समजावयाचें नाहीं कीं बाकीच्या सर्व रसांचा त्यागच करावयाचा. तर, सर्व रसांचें सेवन किंवा त्याग करते वेळीं सांगितलेल्या रसाकडे ऋतूच्या अनुकूळतेप्रमाणें किंवा प्रतिकूळतेप्रमाणें विशेष लक्ष पुरवावयाचें आहे. प्रत्येक ऋतूचा पहिला आठवडा व शेवटला आठवडा यांस ऋतुसंधि म्हणून समजतात. ज्या ज्या ऋतूंत जे जे पदार्थ खावे म्हणून सांगितले आहेत, त्यांच्या सेवनाचें प्रमाण शेवटल्या आठवड्यांत कमी कमी करीत जावें, व येणाऱ्या ऋतूला अनुकूळ पदार्थांची सवय करीत जावी. कोणतेही पदार्थ एकदम टाकणें किंवा एकदम नवे खाऊं लागणें चांगलें नाहीं; कारण ते एकाएकीं शरीरास मानवत नाहींत व त्यामुळें रोग उत्पन्न होण्यास कारण होतें.

**दिनचर्या**—नीरोग मनुष्यानें आयुष्याच्या रक्षणासाठीं पहाटेस चार घटका लौकर उठावें व त्या वेळीं दुःखाच्या शांतीसाठीं आपल्या इष्टदेवतेचें स्मरण करावें. नंतर आरसा पहावा. हा आनंददायक

पदार्थ आहे. प्रातःकाळीं शौचमुखमार्जन केल्यानें आयुष्याची वृद्धि होते व आतड्यांत गुरगराट, पोट फुगणें, व पोटांत जाड्य वाटणें वगैरे विकार नाहींतसे होतात. मळमूत्राचा अवरोध केल्यानें ओटीपोट फुगतें, शूळ उत्पन्न होतो, गुदस्थानीं कापल्याप्रमाणें वेदना वाटते, ढेकर पुष्कळ येतात व वेळेनुसार तोंडावाटेही मळ येतो. वायूचा रोध आल्यानें वायुसंबंधी विकार उत्पन्न होतात. मूत्राचा रोध आल्यानें मूत्राशयांत व जननेंद्रियांत शूळ उत्पन्न होतो; मूत्रकृच्छ्र प्राप्त होतें, मस्तकांत वेदना होतात, शरीर लवतें आणि सांध्यांच्या सांधींत ओढल्यासारखी वेदना होते. यास्तव शौचास होत असेल तर प्रथम मळशुद्धि करून मग दुसऱ्या कामकाजास लागावें. बळानें मळशुद्धि करूं नये. काम, क्रोध, भय, शोक वगैरे जे मनाचे वेग आहेत त्यांचा निरोध करावा पण मळमूत्राचा उत्सर्ग वगैरे शरीराच्या वेगाचा निरोध करूं नये. गुदद्वारादि मळत्यागाचे जे मार्ग आहेत ते साफ ठेवल्यानें आंगाची कांति व बळ वाढतें व पवित्रताही येते; हातपाय धुतल्यानें शुद्धता वाढते, मळ नाहींसा होतो, श्रमाचा परिहार होतो, पुष्टि प्राप्त होते व डोळे चांगले राहतात.

तोंड धुण्याचा विधि—करंगळी एवढी जाड, लांब, सरळ, आणि गांठ व छिद्र वगैरे नसलेली अशी दांतवणाची काडी असावी. मग त्याच्या कोमळ चोथ्यानें दांतवण घेऊन दांतांमधील हिरड्यांस इजा न होईल अशा रीतीनें एक एक दांत घासावा. मध, सुंठ, मिरीं आणि पिंपळी हीं ज्यांत वातलीं आहेत अशा तेजबळाच्या लांकडाच्या चूर्णानें अथवा तेलाची भावना दिलेल्या सैंधेलोणाच्या चूर्णानें नित्य दांत घासून स्वच्छ करावे. मधुर पदार्थांत मोहाचें

लांकूड, तिखटांत करंजाचें, कडव्यांत कडुलिंबाचें आणि तुरटांत खैराचें लांकूड श्रेष्ठ होय. समय, दोष आणि प्रकृति यांचा विचार करून योग्य व रसाळ झाडाच्या लांकडाची दांतवणाची काडी घ्यावी. तसेंच दांतवणही जें अनुकूळ पडेल तें वापरावें. अशा प्रकारें तोंड धुतलें असतां तें खराब झालें असलें तरी चांगलें होतें. दांत, जीभ व तोंड यांस रोग जडत नाहींत, आणि रुचि, स्वच्छता, आणि शरीर हलकें वाटणें हे गुण प्राप्त होतात. गळा, टाळू, ओंठ, जीभ आणि दांत यांत रोग झाले असतील तर, तोंड आलें असेल तर, सूज, श्वास, खोकला आणि वांति हे विकार झाले असतील तर, रोड-पणा असेल तर, खाल्लेलें पचत नसेल तर, दिस मुटली असेल तर, मूर्च्छा आली असेल तर, थकवा आला असेल तर, एखादा पदार्थ प्याल्यामुळें श्रम झाले असतील तर, अर्धांग वायु झाला असेल तर, कर्णशूल झाला असेल तर, नेत्ररोग झाला असेल तर, नवीनच ताप आला असेल तर, आणि छातींत रोग झाला असेल तर, दांत-वण करणें प्रशस्त नाहीं. जीभ साफ करण्याची काडी सोन्याची रुप्याची अथवा तांब्याची, अथवा ती न मिळेल तर मऊ लांकडाची काठी चिरून, तिच्या एका भागानें हळूहळू जीभ साफ करावी असें केल्यानें जिभेवरील मळ, रसरहितपणा, दुर्गंध आणि जाड्य हीं नाहींशीं होतात. नंतर थंड पाण्याचे चूळ भरून तोंड खळखळून टाकल्यानें कफ व तृषा आणि मळ हीं दूर होतात, आणि तोंडाच्या आंतला भाग स्वच्छ होतो. किंचित ऊन पाण्यानें चूळ भरून टाक-ल्यास कफ, अरुचि, मळ, दंतांचें जाड्य वगैरे विकार नाहींसे होतात व तोंड हलकें वाटतें. विषारानें, मूर्च्छेनें अथवा मद्यानें तोंडास कोरड पडलेले, रक्तपित्ताचे रोगी, ज्यांचे डोळे दुखत आहेत असे, तसेंच क्षीणबळ झालेले, अशा रोग्यांनीं ऊन पाण्यानें चूळ

भरणें प्रशस्त नाहीं. थंड पाण्यानें तोंड धुतल्यास रक्तपित्त नाहींसें होतें. जिभेवरील फोड, कोरड, डाग आणि खरे हे विकार दूर होतात; आणि किंचित् ऊन पाण्यानें तोंड धुतल्यास तोंडास स्निग्धता येते, आणि कफ, वायु व कोरड हीं दूर होतात.

तोंड धुतल्यावर जायफळ, सुपारी, लवंग, पानें, थोडासा शुद्ध केलेला कापुर, तसेच बारीक वेलचीचे दाणे हे पदार्थ तोंडांत धरावे, म्हणजे स्वर चांगला होतो, प्रत्येक रसाचें ज्ञान पूर्णपणें होऊं शकतें, अन्नावर उत्तम रुचि उत्पन्न होते, तोंडाची कोरड नाहींशी होते, ओठ फुटत नाहींत व दांतांचीं मुळें मजबूत होतात.

तैलमर्दन—प्रत्येक मनुष्यानें मस्तकावर नेहमीं तेल चोळावें. तेणेंकरून डोकें दुखत नाहीं, थंडी होत नाहीं, केश बळकट होतात, व सुखानें गाढ झोप लागते. कानांत तेलाचे बिंदु सोडल्यानें वायुसंबंधी कानाचे विकार उद्भवत नाहींत व बहिरेपणा येत नाहीं. सगळ्या शरीराला तेल चोळल्यानें तें दृढ होऊन, कातडी स्वच्छ होते; वात रोग जडण्याची भीति उरत नाहीं. क्लेश सोसण्यास व कसरत करण्याला शरीर योग्य बनतें व म्हातारपण उशीरां येतें. पायाच्या तळव्याला तेल चोळीत गेल्यास खरखरीतपणाचा नाश होतो, थकवा वाटत नाहीं, पायांचें बळ व स्थैर्य वाढतें व दृष्टिहि स्वच्छ होते.

स्नान—हें वृद्धपणाला, थकव्याला व वायुला हरतें, दृष्टि स्वच्छ करतें, पुष्टि देतें, आयुष्याची वृद्धि करतें, गाढ झोप आणतें, कातडीला सुशोभित करतें, शरीर दृढ करतें, जठराग्नीला प्रदीप्त करतें, उत्साह व बळ वाढवितें, तसेंच खोकला, मळ, थकवा, घाम, आळस व दाह यांचा नाश करतें. आंघोळीचें पाणी ऊन व थंड असें दोनही प्रकारचें असलें पाहिजे. कारण कीं ऊन पाण्यानें शरी-

राचा खालचा भाग धुतल्यानें बळाची वृद्धि होते. आणखी मस्तकावर ऊन पाणी ओतल्यानें केशांचें व डोक्याचें बळ नाश पावतें. यासाठीं मस्तकावर व तोंडावर नेहमीं थंड पाणीच ओतावें. अर्दितवायु असलेल्या मनुष्यानें, नेत्र, मुख व कान यासंबंधीं रोग असलेल्या मनुष्यानें, अतिसार, उदररोग, पिनस, अजीर्ण हे विकार झालेल्या मनुष्यानें, तसेंच ज्यानें भोजन नुकतेंच केलें असेल त्यानें स्नान करणें, हें हानिकारक आहे,

**कसरत**—आंघोळ केल्यावर कसरत करावी. कारण कीं तेणेंकरून शरीर हलकें होतें, काम करण्याचें सामर्थ्य वाढतें व जठराग्नि प्रदीप्त होतो. थंडीच्या व वसंत ऋतूंच्या दिवसांत मुख्यत्वेंकरून कसरत करावी, व इतर ऋतूंमध्यें थोडी व हलकी करावी. कारण कीं इतर ऋतूंत अति कसरत केल्यानें क्षय, श्वास, व रक्तपित्त हे रोग जडतात व सत्वाची हानि होते. रक्तपित्ताच्या रोग्यांनीं, अगदीं लहान मुलांनीं, आणि अजीर्ण झालेल्यांनीं कसरत करूं नये. बळवान आणि चिकट पदार्थ खाणारानें कसरत करणें तर अर्ध्या बळानें करावी आणि थकवा येण्याच्या पूर्वी सोडून द्यावी. कसरत केल्यानें शरीर लवकर शिथिल होत नाहीं आणि म्हातारपणीं लवकर लवत नाहीं.

**भोजन**—मनुष्यानें सांजसकाळ दोन वेळ* जेवावें; परंतु मध्यंतरीं जेवूं नये. भोजनाचें पात्र सोन्याचें, रुप्याचें, काशाचें अथवा पितळेचें यथाशक्ति असावें; परंतु मातीच्या परळांत कधीं जेवूं नये. कारण कीं असें करणें अलक्ष्मीदायक आहे. जेवणाच्या आरंभीं थोडेसें मीठ आणि आलें खावें, म्हणजे अग्नि प्रदीप्त होतो, तोंडाला रुचि येते व जिभेचें व घशाचें शोधन होतें. जेवण अतिशय कढत

---

* पाश्चिमात्य वैद्यकाचें मत याच्या उलट आहे. थोडथोडें दोनचार वेळां जेवावें, अशी त्याची सल्ला आहे.

असूं नये. तसेंच अतिशय थंडगारही नसावें. कसरत केल्यावर, अन्न चांगल्या प्रकारें पचलें असलें, तर प्रकृतीला मानवेल असें व मोजकें खावें. खाण्याच्या पदार्थांत दूध फार उपयोगाचें आहे; कारण पोषक द्रव्याचीं सगळीं तत्वें दुधांत आहेत. स्त्री, गाढवीण, बकरी, गाय, आणि म्हैस यांचीं दुधें उत्तरोत्तर अधिक पौष्टिक आहेत, परंतु पचण्याला अधिक जड आहेत. बकरीचें व गाढवीचें दूध लहान मुलांस विशेष मानवतें. मुलांस गाईचें दूध पाजावयाचें असलें तर त्यांत थोडी खडी साखर व पाणी घालून पाजावें. बहुतेक रोग, जें अन्न आपण खातों, त्यावर अवलंबून असतात. अधिक अन्न पोटांत गेलें तर तें पचत नाहीं व अजीर्ण होतें; तसेंच कच्चें अन्न पोटांत गेलें तरीही अजीर्ण, रेच, आंव व मुरडा होतो. पृथ्वीवर अनेक प्रकारचीं धान्यें उत्पन्न होतात. त्यांतून कोणी कोणतें धान्य खावें हें निश्चयानें सांगणें कठीण आहे. परंतु साधारण रीतीनें ज्या देशांत जें धान्य होत असेल, त्या देशाच्या लोकांनीं तेंच धान्य खावें. कुजकें, जुनें, बिघडलेलें आणि शिळें अन्न खाऊं नये. तसेंच भूक असेल तेवढेंच खावें. कारण कीं अधिक अन्न खाल्यानें जशा व्याधि जडतात, तशा कमी अन्न खाल्यानेंही होतात. ज्याप्रमाणें अन्नानें व्याधि वाढतात, त्याप्रमाणें त्या दूरही होतात. जेवणाचें प्रमाण जठराग्नीचे बळावर अवलंबून आहे. यास्तव प्रकृति न बिघडतां, योग्य वेळांत जेवढें जेवणें, हेंच जेवणाचें प्रमाण होय. तांदूळ, मूग इत्यादि जे पदार्थ प्रकृतीनेंच हलके आहेत, तसेंच उडीद इत्यादि जे पदार्थ प्रकृतीनें जड आहेत, ते खातांना कांहीं तरी मोजकेपणा ठेवणें हें जरूर आहे. द्रव्याच्या अनुकूलतेप्रमाणें जड पदार्थ खावयाचे असतील तर पोटाचे दोन किंवा तीन भाग भरतील एवढेच खावे, आणि लघु पदार्थ, जठराग्नि प्रदीप्त राहावा म्हणून,

पोटभर खाऊं नयेत. यासाठींच शास्त्रकार सांगतात कीं, मोजके मापानें नियमित अन्न खाण्यांत आलें, तर जेवणारास तें बळ, वर्ण, सुख आणि आयुष्य यांची जोड करून देतें. धान्याच्या अन्नाबरोबरच कांहीं तरी पालेभाजी खाण्याची जरूर आहे; कारण कीं तेणें करून कित्येक रोगांचा प्रतिकार होतो. अन्न नीटपणें चावून खावें. वाजवी भुकेहून अधिक ठासून खाऊं नये. दररोज नेमल्या वेळीं जेवावें. जेवणाची वेळ वारंवार बदलूं नये. दररोज एकाच तऱ्हेचें अन्न खाऊं नये. जेवते वेळीं मन आनंदांत ठेवावें. थोड्या बहुत गोष्टी बोलत बोलत जेवावें. फार थकवा आला असेल तेव्हां अन्न ग्रहण करूं नये. जेवल्यानंतर लगेच शरीराला किंवा मनाला फार मेहनत पाडूं नये. पुष्कळ वेळपर्यंत उपाशीं राहूं नये; आणि जेवल्यानंतर पंधरा किंवा वीस मिनिटें झाल्यानंतर पाणी प्यावें.

**पाणी**—प्यावयाचें पाणी शुद्ध असावें; कारण कीं शुद्ध पाणी शरीराला सुखकारक असून, अशुद्ध पाणी दुःखदायक आहे. खराब पाण्यानें अजीर्ण, अति सार, मुरडा, कालरा, विषमज्वर, गळवें, मुतखडा आणि कातडीचे रोग वगैरे उत्पन्न होतात. यास्तव होईल तोंपर्यंत चांगल्या स्वच्छ पाण्याचाच उपयोग करावा. जें पाणी चिखलानें गढूळ झालें असेल, तसेंच नीळ, गोंडाळ, पानें इत्यादि कुजून जें पाणी बाजलें असेल, ज्यावर चंद्रसूर्याचे किरण पडत नसतील, जें पाणी नुकत्याच पडलेल्या पावसाचें धरलें असेल, जें गढूळ असेल व माती वगैरे मिश्र होऊन जें जाड झालें असेल, जें फेसाळलेलें असेल, ज्यांत किडे पडले असतील, जें उन्हानें तापलेलें असेल, जें अतिशय थंडगार असेल, तें पाणी कधीं पिऊं नये. ज्यांचा जठराग्नि मंद असेल अथवा ज्यांला गुल्म, पंडुरोग, उ-

दररोग, अतिसार, मूळव्याध, संग्रहणी आणि सूज इत्यादि विकार झाले असतील त्यांनीं फार थोडें पाणी प्यावें. नीरोगी मनुष्यानेंही शरद् आणि ग्रीष्म ऋतु शिवाय करून बाकीच्या काळामध्यें थोड-थोडें पाणी प्यावें. रोगी मनुष्याला पाणी पिणें झालें, तर तें कढवि-ल्यावर थंड करून प्यावें. जेवणाच्या मध्यंतरीं पाणी प्यावें, कार-ण कीं, तेणेंकरून धातु समान अवस्थेप्रत पावून, शरीर सुखकारक अवस्थेंत राहतें. जेवणाच्या शेवटीं पाणी प्याल्यानें आमाशयांत कफाची वृद्धि होऊन तो आमाशयाच्या वर राहतो. तसेंच कफाची वृद्धि झाल्यानें शरीर स्थूल होतें. जेवणाच्या अगोदर पाणी प्या-ल्यानें जठराग्नि मंद होतो. याप्रमाणें जेवणाच्या शेवटीं पाणी प्याल्यानें कफ वाढतो व आरंभीं प्याल्यानें जठराग्नि मंद होतो. यास्तव भोजनाच्या मध्यंतरींच पाणी प्यावें असा अभिप्राय जाणावा.

स्वाभाविक वेग– मळ, मूत्र, वीर्य, वायुस्राव, वांति, शिंक, ढेंकर, जांभई, भूक, तहान, अश्रु, झोंप आणि श्वास इत्यादिकांच्या वेगाचा निरोध करूं नये. कारण त्यास अडवून धरल्यानें मनुष्यास व्याधि जडतात. ते असे कीं मूत्राच्या अवरोधानें बस्ति व उप-स्थ यांत शूळ, मूत्रकृच्छ्र, डोकें दुखणें, कळा लागणें व मूतखडा वगैरे मळावरोधामुळें पक्वाशय व डोकें यांत पीडा, व तोंडा वाटे वांति होणें व मळ पडणें वगैरे विकार उद्भवतात. वीर्याच्या अवरो-धानें मेढ्र, वृषण, व हृदय यांत पीडा, वीर्य पाझरणें, वाप, मूत बंद होणें व अंगाला कळा लागणें इत्यादि विकार उत्पन्न होतात. वायूचा रोध केल्यानें पोटांत वातजन्य रोग व ग्लानिही उत्पन्न होतात. वांति होतांना अडवून धरल्यानें, खरूज, शरीरावर वाटोळ्या पुटकळ्या, तोंडाला अरुचि, कोरड, पांडु, ज्वर, कोड, हृदयांत पीडा व विसर्प वगैरे रोग उद्भवतात. शिंक जिरविल्यानें

मस्तक दुखणें व इंद्रियें दुर्बळ होणें हे विकार होतात. ढेंकर न येऊं दिल्यानें उचकी, खोकला, अरुचि, कंप व हृदयांत आणि छातींत पीडा हे विकार होतात. जांभई अडकवून धरल्यानें हृदयांत संकोच व कंप वगैरे विकार जाणवतात. भूक कोंडून धरल्यानें, अरुचि, भ्रम, रोडकेपणा, कांतिहीनपणा, वगैरे विकार उद्भवतात. तहान मारल्यानें कंठ व तोंड यांस कोरड, बहिरेपणा, श्रम, श्वास, हृदयामध्यें पीडा, मोह व घेरी हे विकार उत्पन्न होतात. आंसवें दाबून धरल्यानें शैल्य, नेत्ररोग, हृदयरोग, अरुचि, व भ्रम वगैरे विकार होतात. झोपमोड झाल्यानें जांभया, आळस, डोळे जड होणें, मस्तकाचे विकार वगैरे होतात. आणि श्वासाचा निरोध केल्यानें गुल्म, हृद्रोग व मोह हे उत्पन्न होतात.

वर सांगितल्याप्रमाणें वेग अडवून धरल्यानें रोग उत्पन्न होतात, तेव्हां त्यांचीं कारणें दूर करून मग त्या रोगांची चिकित्सा करावी. रोग होऊं नयेत अशी ज्यांची इच्छा असेल, त्यांनीं वरील वेगांचा निरोध करूं नये. परंतु लोभ, भय, क्रोध, व साहस, तसेंच अप्रशस्त मन, वाणी, काया, व कर्मांचा वेग यांस मात्र रोधून धरावें.

**स्त्रीसंग**—आयुष्याच्या क्षयाच्या भयामुळें मनुष्यांनीं कधींही दिवसा स्त्रीसंग करूं नये. कारणकीं तेणें करून नपुंसक, अल्पवीर्याचीं व कमी आयुष्याचीं मुलें होतात. सोळा वर्षांच्या आंतील वयाच्या स्त्रीच्या ठिकाणीं पंचविशीला न पोंचलेल्या पुरुषानें गर्भाधान केलें तर तो गर्भ गळून पडतो किंवा जें मूल उपजतें तें पुष्कळ वर्षे जगत नाहीं, आणि जगलेंच

तर त्यांचीं इंद्रियें दुर्बळ असतात. यास्तव अत्यंत बाळक अथवा अत्यंत वृद्ध, फार दिवसांची रोगिणी, अथवा अशा कोणत्याही विकारांनीं युक्त स्त्रीच्या ठिकाणीं गर्भाधान करूं नये. याच गोष्टी पुरुषासही लागू आहेत. नवें अन्न, दुधाचा आहार, तूप व ऊन पाण्याचें स्नान हीं जशीं प्राणसंजीवनौषधी आहेत, त्याच प्रमाणें वृद्ध स्त्री, तानें दहीं, प्रातःकाळीं मैथुन आणि अत्यंत निद्रा हीं प्राणाचा नाश करणारीं आहेत. सर्व ऋतूंमध्यें तीन तीन दिवसांनीं मैथुन करावें आणि उन्हाळ्यामध्यें १५ दिवसांनीं मैथुन करावें. तसेंच संध्याकाळीं, सकाळीं, अमावास्येला, पौर्णिमेला, गाय विते वेळीं, मध्यरात्रीं, स्त्रीसंग करूं नये. खूप जेवलेल्यानें, रोग्यानें, तान्हेल्यानें किंवा बाळकानें मैथुन करूं नये. रजस्वला, मलिन, कुरूप, मोठ्या वयाची, रोगपीडित, व्यंग, द्वेष करणारी, योनिरोगानें युक्त, सगोत्र, गुरुपत्नी, आणि विरक्त स्त्री, या स्त्रिया मैथुनाच्या कामास अयोग्य आहेत. गर्भिणी स्त्री सहा महिनेपर्यंत समागमास योग्य आहे. प्रसूत स्त्री दोन महिन्यानंतर उपभोगास योग्य आहे. रजस्वला स्त्रीशीं समागम केल्यानें नेत्राचा व कांतीचा नाश होतो. गर्भिणी स्त्रीशीं समागम केला असतां, गर्भास फार पीडा होते. रोगी स्त्रीशीं समागम केला असतां बळाचा क्षय होतो. आणि अति मैथुनानें खोकला, ताप, दमा, रोडपणा, पांडु आणि क्षय वगैरे रोग उत्पन्न होतात.

सदाचार—आपलें हित इच्छिणाऱ्या मनुष्यानें सदाचाराविषयीं तत्पर असावें. कारण त्यापासूनच धर्म, अर्थ आणि आरोग्य यांची प्राप्ति होते, आणि इंद्रियें निर्मळ होतात. सदाचाराचे नियम पाळण्याविषयीं शास्त्रांत आज्ञा केली आहे. त्याप्रमाणें वागलें असतां मनुष्यें सर्व प्रकारची संपत्ति मिळविण्यास समर्थ होतात, शंभर वर्षे आयुष्य

प्राप्त होतें, तीं व्याधिरहित होतात, सत्पुरुषांच्या समाजांत मान पावतात, पृथ्वीवर यश मिळवतात, धर्मार्थाप्रमाणेंच प्राण्यांचें बंधुत्व संपादितात व अंतीं परलोकवास पावतात. सारांश हे सर्व नियम शरीरसंपत्तीचें रक्षण करणारे आहेत असें अनुमानानें व अनुभवानेंही सिद्ध होतें.

देव, गाय, ब्राह्मण, गुरु, वृद्ध, सिद्ध आणि आचार्य यांची पूजा करावी. पंधरवड्यांत तीन वेळ ह्मणजे पांच पांच दिवसांनीं हजामत करावी, असें वैद्यक शास्त्राचें मत आहे. मिशा कातराव्या व नखें काढावीं. ह्मणजे त्यांस वाढूं देऊं नये. नेहमी स्वच्छ वस्त्रें पांघरावीं, फुलांच्या माळा घालाव्या. सुगंधी पदार्थ जवळ बाळगावे. सर्वांच्या अगोदर आपलें बोलणें सुरू करावें. अतिथि ह्मणजे पाहूणे घरीं आले असतां, त्यांचा योग्य सन्मान ठेवावा. प्रसंग येईल तेव्हां हितकर, परिमित आणि मधुर भाषण बोलावें. हेतूची ईर्षा बाळगावी; फळाची ईर्षा करूं नये. इंद्रियें आणि मन स्वाधीन ठेवावीं. निश्चित, निर्भय, बुद्धिमान, लज्जावान्, मोठा उत्साही, चतुर, क्षमिक, धार्मिक व आस्तिक असावें. थकवा वाटे त्यापूर्वींच कसरत बंद ठेवावी. कारण कीं थकवा येई तोंपर्यंत कसरत केल्यानें फायद्याच्या ऐवजीं नुकसानच होण्याचा संभव आहे. सर्व प्राण्यांविषयीं बंधुभाव धरावा. भयभीतांस धीर द्यावा. गरीबांवर उपकार करावा. सत्यप्रतिज्ञ ह्मणजे खरेंच बोलण्याची व बोलल्याप्रमाणें वागण्याची प्रतिज्ञा केलेली असावी. रागद्वेषाचीं कारणें दूर ठेवावीं. परस्त्रीचा व परधनाचा अभिलाष करूं नये. पाप करूं नये. परक्याचे दोष काढूं नयेत. परक्याची गुप्त गोष्ट उघड करूं नये. पापी, राजद्रोही, उन्मत्त, पतित, भ्रूणहत्या करणारे, क्षुद्रबुद्धि व दुष्ट अशांची संगत करूं नये. दुष्ट वाहनावर बसूं नये. उलटे गुढघे काढून बसूं नये. नाहीं आथरण्या-

ला, नाहीं उसें, आखूड, उंचनिच अशा शेजेवर निजूं नये. पर्व-ताच्या शिखरावर फिरूं नये. झाडावर चढूं नये. मोठ्यानें हसूं नये. मोठ्यानें शब्द होईल अशाप्रकारें वायु सोडूं नये. तोंड उघडें ठेवून जांभया देऊं नयेत; तशीच शिंकही देऊं नये; कि हसूं नये. वारंवार नाकांत बोटें घालूं नयेत. नखानें जमीन खरवडूं नये. काड्या मोडीत बसूं नये, ढेंपळें फोडीत बसूं नये. रात्रीचे वेळीं देवमंदिर, वध्य-स्थान, व स्मशान या ठिकाणीं जाऊं नये. शून्यगृहांत किंवा वनांत एकटें जाऊं नये. पापवृत्तीची स्त्री, मित्र, किंवा बंधु यांची संगती करूं नये. आपलेकडून उत्तम पुरुषाशीं विरोध करूं नये. अनार्य वस्तूंचा आ-श्रय करूं नये. अतिनिद्रा, अतिजागरण, अतिस्नान, अतिपान, व अतिभोजन यांचा त्याग करावा. पायांवर फार वेळ उभें बसूं नये. सर्पापासून, दाढा असलेल्या व शिंगांच्या प्राण्यांपासून दूर रहावें. पूर्व दिशेचा वायु, ऊन व अतिवायु यांचा त्याग करावा. ज्यावर स्नान क-रावयाचे त्या वस्त्रानें डोकें पुसूं नये. हातांत रत्नाची आंगठी घात-ल्यावांचून, आंघोळ केल्यावांचून, धुपट वस्त्रें परिधान करून जप केल्या-वांचून, होम केल्यावांचून आणि गुरु, अतिथि, व आश्रित यांस अन्न दिल्यावांचून स्वत: अन्नग्रहण करूं नये. दहीं, मध, लवण, सातू, व तूप याशिवाय दुसरे पदार्थ सर्वच खाऊं नयेत; ह्मणजे जेवते वेळीं दुसरे पदार्थ थोडथोडे खावे, बाकी ठेवून द्यावे. रात्रीचे वेळीं दहीं खाऊं नये. स्त्रियांवर अतिविश्वास ठेवूं नये. भांडार भरपूर करून ठेवावें ह्मणजे जवळ पैसा जमा करावा. रजस्वला, रोगी, अपवित्र, अनिष्टरूप, आचारहीन, कामरहित, दुसऱ्याची इच्छा करणारी व परक्याची अशा स्त्रीशीं संग करूं नये. पावसाचें सातरें असेल तेव्हां, दाह होत असेल तेव्हां, भूमिकंपाचे दिवसांत, महोत्सवाच्या वेळीं, उल्कापाताच्या काळीं आणि संध्याकाळीं फार उतावळीनें, तसेंच

हळुहळू सुद्धां अध्ययन करूं नये. सायंकाळीं जेवण्याचा, स्त्रीचा व निद्रेचा त्याग करावा. बाळक, वृद्ध, लुब्ध, मूर्ख, क्लिष्ट व नपुंसक यांच्या बरोबर सोबत करूं नये. मद्य व वेश्या यांच्या प्रसंगीं रुचि धरूं नये. आपली गुप्त गोष्ट उघड करूं नये. कोणाचाही तिरस्कार करूं नये. अभिमानी होऊं नये. फार बोलूं नये. वृद्ध, गुरु व राजा यांची निंदा करूं नये.

बंधुजनांस तसेंच गुह्य गोष्ट जाणणाऱ्यांस दूर करूं नये. एकट्यानेंच सुख भोगूं नये. ह्मणजे फक्त एकटा आपलाच स्वार्थ साधण्याचा यत्न करूं नये. सर्वांवरच विश्वासूं नये. तसेंच सर्वांचाच अविश्वास धरूं नये. सर्वकाळ विचार करीत बसूं नये. काम अमुक वेळीं करायचें त्या वेळाचें उल्लंघन करूं नये, ह्मणजे नेमलेल्या वेळीं आपलें कामकाज करावें. इंद्रियांस वश होऊं नये. स्वाभाविक वेगाचें धारण करूं नये. ह्मणजे श्वास, वायु, लघुशंका, वगैरे नैसर्गिक विधींचा अवरोध केल्यानें नुकसान होतें. चंचळ मनाला भ्रमवूं नये. दीर्घसूत्री बनूं नये. शोकग्रस्त होऊं नये. सिद्धीविषयीं फार उत्सुकता धरूं नये, तसेंच असिद्धीविषयीं दैन्यही धरूं नये. सर्व प्राण्यांची एकंदर प्रवृत्ति सुखार्थच असते असें मानिलें आहे. आणि सुख धर्माशिवाय मिळत नाहीं. यासाठीं धर्माविषयीं तत्पर असावें. आपलें शुभ इच्छिणाऱ्या मित्राचा प्रेमपूर्वक आदर करावा. शत्रूपासून दूर राहावें. प्राण्यांचा घातपात, चोरी व व्यभिचार असें तीन प्रकारचें कायिक पापकर्म; चहाडी, कठोर भाषण, खोटें बोलणें, आणि अमर्याद भाषण असें चार प्रकारचें वाचिक पापकर्म; तशीच हिंसा, हेवा, व शास्त्रदृष्टीला विपरीत दिसेल अशी घटना असें मानसिक पापकर्म; अशीं दहा प्रकारचीं पापकर्में शरीर, वाणी, व मन यांच्या योगानें घडतात, त्यांचा त्याग करावा. ज्यांस कांहीं एक उपजीवि-

केचें साधन नसेल, जे व्याधिग्रस्त असतील, तसेंच जे दुःखामुळें शोकातुर झाले असतील, त्यांची शक्तीप्रमाणें संभावना करावी. किडी, मुंग्या वगैरे सर्व प्राण्यांसही सर्वदा स्वसमान दृष्टीनें पाहावें. सारांश, सुखदुःखादिकांचा अनुभव सर्वांसही आपल्याप्रमाणेंच होतो, अशा रीतीनें त्यांशीं वागावें. कीडमुंगीस आपल्याप्रमाणें वागवावें एवढें सांगितलें, ह्मणजे मग पशु, पक्षी, व इतर मनुष्यें यांशींही तशीच वागणूक ठेवावी ह्मणून जास्ती काय सांगावें? वृद्ध ह्मणजे केवळ वयोवृद्ध एवढेंच समजूं नये; तर शीलवृद्ध, ज्ञानवृद्ध, अशा मनुष्यांशींही मानपूर्वक वागावें. राजा या शब्दानें, त्यानें अधिकार दिलेल्या पुरुषांचाही बोध होतो. यासाठीं त्यांच्याशींही तसेंच वागावें. याचकांस नकार बोलून विमुख जाऊं देऊं नये, त्यांचा अपमान करूं नये. शत्रु अपकार करण्याला तत्पर असला तरी त्यावर उपकारच करण्याची रीत ठेवावी. उपकार किंवा अपकार करणें मनुष्याच्या हातची गोष्ट नाहीं, त्यांतूनही तसा प्रसंग ईश्वरकृपेनें प्राप्त झाला असतां शत्रूवरही उपकार करण्यास मागें पुढें पाहूं नये. संपत्तीमध्यें व विपत्तीमध्येंही सर्वदा एकसारखी वृत्ति ठेवावी; ह्मणजे संपत्काळीं हर्ष पावूं नये किंवा मदांध होऊं नये, तसेंच विपत्काळीं सुद्धां शोक करूं नये किंवा दैन्य धरूं नये. स्वतांचा किंवा परक्याचा अपमान झाला असला, तर तो प्रकट करूं नये. मनुष्याची प्रकृति पाहून, तो जेणेंकरून खुश होईल, तसेंच त्याच्याशीं वर्तन ठेवावें. धर्म, अर्थ व काम यांपैकीं एकही साध्य होत नसेल तर तसला उद्योग करूं नये हें बरें. आचारविचारांत मध्यम मार्गाचें अवलंबन करावें. अमुकच एका वस्तूविषयीं आसक्ति धरूं नये. मैत्री चांगल्या व वाईट मनुष्याबरोबर सुद्धां करावी. उद्योगापासून मागें हटूं नये. बळवंताशीं युद्ध करूं नये. डोक्यावर ओझें घेऊं नये. शत्रूचें किंवा गणिकेचें अन्न

कधींही खाऊं नये. कोणास जामीन राहूं नये. खोटी साक्ष देऊं नये. खोटें कधीं बोलूं नये. तसेंच जुगारापासून दूर राहावें. याप्रमाणें सदाचाराविषयीं तत्परता ठेवून काळ कंठावा.

**पथ्यापथ्यविवेचन**—वैद्यक शास्त्रांत जो पदार्थ पथ्यकर ह्मणून सांगितला आहे, तो आपल्या प्रकृतीला मानवत नसला, तर तो अपथ्य समजावा; आणि अपथ्य ह्मणून सांगितला असतांही, जर मानवत असला तर तो पथ्यकर ह्मणून समजावा. वास्तव, पथ्यापथ्याच्या विवेचनाविषयीं कित्येक प्रसंगीं निश्चित नियम सांगतां येत नाहींत. जो पदार्थ वायूला पथ्यकर असेल, तोच पित्ताला अपथ्यकारक असूं शकेल. तथापि असाही निश्चित नियम करतां येत नाहीं. कित्येक पदार्थ प्रभावानें व मिश्रणानें, केवळ पथ्यकर, अपथ्यकर आणि पथ्यापथ्यकर असे बनतात. त्यांतही जळ, दूध, तूप, आणि तांदूळ इत्यादि पदार्थ सर्व प्राण्यांस सात्म्य असल्यानें पथ्यकरच ह्मटले आहेत. दाह, पाक आणि मारण या क्रियेंत योजलेले पदार्थ, अग्नि, क्षार व विष हे अपथ्यकारक ह्मणून ह्मटले आहेत. आणखी कित्येक पदार्थ पथ्यकर असूनही संयोगानें अपथ्यकारक कार्य करतात. तसेंच वायूला अनुकूळ व पित्ताला प्रतिकूळ दिसणारे पदार्थ पथ्यापथ्य ह्मटले आहेत. यासाठीं जे पदार्थ सर्वसामान्य हितकारक व अहितकारक आहेत ते खालीं लिहिल्याप्रमाणें:—

जीवनाच्या पदार्थांमध्यें अन्न श्रेष्ठ आहे. तसेंच तृप्तिकारक पदार्थांमध्यें पाणी; संजीवनपदार्थांमध्यें क्षीर; शरीरास पुष्टता देणाऱ्या पदार्थांमध्यें मांस; खाण्याच्या पदार्थांवर रुचि उत्पन्न करणाऱ्या वस्तूंमध्यें मीठ; हृद्य पदार्थांमध्यें अम्लपदार्थ; कफाला व पित्ताला

शमविणाऱ्या पदार्थांमध्यें मद्य; वात व पित्त यांस शमविणाऱ्या पदार्थांमध्यें तूप व तेल; कफहारक पदार्थांमध्यें वमनद्रव्य; पित्ताला हरणाऱ्या पदार्थांमध्यें विरेचन; वातहारक पदार्थांत बस्ति; शरीराला कोमळ करणाऱ्या पदार्थांत स्वेद; शरीराला बळकट करणाऱ्या पदार्थांत कसरत; पुरुषत्वाचा नाश करणाऱ्या पदार्थांत क्षार; स्वर बिघडविणाऱ्या पदार्थांत कच्चें कवठाचें फळ; हृदयाला अहितकारक पदार्थांमध्यें मेंढीचें तूप; शरीरांतील रक्तवाहिन्यांस होणारा प्रतिबंध दूर करणाऱ्या पदार्थांत बकरीचें दूध; कफ व पित्त करणाऱ्या पदार्थांत मेंढीचें दूध, निद्रा उत्पन्न करणाऱ्या पदार्थांत म्हशीचें दूध; नाडीच्या गतीचा प्रतिबंध करणाऱ्या पदार्थांमध्यें अदमुरें दहीं; मूत्र उत्पन्न करणाऱ्या पदार्थांमध्यें ऊंस: वमन व आस्थापन व अनुवासन बस्ति यांस उपयोगी पदार्थांमध्यें मदनफळ; सुखानें रेच आणणाऱ्या पदार्थांत निशोत्तर; हलक्या विरेचनामध्यें बहाव्याचा मगज; उग्र विरेचनामध्यें थोर वृक्षाचा चीक; कृमिरोगाचा नाश करणाऱ्या पदार्थांत वावडिंग; विष उतरणाऱ्या पदार्थांत शिरीष; कोडाला हरणाऱ्या पदार्थांत खैर; वयाची स्थिति चांगली ठेवणाऱ्या पदार्थांमध्यें आंवळे; कणीपासून उत्पन्न होणाऱ्या धान्यामध्यें रांत तांदूळ; शेंगाच्या दाण्यामध्यें मूग; सर्व प्रकारच्या पाण्यामध्यें अधांतरीं धरलेलें पाणी; सर्वप्रकारच्या लवणांमध्यें सैंधव; सर्व प्रकारच्या तुपामध्यें गाईचें तूप; सर्व प्रकारच्या दुधामध्यें गाईचें दूध; वनस्पतीपासून उत्पन्न होणाऱ्या स्निग्ध पदार्थांत तिळांचें तेल; फळांमध्यें द्राक्ष; ऊंसाच्या पदार्थांमध्यें साखर; पुष्टिकर व वातहर पदार्थांमध्यें एरंडाचें मूळ; अग्निदीपन, पाचन, व पोटांत वायु धरतो त्याचें शमन करणाऱ्या पदार्थांत पिंपळमूळ; अग्निदीपन, गुदास्थानांतील शूळ शमविणारे व सूज उतरविणारे, अशा पदार्थांत चित्रकाचें मूळ; उचकी,

श्वास, खोकला व कुक्षिशूळ यांचें शमन करणाऱ्या पदार्थांमध्यें पुष्करमूळ; मळ बांधणें, दीपन आणि पाचन या कामीं उपयोगी पदार्थांमध्यें नागरमोथा, शमन करणाऱ्या, दीपन करणाऱ्या, ओकारी मोडणाऱ्या; व अतिसाराचें निवारण करणाऱ्या पदार्थांमध्यें वाळा; मळ बांधणें, वायु हरणें, दीपन, कफ, रुधिरविकार व बद्धकोष्ठ यांचें शमन करणें या कर्मांत उपयोगी पदार्थांमध्यें गुळवेल; मळ बांधणें, दीपन, व कफाची शांति करणें यामध्यें बेलफळ; अग्नीचें प्रदीपन, पाचन, मळ बांधणें, व सर्व दोष हरणें, या कामीं अतिविष; मूत्रकृच्छ्र व वात यांचें शमन करणाऱ्या पदार्थांत गोखरूं; छेदन, दीपन, वायु खालीं उतरणें, वाताचें शमन, आणि कफाला दूर करणें या कामीं उपयोगी पदार्थांमध्यें हिंग; संग्रहणी, अर्श, व फार तूप खाल्ल्यानें होणारी पीडा यांस दूर करणाऱ्या पदार्थांमध्यें ताक; दांतांस बळकटी देणाऱ्या व भोजनोत्तर तोंडास रुचि आणणाऱ्या पदार्थांमध्यें तेलाचा चूळ; शमन करणाऱ्या लेपांमध्यें चंदनाचा लेप; शीत दूर करणाऱ्या लेपांमध्यें रास्न्याचा व अगरूचा लेप; दाह, कातडीचा दोष व स्वेद यांचा नाश करणाऱ्या पदार्थांमध्यें वाळा; चक्षु, केश व कंठ यांस हितकर, वर्ण चांगला करणाऱ्या व व्रणाचें रोपण करणाऱ्या पदार्थांमध्यें ज्येष्टीमध; शरीरांत प्राण आहे किं नाहीं याची खात्री करणाऱ्या पदार्थांमध्यें वायु; थंड पाण्यानें शरीराला आलेली जडता, थंडी, शूळ, व कप यांचें प्रशमन करणाऱ्या पदार्थांमध्यें अग्नि; आम दोषाला उत्पन्न करणाऱ्या पदार्थांत बहु भोजन; जठराग्नीला प्रदीप्त करण्यासाठीं त्याच्या बळानुरूप भोजन; खाण्याला व पिण्याला योग्य पदार्थांमध्यें स्वतांला अनुकूळ व्यवहार; आरोग्य राखण्याला अनुकूळ क्रियांमध्यें वेळचे वेळीं भोजन; रोग उत्पन्न

करणाऱ्या कार्यांमध्यें मूत्रादिकाच्या वेगाचें धारण; बुद्धि, धैर्य, व स्मृति यांचा नाश करणाऱ्या पदार्थांमध्यें दारू; कष्टांनीं पचणाऱ्या पदार्थांमध्यें जडान्न; सुखानें पचविणाऱ्या क्रियांमध्यें एक वेळ भोजन; शरीराला शुष्क करणाऱ्या क्रियांमध्यें स्त्रीसंग; नपुंसकत्व आणणाऱ्या क्रियांमध्यें वीर्याचा निरोध; अन्नावर अनिप्रीति उत्पन्न करणाऱ्या क्रियांमध्यें एकांत्राड भोजन; आयुष्याला घटविणाऱ्या क्रियांमध्यें अभोजन; शरीराला कृश करणाऱ्या पदार्थांमध्यें थोडें भोजन; संग्रहणीला उत्पन्न करणाऱ्या पदार्थांमध्यें अजीर्ण आलें असतां अतिभोजन; जठराग्नीला विषम करून टाकणाऱ्या पदार्थांमध्यें अनियमित भोजन; दुष्टव्याधि उत्पन्न करणाऱ्या क्रियांमध्यें परस्परविरुद्ध गुणांच्या पदार्थांचें भक्षण; अलक्ष्मी आणणाऱ्या पदार्थांमध्यें रजस्वलाभिगमन; आयुष्याची अभिवृद्धि करणाऱ्या क्रियांमध्यें ब्रह्मचर्य; वीर्याची पुष्टि करणाऱ्या क्रियांमध्यें संकल्प; वीर्याच्या पुष्टीला प्रतिबंध करणाऱ्या गोष्टींमध्यें दौर्मनस्य, ह्मणजे मन बिघडणें; शक्तीचा नाश करणाऱ्या क्रियांमध्यें शक्तीबाहेर काम करूं जाणें; रोग वाढविणाऱ्या गोष्टींमध्यें खेद; श्रमहारक क्रियांमध्यें स्नान; मनाला तृप्त करणाऱ्या गोष्टींमध्यें हर्ष; शरीराला शुष्क करणाऱ्या गोष्टींमध्यें शोक; शरीराला पुष्टि देणाऱ्या क्रियांमध्यें निवृत्ति, ह्मणजे साफ कर्म न करणें असें नाहीं, तर यथाशक्ति कर्म करणें; आळसाची वृद्धि करणाऱ्या गोष्टींमध्यें जास्ती झोंप; बळ उत्पन्न करणाऱ्या क्रियांमध्यें सर्व प्रकारचे रस खाण्याचा अभ्यास ठेवणें; तसेंच शरीर कृश करणाऱ्या गोष्टींमध्यें एकच रसाचें सेवन; शस्त्रानें ओढून काढवयाच्या पदार्थांमध्यें गर्भशल्य ( आडवें आलेलें बाळक ); शरीरांतून काढून टाकण्यालायक विकारांमध्यें अजीर्ण; कोमळ औषधांनीं रोग दूर केला पाहिजे अशा प्राण्यांमध्यें बाळक; रोग लौकर दूर

होणार नाहीं असें जाणून, त्याच्या शमनार्थ योग्य आहारविहार ठेवून पाळण्यास लायक अशा प्राण्यांमध्यें वृद्ध; तीक्ष्ण औषधें व श्रम देण्यास नालायक प्राण्यांमध्यें गर्भिणी स्त्री; गर्भ स्थिर राखण्याच्या उपायांमध्यें मनाची प्रसन्नता; चिकित्सा करण्यास अयोग्य रोगांमध्यें सन्निपात; कष्टानीं शांत होणाऱ्या रोगांमध्यें आमरोग; सर्व रोगांमध्यें ज्वर; फार काळ राहणाऱ्या रोगांमध्यें कोड; अवांतर अनेक रोगांनीं युक्त अशा रोगांमध्यें क्षय; परस्परप्रसंगानें होणाऱ्या रोगांमध्यें प्रमेह; शस्त्रतर नव्हे, पण शस्त्राचें काम करणाऱ्या पदार्थांमध्यें जळू; औषधी उत्पन्न करणाऱ्या स्थानांमध्यें हिमालय; आरोग्य देणाऱ्या देशांमध्यें मारवाड; राहण्याला नालायक प्रदेश ह्मटला ह्मणजे फार पाणथळ असा कफप्रधान देश; चिकित्सेच्या कामांत वैद्य; संगति करण्याला नालायक मनुष्यांमध्यें नास्तिक; मनाला क्लेश देणाऱ्या कृत्यांमध्यें हायहाय: रोग्याला अनिष्ट गोष्टींमध्यें त्याच्या इच्छेप्रमाणें न करणें; सर्व साधनांमध्यें शास्त्राच्या अभिप्रायास अनुसरून चालणारा तर्क; संदेह दूर करणाऱ्या पदार्थांमध्यें कष्टकर्मता; भय उत्पन्न करणाऱ्या गोष्टींमध्यें असामर्थ्य; बुद्धीची अभिवृद्धि करणाऱ्या गोष्टींमध्यें निरनिराळ्या शास्त्रांत पारंगत अशा विद्वानांचा सहवास; शास्त्राचा खरा अभिप्राय जाणण्याच्या कारणामध्यें गुरु; मरण न यावें अशा उपायांमध्यें आयुर्वेद; अनुसरण्याला अवश्य अशा मित्रादिकांच्या उपदेशांमध्यें सद्वचन; अशा प्रकारें उत्तम आणि अनुत्तम, हित आणि अहित अशा पदार्थांचा विचार चिकित्सा करण्याचे कामीं फार उपयोगाचा आहे.

**रसायनप्रयोग—१ ला.** चार आंगळें लांब, रुंद, तीक्ष्ण व खऱ्या लोखंडाचा पत्रा खूप तापवून तापवून, त्रिफळाच्या रसांत, गोमूत्रांत, इंगुदीच्या व पळसाच्या क्षारांत, अनुक्रमें,

काजळाप्रमाणें काळा होई तोंपर्यंत शुद्ध करावा. शुद्ध झाल्यावर त्याचें बारीक चूर्ण करून त्यांत मध व आंवळ्याचा रस, चाटतां येईल तितका, घालून, तुपाच्या रामलेल्या मडक्यांत ओतून, तोंड बंद करून, तें जवाच्या राशीमध्यें एक वर्षपर्यंत पुरावें. मध्यंतरीं दर महिन्याला तें एकदां हलवावें. याप्रमाणें तयार केलेलें हें औषध मधाशीं व तुपाशीं, बळाची व अग्नीची स्थिति पाहून, सकाळीं खात जावें, आणि औषध पचल्यावर मग जेवावें. वर सांगितल्याप्रमाणेंच सुवर्ण व रत्न यांचें रसायन सिद्ध होतें. तें सर्व रोगांचा नाश करतें, दीर्घायुष्य देतें, आणि तें एक वर्षभर घेत गेल्यास म्हातारपण व मृत्यु यांची भास्ती मुळींच करणें नलगे. या प्रयोगाचें नांव "लोह-रसायन" असें वैद्यांनीं ठेवलें आहे.

२. शुद्ध गंधक घेऊन, त्याला गाईचें दूध, दालचिनी, वेलची, तमालपत्र, नागकेशर, गुळवेल, हिरडा, बेहडा, आंवळकटी, सुंठ, माका आणि आलें या सर्व पदार्थांच्या काढ्याच्या निरनिराळ्या आठ भावना द्याव्या, व या भावना दिल्यावर त्यांत गंधका एवढीच साखर घालावी. हें रसायन एक तोळाभर घेत गेल्यास वीर्य वाढतें, पुष्टि येते, शरीराला बळकटी येते, अग्नि प्रदीप्त होतो, आणि कोड, चळ, विषविकार, फार वाढलेला अतिसार, संग्रहणी, वातरक्त, शूळ, जीर्णज्वर, तीव्रप्रमेह, वायुसंबंधी रोग, वृषणवृद्धि या रोगांचाही नाश होतो. या गंधक रसायनाला पाऱ्याच्या व सुवर्णाच्या भस्माचा योग दिला तर तें मेल्याप्रमाणें झालेल्या माणसासही जीवन देतें व अतिसुख करतें.

३. हरडेदळ, मिरीं, सुंठ, वावडिंग, आंवळकटी, पिंपळी, पिंपळमूळ, दालचिनी, तमालपत्र, व नागरमोथा हीं सगळीं समभाग

घेऊन त्यांत तिप्पट जेपाळ, आठपट निशोत्तर, व साहापट खडीसाखर घालून, मधाबरोबर एकेक तोळाभार लाडू वळावे. त्यांतून एकेक रोज प्रातःकाळीं खात जावा व त्यावर थंड पाणी प्यावें. लाडू खाल्यावर जोंपर्यंत ऊन पाणी व ऊन खाण्यांत येणार नाहीं तोंपर्यंत रेच होतील. जो हे लाडू खाईल त्याला अन्न, पान व विहार यांत फार कडकडीत पथ्य राखणें जरूर आहे. या लाडवांच्या सेवनानें विषमज्वर, अग्निमांद्य, पांडुरोग, खोकला, भगंदर, कुशींत दुखणें, पाठींतील रोग, मांडींतील पीडा, पोटऱ्यांतील रोग, आणि पोटांतील विकार, हीं सर्व बरीं होतात. ज्या दिवशीं हा लाडू खाण्यांत येईल त्या दिवशीं आंगाला तेल चोळूं नये, किंवा राग आणूं नये. हे लाडू उत्तम रसायनांत गणले आहेत व त्यांस "अभयादिमोदक" असें योग्य नांव दिलें आहे.

४. बेलफळ, अरणी, अरलू, शीवण, काकच, खपाट, समेरवा, वेडा समेरवा, रानमूग, रानउडीद, पिंपळी, गोखरू, उभी भुईरिंगणी, बैठी भुईरिंगणी, काकडशिंग, भुईआंवळी, द्राक्ष, कवठ, अगरु, हिरडे, गुळवेल, ऋद्धि, जीवक, ऋषभक, कचोरा, मोथा, पुनर्नवा, मेदा, महामेदा, बारीक वेलची, निळें कमळ, रक्तचंदन, विदारीकंद, अडुळशाचें मूळ, कंकोळी व तांबडी निशोत्तर, हे प्रत्येक पदार्थ चार चार तोळे व पांचशें आंवळे अशीं औषधें घ्यावीं व तीं एक हजार चोवीस तोळे पाण्यांत शिजवावीं. या औषधांतला सगळा रस पाण्यांत उतरला असें समजतांच, तें पाणी वस्त्रानें गाळून घ्यावें. नंतर त्यांतील आंवळे काढून घेऊन व त्यांतल्या बिया काढून टाकून, ते आंवळे अडतीस तोळे तुपांत व तेलांत परतावे. वरील गाळून घेतलेल्या पाण्यांत दोनशें तोळे स्वच्छ खडीसाखर घालून, तें पाणी त्या आंवळे परतलेल्या तुपांत व तेलांत घालून,

उत्तम प्रकारचा पाक करावा. पाक तयार होऊन निवाल्यावर त्यांत सोळा तोळे वंशलोचन, आठ तोळे पिंपळी, व चार तोळे दालचिनी, वेलची, तमालपत्र, व केशर हीं घालावीं. हा प्रयोग च्यवन प्राश्यावलेह या नांवानें प्रसिद्ध आहे व कित्येक तर याला "जीवन" असेंच ह्मणतात. हा अवलेह मोठें रसायन आहे. हा खोकला व श्वास यांचा नाश करतो. क्षीण झालेल्यांच्या, वृद्धांच्या व बाळकांच्या शरीरास सष्ट व पुष्ट करणारा आहे. स्वरभंग, उराचे रोग, वातरक्त, तृषा, मूत्रदोष, व वीर्यदोष, हे सर्व विकार याच्या सेवनानें बरे होतात. या अवलेहाच्या सेवनानें च्यवन मुनि पुनः तरुण झाले. ऋद्धि, जीवक, ऋषभक, मेदा, महामेदा, व काकोली हीं औषधें तर मिळत नाहींत, यासाठीं त्यांच्या जागीं शतावरी, विदारीकंद, आसोंद व वाराहीकंद यांचा उपयोग करावा.

९. कचोरा, वेखंड नागरमोथा, किराइत, गुळवेल, देवदार, हळद, अतिविष, दारुहळद, पिंपळमूळ, चित्रक, धणे, हिरडे, बेहळा, आंवळकटी, चवक, वावडिंग, गजपिंपळी, सुंठ, मिरीं, पिंपळी, सोनामुखीचें भस्म, जवखार, सार्जीखार, सैंधव, संचळखार, बीडलोण हे पदार्थ चोवीस चोवीस गुंजा घ्यावे. निशोत्तर, जेपाळमूळ, तमालपत्र, दालचिनी, वेलची व वंशलोचन हीं प्रत्येकीं एकेक तोळा घ्यावीं. मारलेलें लोखंड दोन तोळे, खडीसाखर चार तोळे, शिलाजित आठ तोळे व गुग्गुळ आठ तोळे असे घ्यावे. हे सर्व पदार्थ एकत्र करून खलांत सपाटून वाटावे. शाहाण्णव गुंजांची एकेक गोळी करावी. या गोळ्यांस चंद्रप्रभा असें नांव प्रख्यात आहे. यांच्या सेवनानें सर्व प्रकारचे प्रमेह, मूत्रकृच्छ्र, मूत्राघात, मुतखडा, मळबंध, ओटीपोट फुगणें, शूळ, अर्बुद, वृषणवृद्धि, पांडुरोग, कमला, हली-

मक, अंत्रवृद्धि, कटीशूळ, श्वास, खोकला, विचर्चिका, कोड, अर्श, चळ, कवलू, उदराचे विकार, भगंदर, दांताचे रोग, नेत्ररोग, रजोदोष, अग्निमांद्य, अरुचि, वात, पित्त व कफ यां सर्वांचा नाश होतो. यांच्या योगानें बळ प्राप्त होतें. या उत्तम रसायन होत.

६. गुळवेल, गोखरू व आंवळकटी हीं तीनही समभाग घेऊन त्यांचें चूर्ण करावें. हें चूर्णही एक रसायनच आहे. हें चूर्ण अर्धा तोळा, सांज सकाळ तूपसाखरेबरोबर खावें. याच्या सेवनानें देवसुद्धां अजर, अमर, बहुपराक्रमी, व काळेभोर केशांनीं सुशोभित असे झाले असें लिहिलें आहे.

७. सुंठ, पिंपळमूळ, चवक, मिरीं, चित्रक, भाजलेला हिंग, बोडी ओंवा, सशेव, जिरें, शाहाजिरें, तगरीचें बीं, इंद्रजव, काळी-पाठ, वावडिंग, गजपिंपळी, कुटकी, अतिविष, भारंग, वेखंड, पिलुडी, तमालपत्र, देवदार, पिंपळी, कवठ, रास्ना, मोथा, सैंधव, वेलची, गोखरूं, हिरडे, धणे, बेहडा, आंवळकटी, दालचिनी, वाळा, व जवखार, हीं सर्व समभाग घेऊन, त्यांचें चूर्ण करावें. मग त्याबरोबर गुग्गुळ घेऊन तुपांत खलावा, इतका कीं त्याचे गोळे बनवितां येती-ल. नंतर ते गोळे तुपानें रामलेल्या मडक्यांत ठेवावे. कांहीं काळानें त्यांच्या चोवीस गुंजांची एकेक अशा गोळ्या बनवाव्या, व दोष आणि काळ यांचा विचार करून त्यांची योजना करावी. प्रथम कांहीं दिवस एकेक गोळी खावी, नंतर कांहीं दिवस दीड दीड, नंतर अर्धा तोळ्याची एकेक गोळी व शेवटीं एकेक तोळ्याची गोळी खात जावी. याला महायोगराज गुग्गुळ असें नांव दिलें आहे. व तें एक मोठें रसायनच आहे. त्याच्या सेवनानें बळाची वृद्धि होते; अर्श, संग्र-

हणी, कीलू, गुल्म, उदराचे विकार, पोटफुगी, अग्निमांद्य, श्वास, खोकला, अरुचि, प्रमेह, नाभीमध्यें शूळ, कृमि, क्षय, छातींत धडधडणें, सर्व वातव्याधि, आमवात, अपस्मार, वातरक्त, कोड, दुष्टव्रण, वीर्यदोष, रजोदोष, उदावर्त, आणि भगंदर वगैरे रोगांचा नाश होतो.

८ टोणग्याच्या डोळ्याच्या व पोटाच्या वर्णाप्रमाणें वर्ण असलेला चारशें तोळे गुग्गुळ पाण्यांत घालून, त्यांत आणखी चौसष्ट तोळे हिरडा, बेहडा आणि आंवळकटी, व बत्तीस तोळे गुळवेल घालावी. नंतर हीं सर्व औषधें चुलीवर ठेवून, अर्धे पाणी आटे तोंपर्यंत पळीनें ढवळीत असावें. मग चुलीवरून उतरून थंड झाल्यावर त्यांत दोन दोन तोळे हिरडा, बेहडा व आंवळकटी यांचें चूर्ण, साहा साहा तोळे सुंठ, मिरीं व पिंपळी यांचें चूर्ण, दोन तोळे वावडिंगांचें चूर्ण, एक तोळा निशोत्तरेचें चूर्ण, एक तोळा जेपाळाचें चूर्ण, चार तोळे गुळवेलीचें चूर्ण, याप्रमाणें औषधें घालून मिश्र करावीं, ह्मणजे कैशोर गुग्गुळ सिद्ध झाला. हा वातरक्ताचा हटकून नाश करतो; आणि व्रण, खोकला, कोड, गुल्म, सूज, विष, पांडुरोग, प्रमेह, अग्निमांद्य, मलावरोध, प्रमेहाचा पुरळ, व इतरही बहुत रोग याच्या सेवनानें नाश पावतात. निरंतर सेवन केल्यानें हा गुग्गुळ जरेचा पराभव करून बाल्यावस्थेंतल्याप्रमाणें रूप प्राप्त करून देतो. गुग्गुळ पाण्यांत घालण्याविषयीं सांगितलें आहे, तें पाणी दोन आढक ( ह्म० दोनशें छप्पन तोळ्यांचा एक आढक याप्रमाणें ) घ्यावें.

९. ज्येष्ठमध, आणि त्रिफळा ( हिरडा, बेहडा व आंवळकटी ) हीं समभाग घेऊन, त्यांत तवकील, पिंपळी, सैंधेलोण, निरनिराळा पांच प्रकारचा लोह ( रुपें, तांबें, शिसें, कथील, आणि

लोखंड ), सोनें, वेखंड, आणि मध, तूप, अथवा खडीसाखर हे अकरा पदार्थ निरनिराळे मिश्र केल्यानें निरनिराळीं अकरा रसायनें तयार होतात. हें 'त्रिफळा' नामें रसायन सर्व रोगांचा नाश करितें, व मेधा, आयुष्य, स्मृति आणि बुद्धि यांस वाढवितें.

१०. कमळाचीं पंचांगें घेऊन वांटावीं, व त्या कल्कांत दुधा-सहित सोन्याचे तुकडे तुपांत उकळावे ह्मणजे पंचारविंद घृत नामें रसायन बनतें. या रसायनाच्या सेवनानें गेलेलें पुरुषत्व, बळ व प्रतिभा हीं पुनरपि प्राप्त होतात.

११. श्याम कमलाचें नाल, त्याचा कंद, त्याचीं पानें, व त्याचे केसर घेऊन, दूध व सोन्याचे तुकडे यांसहित तुपांत उकळावे, ह्मणजे जें रसायन बनतें, तें चतुःकुवलय घृत या नामें प्रसिद्ध आहे. हें रासायनिक घृत सेवन केल्यानें बैलासही बुद्धि प्राप्त होते, मग मनुष्यास होईल यांत काय नवल?

१२. एक हजार हिरडे, एक हजार आंवळे, व एक ह-जार पिंपळी, हीं तीनही औषधें शुद्ध घेऊन, तीं पळसाच्या क्षा-रांत भिजवून सावलींत सुकवावीं, मग त्यांचें चूर्ण करून रामलेल्या मडक्यांत ठेवून, त्यांत आणखी चौथा हिस्सा खडीसाखर व साखरे-च्या चौपट हिस्सा तूप व मध हीं घालावीं. नंतर हें मडकें साहा महिने जमिनींत पुरून ठेवावें, व साहा महिन्यांनीं बाहेर काढून जठराग्निच्या बळाप्रमाणें त्याचें सेवन करावें. सायंकाळीं सात्म्य भोजन करावें. याप्रमाणें हें रसायन घेणारा मनुष्य रोगरहित व वृद्धावस्थारहित होत्साता शंभर वर्षेपर्यंत जगतो, व बळ, पुष्टि, स्मृति व मेधा इत्यादि गुणांनीं युक्त होतो.

१३. कुजलेला नाहीं असा ओल्या पळसाचा शेंडा कापून, त्याच्या खुंटांत दोन हात खोल कुंटी उकरून, त्यांत नवे आंवळे भरावे. मग त्या खुंटाला बुंध्यापासून वरपर्यंत दर्भांनीं झाकावें व त्यावर कमळाची माती लिंपावी. नंतर वायुरहित स्थळीं रानशेण्या रचून पेटवाव्या. आंतले आंवळे चांगले शिजले ह्मणजे बाहेर काढून मध व तूप यांशीं युक्त, पोट भरून, तृप्ति होईपर्यंत खावे. त्यावर कढत कढत दूध प्यावें. कडकडीत पथ्य पाळावें. थंड पाण्याला स्पर्शही करूं नये. याप्रमाणें एक महिना करावें. औषध सुरू केल्यापासून अकराव्या दिवशीं औषध घेणाराचे केस, नखें व दांत गळून पडतील. नंतर थोडेच दिवसांत हळूहळू तो दिव्य स्वरूप पावून व विशेष पराक्रम, धारणा, बळ, बुद्धि आणि सत्व यांनीं युक्त होत्साता, हजार वर्षे पर्यंत वांचेल.

१४. राहु नांवाचा दैत्य, देवाचें रूप घेऊन, देवांच्या पंक्तीला जाऊन बसला, आणि मोहिनीचें रूप घेऊन, भगवान जेव्हां अमृत वाढावयास आले, तेव्हां सर्वांबरोबर त्याला अमृताचा अंश मिळाला. तो तोंडांत घालून गळ्याखालीं उतरणार तों इतक्यांत चंद्रसूर्यांच्या सूचनेवरून भगवंतानें त्याचें मस्तक चक्रानें छेदलें. तेव्हां गळ्यांतून अमृताचे कांहीं थेंब जमीनीवर पडले, व तेच नंतर लसुनीच्या रूपानें पृथ्वीवर प्रगट झाले. यासाठींच, दैत्याच्या संपर्कास्तव, ब्राह्मण वगैरे सोवळे लोक लसून खात नाहींत. परंतु खरें ह्मटलें तर लसून हें एक श्रेष्ठ रसायन आहे.

लसून बहुत करून हेमंत व शिशिर ऋतूंतच सेवन करण्यास योग्य आहे. कफविकाराच्या मनुष्यांनीं वसंतकाळींही ती सेवन करावी व वातव्याधि झालेल्या मनुष्यानें वर्षाकाळीं घ्यावी. वातव्याधिग्रस्तांनीं

नेहमीं सेवन करीत गेल्यासही कांहीं वाईट नाहीं. लसुनेचें रसायन घेण्यापूर्वी स्नेहनविधीनें व वमनविरेचनांनीं पहिल्यानें शरीराची शुद्धि केली पाहिजे. तसेंच शातवीर्याचे व मधुर पदार्थ खातां कामा नये.

लसुनीचें रसायन एक पळप्रमाण घ्यावें, व तें जेवण्यापूर्वी घ्यावें. तें पचल्यावर सार किंवा नुसतें दूध यांशीं पांढरे तांदूळांचा भात खावा. हें रसायन चालू असतां, तहान फार लागली तर धण्यांचें पाणी पीत जावें.

लसनीचा कल्क व तूप हीं समभाग घेऊन, खूप हलवून हलवून मिश्र करावीं, मग तुपाच्या रामलेल्या मडक्यांत दहा दिवसपर्यंत घालून ठेवावीं. नंतर बळाबळ पाहून सेवन करीत जावीं. हें रसायन खाण्याच्या इतर पदार्थांत घालून जरी खाण्यांत आलें तरीसुद्धां तें पुष्कळ फायदा करणारें आहे.

सूर्यमारुतिक विधि—रसायन सेवन करणारा मनुष्य ऊन, थंडी व वारा यांत जरी फिरला तरी त्याला त्यापासून रसायनकृत उपद्रव होऊं नये असा जो उपाय, त्याला सूर्यमारुतिक विधि अशी संज्ञा आहे. या विधीला योग्य अशीं रसायनें आहेत तीं खालीं लिहिल्याप्रमाणें:—

१. थंड पाणी, दूध, मध, तूप या चोहोंपैकीं एकेक, दोन दोन, तीनं तीन, अथवा सर्व पदार्थ प्याल्यावर पुष्कळ उशीरानें जेवल्यास पिणाराच्या वयाची स्थिति जशीच्या तशीच राहील.

२. गूळ, मध, सुंठ, पिंपळी अथवा मीठ यांशीं मिश्र करून दोन दोन खात गेल्यास सुखानें शंभर वर्षे आयुष्य भोगितां येतें.

३. हरीतकी तुपांत परतून खावी व तीवर तेंच तूप प्यावें. असें केवळ एक दिवस केल्यानेंही, जसा संत जनांनीं केलेला उपकार अनेक दिवसपर्यंत सुखदायक होतो, तसें फार दिवसपर्यंत बळ अंगांत टिकाव धरून राहतें.

४. नित्य नेमानें एक पळ काळे तिळ खाऊन, वर थंड पाण्याचा घोंट घेत गेल्यानें, शरीर पुष्ट होतें, आणि मरे तोंपर्यंत दांत बळकट राहतात.

५. काळ्या तिळांबरोबर हरडा, बेहडा अथवा आंवळकटी खात गेल्यास, खाणाराचें शरीर, मयूराप्रमाणें, इतरांस सुंदर दिसूं लागतें.

६ खरें बोलणारा, क्रोधरहित, आत्मज्ञानाविषयीं तत्पर, शांत व सदाचारी असा जो मनुष्य असेल तो सदासर्वदा रसायनच खात आहे ह्मणून समजावें; आणि असा गुणवान मनुष्य जर आणखी रसायन खाईल तर तो या लोकीं तसाच परलोकींही सुखच पावेल.

७. शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें वागणूक, आपली मनोवृत्ति जाणण्याची शक्ति आणि जवळचे लोक व प्रत्येक पदार्थ जसे असतील तसेच ते जाणण्याची शक्ति, या तीनही गोष्टी रसायनरूप होत.

यान्वास्वाद्य रसायनान्यनुदिनं शीघ्रं भवेयुर्जना
भूभागे ह्यजरामरागतदरा दुष्टामयक्लेशतः ।
तेषां नाम गुणस्वरूपकथनव्यग्रस्य पीयूषतां
संभाव्यैव मया रयात्मकरणस्यास्याऽमृताख्याऽर्पिता ॥

# वाजि रत्न ७ वें.

**वाजीकरणाचा प्रभाव**—धर्म, अर्थ, प्रीति आणि यश हीं वाजीकरणाच्या प्रयोगावर अवलंबून आहेत; इतकेंच नाहीं तर पुत्रोत्पत्तींचें मुख्य कारणही वाजीकरण हेंच आहे.

**मुख्य वाजीकरण**—जिच्या दर्शनानें तत्काळ पुरुषाच्या शरीरांत काम प्रगट होतो व जी पुत्रोत्पत्तीला क्षेत्ररूप आहे, अशी स्त्री हेंच मुख्य वाजीकरण होय. जे शब्दादि अर्थ पृथक् पृथक् स्थळीं असतांही एकेकटेच प्रीति उत्पन्न करतात, ते सर्वच स्त्रीच्या शरींरांत एकवटले आहेत, त्यापेक्षां ते तिच्या ठिकाणीं विशेषच प्रीति उत्पन्न करतात यांत नवल नाहीं. जरी शब्दादिक अर्थांच्या समूहाचा अनुभव इतर पदार्थांतही दृष्टीस पडतो, तरी स्त्रीच्या शरीरांत स्थित असलेल्या अर्थांचा समुदाय जसा प्रीति उत्पन्न करणारा आहे, तसा तो इतर ठिकाणचा समुदाय एवढा आनंदजनक अनुभव देत नाहीं. आणखी स्त्रीजाति अपत्य, धर्म, अर्थ, लक्ष्मी आणि स्वर्ग यांच्या प्राप्तीचें साधन आहे. यासाठीं स्त्री जर सुस्वरूप, तरुण, सुलक्षण, पतीच्या आज्ञेंत वागणारी आणि सुशिक्षित असली तर ती पतीच्या शरीरास अवश्य पुष्टि देईल. तसेंच दर्शनस्पर्शनादिकेंकरूनच कामोत्पत्ति करणाऱ्या पुरुषाचा मुद्दाम शोध करून व प्रारब्ध योगानें प्राप्त झाल्यावरून समागम झाल्यामुळें स्त्रीच्या शरीरांत रूपादिक गुणांची अभिवृद्धि होते, यास्तव असा पुरुषही स्त्रीस पुष्टि देणारा समजावा. वय, शुद्धि व हावभाव या गुणांनीं किंवा केवळ प्रारब्धानें जी स्त्री किंवा पुरुष मनांत भरेल ती स्त्री अथवा पुरुष परस्परांच्या पुष्टीकरतां सर्वप्रकारें योग्य होत.

**पुष्टि देणारी स्त्री.**—जगामध्यें मनुष्यें अनेक प्रकारचीं आहेत. जी स्त्री ज्या पुरुषाला सौंदर्य आणि बळ यांच्या साम्यामुळें हृदयाला आनंद देणारी आहे, स्वतः आज्ञाधारक आहे, आपल्या उत्कृष्ट गुणांनीं त्याच्या इंद्रियांस आपल्या स्वाधीन ठेवूं शकते, जिच्या वियोगानें तो रतिरहित व उदास होतो, व सर्व जगाला स्त्रीरहित पांहतो, तसेंच आपलें शरीरही इंद्रियरहित केवळ लांकडासारखें लेखतो, जिला पाहून त्याचे भय, शोक, उद्वेग आदि प्रतिकूळ विकार दूर होतात व जिच्या नित्य समागमानें त्याच्या मनाला संतोष वाटतो, ती गुणवती स्त्री त्या पुरुषाला पुष्टिच देईल.

**समागम करण्याला योग्य स्त्री**—ज्या पुरुषास पुत्राची इच्छा असेल, त्यानें ज्या स्त्रीचा समागम करावयाचा ती इतर गोत्राची, वर सांगितल्याप्रमाणें वृष्य ह्मणजे वाजीकरणगुणांनीं युक्त, कामोद्दीपन संपन्न, रोगरहित व ऋतुस्नात अशी असावी.

**पुत्रोत्पत्तीची आवश्यकता**-शुष्क सरोवर किंवा पेंढ्याचें बाहुलें जसें कोणताही मनोरथ पूर्ण करूं शकत नाहीं, तसा निपुत्रिक पुरुषही निरर्थक होय. कारण कीं तो प्रतिष्ठाहीन, नग्न, शून्य आणि सर्व कर्मांविषयीं अनधिकारी ह्मणून गणलेला आहे. पुष्कळ पुत्र असलेल्या पुरुषास पुष्कळ शरीरें धारण करणारा, पुष्कळ सुखें भोगणारा, पुष्कळ तोंडें असलेला, परिवारानें युक्त, पुष्कळ कामें करण्याला समर्थ, पुष्कळ नेत्र असलेला, व पुष्कळ ज्ञानानें मंडित असा मानिला आहे. त्याची सर्व लोक वाखाणणी करतात. तसेंच प्रीति, बळ, सुख, वृत्ति, विस्तार, विपुल कुळ, यश, स्वर्गलोक आणि संतोष या गोष्टी पुत्रापासूनच प्राप्त होतात. यास्तव पुत्रोत्पत्तीला साधनीभूत जे वाजीकरणप्रयोग त्यांचा नेहमीं प्रेमपूर्वक आदर करावा.

**वाजीकरणाची ज्यांस जरूर असे पुरुष.**—वृद्ध असून ज्यांस आपल्यावर स्त्रीची प्रीति असावी अशी इच्छा असेत, अत्यंत स्त्री सेवनानें ज्यांचें वीर्य क्षीण झालें आहे, उपाय केल्यानें दूर होईल असें नपुंसकत्व ज्यांचें असेल ते, ज्यांस जात्याच वीर्य अल्प असेल ते, या सर्वांस वाजीकरणप्रयोग हितकारक आहेत.

**स्त्रीसमागमास सामर्थ्य देणारे पदार्थ**—मनास आवडेल असें भोजन व पान, कानाला गोड लागतील अशीं भाषणें, स्पर्शसुख, चांदणें, मधुर गायन, तांबूल, मद्य, फुलांच्या माळा, आणि दाब नाहीं असें मोकळें मन, या गोष्टी स्त्रीसमागमांत बळ देणाऱ्या होत.

**नपुंसकत्व**—स्त्रीसंग करण्याची इच्छा असतांही अप्रिय अशा गीतादिकांच्या तत्कालीन अनुभवावरून अथवा प्रतिकूल स्वभावाच्या स्त्रीशीं गांठ पडल्यावरून, कामकलेविषयीं पुरुष निरुत्साह होतो, तें मानसिक नपुंसकत्व जाणावें. तिखट, खारट व आंबट रस अतिशय सेवन केल्यामुळें पुरुषाच्या शरीरांत सौम्य ( चंद्रसंबंधी ) धातूचा क्षय होतो तें शारीर नपुंसकत्व म्हटलें आहे. ज्याची मैथुनाविषयीं प्रवृत्ति आहे, व वाजीकरणप्रयोगांचा उपयोग तर करीत नाहीं, यामुळें ज्याच्या शरीरांत धातूचा क्षय झाला आहे, त्याच्या ठिकाणीं प्रगट झालेलें नपुंसकत्व ध्वजभंगात्मक म्हणून समजावें. गुदद्वारांत झालेल्या जबर रोगामुळें अथवा मर्मस्थानाचा छेद झाल्यामुळें जें नपुंसकत्व येतें तें पुरुषत्वाच्या उपघातानें आलेलें समजावें. जन्मतःच जो नपुंसक असतो त्याचें तें सहज नपुंसकत्व जाणावें. स्वतः बळवान असून ब्रह्मचर्यव्रत पाळल्यामुळें, कामवेगाला प्रसंगीं प्रतिबंध झाल्यामुळें, जें नपुंसकत्व प्राप्त होतें, तें शुक्राच्या स्थैर्याच्या

निमित्तानें आलेलें नपुंसकत्व ह्मणून ह्मटलें आहे. जन्मतः प्राप्त झालेलें व मर्मस्थानाच्या छेदामुळें आलेलें, असें हें दोन प्रकारचें नपुंसकत्व असाध्य जाणावें. कारण, तें वाजीकरणोपायांनीं दूर करतां येत नाहीं. इतर कारणांनीं आलेल्या नपुंसकत्वाचे जे वर प्रकार सांगितले आहेत ते त्यांच्या कारणांहून विपरीत आचरणानें बरे होतात व त्यांसच वाजीकरणाचे उपाय बरे करूं शकतात.

**वाजीकरण ह्मणजे काय?**—इंद्रियांस त्वरित शक्ति देणारें, पुष्कळ संतति प्राप्त करून देणारें, बळ कायम ठेवणारें, व शरीरांत ओजोधातूला वाढविणारें जें औषध तेंच वाजीकरण समजावें.

छायारहित, घाणेऱ्या वासाच्या फुलांनीं युक्त व ज्यावर फळें येत नाहींत, असा वृक्ष जसा केवळ निरुपयोगी आहे, तसें संतानहीन पुरुषाचें जिणेंही व्यर्थ आहे, हें मागें सांगितलेंच आहे. हें आणखी असें कीं बाल्यावस्थेमुळें चालतां चालतां अडखळणारें, अस्पष्ट बोबडें बोलणारें, धुळींत खेळल्यामुळें शरीर मळकट झालेलें, आणि लाळेनें तोंड लडबडलें आहे ज्याचें, असें बाळक हृदयाला आल्हाद देणारें आहे. बालकाच्या दर्शनानें व स्पर्शानें मिळणारें सुख इतर कोणत्याही वस्तूंपासून मिळणार नाहीं. यश, धर्म, मान, लक्ष्मी आणि यांची वृद्धि करणारें साधन बाळकच आहे. यास्तव अशा बाळकाची प्राप्ति व्हावी ह्मणून पुरुषानें नेहमीं वाजीकरणप्रयोगांचा आदर करावा. प्रथम स्नेहविधीनें व वमनविरेचनांनीं शरीर शुद्ध करून, तूप, तेल, रस, दूध, साखर, मध यांनीं युक्त असा निरूह व अनुवासन बस्ति वैद्याच्या अनुमतानें घेऊन, व त्यावर तूप व मांसरस खाऊन, मग वाजीकरण प्रयोग योजावे.

**वाजीकरणाचे पदार्थ**—तेल चोळणें, उटणीं, स्नान, सुगंध पुष्पांच्या माळा, कोंवळे पल्लव, वस्त्रप्रावरणें, अलंकारभूषणें, गायन, काव्यकथा, स्वसमान स्वभावाच्या मित्रांची संगति, घराजवळच तलाव वगैरे, कमळाच्या रजांनीं व रसानें मस्त झालेला पक्षिगण, शहराजवळचे बागबगीचे, नेत्रांस सुखविणाऱ्या वृक्षांचें दर्शन, कानाला सुखविणारा कोकिलांचा मधुर शब्द, ऋतुमानांप्रमाणें अंगाला सुख देणारीं वस्त्रेंभूषणें, मनाला हर्ष देणारें कुटुंब, तांबूल, निर्मळ मद्य, सुखरूप स्त्री व चांदणी रात्र, ह्या सर्व आणि इतरही मनाला आवडणाऱ्या गोष्टी वाजीकरणरूप होत. याचप्रमाणें कमळाच्या पाकळ्या घातलेलें द्राक्षांचें मद्य, वीणानाद, पुष्पशय्या, उपद्रवरहित शरीर, आणि जाग्याची व पैशाची विपुळता, ह्याही गोष्टी वाजीकरणप्रयोगाप्रमाणेंच उद्दीपन करणाऱ्या असल्याकारणानें वाजीकरणरूप ह्मणून ह्मटल्या आहेत.

**वाजीकरणप्रयोग**—१. विदारी कंद, पिंपळी, साळी, प्रियाल व अक्रोड यांचें चूर्ण सोळा तोळे, कुइलीच्या बियांचें चूर्ण सोळा तोळे, खडीसाखर दोनशें तोळे, आणि लोणकढें तूप अठ्ठेचाळीस तोळे हीं सर्व एकत्र करून त्याची एकेक तोळ्याची गोळी करावी व रोज एकेक गोळी खावी ह्मणजे पुरुषाची शक्ति नष्ट होण्याची भीति नाहीं.

२. कुइलीचें बीं व गहूं दूधांत शिजवून थंड झाल्यावर खात गेल्यानें अथवा शिजविलेल्या उडिदांत तूप व मध कमी जास्ती घालून खात गेल्यानें व त्यावर पहिल्या विणीच्या गाईचें दूध प्याल्यानें शरीरास अत्यंत पुष्टि प्राप्त होते.

३. स्वतःच्या रसाची वारंवार भावना दिलेलें व त्यांत मध व तूप घातलेलें भुईकोहळ्याचें चूर्ण पोटांत घेतल्यानें पुरुष बळवान होतो.

४. आंवळ्याच्या रसाची भावना दिलेलें, पिंपळी आणि आंवळकटी यांचें चूर्ण, साखर व मध यांशीं मिश्र करून खाल्ल्यानें व त्यावर दूध प्याल्यानें ह्मातान्या माणसाला तरुणावस्था प्राप्त होते.

५. मोहाचें चूर्ण एक तोळा घेऊन, त्यांत तूप घालून नित्य चाटीत गेल्यास व त्यावर दूध पीत गेल्यास पुरुषाच्या शरीरांत शक्तीचा वेग नेहमीं प्रज्वलित असतो.

६. क्षीरकाकोली दुधांत शिजवून, त्यांत तूप व मध घालून खावी, आणि वर धारोष्ण गाईचें दूध प्यावें ह्मणजे पुरुषाचें शुक्र कधींच क्षय पावत नाहीं.

७. कुहलीच्या व गोखरूच्या बियांच्या चूर्णांत साखर घालून, त्याची फक्की मारावी व त्यावर धारोष्ण दूध प्यावें ह्मणजे कसाही क्षीण मनुष्य अतिबलिष्ट होतो.

८. चंद्रासारखें पांढरें, मोडलेलें दहीं फडक्यानें गाळून, त्यांत साखर घालून, साठी तांदुळाच्या भाताशीं मिश्र करून जो खातो, तो वृद्ध असला तरी तरुणासारखा होतो.

९. गोखरू, तालीमखाना, उडीद, कुहलीचें बीं व शतावरी हीं सर्व औषधें दुधांत घालून प्याल्यानें वृद्ध मनुष्य सुद्धां तरुणासारखा बळवान होतो.

१०. पिंपळाचें मूळ, त्याचें फळ, त्याची साल हीं सर्व दुधांत खूप उकळून त्यांत खडीसाखर व मध घालून प्यावीं ह्मणजे मनुष्य बळवान होतो.

११. मध व तूप यांत मिश्र केलेलें उडदांचें चूर्ण, चार तोळ्यांची एक गोळी याप्रमाणें खाणारा पुरुषही बलिष्ठ होतो.

१२. साखर, बिनसालीची उडदांची डाळ, तळवणी, दूध, तूप, व गव्हांची पिठी ही सगळीं तुपांत घालून, लापशीप्रमाणें शिजवावीं; अर्धवट शिजल्यावर त्यांत कोंबड्याचा मांसरस घालावा व पिंडासारखे गोळे करावे. हे गोळे खाल्यानें पुष्टि व बल प्राप्त होतें.

१३. कुइलीचें बी, उडीद, खजूर, शतावरी आणि द्राक्ष हे सर्व पदार्थ आठ आठ तोळे घेऊन, चौसष्ट तोळे पाणी व चौसष्ट तोळे दूध यांच्या मिश्रणांत घालावे, व खूप कढवावे. कढून एक प्रस्थ शिल्लक राहिल्यावर, गाळून घेऊन, त्यांत साखर, तळवणी व ताजें तूप हेही पदार्थ आठ आठ तोळेच घालावे, नंतर त्यांत मध घालून प्यावे, व वर साठी तांदुळाचा भात जेवावा; ह्मणजे मनुष्य जरेनें जर्जर असला तरी सुद्धां तो तरुणाप्रमाणें होतो व पुत्रसुख अनुभवतो.

१४. खजुरीचें डेंख, उडीद, शतावरी, खजूर, ज्येष्ठमध, द्राक्ष, विदारी कंद, कुईलीचें बीं, हीं सर्व चार चार तोळे घेऊन दोनशें छप्पन्न तोळे पाण्यांत उकळावीं. चौथा भाग पाणी राहिल्यावर त्यांत चौसष्ट तोळे दूध घालून पुनः उकळावीं. मग दूध मात्र शिल्लक राहिल्यावर, तें साखर घालून साठी तांदुळाच्या भाताशीं खावें. हा प्रयोग पुष्टि देण्यामध्यें उत्तम गणला आहे.

१५. पांढऱ्या तांदुळाच्या भातांत दूध, साखर व मध घालून खात गेल्यास पुरुषाचें शरीर पुष्ट होईल.

१६. उडदाचा पाला खाऊन पुष्ट झालेली. पहिलार, चारी आचळांनीं दूध देणारी, सम वर्णाच्या व जिवंत अशा वासरासहित, काळी, उंच शिंगांची, गरीब, उंच स्तनांची, प्रमाणाच्या अवयवांची, पाणी प्यालेली व जिचें दूध दाट आहे, अशी गाय असावी. तिचें दूध ऊन करून अथवा थंड करून, साखर व मध घालून, प्यावें हा प्रयोग फारच पुष्टिकारक आहे.

१७. वीर्याधिक संदीपन करणारे, शरीराला पुष्टि देणारे व अंगावरचें दूध वाढविणारे असे पदार्थ घालून, पृथक् पृथक् उकळलेलें दूध कणकेंत घालून, त्यांत आणखी तूप, मध व साखर हीं घालावीं. मग तो सर्व गोळा जो खाईल तो कधींही शक्तिहीन होणार नाहीं.

१८. वर वर्णिलेल्या गाईचें दूध सोन्याचे पत्रे घालून उकळावें, व त्यांत तूप, मध व साखर घालून प्यालें असतां, ज्यास मुलें होत नसतील तो पुरुषसुद्धां पुत्रसुख अनुभवील.

१९. तीस पिंपळ्या वांटून त्यांचें चूर्ण चार तोळे तेलांत व तुपांत तळून, त्यांत मध व साखर घालून, वर गाईला दोहावी. मग तें दूध जठराग्नीच्या बळाप्रमाणें प्यावें. तें पचल्यावर दूध-तूप घालून शिजविलेला साळीच्या तांदुळाचा भात जेवावा. जो असें करील तो नेहमीं सशक्तच असेल हें निश्चयानें समजावें.

२०. शतावरीचें तूप दसपट दुधांत उकळून, त्यांत मध, साखर व पिंपळी घालून तें प्यावें. हा पुष्टीचा उत्तम उपाय आहे.

२१. उडीद, कुईलीचें बीं, गहूं, साल, व राते तांदूळ यांच्या पिठांत साखर व विदारीकंदाचें चूर्ण घालून उंसाच्या रसांत त्याची पोळी करावी व तुपांत तळावी. अशा पोळ्या खाणारा व त्यांवर दूध पिणारा पुरुष बहुवीर्यवान होतो.

२२. साखर व गाईचें दूध एकेक तोळा, विदारीकंदाचें व पिंपळीचें चूर्ण चौसष्ट चौसष्ट तोळे आणि तिळवणी व नवी मध प्रत्येक एकशें अठ्ठावीस तोळे, याप्रमाणें सर्व औषधें एकत्र करून तुपाच्या रामलेल्या मडक्यांत घालून ठेवावीं. मग जठराग्नीचें बळाबळ पाहून त्यांतून नेमानें रोज सकाळीं खात जावीं. हा प्रयोग वीर्य वाढविणारा, शरीराला पुष्टि देणारा व कंठ सुधारणारा आहे.

२३. शतावरी, विदारीकंद, उडीद, कुईलीचें बीं आणि गोखरू यांचा वेगळा वेगळा काढा करून, त्यांत चौसष्ट तोळे तूप घालून उकळावें. तेंच तूप फिरून आठपट दुधांत उकळावें. नंतर तें तूप साखर व मध घालून खात जावें. या प्रयोगानें संतति प्राप्त होते.

२४. एक मांडेभर तूप घेऊन, त्याच्या शंभरपट विदारीकंदाच्या रसांत तें घालून, खूप उकळावें, नंतर पुनः शंभरपट गाईच्या दुधांत उकळावें. मग त्यांत साखर, तिळवणी, मध, उंसाचा रस, पिंपळी, व पिंपळमूळ हीं चौथा भाग टाकावीं, व उंबराच्या मोठ्याशा फळा एवढाल्या गोळ्या करून, त्यांतून एकेक रोज खात जावी. याच्या सेवनानें पुरुषाच्या शरीरांत बळ विशेष वाढतें.

रतिचर्या—सोळा वर्षांच्या आंत आणि सत्तर वर्षांनंतर कोणीही पुरुषानें स्त्रीसंग कधींही करूं नये. कारण त्या योगानें आयुष्याचा क्षय होतो. सोळावर्षांखालच्या मुलांच्या शरीरांत सर्व धातु पूर्णदशेस आलेले नसतात. यामुळें स्त्रीसंगानें त्यांचें रक्त, डबक्यांतील पाण्याप्रमाणें तापून तापून, सुकून जातें. कुजून शुष्क झालेलें लांकूड जसें हात लावतांच चुरा होऊन जातें, तसें अशा पुरुषाचें शरीर स्त्रीच्या स्पर्शानेंच चुरून जातें. म्हातारपण, चिंता, व्याधि, उरस्फोडीची मेहनत, उपवास व अतिशय स्त्री-सेवन यांच्या योगानें वीर्य नाश पावतें. उंसाच्या कांड्यांत रस, दह्यांत तूप, आणि तिळांत तेल, त्याप्रमाणें सर्व शरीरांत वीर्य व्यापून राहिलें आहे; तें स्त्रीपुरुषांच्या संयोगकाळीं, परस्परांच्या चेष्टांच्या व संकल्पांच्या दाबानें, ओल्या फडक्यांतून जसें जळ, तसें इंद्रियद्वारा स्रवतें. मैथुनाच्या पूर्वी सेवन करण्यास योग्य जी वस्तु ती मैथुनानंतर कधींही सेवन करूं नये. तसेंच शब्दादिक पांच विषय, धर्मास धक्का न लागे अशा प्रकारें, सेवन करावे. परंतु वाजीकरण प्रयोग योजून मस्त होऊन धर्मविरुद्ध वर्तन करावें, हें योग्य नाहीं.

याप्रमाणें देश, काळ, बळ व शक्ति यांस अनुसरून, वैद्यक शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें निष्पाप रतिचर्या केल्यास कोणाही पुरुषास रोगाची गांजणूक भोगावी लागणार नाहीं.

येषां सेवनया हया इव स्यात्संप्राप्तकामोच्छ्रयाः
संयास्यंति न संशयाद्व्रजमपुत्थाने क्षमा यौवनम् ।
तान्संभावयतः प्रयोगनिवहानस्याऽभिधानं मया
संख्यातं हयरत्नमित्यनुगुणं ग्रंथप्रतीकस्य हि ॥

# लक्ष्मीरत्न ८ वें.

## पाण्याच्या शुद्धीचीं साधनें.

**धान्याम्ल**---मडक्यांत पाणी भरून, साळी वगैरे जीं धान्यें तयार असतील तीं त्यांत घालून, तीं कांहीं दिवस आंबूं द्यावीं. नंतर त्या मडक्यांत, माका, गोरखमुंडी, पांढऱ्या फुलांचा कुंपा, पुनर्नवा, पांढऱ्या दूर्वा, नरवेल, खपाट, शतावरी, हरडे, बेहडा व आंवळकटी, काळ्या फुलांचा कुंपा, हंसराज व चित्रक यांपैकीं जेवढ्या मिळतील तेवढ्या औषधि मुळांसहित कुटून घालाव्या म्हणजे "धान्याम्ल" तयार झालें. पाण्याच्या स्वेदनसंस्करादि-कामध्यें सर्व स्थळीं याचा उपयोग करण्यांत येतो.

**डमरु यंत्र**-एका मडक्यावर दुसरें मडकें, तोंडाशीं तोंड लावून ठेवावें व सांधा घट्ट बंद करावा. मग खालच्या मडक्याखालीं चांगला जाळ लावावा. हें डमरुयंत्र.

**भूधरयंत्र**-प्रथम एक मोठा खाडा खणावा व त्याच्या मधल्या भागीं आणखी आंत लहानसा दुसरा खाडा खणावा. या मधल्या खाड्यांत रेती भरून त्यांत एक मडकें पुरावें व मोठ्या खाड्यांत प्रज्वलित निखारे भरावे. हें भूधरयंत्र.

**दोलायंत्र**-पाऱ्याला भूर्जपत्रांत दोऱ्यानें बांधून वर तिहेरी फडकें गुंडाळावें. मग ही पोटली एका लांकडाच्या दांडक्याच्या मध्याला दोरीनें लटकती बांधावी. कांजी भरलेल्या मडक्यांत मधोमध तें दांडकें उभें करावें. असें कीं ती पोटलीसुद्धां मडक्याला लागूं नये. नंतर रीतिप्रमाणें खालीं आंच द्यावी. हें "दोलायंत्र"; यालाच कित्येक जण "स्वेदनयंत्र" असेंही ह्मणतात.

वालुकायंत्र-एक वीत खोल भांड्यांत गळेगळ रेती भरावी व त्यांत मध्यभागीं शिशी ठेवावी. या भांड्याखालीं जाळ लावून, त्या शिशींतुळें औषध शिजवावें. हें "वालुकायंत्र."

## पाऱ्याच्या शोधनार्थ संस्कार.

स्वेदन-सुंठ, मिरीं, पिंपळी, सैंधव, मोहरी, हळद, हरडा, बेहडा, आंवळकटी, आलें, खपाट, गंगेटी, तांदुळजा, पुनर्नवा, मुरुड-शिंग, चित्रक, आणि नवसार, हीं औषधें समभाग घेऊन सर्वच एकत्र अथवा प्रत्येक निरनिराळें, "धान्याम्लांत" वांटून चटणी-सारखा कल्क करावा; नंतर एका फडक्यावर या कल्काचा एक बोट जाडीचा थर चढवावा. याप्रमाणें थर चढविलेल्या वस्त्रांत पारा बांधून, धान्याम्लानें भरलेल्या दोलायंत्रांत तीन दिवसपर्यंत शिजवावा ह्मणजे पारा स्वेदित होतो.

दुसऱ्या प्रकारचें मूर्छनासहित स्वेदन-मुळा, चित्रक, सैं-धव, सुंठ, मिरीं, पिंपळी, आलें आणि मोहरी यांपैकी प्रत्येक पदार्थ, पाऱ्याच्या सोळाव्या प्रमाणानें घेऊन, त्यांचा कल्क करावा. या कल्काचा थर फडक्यावर चढवावा व आंत पारा बांधून, कांजी भर-लेल्या दोलायंत्रांत एक दिवसपर्यंत उकळावा. अशा प्रकारें उकळ-ल्यानें पारा तीव्र होतो. उकळल्यावर विटेच्या भुकीबरोबर आणि चुन्याबरोबर पारा वांटून, मग दहीं, गूळ. सैंधव, मोहरी व वेरोसा यासह खलांत घालून खलावा. अथवा कोरफड, चित्रक, तांबडा शिरस, भुईरिंगणी, हरडा, बेहडा व आंवळकटी, यांचा काढा करू-न, त्यांत पारा तीन दिवसपर्यंत खलांत घालून खलावा, ह्मणजे तो मलरहित होतो.

मूर्छन-हरडा, बेहडा, आंवळकटी, सुंठ, मिरी, पिंपळी, वांझ कर्टुलीचा कांदा, उभी भुईरिंगणी, बैठी भुईरिंगणी, चित्रक, लोकर,

हळद, जवखार, कोर्फडाचा रस, रुईच्या पानांचा रस, व धोत्र्याच्या पानांचा रस, यांचा काढा करून, त्यांत सात वेळ पाऱ्याचें मर्दन करावें ह्मणजे पारा मूर्छित होतो. याप्रमाणें मूर्च्छित झालेला पारा सात आवरणांपासून मुक्त होतो.

**उर्ध्वपातन** ( उंच चढविणें )–कोरकंडाच्या रसांत मोरचुत व सुवर्णमाक्षिकासहित पारा अशा प्रकारें खलामध्यें घालून खलावा कीं पारा व वरील औषधें हीं एकरूप होतील. नंतर तो डमरुयंत्रांत घालून, खालच्या मडक्यांतून वरच्या मडक्यांत चढवावा.

**अधःपातन** ( खालीं उतरणें )–हिरडा, बेहडा, आंवळकटी, शेगवा, चित्रक, सैंधव व मोहरी हीं औषधें व कोर्फडाचा रस खलांत घालून व पाराही त्याबरोबरच घालून, अशा प्रकारें वांटावीं कीं पारा वेगळा पडणार नाहीं. नंतर तो पारा वरच्या मडक्यांत चिकटवून भूधर यंत्रांत घालून, वर निखारे ठेवावे व खालच्या मडक्यांत पडेल असें करावें.

याप्रमाणें स्वेदन, मूर्च्छन, ऊर्ध्वपातन आणि अधःपातन अशा चार संस्कारांनीं पारा उत्तम प्रकारें शुद्ध होतो.

**सर्व दोष जरी नाहीं तरी मुख्य दोष नाहींसा करण्याचा दुसरा प्रकार**—कोर्फड पाऱ्याचा सर्व दोष मोडतें. हरडा, बेहडा, व आंवळकटी हीं पाऱ्यांतील अग्नीची शक्ति क्षीण करतात व चित्रक पाऱ्यांतील विषाचा अंश नाहींसा करतो. यास्तव या सर्वांस एकत्र करून, खलांत पाऱ्याचें खूप मर्दन करावें. एकवेळ सुकल्यावर फिरून दुसऱ्यांदा,अशा प्रकारें सात वेळ खल करावा

**शोधनाचा स्वल्प आणि सर्व दोष नष्ट करणारा तिसरा प्रकार**-कोर्फड, चित्रक, तांबडा शिरीश, भुईरिंगणी, हरडा, बेहडा व आंवळकटी यांचा काढा करून, त्यांत पारा घालून, खलामध्यें तीन दिवस खूप खलावा, ह्मणजे तो सर्व मळांपासून मुक्त होतो. नंतर त्याच पाऱ्याचें, कोर्फडाच्या रसासहित व हळदीसहित, खलांत, मर्दन करावें. या उपायानें पारा नपुंसक होतो. नंतर नरवेल, चिंच, वांझ कर्टुली, माका व नागरमोथा यांच्या काढ्यांत, दोलायंत्रांत घालून तो पारा उकळावा ह्मणजे तो बळवान होतो. नंतर फिरून चित्रकाच्या काढ्यांत तसाच तो उकळावा ह्मणजे तो दीप्तियुक्त होतो. रसकापूर तयार करावयाचा असला तर या तिसऱ्या उपायानेंच पाऱ्याचें शोधन करावें.

**शुद्ध केलेल्या पाऱ्याला मारण्याचा प्रकार**—भुरकट बाफलेला चेरोसा, पारा, तुरटी, शुद्ध गंधक, नवसागर, हे पदार्थ समभाग घेऊन, एक प्रहर धान्याम्लासहित खलावे. मग कांचेच्या कुपीत चौफेर कापड गुंडाळून माती लिंपावी. कुपीच्या तोंडाला घट्ट बूच घालावा. मग एका मडक्याच्या बुंधाला भोंक पाडून, त्या मडक्यांत ती कुपी ठेवावी व गळ्यापर्यंत भोंवतीं रेती भरावी. नंतर हें मडकें चुलीवर ठेवून, प्रथम खालीं मंद जाळ लावावा, व मागाहून तो हळुहळू जास्त प्रज्वलित करीत जावा. असें केल्यानें पुरे बारा प्रहर गेल्यावर पारा मरतो व वापरण्याला योग्य होतो. नंतर कुपी थंड पडल्यावर, ती फोडून वरच्या कडेला जमलेला गंधक काढून टाकावा; व खालीं असलेला, मेलेला पारा काढून घ्यावा. पाऱ्याच्या या भस्माचा, योग्य प्रमाणानें, अनुपानासहित, उपयोग करावा.

**शुद्ध पारा मारण्याचा दुसरा प्रयोग**—अघाड्याचें बीं वांटून, त्याची आंवळ तोंडाची वाटी करावी; तींत काळ्या उंबराचा

चीक व पारा एकत्र करून घालावा. नंतर कुंपाचीं फुलें, वावडिंग व खेर यांचें चूर्ण पाऱ्याच्या वर व खालीं पसरून त्या वाटीचें तोंड आंवळून बंद करावें. मग ही वाटी मातीच्या मडक्यांत ठेवून, त्याचे भोंवती कापड लावून व माती लिंपून, त्याला अग्नीचें एक गजपुट द्यावें. एका पुटानेंच पाऱ्याचें भस्म बनतें. मग त्याचा उपयोग, योग्य प्रमाणानें, योग्य स्थलीं, व योग्य रीतीनें करावा.

**शुद्ध केलेला पारा मारण्याचा तिसरा प्रकार**—काळ्या उंबराच्या चिकांत पारा थोडासा खलावा. मग तो काळ्या उंबराच्याच चिकांत हिंग वांटून त्याच्या दोन वाट्या करून व त्यांत तो पारा घालून, वाट्यांचीं तोंडें बंद करून, त्या वाट्या मातीच्या दुसऱ्या मडक्यांत ठेवाव्या. मग त्यावर कापडमातीनें लिंपून अग्नीचें गजपुट द्यावें ह्मणजे पाऱ्याचें भस्म बनतें.

**शुद्ध केलेला पारा मारण्याचा चौथा प्रकार**—पारा नागवेलीच्या पानांच्या रसांत खलून वांझकरटुलीच्या कांद्याला भोंक पाडून त्यांत तो घालावा. मग हा कांदा मातीच्या बुडकुल्यांमध्यें ठेवून व कापडमातीनें लिंपून अग्नीचें गजपुट द्यावें. यानेंही पाऱ्याचें भस्म बनतें.

**रसकापूर करण्याचा प्रकार**--पहिल्यानें, वर सांगितल्या अल्प उपायाप्रमाणें पारा शुद्ध करावा. नंतर गेरू, चुना, वीट, खडु, तुरटी, सेंधेलोण, वारुळाची माती, पापडखार, व मडकीं रंगण्याची माती, हा प्रत्येक पदार्थ पाऱ्या इतक्या वजनाचा घेऊन, वांटावा, व त्यांची वस्त्रगाळ पूड करून, त्यांत पारा एक प्रहर सारखा खलावा. मग तें पाऱ्यासहित चूर्ण एका मडक्यांत घालून त्यावर दुसरें मडकें उलटें तोंड करून ठेवावें. व ही दोन मडक्यांच्या तोंडांची सां

कापडमातीनें बुजवून टाकावी. ती सुकल्यावर कापडमातीचा दुसरा थर द्यावा. तो सुकल्यावर तिसरा चढवावा. तो सुकल्यावर मग हीं मडकीं चुलीवर ठेवून शहाण्णव तासपर्यंत अखंड जाळ लावावा; विस्तवाचा ताप विझूं अथवा कमी होऊं देऊं नये, रात्रंदिवस त्याचें रक्षण करावें. नंतर सावधपणें त्या यंत्राला ( डमरुयंत्राला ) उघडून वरच्या मडक्यांत जमा झालेला कापुरासारखा पदार्थ काढून घ्यावा; हाच रसकापूर. तो लवंग, चंदन, कस्तूरी व केशर यांच्या बरोबर सेवन केला तर इतर उपद्रवांसहित उपदंश रोग ताबडतोब बरा करतो; अग्नि प्रदीप्त करतो, शरीराला पुष्टता देतो, आणि वीर्याची व बळाची फारच वृद्धि करतो.

**रससिंदूर बनवण्याचा प्रकार**—एक भाग शुद्ध केलेला पारा व अर्धा भाग शुद्ध गंधक, हे एक दिवस भर एकत्र खलून त्यांची कज्जली करावी. नंतर काचेच्या बाटलीभोंवती तीन वेळ कापडमातीचे थर देऊन ती सुकवावी. व तींत तयार करून ठेवलेली कज्जली घालून, ती बाटली वालुकायंत्रांत बसवावी. मग शहाण्णव तासपर्यंत तिला अखंड अग्नीची आंच द्यावी म्हणजे शेंदरासारखा पदार्थ बाटलीच्या वरच्या अंगाला जमतो. तोच रससिंदूर, तो काढून घ्यावा.

**मारलेल्या पाऱ्याचे गुण**—पारा कृमीचा व कोडाचा नाश करतो, जयाची प्राप्ति करवितो, डोळे चांगले करतो; तो मळशुद्धि करणारा आहे, आयुष्यवृद्धि करणारा आहे; शक्ति देणारा, संसर्गी पदार्थांचे गुण ग्रहण करणारा, ज्वर नाहींसा करणारा, व स्मृति, ओज आणि रूप हीं देणारा आहे. तो कामी पुरुषांस गुणावह असून, धातूची वृद्धि व नपुंसकपणाचा नाश करतो. रोगाचे जे जे उपाय आहेत त्याजबरोबरच पाऱ्याचाही उपयोग केला तर तो मनुष्याचे नर काय,—पण हत्तींचे व घोड्यांचेही रोग बरे करतो.

**हिंगूळ शुद्ध करण्याचा प्रकार**—मेंढीच्या दुधांत व आंबट पदार्थांच्या रसांत हिंगुळास सात वेळ मोठ्या प्रयत्नानें भावना दिल्यानें, तो शुद्ध होतो.

. **हिंगुळांतून पारा पाडण्याचा प्रकार**—लिंबाच्या किंवा लिंबणीच्या पानांच्या रसांत एक प्रहरपर्यंत हिंगूळ खूप खलून, वर पाऱ्याच्या बाबतींत सांगीतल्या युक्तीप्रमाणें हिंगुळांतील पारा वर चढवावा. हा वरच्या मडक्यांत चढून जमलेला पारा काढून घेऊन, वर सांगितल्या रीतीनें परभारेंच त्याचें भस्म करावें. हिंगुळांतून काढलेला पारा शुद्धच असतो, करतां संस्करांनीं शुद्ध करण्याची आणखी गरज नाहीं.

## रसप्रयोग.

**अग्निकुमार-रस**—पारा, गंधक व टांकणखार हीं तीन औषधें एकेक भाग, बचनाग, कवड्यांचें भस्म व शंखभस्म हीं तीन औषधें तीन तीन भाग, व मिरें आठ भाग, हीं सर्व औषधें घेऊन लिंबाच्या रसांत बारा तासपर्यंत खलून, त्यांची एकेक वालाची गोळी करावी. हा प्रयोग अग्निकुमाररस या नांवानें प्रख्यात आहे. याची एक गोळी अथवा दोन गोळ्या, योग्य प्रमाणांत घेतल्यास पोटांत उठणारेंवेंट एकदम बरे होतात.

**अमृतेश्वररस**—मारलेला पारा, गुळवेलीचें सत्व व मारलेला लोह हीं एकत्र करून मधतुपाबरोबर साहा गुंजा चाटावीं. हा अमृतेश्वर रस राजयक्ष्मा ( जबरदस्त क्षय ) सुद्धां शांत करतो.

**अल्प ज्वरांकुश**—तीन टांक सोमल, तीन टांक मोरचूत व तीन टांक कलखापरी. हीं औषधें घेऊन व धोतऱ्याच्या रसांत तीन दिवसपर्यंत खलून अर्ध्या हरभऱ्या एवढ्या गोळ्या कराव्या. त्यांपैकीं एक गोळी एकवीस मिऱ्यांबरोबर व सात तुळशीपत्रांबरोबर खावी, वर साखर व दूधभात यांचें पथ्य करावें. या गोळ्या तरुण ज्वराचा, विषम ज्वराचा, जीर्णज्वराचा व सर्वच प्रकारच्या ज्वरांचा हटकून नाश करतात.

**महाज्वरांकुश**-एक टांक शुद्ध पारा, एक टांक शुद्ध बचनाग, एक टांक शुद्ध गंधक, तीन टांक धोतऱ्याचें बीं, चार टांक मिरीं, चार टांक सुंठ व चार टांक पिंपळी, यांचें अत्यंत बारीक चूर्ण करून, त्यांतून दोन रतीभार चूर्ण अल्याच्या व लिंबाच्या रसांत सेवन करावें. हा महाज्वरांकुश रस सर्व प्रकारच्या ज्वरांचा नाश करतो.

**राजमृगांक रस**—तीन भाग मारलेला पारा, एक भाग सुवर्ण भस्म, एक भाग ताम्र, दोन भाग मनशीळ, दोन भाग गंधक व दोन भाग हरताळ यांचें चूर्ण करून तें कवड्यांमध्यें भरावें. मग बकरीच्या दुधांत खललेल्या टांकणखाराच्या पुडीनें कवड्यांचीं तोंडें बंद करून, त्या कवड्या एका मडक्यांत भराव्या. या मडक्याचें तोंडही कापडमातीनें लिंपून त्याला गजपुटाची आंच द्यावी. विस्तव विझाल्यावर मडकें थंड पडलें ह्मणजे त्यांतून रस काढून घ्यावा. हाच राजमृगांक रस जाणावा. एकोणीस मिरीं, दहा पिंपळ्या, मध व तूप यांच्या बरोबर ह्या रसाचें चार रतिभार प्रमाण रोज खात गेल्यास क्षयरोग हटकून नाश पावतो.

**ग्रहणीकपाटरस**–रुप्याचें भस्म, मौक्तिक भस्म, सुवर्णभस्म, लोहभस्म, हीं भस्में प्रत्येकीं एकेक भाग, गंधक दोन भाग व शुद्ध पारा तीन भाग, याप्रमाणें घेऊन हीं औषधें कवठाच्या फळाच्या रसांत खलावीं. व नंतर हरिणाच्या शिंगामध्यें खच दाबून दाबून भरावीं आणि कापडमातीचा थर देऊन तोंड बंद करावें. मग त्यास रानशेण्यांच्या विस्तवाची मध्यमसर आंच द्यावी. थंड झाल्यावर बाहेर काढून खलांत घालून बळदाण्याच्या रसाची सात वेळ भावना द्यावी. नंतर अघाडा, लोध्र, अतिविष, नागरमोथा, धामणीचीं फुलें, इंद्रजव व गुळवेल यांचे पृथक् पृथक् रस काढून, एकेकाची निरनिराळी तीन वेळ भावना द्यावी. ह्मणजे ग्रहणीकपाट नांवाचा रस सिद्ध झाला. याची एकेक माशाची गोळी करून, मध व मिरपूड यांच्या अनुपानांत रोज खात गेल्यास, सर्व प्रकारचा अतिसार व कोणत्याही दोषानें उत्पन्न झालेली संग्रहणी बरी होते. हा रस अग्नीला प्रदीप्त करतो व ग्रहणीला कवाड देणारा आहे.

**क्रव्यादरस**—आठ तोळे शुद्ध गंधक, चार तोळे शुद्ध पारा, दोन तोळे मारलेलें लोखंड व दोन तोळे मारलेलें तांबें, यांचें सर्वांचें चूर्ण करून व तें एकत्र करून, अग्नीच्या योगानें त्यांचा रस करावा. उत्तम प्रकारें पातळ झाल्यावर पांढऱ्या एरंडाच्या पानांवर तो ओतावा. नंतर पुनः त्यांची पूड करून व लोखंडाच्या भांड्यांत घालून त्यांत चारशें तोळे लिंबाचा रस वस्त्रगाळ करून घालावा. मग तें भांडें चुलीवर चढवून यत्नानें कोमळ अग्नीची आंच देऊन उकळावें. उकळतां उकळतां, घट्ट झाल्यावर, सुकवून, त्यांचें चूर्ण करावें. ह्या चूर्णाला पिंपळी, पिंपळमूळ, चवक, चित्रक, व सुंठ यांच्या काढ्याची व चूका नांवाच्या खाटीलुणीच्या रसाची पन्नास वेळां

भावना द्यावी व हळूहळू सुकवून व खलून, तें चूर्ण बाटलींत भरून ठेवावें. हा क्रव्याद रस जाणावा. भोजनानंतर यांतील बारा रतिभार रस द्राक्षा व वर सैंधव घालून दाट ताक प्यावें. फार जडान्न व अतिशय भोजन झालें असल्यास, तें याच्या सेवनानें लौकरच पचून जातें. शूळ, वायुगोळा, बद्धकोष्ठ, कौलुचा रोग व उदररोग या सर्वांचा हा निःसंशय नाश करतो.

शीतभंजीरस—हरताळ एक भाग, अर्धा भाग हिंगुळांतून काढलेला पारा, पाव भाग गंधक व अदाव मनःशीळ, हीं औषधें कारल्याच्या रसांत सात खलून, त्याचा कल्क करावा, व त्याचा लेप तांब्याच्या भांड्याला आंतून करून, मग हें भांडें दुसऱ्या एका रुंद तोंडाच्या भांड्यांत उपडें घालून सभोंवती रेती घालावी. मग तें चुलीवर ठेवून, एक दिवसपर्यंत, खालीं खूप जाळ करावा. थंड झाल्यावर त्याचें चूर्ण करावें. हाच शीतभंजीरस. हा नागवेलीच्या पानांत ठेवून मिऱ्यांबरोबर पांच रतीभार खात जावा, ह्मणजे आरंभींचा शीत किंवा आरंभींचा उष्ण असे सर्व प्रकारचे विषमज्वर नाश पावतात. याला पथ्य ह्मटलें ह्मणजे दूधभात जाणावें.

शीतभंजीरसाचा दुसरा प्रकार—हरताळ एक भाग व तेवढेंच शिंपल्याचें चूर्ण, या दोहोंचा नववा भाग मोरचूत, हीं घेऊन कोरफडाच्या रसांत त्यांचा खल करावा. मग सुकवून, रानशेणीच्या आंचीनें गजपुटामध्यें शिजवावें. थंड झाल्यावर त्याचें चूर्ण करावें ह्मणजे शीतभंजीरस तयार झाला. हा रस सकाळीं खडीसाखरे-बरोबर एक गुंजभर खात गेल्यास, शीतज्वराचा नाश होईल. याच्या सेवनानंतर कोणास ओकारी येते व कोणास येत नाहीं. तथापि तेणेंकरून भिण्याचें कारण नाहीं.

**आनंदभैरव रस**-शुद्ध हिंगूळ, शुद्ध केलेला बचनाग, मिरीं, टांकणखार आणि पिंपळी, हीं पांच औषधें समभाग घेऊन, त्यांचें बारीक चूर्ण करावें; ह्मणजे आनंदभैरव रस सिद्ध झाला. इंद्रजव व कडासाल हीं एक तोळाभर घेऊन, त्यांचें चूर्ण करून, हें चूर्ण, मध आणि बळाबळ पाहून, हा रस, एक गुंजेपासून दोन गुंजांपर्यंत, एकत्र करून घेत गेल्यास, तीन दोषांनीं युक्त अतिसार बरा होतो. यावर पथ्य ह्मटलें ह्मणजे दहींभात अथवा गाईचें तूप व भात अथवा ताकभात खावा. रात्रीं थोडीशी शुद्ध केलेली भांग द्यावी, हें हितकारक आहे. तहान लागली तर थंडगार पाणी प्यावें.

**चंद्रकला रस**-वेलची, कापूर, खडीसाखर, आंवळकटी, जायफळ, गोखरू, सांवरीची साल, पाऱ्याचें भस्म (रससिंदूर) कथिलाचें भस्म, व लोहभस्म, हीं औषधें समभाग घेऊन, त्यांस गुळवेल आणि सांवर यांच्या काढ्याची भावना देऊन, बारा बारा गुंजांची एकेक गोळी करावी. ती मधाबरोबर खात गेल्यास सगळ्या प्रकारचा प्रमेह नाश पावतो.

**श्वासकुठार रस**-एक टांक शुद्ध पारा, एक टांक शुद्ध बचनाग, एक टांक टांकणखार, एक टांक गंधक, एक टांक मनशील, आठ टांक मिरीं, आणि साहा टांक सुंठ, मिरीं व पिंपळी, यांस खलांत खलून बारीक चूर्ण करावें, ह्मणजे श्वासकुठार नामें रस सिद्ध झाला. याच्या सेवनानें श्वास आणि ज्वर हे बरे होतात.

**दुसरा श्वासकुठार रस**-एक तोळा पारा, एक तोळा गंधक, एक तोळा बचनाग, एक तोळा टांकणखार, एक तोळा मनशील आणि आठ तोळे मिरीं, यांचें बारीक चूर्ण करून त्यांत दोन तोळे सुंठीचें चूर्ण, दोन तोळे मिऱ्यांचें चूर्ण व दोन तोळे पिंपळीचें चूर्ण घालून एकत्र करावें, ह्मणजे श्वासकुठार रस सिद्ध झाला. हा रस

नागरवेलीच्या पानांत घालून दोन रती खात गेल्यास सर्व प्रकारचा श्वास बरा होतो.

रसपर्पटी—जासवंदीच्या पानांच्या रसानें, पांढऱ्या एरंडाच्या रसानें, माक्याच्या रसानें, आणि पिलुडीच्या रसानें पारा शुद्ध करावा. गंधकही तितकाच घेऊन शुद्ध करावा. नंतर माक्याच्या रसांत गंधक खलून, सात वेळां अथवा तीन वेळां सूर्याच्या उनांत तो सुकवावा व त्याची बारीक पूड करावी. या पुडींत पारा घालून अशा रीतीनें खलावा कीं तो अगदीं मिळून जाईल व पूड काजळासारखी होऊन जाईल. नंतर धुराशिवाय बोरीच्या लांकडाच्या निखाऱ्यावर यत्नानें ठेवून रस करावा. ह्मशीच्या शेण्यांवर केळीचीं पानें ठेवून त्यांवर तो ओतावा; त्यावर केळीचीं दुसरीं पानें घालून खूप चेपून ठेवावा. थंड झाल्यावर वरलीं पानें काढून टाकून, त्याचें चूर्ण करावें. यासच रसपर्पटी असें ह्मणतात. हीपैकीं एक रतीभर घेऊन, ती, भाजलेला अर्धी रतीभर हिंग व भाजलेलें जिरें यांच्याशीं खावी. त्याच प्रमाणें जो रोग असेल त्यास अनुसरून इतर अनुपानाशीं तिचें सेवन केल्यास चिंता नाहीं. ती खाल्ल्यावर तीन ओंजळीभर पाणी प्यावें. वैद्यानें दररोज एक रतिभार औषध वाढवीत जावें, तें दहा रतीभार. दहा रतीहून जास्त रसपर्पटी सेवन करूं नये. पुनः अकराव्या दिवसापासून रोज एकेक रतिभर कमी कमी करीत सेवन करावी. मिळून वीस दिवस औषध घ्यावें. यावर पथ्य ह्मटलें ह्मणजे दूध व मांसरस. यानें ज्वर, संग्रहणी, अतिसार, कामळा, पांडुरोग, शूळ, कोड, जलोदार व असलेच दुसरे रोग सुद्धां नाश पावतात; वीर्य वाढतें, शरीर धष्टपुष्ट होतें; व आयुष्याची वृद्धि होते.

त्रिपुरभैरवरस—एक भाग बचनाग, दोन भाग सुंठ, तीन भाग पिंपळी, चार भाग मिरीं, पांच भाग मारलेलें तांबें, आणि

साहा भाग हिंगूळ यांचें एकत्र चूर्ण केलें असतां, त्रिपुरभैरव रस सिद्ध होतो. याच्या सेवनानें ज्वराचा नाश होतो. हा घेण्याचें प्रमाण अर्धा रतीभर.

भस्मेश्वर रस—रान शेण्यांची राख तोळा निष्क ( चोवीस गुंजा म्हणजे एक निष्क ), एक निष्क मिरें, आणि एक निष्क बच-नाग, यांचें चूर्ण करून एकत्र करावें, म्हणजे तोच भस्मेश्वर रस जाणावा. हा रस आल्याच्या रसांत एक एक रतीभर खाल्ला तर सन्निपात ज्वराचाही नाश होतो.

रामबाण रस—एक भाग पारा, एक भाग बचनाग, एक भाग लवंग, एक भाग गंधक, दोन भाग मिरीं व अर्धा भाग जाय-फळ, हीं एकत्र करून चिंचेच्या फळांच्या रसांत खूप खलावीं, म्हणजे रामबाण रस सिद्ध झाला. याच्या सेवनानें अग्निमांद्य, संग्र-हणी, व आमवायु हीं बरीं होतात. मिऱ्यांच्या अनुपानाशीं हा रस खाण्यांत आला तर तत्काळ जठराग्नि प्रदीप्त होतो, रुचि उत्पन्न होते, आणि कफ, श्वास, खोकला, ओकारी व कृमि यांचा नाश होतो.

शंखवटी—चार तोळे चिंचेचा रस व चार तोळे पंचलवण, हीं लहान लिंबांच्या रसांत खलावीं. नंतर त्यांत शंखाचे तुकडे तापवून तापवून सात वेळ टाकावे. असें केलें म्हणजे ते तुकडे त्या रसांत विर घळून जातील. मग त्यांत चार तोळे त्रिफळा ( हिरडे, बेहडा व आंव ळकटी ), दोन दोन तोळे वेखंड व हिंग, चार तोळ्याच्या बाराव्य भागा एवढा बचनाग, बचनागा इतका पारा, व तेवढाच गंधक, एव पदार्थ घालून बोराच्या बियां एवढ्या गोळ्या कराव्या याच्या से नानें सर्व प्रकारच्या अजीर्णाची शांति होते. ही शंखवटी सर्व प्रव

रच्या उदराचे विकार, शूळ, कावरा, मंदाग्नि व वायुगोळा वगैरे रोगांवर हितकारक आहे.

बृहच्छंखवटी— ४ तोळे घोगाचा क्षार, ४ तोळे चिंचेचा क्षार, ४ तोळे रुईचा क्षार, ४ तोळे अघाड्याचा क्षार, ४ तोळे केळीचा क्षार, ४ तोळे तिळांचा क्षार, ४ तोळे पळसाचा क्षार, २० तोळे पंचलवणं व सार्जीखार, जवखार व टांकणखार हे तिनही मिळून चार तोळे; याप्रमाणें ४२ तोळे सर्व मिळून औषधें घेऊन त्यांचें चूर्ण ६४ तोळे लिंबाच्या रसांत घालावें. नंतर त्यांत चार तोळे शंखाचे तुकडे विस्तवांत तापवून सात वेळ बुडवावे म्हणजे ते त्यांत विरघळून जातील. मग १२ तोळे सुंठ, ८ तोळे मिरीं, ४ तोळे पिंपळी, २ तोळे भाजलेला हिंग, २ तोळे पिंपळमूळ, २ तोळे चित्रक, २ तोळे ओवा, २ तोळे जिरें, २ तोळे जायफळ, २ तोळे लवंग, १ तोळा पारा, १ तोळा गंधक, १ तोळा वचनाग, १ तोळा टंकण, १ तोळा मनशीळ, हीं सर्व द्रव्यें घेऊन चूर्ण करावें. तें वरील रसांत घालावें. त्यांत आणखी १६ तोळे चुनयाचा रस टाकून, त्याच्या उडीदा एवढ्या गोळ्या कराव्या. ह्या बृहच्छंखवटीच्या गोळ्या, सर्व प्रकारचें अजीर्ण, सगळे शूळ व कावरा वगैरे रोगांचा तत्काळ नाश करतात.

**नाराच रस**—शुद्ध गंधक, शुद्ध पारा, जेपाळ, हिरडा, बेहडा, आंवळकटी, सुंठ, मिरीं, पिंपळी हीं सर्व समभाग घेऊन खूब खलावीं. हाच नाराच रस होय. हा रस मधाशीं २४ गुंजा खात जावा. याच्या सेवनानें गुल्म व उदराचे रोग बरे होतात.

**महानाराच रस—हरडे, बेहाड्याचा मगज, आंवळकटी, जेपाळ, कडुकी, थोर, निशोत्तर, व नागरमोथा, हीं औषधें प्रत्येक चार**

चार तोळे घ्यावीं, व बारीक कुटून, ५०० तोळे पाण्यांत उकळावीं. अष्टमांश शेष राहिल्यावर त्यांत सालीशिवाय चार तोळे नव्या जेपाळाच्या बिया फडक्याच्या पुरचुंडींत बांधून मंदाग्नीवर शिजूं द्याव्या. काढा घट्ट होत आल्यावर तो खलांत ओतावा व त्यांत जेपाळाच्या बिया ८ भाग, सुंठ तीन भाग, मिरीं दोन भाग, पारा दोन भाग व गंधक दोन भाग, याप्रमाणें घालून एक प्रहर खूप खलावीं. ह्मणजे महानाराच रस सिद्ध झाला. हा थंड पाण्याच्या घोटाबरोबर नित्य खाण्यांत येईल तर पोट फुगणें, शूळ, उदावर्त, गोळा, व उदराचे दुसरे कित्येक विकार बरे होतात. रोगाचा वेग शांत पडल्यावर रोग्यास दहींसाखर खावयास द्यावी व सैंधवासहित दहीं-भातही थोडासा खाण्यास द्यावा. हा रस शौचास होण्यासाठीं सुद्धां उपयोगी आहे.

**सुवर्ण वसंत मालती**—एक भाग सुवर्ण, दोन भाग मोतीं, तीन भाग मिरीं, व आठ भाग कलखापरी, यांची बारिक पूड करून, खलांत घालून, लोण्यांत खूप खलावी. मग ती लिंबाच्या रसांत खलावी, इतक्या जोरानें कीं, लोण्याचा लय होऊन तें बिलकूल दिसणार नाहीं. हाच सुवर्ण वसंत मालती रस. हा मध व पिंपळीशीं दोन रतीं रोज घेत गेल्यास सर्व प्रकारचे रोग बरे होतात.

**लघुवसंत मालती**—दोन भाग कलखापरी, व एक भाग मिरीं, यांचें चूर्ण ताज्या लोण्याशीं मर्दन करावें, नंतर लिंबाच्या रसांत मर्दन करावें—इतकें कीं लोणी विरून जाईल. असें झालें ह्मणजे लघुवसंत मालती रस सिद्ध झाला. हा रस दोन वाल मधपिंपळी-बरोबर खात गेल्यास ज्वर बरा होतो. तसेंच जीर्णज्वर, धातुगतज्वर, अतिसार, रक्तातिसार, रक्तविकार, फार पीडाकारक पित्तविकार,

प्रदर, अर्श रोगांतील रक्तस्राव, विषमज्वर, नेत्ररोग, व मुलांचे सर्व प्रकारचे रोग, हे सर्व याच्या सेवनानें बरे होतात.

**लघु वसंत मालती रसाचा दुसरा प्रकार**—कलखापरी एकवीस दिवसपर्यंत मनुष्याच्या मुतांत भिजत घालावी. नंतर तिची पूड करून, तींत अर्धा भाग सालाशिवाय मिऱ्याचें चूर्ण घालून, त्यांना ताज्या लोण्याबरोबर खल करावा. नंतर त्याला लिंबाच्या रसाच्या शंभर भावना द्याव्या. ह्मणजे लघुवसंत मालती अथवा रसकेश्वर नांवाचा रस सिद्ध झाला. पिंपळी, मध, व खडीसाखर याबरोबर हा रस खात गेल्यास धातुगत ज्वर, पित्त, भ्रम, रक्तपित्त, रक्तातिसार, ग्रहणी आणि अर्शाचें रुधिर या विकारांचा नाश होतो. यावर अदमुरें दहीं व दूध याचें पथ्य करावें.

**वसंतमालती रसाचा तिसरा प्रकार**--कलखापरीची पूड करून घोड्याच्या मुतांत एकवीस दिवस भिजवून ठेवावी व मग उन्हांत सुकवावी. नंतर आठ तोळे ही पूड, चार तोळे सालाशिवाय मिरीं व आठ तोळे हिंगूळ हीं गाईच्या लोण्यांत व मागून शंभर लिंबांच्या रसांत खूप खलावीं. एवढें केलें ह्मणजे वसंतमालतीरस सिद्ध झाला. मध पिंपळीबरोबर हा रस जर दोन वाल घेत गेलें तर ग्रहणी, अतिसार, ज्वर, क्षय, मूळव्याध, ताप, शूळ, अग्निमांद्य, वायुसंबंधी विकार, प्रदर, विषमज्वर, व डोळ्यांचे रोग यांचा नाश होतो.

**कृमिकुठार**—आठ भाग कापूर, एक भाग कडासाल, १ भाग त्रायमाण, १ भाग ओंवा, १ भाग वावडिंग, १ भाग हिंगूळ, १ भाग बचनाग, १ भाग नागकेशर, व १ भाग पळसाचें बीं, यांचें

बारीक चूर्ण करून त्यास माक्याच्या रसाची, उंदीरकानीच्या रसाची व ब्राह्मीच्या रसाची भावना द्यावी, ह्मणजे कृमिकुठार रस सिद्ध झाला. याची एकेक वालाची गोळी करावी. ही गोळी धोत-याच्या पानांबरोबर खात गेल्यास कृमींचा तत्काळ नाश होतो.

**त्रैलोक्य चिंतामणि रस**—पाऱ्याचें भस्म, विक्रांत (तरमरी) भस्म, रौप्य भस्म, ताम्रभस्म, लोहभस्म, मौक्तिक भस्म, सुवर्णभस्म, व गंधक, हीं सर्व समभाग घेऊन, एकत्र करून, त्यास अल्याच्या रसाच्या, माक्याच्या रसाच्या व चित्रकाच्या रसाच्या तीन तीन भावना द्याव्या. नंतर गाईच्या दुधाच्या आणखी तीन भावना द्याव्या, ह्मणजे त्रैलोक्य चिंतामणि रस सिद्ध झाला. हा रस मध व पिंपळी यांच्या बरोबर जर एक रतिभर चाटविला, तर क्षय, खोकला, अर्श, अरुचि, जीर्णज्वर, पांडुरोग व प्रमेह यांचा नाश होतो.

**त्रैलोक्य चिंतामणीचा दुसरा प्रकार**—पाऱ्याचें भस्म, सुवर्ण भस्म, अभ्रक भस्म, रौप्यभस्म, माणिक्यभस्म, हिऱ्याचें भस्म, मनःशीळ, सोनामुखीचें भस्म, गंधक, प्रवाळभस्म, लोहभस्म, मौक्तिक भस्म, शंखभस्म, व हरताळाचें भस्म हीं सर्व एकत्र करून, त्यास चित्रकाच्या काढ्याच्या सात भावना द्याव्या. नंतर निगडीच्या रसाच्या, सुरणाच्या रसाच्या, थोराच्या चिकाच्या, व रुईच्या चिकाच्या तीन तीन भावना द्याव्या. नंतर तें चूर्ण बुडकुल्यांत भरून [illegible] चिकानें व टंकणखारानें त्यांचीं तोंडें बंद करून [illegible] व कापडमातीनें बरोबर लिपून अग्नीचें गजपूट द्यावें. थंड झाल्यावर काढून घेऊन त्याचें चूर्ण करावें. मग त्यांत तेवढेंच पाऱ्याचें भस्म व त्याचा चौथा भाग विक्रांत (तरमरी)

भस्म घालून, सातपट शेगट्याचें मूळ, दालचिनी, चित्रक, टांकणखार, व मिरीं हीं प्रत्येकीं पांचवा भाग, तसाच हरडे, जायफळ, लवंग, पिंपळी, सुंठ व बचनाग हीं प्रत्येक चौथा भाग, हीं सगळीं औषधें एकत्र करून बिजोऱ्याच्या रसांत खलावीं. ह्मणजे त्रैलोक्य चिंतामणि नामें रस सिद्ध झाला. रोगाला योग्य अशा अनुपानांत जर हा रस दीड वाल सकाळीं घेत गेलें, तर वातव्याधि, आमवात, ज्वर, उदररोग, कृमि, श्वास, शूळ, वातरक्त, रक्तपित्त, क्षीणता, खोकला, क्षय, कफसंबंधी रोग, उरःक्षत, अजीर्ण, प्रमेह, कोड, अतिसार, पंडुरोग, ग्रहणी, तमक, व्रण, अर्श, पंगुवात, ऊरुस्तंभ, कर्णरोग व योनिरोग यांचा नाश होतो. हा रस सगळे रोग बरे करतो.

**स्वयमग्निरस**—एक भाग शुद्धपारा व दोन भाग शुद्ध गंधक यांची खलांत कज्जली करून व त्यांत तितकेंच गजवेलीचें चूर्ण घालून, कोरफडाच्या रसांत त्याचें चांगलें मर्दन करावें. नंतर त्याचा गोळा करावा व तांब्याच्या भांड्यांत घालून वर एरंडाचीं पानें ठेवावीं. मग तें भांडें उन्हांत चार घटका ठेवून ऊन होऊं द्यावें. नंतर तें धान्याच्या राशींत दोन दिवस गाडून ठेवावें व तिसरे दिवशीं काढून त्यांतील चूर्ण वस्त्रगाळ करावें. ह्मणजे तें पाण्यावर तरूं लागतें. मग सुंठ, मिरीं, पिंपळी, हरडे, बेहेडे, आंवळकटी, जायफळ व लवंग यांचें चूर्ण वरील चूर्णाइतकें घेऊन दोनही एकत्र करावीं. ह्मणजे स्वयमग्निरस सिद्ध झाला. यापैकीं अठेचाळीस गुंजा घेऊन मधांत कालवून खात जावा ह्मणजे क्षय व खोकला बरा होतो. अथवा क्षयानें व खोकल्यानें

पीडलेल्या मनुष्यानें कवंडळीचें मूळ, भांग, पिंपळी व तीळ यांच्या बरोबर चोवीस गुंजा खात जावें.

**वंगेश्वररस**—कथील व पारा हीं कोरफडाच्या रसांत खूप खलावीं. नंतर त्याच्या गोळ्या करून काचेच्या पात्रांत शिजवाव्या. ह्मणजे चंद्रप्रकाशाप्रमाणें पांढरा रस तयार होतो. तोच वंगेश्वररस. हा रस पांडुरोग, प्रमेह, निःशक्तता व कमळ रोग यांवर योजावा.

**पंचामृतपरपटी रस**—एक भाग लोह भस्म, एक भाग पाऱ्याचें भस्म, एक भाग अभ्रक भस्म, एक भाग ताम्र भस्म, आणि दोन भाग गंधक, हीं सर्व एकत्र करून लोखंडाच्या भांड्यांत बोरीच्या लांकडाच्या मंद विस्तवावर शिजवावीं, ह्मणजे त्यांचा द्रव होईल. मग हा द्रव केळीचे पानावर ओतावा व घट्ट झाला ह्मणजे खोदून त्याच्या वड्या पाडाव्या. हाच पंचामृत परपटी रस. हा अग्नीला प्रदीप्त करितो, आणि ज्वर, अतिसार, खोकला, कमळा आणि पांडुरोग यांस दूर करितो. बद्धकोष्टता असेल तर त्यावर व जीर्ण ज्वरावर ही परपटी बकरीच्या मुतांत खावी. या रसावर मांस पथ्यकर आहे आणि तेलकट व आंबट पदार्थ अपथ्यकर आहेत यावरून इतर कोणते पदार्थ पथ्यापथ्यकर आहेत तें जाणावें.

**रत्नगिरिरस**—पाऱ्याचें भस्म, अभ्रक भस्म, ताम्रभस्म, सुवर्णभस्म आणि गंधक हीं समभाग घेऊन, त्यांत अर्धा भाग लोहभस्म व पाव भाग तरमरी भस्म हीं सगळीं एकत्र करून, त्यांस माक्याच्या रसाची भावना देऊन, वर सांगितलेल्या परपटीप्रमाणें त्यांचा पाक करावा. मग तो थंड झाल्यावर त्याला शेवग्याच्या रसाची, अडुळशाच्या रसाची, निगडीच्या रसाची, गुळवेलीच्या रसाची, चित्रकाच्या

रसाची, माक्याच्या रसाची, भुई रिंगणीच्या रसाची, गोरखमुंडी-च्या रसाची, अगस्त्याच्या रसाची, ब्रंह्मीच्या रसाची, किराइताच्या रसाची, आणि कोरफडाच्या रसाची, अशा वेगवेगळ्या तीन तीन भावना द्याव्या. नंतर अग्नीचें हलकें पूट दिल्यावर, उतरून थंड होऊं द्यावा, ह्मणजे रत्नगिरि रस सिद्ध झाला. तो पिंपळी व धणे यांचे चूर्णाबरोबर साहा रती भार योजिला असतां, नवीनच ताप आलेल्या रोग्याचा ताप दोन घटकांच्या आंत उतरतो. यावर मुगाचें अन्न, मुगांचें पाणी, ताकभात व ज्वरावर उपयोगी पडणाऱ्या भाज्या वगैरे पथ्य पाळावें.

एकांगवीर रस—शुद्ध गंधक, पारद भस्म, कांतलोह भस्म, वंगभस्म, शिशाचें भस्म, ताम्रभस्म, अभ्रकभस्म, गजवेलीचें भस्म, सुंठ, मिरीं आणि पिंपळी या सर्वांचें चूर्ण करून, त्याला त्रिफ-ळाच्या काढ्याची, त्रिकटूच्या काढ्याची, निगडीच्या रसाची, चित्रकाच्या रसाची, माक्याच्या रसाची, शेगळ्याच्या रसाची, कवठाच्या काढ्याची, आंवळ्याच्या रसाची, कुचल्याच्या काढ्याची, रुईच्या रसाची, आल्याच्या रसाची, याप्रमाणें वेगवेगळ्या तीन तीन भावना द्याव्या, ह्मणजे एकांगवीर रस सिद्ध झाला. हा रस पक्षघात, अर्दित, धनुर्वात, अर्धांग, गृध्रसी, अपबाहुक आणि वायुसंबंधी सर्व रोग यांचा नाश करतो.

सुवर्णभूपति रस,—शुद्ध पारा १ भाग, शुद्ध गंधक १ भाग, ताम्र भस्म २ भाग, अभ्रक भस्म १ भाग, गजवेल भस्म १ भाग, कांतलोह भस्म १ भाग, सुवर्ण भस्म १ भाग, रौप्य भस्म १ भाग आणि बचनाग १ भाग याप्रमाणें घेऊन, एकत्र करून, एक दिवसपर्यंत तांबड्या लाजाळूच्या रसांत खलून, गोळ्या

बांधाव्या. मग त्या गोळ्या कांचेच्या बाटलींत भरून कापड-मातीनें लिंपून, सुकवून, मग वालुकायंत्रांत त्या बाटलीला हळुहळु मंदाग्नीवर आंच द्यावी, ह्मणजे सुवर्णभूपति रस सिद्ध झाला. हा रस चार रती, पिंपळीचें चूर्ण आल्याच्या रसांत घालून, त्याबरोबर योजावा. तिन्ही दोषांमुळें झालेला क्षय, तेरा प्रकारचे सन्निपात, आमवात, धनुर्वात, उरःस्तंभ, पंगुवात, कफवात, अग्निमांद्य, कटि-ग्रह, सर्व प्रकारचे शूळ, उदावर्त, भयंकर संग्रहणी, प्रमेह, उदररोग, सर्व प्रकारचे मूतखडे, मूत्रकृच्छ्र, कोष्टबद्धत्व, भगंदर, सर्व प्रकारचीं कोडें, विद्रधि, श्वास, खोकला, अजीर्ण, आठ प्रकारचे ज्वर, कमळा, पंडुरोग आणि मस्तकरोग यांचें निवारण या रसाच्या सेवनानें होतें. ज्या रोगावर जें अनुपान पाहिजे तें अनुपान योजिलें असतां हा रस सर्व रोगांचा नाश करतो.

**लोकनाथ रस—शुद्ध करून** ज्याचें मुख* केलें आहे असा पारा दोन भाग व शुद्ध गंधक दोन भाग घेऊन कज्जली करावी. मग ती कज्जली पाऱ्याच्या चौपट वजनाच्या कवड्या घेऊन त्या-मध्यें भरावी. मग एक भाग टांकणखार घेऊन गाईच्या दुधांत वांटून त्यानें कवड्यांचीं तोंडें बंद करावीं. नंतर आठ भाग वजनाचे शंखाचे तुकडे घेऊन, मातीच्या दोन मोठ्या पंत्यांस आंतून चुना लावून एकींत अर्धे व दुसरींत अर्धे असे ते शंखाचे तुकडे चिकटवून बसवावे. मग एका पंतींत त्या कवड्या भराव्या आणि वर दुसरी पंती झांकण ठेवावी. त्यावर कापडमातीचा लेप

---

* लोण, शेगट्याचा रस, मोरचूत, मोहरी व मिरीं यांच्या काढ्यांत तीन रात्रीं बुडवून ठेवून, ज्याला स्वेदनाचा संस्कार केला आहे, असा पारा बुभुक्षित होतो ह्मणजे सुवर्णादि कोणत्याही धातूला तो खाऊन टाकतो. असें झालें म्हणजे त्याचें मुख केलें अशी परिभाषा आहे.

करावा आणि एक हात खोल खाड्यांत गजपुट अग्नीचा ताप द्यावा. थंड झाल्यावर काढून घेऊन, शंखाचे तुकडे व कवड्या एकत्रे वांटून भस्म करून ठेवावें. हाच लोकनाथ रस. हा रस साहा साहा गुंजा योजावा. वायुरोगावर तुपांत, पित्तरोगावर लोण्यांत आणि कफ रोगावर मधांत द्यावा. यानें अतिसार, क्षय, अरुचि, संग्रहणी, कृशता, अग्निमांद्य, खोकला, श्वास आणि गुल्म हे विकार दूर होतात. हा रस घेतल्यावर तूप घातल्या अन्नाचे तीन घास खावे. मधुर पदार्थ व मांस वगैरे यावर पथ्य करावें. आंबट, तेलकट, कारलीं, वांगीं, मासळी, मेहनत, मद्य, मैथुन, लोणचें, हिंग, सुंठ, उडीद, मोहरी आणि कोहळा हीं खाऊं नयेत. हा रस खाल्ल्यानें शरीरांत दाह उत्पन्न झाला, तर खडीसाखर, व वंशलोचन घालून गुळवेलीचें सत्व द्यावें ह्मणजे उष्णता शांत होईल.

**चंद्रोदय रस**—सोन्याचा वर्ख चार तोळे, पारा बत्तीस तोळे, गंधक ६४ तोळे, हीं एकत्र करून हिरवणीचीं फुलें व कोरफडाचा रस यांसहित खल करावा. मग त्यांच्या गोळ्या बनवून त्या कांचेच्या भक्कम शिशींत भराव्या व तिला कापडमाती लिपावी. मग ती शिशी तीन दिवस वालुकायंत्रांत वाढत्या अग्नीवर ठेवून गोळ्या शिजवाव्या. थंड झाल्यावर शिशींतून या रसाचें चूर्ण काढून घ्यावें. नंतर चार तोळे चूर्णांत सोळा तोळे वंशलोचन, जायफळ, समुद्रशोष, व लवंगा यांचीं चूर्णे व चोवीस गुंजा कस्तूरी घालावी, ह्मणजे चंद्रोदय नामें रस सिद्ध झाला. हा रस नागवेलीच्या पानांच्या विड्यांत साहा रती घालून खात गेलें असतां, कामेच्छा फार प्रबळ होते. यावर तूप, आटीव दूध, कोमळ मांस, उडदाचे पदार्थ व दुसरे आनंद देणारे पदार्थ याचें

सेवन करावें. हा रस सेवन केल्यानें आंगावरील सुरकुत्या जातात व पांढरे केस काळे होतात. तरुणपण स्थिर राहतें, सर्व रोग मोडतात, कामेच्छा वाढते, संभोगाच्या पूर्वी व नंतर हा रस खावा. सोन्याचे वर्ख, पारा आणि गंधक यांस डेखाशिवाय तांबड्या हिरवणीचीं फुलें घेऊन त्यांच्या रसांत खललें असतांही चालतें अथवा केवळ कोरफडाच्या रसांत खललें असतांही चालतें, असें वैद्यांचें मत आहे. याच रसाचें मकरध्वज असें दुसरेंही नांव प्रसिद्ध आहे.

निर्दारिद्र्यगदं रसे जगदिदं सिद्धे करिष्याम्यह-
मित्थं श्रीरसवाग्भटप्रणयिनो दृष्ट्वा प्रतिज्ञावचः ।
लक्ष्मीहेतुरसप्रयोगविलसत्सर्वांगसंशोभिनो
लक्ष्मीरत्नमितीदृशं प्रकरणस्यैतस्य नामार्पितम् ॥



# धेनु रत्न ९ वें.



दूध हें जनावरांनीं खाल्लेल्या वनस्पतींचें सार आहे. प्रत्येक प्राण्यास कोणत्याहि प्रकारचें दूध सात्म्य आहे ह्मणजे तें प्रत्येकाला मानवतें असें जाणावें. स्वादिष्ट, शीतवीर्य, कोमळ, स्निग्ध, वीर्यकर असे त्याचे गुण आहेत. जीवनीय औषधांमध्यें दूध हें मुख्य रसायन आहे. बकरीचें दूध बहुतकरून गायीच्या दुधासारखेंच असतें. परंतु बकरीचें शरीर लहान असल्यामुळें, अनेक कडू व तिखट पदार्थ भक्षण केल्यामुळें, फार पाणी न प्याल्यामुळें, बकरीचें दूध गाईच्या दुधापेक्षां रोग हटविण्याचे कामीं अधिक उपयोगाचें आहे. बकरीच्या दुधाचे गुण, मधुर, शितवीर्य, नाडीग्रहण करणारें, व हलकें असून, रक्तपित्त, अतिसार, क्षय, कास आणि ज्वर यांचें हरण करतें. ह्मशीचें दूध गाईच्या दुधापेक्षां गुरु, अति शीतवीर्य, अतिस्निग्ध व निद्रा आणणारें असें आहे. जठराग्नि प्रदीप्त असणाऱ्या पुरुषानें सेवन करण्याला तें योग्य आहे. सांडणीचें दूध रूक्ष, उष्णवीर्य, किंचित खारट, हलकें असून वात, कफ, पोट फुगणें, कृमी आणि अर्श या विकारांवर हितकारक आहे. एकच खुरी असणाऱ्या (घोडी, गाढवी वगैरे) जनावरांचें दूध बळ देणारें, उष्णवीर्य, खारट, आंबट, रुक्ष, हलकें व हातापायांस झालेल्या रोगांचा नाश करणारें असें आहे. मेंढीचें दूध उचकी व श्वास उत्पन्न करणारें, उष्ण वीर्य, पित्त व कफ वाढविणारें, शरीर भक्कम करणारें व अत्यंत गुरु असें आहे. गाईचें दूध जीवनीय, रसायन, क्षतरोगानें क्षीण झालेल्यास हितकर, बुद्धिवर्धक, बळ देणारें, स्त्रियांच्या

स्तनांत दूध उत्पन्न करणारें, मलशुद्धि करणारें असें असून, श्रम, भ्रम, मद, कांतिहीनता, श्वास, कास, अत्यंत तृषा, भूक, अजीर्ण, मूत्रकृच्छ्र आणि रक्तपित्त यांचा नाश करतें. वर सांगितलेल्या जनावरांचें प्रातःकाळीं काढलेलें दूध गुरु, नाडी ग्रहण करणारें, शीतल गुणाचें असें असतें; कारण कीं हे प्राणी रात्रीस मेहनत करीत नाहींत. संध्याकाळीं काढलेल्या दुधाच्या सेवनानें वायु खालीं उतरतो, थकवा जातो आणि तें डोळ्यांस हितकर असतें. कारण कीं दिवसास या जनावरांचें शरीर सूर्याच्या किरणानें तापतें, तशीच त्यांस वारंवार मेहनत पडते, ह्मणून दुधांत वरील गुण उत्पन्न होतात.

कच्चें दूध नाडीचें ग्रहण करणारें व गुणानें गुरु असें असतें. तथापि कांहीं युक्तीनें दूध तापविलें असतां तें लघु होऊन कफाला कोपवित नाहीं. ही युक्ति अशी कीं दुधांत बरोबरीनें पाणी घालून तें इतकें उकळावें कीं त्यांतील पाणी जळून जाईल. मग जें दूध अवशिष्ट राहील, तें दूध युक्तीनें तापवलेलें समजावें. फार तापवलेलें दूध फार गुरु असतें, आणि धारोष्ण दूध अमृतासारखें जाणावें. ह्मणजे तें वात, कफ व पित्त हे तिन्ही दोष शमवितें व जीवित वाढवितें. इतर सर्व प्रकारचीं दुधें ऊन केल्यानें उत्तम गणलीं आहेत. स्त्रीचें दूध कच्चेंच उत्तम. तें वातरक्त, रक्तपित्त व नेत्ररोग यांस बरें करतें.

ज्या दुधाला वाईट वास येतो, ज्याचा रंग पालटला आहे, जें खारट झालें आहे, ज्यांतला रस बिघडला आहे, जें फुटलें आहे आणि ज्यांत मीठ पडलें आहे त्याचें सेवन करूं नये.

दहीं हें मधुर, आंबट आणि अतिशय आंबट असें तीन प्रकारचें व कषाय रसाचें आहे. जीवनीय, पुष्टीकारक, सात्म्य,

स्निग्ध, बळ वाढविणारें, पाकावस्थेंत आंबट व उष्णवीर्य असून, वातरोगाचें हरण करतें; आणि तें मंगलरूपहि आहे. त्यांत आंबट दहीं उष्णवीर्य असून वातरोगाचें हरण करतें. आणि तेंहि मंगलरूप आहे. त्यांत मधुर दहीं स्नायूला भक्कम करणारें आणि कफाला व मेदाला वाढविणारें समजावें. आंबट दहीं कफ व पित्त उत्पन्न करणारें; व अतिशय आंबट दहीं तर रक्त बिघडविणारें आहे. दह्यांची योजना पिनस रोगावर, अतिसार, हिंवताप, मुत्रकृच्छ्र आणि शरीराची कृशता या विकारांवर केली असतां हितकारक आहे. फार करून दहीं, शरद, ग्रीष्म आणि वसंत या ऋतूंत आणि रक्तपित्त व कफ याच्या योगानें उत्पन्न झालेल्या विकारांवर खाऊं नये. हें दहीं, चांगलें विरजलें नसेल तर त्याच्या सेवनानें तीनही दोष उत्पन्न होतात. गाईचें दहीं वाताचें हरण करतें व रुचि उत्पन्न करतें. बकरीचें दहीं कफपित्ताला हरतें, शिवाय तें हलकें असून, वातानें उत्पन्न झालेल्या क्षय रोगाचा नाश करतें. दुर्नाम, श्वास आणि कास यांच्या रोग्याला हितकारक असून तें जठराग्निही प्रदीप्त करतें. म्हशीचें दहीं पाकस्थितींत मधुर, पुष्टीकारक, वातपित्ताला हरण करणारें, व कफ वाढविणारें असून, अति स्निग्ध आहे. सांडणीचें दहीं पक्वस्थितींत तिखट, खारट, गुरु, मळाचा भेद करणारें असून, वातरोग, अर्श, कोड, कृमिरोग आणि उदररोग यांचा नाश करतें. मेंढीचें दहीं कफवाताला कोपवितें व दुर्नाम रोगाला उत्पन्न करतें. तें रस संबंधानें आणि पाकस्थितींत मधुर, नाडीचें ग्रहण करणारें व फार दोषावह आहे, घोडीचें दहीं जठराग्नीला प्रदीप्त करणारें, वातल, रुक्ष, उष्णवीर्य, कषाय रसाचें असून कफाचें हरण करतें. हत्तिणीचें दहीं पाकस्थितींत लघु, उष्णवीर्य, कषाय रसाचें असें असून कफाचें हरण करतें,

व मळाची वृद्धि करतें. स्त्रियांच्या दुधाचें दहीं स्निग्ध, पाकस्थितींत मधुर, तृप्तिकर, गुरु, व डोळ्यांना हितकर असून, सर्व दोषांचें हरण करून, बळ देतें.

वर लिहिलेल्या सर्व प्रकारच्या दह्यामध्यें गायीचें दहीं उत्कृष्ट समजावें. चांगलें विरजलेलें दहीं वाताला हरतें, कफाला उत्पन्न करतें व स्निग्ध असून शरीराला पुष्टि देतें, भोजनामध्यें रुचि उत्पन्न करतें. दूध ऊन करून विरजलें असतां जें दहीं बनतें. त्याचा गुण अधिक आहे. तें वात्तपित्ताला हरतें, रुचि उत्पन्न करतें, धातूची वृद्धि करतें व अग्नीचें बळ वाढवतें. दहीं हेमंत, शिशिर व वर्षा या ऋतूंत खाण्याला चांगलें; दहीं रात्रीं खाऊं नये; तसेंच ऊन करून खाऊं नये. खाणेंच तर मुगांची डाळ, मद्य, साखर, तूप, किंवा आंवळकटीचें चूर्ण यांतून कोणताही एखादा पदार्थ टाकून खावें. नेहमीं खाऊं नये आणि अर्धवट विरजलेलें तर मुळींच खाऊं नये.

घुसळ दहीं—दह्यांत पाणी न घालतां, ढवळून, पातळ केलें असतां त्यास घुसळ दहीं ह्मणतात. तें कफ आणि वात यांस हरणारें असून, नाडीची गति शोधणारें आहे. ताक हें, दहीं घुसळल्यावर, लोणी काढून घेऊन, आर्धेअर्ध पाणी घालून, जें अत्यंत आंबट नसून तुरट रसाचें बनतें तें. ताक हें सूज, संग्रहणी, मूत्रकृच्छ्र, उदर रोग, अरुचि, तुपाचें अजीर्ण, पंडुरोग आणि विषविकार यांवर उत्तम आहे. क्षतरोगावर व उष्णकाळीं सेवन करण्यास योग्य नाहीं. दुर्बळ मनुष्यानेंही सेवन करण्यास योग्य नाहीं. मूर्च्छा, भ्रम, दाह, रक्तपित्त, अग्निमांद्य आणि कफ विकार यांवरही तें हितकारक नाहीं. रसरक्तादि धातूंस वाहणाऱ्या नाड्यांचीं तोंडें जर बंद पडलीं असतील किंवा वायु बिघडला असेल तर

ताक अवश्य खावें. तें रसानें मधुर असलें तर कफ वाढवितें व पित्ताचें शमन करतें. आंबट असलें तर वाताला हरण करून पित्त उत्पन्न करतें. यास्तव वातव्याधीच्या मनुष्यानें सैंधव घालून ताक प्यावें. पित्तविकारी मनुष्यानें साखर घालून प्यावें आणि कफ प्रकृतीच्या मनुष्यानें सुंठ घालून प्यावें. ताकाची निवळ ताकाहून हलकी असते.

**श्रीखंड**–चक्का दहीं कपड्यांत घालून, पुरचुंडी करून, बांधून ठेवावें. त्यांतून पाणी गळून गेल्यावर जो गड्डा राहतो त्यासच श्रीखंड ह्मणतात. तें गुरु असून वाताचें हरण करतें, पुरुषत्व देतें, निद्रा आणतें आणि शरीरास व वीर्यास पुष्टि देतें.

**लोणी**–ताजें काढलेलें लोणी शिथिलता दूर करतें, जठराग्नीला प्रदीप्त करितें आणि हृदयाला हितकर असून, संग्रहणी, अर्श, व अरुचि यांचा नाश करतें. क्षय रोगावर लोणी फारच गुणवान आहे अशी वैद्य लोक प्रशंसा करितात.

**तूप**–तें स्मृति, बुद्धि, अग्नि, शुक्र, ओज, कफ आणि मेद यांस वाढवितें. वात, पित्त, विष, उन्माद, शोष आणि कांति-हीनता यांचा नाश करतें. तें सर्व स्निग्ध पदार्थांमध्यें उत्तम असून, रसानें व पाक स्थितींत मधुर आहे आणि निरनिराळ्या विधानांमध्यें ही पराक्रम करून तें अनेक कामीं उपयोगीं पडतें. तूप जुनें असलें तर, मद, घेरी, मूर्च्छा, सूज, उन्माद, विषमज्वर, योनिशूळ व कर्णशूळ यांस दूर करतें. वर जनावरांच्या दुधाचे जे गुण सांगितले आहेत तेच गुण त्यांच्या तुपांतही आहेत असें समजावें. एकशें अकरा वर्षांवरील जुनें तूप महाघृत या नांवानें प्रसिद्ध आहे. हें महाघृत

प्याल्यानें, कफ आणि वात यांचे व्याधि दूर होतात, बळ प्राप्त होतें, पवित्र बुद्धि वाढते आणि तिमिर रोगाचा नाश होतो. गाईचें दूध व तूप हीं सेवनास योग्य आहेत; परंतु मेढींचें दूध आणि तूप अयोग्य आहे. दुधांत ताक मिसळून तापविल्यानें जो पदार्थ होतो त्यास कूर्चिका ह्मणतात. ती मळ घट्ट करणारी, वातुळ, रुक्ष व लवकर न पचणारी अशी आहे. अटींव दूध, बासुंदी, खर्वस वगैरे—वर श्रीखंडाचे जे गुण सांगितले आहेत तेच गुण नुकत्याच व्यालेल्या गाईच्या दुधांत आणि त्याच्या खर्वसांतही आहेत. अटींव दूध, बासुंदी वगैरे दुधाचे पदार्थ, ज्याचा अग्नि प्रदीप्त आहे व ज्याला झोंप थोडी येते, त्याला हितकारक आहेत.

ग्रंथांगें दधिदुग्धतक्रघृततः प्रारभ्य यद्गोरसाः
सात्म्यासात्म्यविभागतः समुदिताः शास्त्रानुसारादिह ।
छाग्युष्ट्रीमहिषीमुखान्यपशुजस्त्रीजातिदुग्धादिक
व्याख्यानानि तथा कृतानि हिततो गोरत्नमेतत्स्मृतम् ॥



# पांचजन्य रत्न १० वें.

आंतरिक्ष जळ—आकाशांतून पडणारें मेघांचें पाणी अधांतरीं झेलून घेतात, त्याला आंतरिक्ष जळ ह्मणतात. हें पाणी, मधुरादि शब्दांनीं सांगतां येत नाहीं अशा रसाचें, वात, पित्त आणि कफ यांस समान अवस्थेमध्यें ठेवणारें, जीविताची वृद्धि करणारें, तृप्ति करणारें. स्वस्थिति न बदलूं देणारें, शरीराला आधार देणारें, क्षीण हरणारें, खेद, तृषा, मद, मूर्च्छा, आळस, निद्रा आणि दाह यांस दूर करणारें, आणि केव्हांही योजिलें असतां पथ्यकर असें आहे. हेंच आंतरिक्ष जळ नदी, डोह, तलाव, कुंड, विहीर, झरा इत्यादि स्थळविशेषांच्या संबंधानें निरनिराळ्या रसांचें बनतें. कित्येक वृद्ध मनुष्यांचें असें ह्मणणें आहे कीं, तांबडमातीच्या जमीनींतून निघणारें पाणी मधुर असतें, पिंगट जमीनींतून निघणारें पाणी आंबसण असतें, दलदलीच्या जमीनींतून निघणारें पाणी खारट असतें, पिवळ्या जमीनींतून निघणारें पाणी तिखट असतें, काळ्या जमीनींतून निघणारें पाणी कडवट असतें, आणि पांढऱ्या जमीनींतून निघणारें पाणी तुरट असतें. हें ह्मणणें कित्येकांस मान्य नाहीं. पृथ्वी आदि पंच महाभूतांच्या अन्योन्यप्रवेशानें पाण्याच्या रसाच्या अवस्था उत्कृष्ट व निकृष्ट अशा दोन होतात. अधिक गुणांनीं युक्त अशा जमीनीवर पडलेलें पाणी खारट आणि आंबट असतें. जळाचे अधिक गुण जींत आहेत, अशा जमीनीवर पडलेलें पाणी मधुर असतें. तेजाचे गुण जींत अधिक आहेत, अशा जमीनीवरील पाणी तिखट आणि कडवट असतें. वायूचे गुण अधिक असलेल्या जमीनीवरील पाणी कषाय असतें. आणि आकाशाचे गुण अधिक असलेल्या जमीनीव-

रील पाणी अस्फुट रसाचें असतें. या शेवटल्या प्रकारच्या पाण्याचा रस अस्फुट असण्याचें कारण असें कीं, अव्यक्त गुणयुक्त जें आकाश त्याचें आधिक्य त्या जमीनींत असतें. हें 'पाणी . प्याल्यानें आंतरिक्ष जळ प्याल्याचें कार्य होतें.

**आंतरिक्ष जळाचे भेद**—आंतरिक्ष जळाचे जे भेद आहेत त्या सर्वांत धाराजळ (आकाशांतून पडणारें मेघजळ) उत्तम म्हटलें आहे. त्याचेही दोन भेद आहेत—गांग (गंगेसंबंधी) आणि सामुद्र (समुद्रसंबंधी) जळ. आश्विन महिन्यांत जी वृष्टि होते, तिचें पाणी गांगजळ असें समजतात आणि इतर महिन्यांत पडलेलें मेघजळ सामुद्र असें समजतात. पाऊस पडत असेल तेव्हां उत्तम शिजवलेल्या भाताचा पिंड रुप्याच्या भांड्यांत ठेवून तें मोकळे जागेंत ठेवावें. या प्रमाणें दोन घटका ठेविल्यावर पाण्याच्या स्पर्शानेंहि तो पिंड जशाचा तसाच राहिला तर गांगजळ पडत आहे असें समजावें, तें पिण्यास नड नाहीं. परंतु त्या पिंडाचा वर्ण पालटला आणि तो कुजल्यासारखा झाला, तर सामुद्रिक जळ पडत आहे असें समजून त्याचा त्याग करावा. आश्विन महिन्यांत पडलेलें सामुद्र जळ पण गुणांनीं गांगजळाप्रमाणेंच आहे. सर्व प्रकारच्या जळांत गांगजळ प्रधान गणलें असल्यामुळें अश्विन महिन्यांत जी वृष्टि होते तिचें पाणी निर्मळ, पांढरें, स्वच्छ आणि उंच बांधलेल्या फडक्यांतून गाळून घेतलें असतां अथवा गच्ची वगैरे स्थळीं आणि स्वच्छ भांड्यांत अधांतरीं धरलें असतां, तें सोन्याच्या, रुप्याच्या किंवा मातीच्या भांड्यांत ठेवून द्यावें. मग त्याचा लागेल तेव्हां उपयोग करण्यास हरकत नाहीं. परंतु असें जळही जेव्हां मिळूं शकत नाहीं, तेव्हां आकाशींच्या जळाच्या गुणासारखेच ज्याचे गुण आहेत असें भौम जळही घ्यावें.

हें भौम जळ सात प्रकारचें आहे—विहिरीचें, नदीचें, कुंडाचें, तलावाचें, झऱ्याचें, जमीनींतून आपोआप निघालेलें, व डबक्यांतलें.

**पिण्यालायक पाणी**—वर्षाऋतूंत आंतरिक्ष जळ गुणावह आहे. शरद् ऋतूंत निर्मळपणामुळें सर्वच पाणी पिण्यालायक असतें. हेमंत ऋतूंत कुंडांतलें व तलावांतलें पाणी पिण्यालायक समजावें. वसंतऋतूंत विहिरीचें व झऱ्याचें पाणी आणि ग्रीश्म ऋतूंतही विहिरीचें व झऱ्याचें पाणी पिण्यालायक समजावें आणि प्रावृट्ऋतूंत डबक्याचें पाणी आणि नवीन पावसाचें न पडलेलें पाणी पिण्यालायक असतें.

**वाईट पाणी**—वर्षाऋतूंत किडे, मूत्र, विष्ठा, व कुजलेलीं प्रेतें इत्यादिकांनीं बिघडलेलें, गवत आणि पानें वगैरे कचरा आंत पडल्यामुळें कुजलेलें, आणि विषयुक्त नवें पाणी जे कोणी पितात किंवा त्यांत आंघोळ करितात. त्यांच्या शरीरांत बाहेरच्या व आंतल्या भागीं अनेक रोग उत्पन्न होतात. शेवाळ, चिखल, गवत व कमळाचे वेल, व त्यांचीं पानें इत्यादि पदार्थांखालीं झाकलेलें, चंद्र व सूर्य यांचे किरण ज्यांवर पडत नाहींत आणि ज्यावरून वारा वाहत नाहीं व उत्तम गंध, रस, आणि वर्ण, यांनीं रहित असतें, तें पाणी बिघडलें असें समजावें. स्पर्श, रूप, रस, गंध, वीर्य, आणि विपाक असे पाण्याचे साहा दोष आहेत. त्यांत खरखरा बाजलेलें, तिखट, ऊन, आणि दांतांस शिवळणारें असें जें पाणी तें स्पर्शदोषानें युक्त आहे असें समजावें. चिखलट, गढूळ, शेवाळीनें भरलेलें, आणि निरनिराळ्या रंगाचें असें पाणी रूपदोषानें युक्त जाणावें. साहा रसांपैकीं कोणत्याही जातीचा एक रस ज्या जळांत स्पष्टपणें दिसून येतो तें पाणी रसदोषानें युक्त जाणावें. ज्याला वाईट वास येत आहे तें पाणी गंधदोषानें युक्त जाणावें. जें पाणी प्याल्यानें तृषा मोडत नाहीं आणि शरीरांत जडपणा, शूळ, व पडसें उत्पन्न होतें, तें पाणी

वीर्यदोषानें युक्त जाणावें. आणि जें पाणी प्याल्यानें खाल्लेलें अन्न पचण्याला फार वेळ लागतो आणि पोटांत भरून राहतें. असें पाणी विपाकदोषानें युक्त असें समजावें. अकालिक वृष्टीचें पाणी अथवा बिघडलेलें पाणी अहित समजावें. यास्तव असें पाणी स्नानपानादिक व्यवहाराला अयोग्य आहे. आणि पुढें सांगितल्याप्रमाणें त्यांतील दोष नाहींसे केल्यावांचून जर त्याचा उपयोग केला, तर शरीरांत सूज, पांडुरोग, त्वग्विकार, अन्न न पचणें, श्वास, खोकला, शैत्य, शूळ, आणि उदररोग, असे अनेक रोग तत्काळ उत्पन्न होतात.

**पाणी बिघडलें असतां निर्दोष करण्याची रीत**—वरील दोष आंतरिक्ष जळांत नसतात. खराब झालेल्या पाण्याखालीं विस्तव लावावा किंवा उन्हांत तापवावें किंवा तापवलेल्या लोखंडाचा तुकडा, वाळू, किंवा मातीचा गोळा आंत बुडवावा ह्मणजे पाणी निर्दोष होतें. तसेंच चाफा, कमळ, गुलाब इत्यादि पुष्पांनीं सुवासित करून, सोन्याच्या, रुप्याच्या, तांब्याच्या, काशाच्या, किंवा मण्याच्या, भांड्यांत ठावून, मग प्याल्यानें शरीरांत विकार उत्पन्न होत नाहींत.

**पाणी शीतळ करण्याची रीत**—पाणी शीतळ करावयाचें असतां तें ज्या ठिकाणीं पुष्कळ वारा वाहत असेल तेथें ठवावें. त्यांत जेष्ठीमधीची कांडी फिरवावी, वारा घालावा, फडकें बांधून उलटें टांगावें, वाळू घालून अथवा शिक्यावर लोंबत ठवावें.

याप्रमाणें दुर्गंधरहित, अस्फुट रसांनीं युक्त, तृषा शांत करणारें, पवित्र, शीतळ, निर्मळ, हलकें आणि मनास आवडणारें असें पाणी उत्तम ह्मटलें आहे.

**नद्यांचें पाणी**—पश्चिमेकडे वाहत जाणाऱ्या नद्यांचें पाणी हलकें असून, स्नानपानादिकाचे कामीं प्रशस्त ह्मटलें आहे. पूर्व

दिशेकडे वाहणाऱ्या नद्यांचें पाणी जड असून प्रशस्त नाहीं. आणि दक्षिणेकडे वाहणाऱ्या नद्यांचें पाणी साधारण गुणांस्तव अत्यंत दुष्ट समजलें जात नाहीं. सह्याद्रि पर्वतांतून निघालेल्या नद्यांचें पाणी कुष्टरोग उत्पन्न करतें. विंध्यपर्वतांतून निघालेल्या नद्यांचें पाणी कोड आणि पांडु रोग उत्पन्न करितें. मलय पर्वतांतून निघालेल्या नद्यांचें पाणी कृमि उत्पन्न करितें. महेंद्र पर्वतांतून निघालेल्या नद्यांचें पाणी श्लीपद आणि उदर रोग उत्पन्न करितें. आणि हिमालय पर्वतांतून निघालेल्या नद्यांचें पाणी हृदयरोग, सूज, शिरोरोग, श्लीपद, व गंडमाळा, या रोगांस उत्पन्न करितें. जिचें पाणी निर्मळ आहे व जी वेगानें वाहात आहे, अशा नद्यांचें पाणी हलकें असतें. गढूळ, हळुहळु चालणारी व जींत शेवाळ वाजली आहे अशा नदीचें पाणी जड असतें. फार करून मारवाडदेशच्या नद्यांचें पाणी कडवट, खारट, तुरट, आणि मधुर रसांचें असतें. यामुळें असें पाणी प्याल्यानें अन्न लवकर पचतें व मनुष्य बळवान होतो.

**पाणी भरण्याची वेळ**—पृथ्वीवरील नद्यादिकांचें पाणी सकाळींच भरावें; कारण कीं त्या वेळीं पाणी निर्मळ व शीतळ असतें. आणि पाण्याच्या सर्व गुणांत शीतळता व निर्मळता हे गुण मुख्य गणले आहेत.

**उत्तम गुणाचें पाणी**—सारा दिवसभर सूर्याच्या तापानें तापलेलें, सारी रात्रभर चंद्रादिक ग्रह, नक्षत्र व तारे यांच्या शीतळ किरणांनीं थंड झालेलें, जें रुक्ष नाहीं, व नाड्यांस न पकडणारें, असें पाणी आंतरिक्ष जळाच्या गुणाचें असतें. चांगल्या भांड्यांत धरलेलें आंतरिक्ष पाणी वात, पित्त व कफ या दोषांस दूर करतें. याशिवाय तें मेधा उत्पन्न करणारें असल्यमुळें रसायनरूप ही गणलें आहे.

चंद्राच्या संबंधानें मण्यापासून प्राप्त झालेलें पाणी शीतळ असून आल्हादजनक आहे. तें ज्वर, दाह, व विषदोष यांचा नाश करतें. व निर्मळतेमुळें पित्ताचाही उपशम करतें. शीतळ पाणी प्यायल्यानें तें मूर्च्छा, पित्त, उष्णता, दाह, विष, रक्तविकार, मदात्यय, भ्रम, खेद वगैरे रोगावर व शरीराच्या वरच्या भागांतील रक्तपित्त रोगाच्या पीडेवर हितकारक आहे. पार्श्वशूळ, शैत्य, वातरोग, गलग्रह, आध्मान, बद्धकोष्ठता, विरचेन, नवीन ज्वर, व उचकीच्या विकारांवर शीतळ जळाचें पान विरुद्ध आहे.

**नद्यादिक जळाचे गुण**—नदीचें पाणी वातुळ, रूक्ष, दीपन, हलकें, व लेखन करणारें असें आहे. सरोवराचें पाणी मधुर, गुरु, कफकारक, व तृषाहारक असें आहे. तळ्याचें पाणी बळ देणारें, कषाय, मधुर व हलकें असें असतें. बावीचें पाणी वातुळ, गोड, तुरट, तिखट, व वातश्लेष्मा यांस हरणारें असतें. विहिरीचें पाणी लवण रसाचें, पित्त उत्पन्न करणारें, कफहारक, दीपन व हलकें असें असतें. डबक्याचें पाणी जठराग्नीला प्रदीप्त करणारें, रूक्ष व मधुर असें असतांही कफ उत्पन्न करीत नाहीं. झऱ्याचें पाणी कफ हरणारें, दीपन, हृदयाला हितकर, व हलकें असें आहे. पृथ्वींतून आपल्या आपण निघालेलें पाणी मधुर, पित्ताचें शमन करणारें व दाह शांत करणारें आहे. समुद्राचें पाणी, दुर्गंध व क्षार यांनीं युक्त असें असतें व सर्व दोषांस कुपित करतें. अनूप देशचें पाणी अनेक दोषांनीं युक्त व रसादिक धातूंस वाहणाऱ्या नाड्यांची गति बंद करणारें असल्यामुळें अतिनिंद्य आहे. वर सांगितलेल्या दोषांनीं युक्त जांगल देशचें पाणी उत्तम झटलें आहे. सामान्य देशचें पाणी पक्वावस्थेंत दाह उत्पन्न करीत नाहीं,

तृषेचें हरण करतें, व प्रीति वाढवितें. याशिवाय तें दीपन, गोड, शीतवीर्य, व हलकें असल्यामुळें अतिशय प्रशस्त गणलें आहे.

**ऊन•पाणी**—हें वात, कफ, मेद व आम यांचा नाश करतें, अग्नीचें उद्दीपन करतें, बस्ति व कंठ यांस सुधारतें, कास, श्वास, व ज्वर यांस हरतें व सर्व अवस्थांमध्यें पथ्यकर आहे. जें पाणी अति उकळल्यामुळें, फेणरहित, वेगरहित, निर्मळ, हलकें व चौथा भाग बाकी राहिलेलें, तें फार गुणकारक समजावें. तान्हेल्यानें ऊन करून वासें झालेलें पाणी पिऊं नये; कारण कीं आंबट झाल्यानें तें कफास वाढवितें. ऊन करून थंड केलेलें पाणी अत्यंत हितकारक आहे.

**नारळाचें पाणी**—हें स्निग्ध, गोड, शीतवीर्य, हृदयाला हितकर, अग्नीला प्रदीप्त करणारें, बस्तिची शुद्धता करणारें, वीर्याला पुष्टि देणारें, पित्तानें झालेला तृषाविकार शांत करणारें व गुरु गुणाचें असें असतें. नारळाचें पाणी ऊन करून थंड केल्यास तें दाह, अतिसार, रक्तपित्त, मूर्च्छा, मद व विषाची पीडा, तृषा, उलटी, व भ्रम यांस शांत करण्यांत फार प्रशस्त गणलें आहे.

**पाण्याचा उपयोग**—अरुचि, शैत्य, तोंडांतून लाळ पडणें, सूज, क्षय, मंदाग्नि, कोड, उदररोग, ज्वर, नेत्ररोग, व्रण, व मधुमेह, या रोगांमध्यें पाण्याचा उपयोग फार थोडा करावा. शरद व ग्रीष्म ऋतूंशिवाय इतर काळीं निर्दोष मनुष्यानें सुद्धां थोडेंच पाणी प्यावें. जेवणांत मध्यंतरीं पाणी प्याल्यानें शरीराला जशी हवी तशी पुष्टि प्राप्त होते; शेवटीं प्याल्यानें शरीर स्थूळ होतें व पाणी प्याल्यावर जेवल्यानें शरीर कृश होतें.

**कार्यं कारणबोधकं क्व च तथा कार्यस्य संबोधको**
**हेतुः कुत्रचिदित्यवेक्ष्य महतां सन्मानितां पद्धतिम् ।**
**नीरस्योत्तममध्यमाधमगुणाः श्रीशंखरत्ने मया**
**संप्रोक्ताः खलु देशकालजनिता ग्राह्यांभसो ज्ञप्तये ॥**

# मद्य रत्न ११ वें.

मद्य हें द्रवरूप, अनेक गुणांनीं युक्त, बहुत काम करणारें त्याच प्रमाणें फार दोष उत्पन्न करणारेंही आहे. त्याचें कोणत्या प्रकारानें सेवन केलें असतां हित होतें व कोणत्या रीतीनें दोष उत्पन्न होतात, या दोन्ही प्रकारचें स्पष्ट विवेचन या प्रकरणांत करण्याचें योजिलें आहे.

**मद्याचे चांगले वाईट परिणाम**—जर कोणीही मनुष्य, विधिपूर्वक, अमुक प्रमाणानें, स्वतांची शक्ति पाहून, आनंदांत राहतां येईल तोंपर्यंत, मद्याचें सेवन करील, तर मद्य हें त्याला अमृतप्रायच होईल. परंतु ज्याचें शरीर रुक्ष आहे व जो फार मेहनती आहे, त्यानें सेवनविधि सोडून इच्छेस येईल तेवढें मद्य पिण्याचें आरंभिलें, तर त्यास विषासारखे विपरीत परिणाम मद्याचे जाणवतील.

**मद्याचा प्रभाव**—जेव्हां मद्याचे विपरीत परिणाम जाणवतात, तेव्हां तें हृदयांत प्रवेश करून, तेथें असलेल्या ओज नामक धातूच्या दहा गुणांहून विपरीत अशा स्वतांच्या दहा गुणांनीं पीडा करून, पित्तास विकृत करतें. तें अशा रीतीनें कीं स्वतांच्या लघु गुणानें ओजाच्या गुरु गुणाला, उष्णगुणानें शीत गुणाला, अम्ल गुणानें मधुर गुणाला, तीक्ष्ण गुणानें मृदु गुणाला, आशुगम (लौकर पसरणें) या गुणानें प्रसाद गुणाला, रुक्षगुणानें स्निग्ध गुणाला, व्यवायी (व्याप्त होणें) या गुणानें स्थिर गुणाला, विकासी (द्रवीभूत करणें) या गुणानें श्लक्ष्ण गुणाला, विशद (निर्मळ) या गुणानें पिच्छिल (गढूळ) गुणाला आणि सूक्ष्मगुणानें सांद्र (घट्टपणा) या गुणाला, तें मारतें. यामुळें ओजाचा आश्रय करून राहिलेल्या सत्व

गुणाचा क्षोभ करून तें मदाला उत्पन्न करतें. कारण कीं हृदय हें रसादिक साहा धातूंच्या मार्गाचें, ओजाचें, सत्वाचें, बुद्धीचें आणि इंद्रियांचें स्थान* आहे. ह्मणजे अतिशय मद्यसेवनानें, प्रधान जें ओज, त्याचा पराभव झाल्यामुळें, हृदय आणि हृदयांत असलेले दुसरे धातु विकृति पावतात. परंतु तेंच अल्प प्रमाणानें किंवा मध्यम प्रमाणानें पिण्यांत येईल, तर 'ओजाचा जरी पराभव झाला तरी सुद्धां हृदय प्रतिबोध पावतें, आणि उत्तम प्रकारचा अंमल चढतो. जेव्हां हृदय मद्याच्या गुणानें व्याप्त होतें, तेव्हां हर्ष, रतीची तृष्णा, सुखकारक मनाची वृत्ति आणि शक्तीप्रमाणें विकार ही उत्पन्न होतात. त्याचप्रमाणें अतिशय मद्य प्याल्यानें रजोगुणी व तमोगुणी मनुष्यांस मोह व निद्रा प्राप्त होते. मद्याच्या या प्रभावास अंमल करणें असें ह्मणतात.

**मद्याचे तीन भेद**—पिण्यास योग्य अशा मद्याचे प्रथम, मध्यम व अंत्य असे मदाचे तीन प्रकार आहेत. त्यांत प्रथम मदाच्या अवस्थेंत कामाचें उद्दीपन, प्रीति, खाण्यापिण्यावर रुचि आणि वाद्य, गीत, हास्य व कथा याविषयीं मनाची प्रवृति होते; आणि बुद्धीचा व स्मृतीचा नाशही होत नाहीं. विषयसुख आनंदानें घेतां येतें आणि निद्रेंत किंवा जागृतींतही सुख वाटतें. मध्यम मदांत वारंवार स्मृति, वारंवार मोह, केव्हां व्यक्त तर केव्हां अव्यक्त, केव्हां योग्य तर केव्हां अयोग्य, भाषण, क्रोधामुळें इंद्रियांचें चांचल्य, आणि स्नान, पान, अन्न यांच्या संबधानें विपरीत क्रिया होऊं लागते. या मध्यम मदाचें उत्क्रमण करून, उत्तम मद प्राप्त न झाल्यामुळें, रजोगुणी व तमोगुणी मनुष्याच्या हातून कोणतेंही चांगलें काम होत नाहीं. अंत्य मदामध्यें मनुष्य, मोडलेल्या लांकडाप्रमाणें, क्रियाहीन होऊन

पडतो, व मदामुळें आणि मोहामुळें जीवंत असला तरी मेल्याप्रमाणेंच दिसतो. हा मनुष्य आपल्या जवळ असलेल्या मनोहर भोग्य पदार्थांस किंवा संबंधी जनांस ओळखूं शकत नाहीं ; इतकेंच केवळ नव्हे, पण मद्याचा हेतु जें रतिसुख, त्याचाही उपभोग त्याच्यानें घेववत नाहीं. याप्रमाणें कार्याकार्य, सुखदुःख, हिताहित यांचा या अवस्थेंत बिलकूल विचार राहत नाहीं. याच तिसऱ्या मदाच्या अवस्थेंत सुख मानणारीं मनुष्यें सर्व प्राणिमात्राच्या दूषणास, निंदेस आणि अनादरास पात्र झालीं आहेत ; इतकेंच केवळ नव्हे, तर या व्यसनामुळें त्यांच्या शरीरांत भयंकर रोगही उत्पन्न झाले आहेत. या लोकींचें कल्याण आणि परलोकींचें कल्याण व मोक्ष हीं मनाच्या स्थितीवर अवलंबून आहेत. परंतु या मनासच हा तिसऱ्या प्रकारचा मद क्षोभयुक्त करितो. यामुळें वर सांगितलेल्या तिन्ही प्रकारचें कल्याण त्यास प्राप्त होत नाहीं ; इतकेंच केवळ नाहीं, तर शेवटीं नरकाचीच प्राप्ति होते. मद्य हें रजोगुणी आणि तमोगुणी मनुष्यांच्या मनोरूपी वृक्षांस हालविण्याकरितां प्रचंड वायूसारखें आहे. मद्य हें अज्ञानाला उत्पन्न करणारें, महामोह उत्पन्न करणारें महाव्याधीला शरीरांत स्थळ देणारें, आणि बहुत दोषांनीं युक्त असें असून, रजोगुणामुळें आणि मोहामुळें मूढ होऊन गेलेल्या मनुष्यालाच सुखदायक वाटतें. मद्याच्या मदानें मनुष्यें ज्ञानहीन, सत्वगुणानें रहित आणि अंध होऊन, आपल्या कल्याणाविषयीं निष्काळजी होतात. मद्यांत मोह, भय, शोक, क्रोध, मृत्यु, उन्माद, मद, मूर्च्छा, वायु, अपतानक नांवाचा रोग आणि सर्व वाईट कामें करावयास लावणारा स्मृतिभ्रंश हे गुण राहिले आहेत. यामुळें तिसऱ्या मदाचे वर वर्णिलेले दोष जाणून, उत्तम पुरुष मद्यपानाचा तिरस्कार करितात. पण हे सर्व दोष प्रमाणाबाहेर आणि पिण्यास लायक नाहीं अशा आणि विधि सोडून केलेल्या मद्यपानापासून मात्र उत्पन्न

होतात. खरें ह्मटलें असतां, मद्य हें अन्नाप्रमाणें नेहमी हितकारकच आहे; इतकेंच केवळ नव्हे, तर युक्तीनें प्यालें असतां, अमृताप्रमाणें तें गुण दाखविणारें ही आहे. परंतु युक्ति सोडून प्यालें असतां तें अनेक रोगांस उत्पन्न करील. अन्नानें मनुष्याच्या प्राणाचें रक्षण होतें खरें, परंतु तेंच युक्तिरहित मार्गानें सेवन केलें असतां, मरण आणतें. मग युक्तिरहित मद्य पिण्यांत येईल, तर त्यानें अनर्थ कां ओढवणार नाहींत बरें? युक्तीनें सेवन केलें असतां, विषसुद्धां अमृतरूप होतें. यास्तव उत्तम मद्याचें युक्तीनें सेवन करावें, ह्मणजे हर्ष, मद, पुष्टि, आरोग्य आणि उत्कृष्ट पौरुष यांची पिणारास प्राप्ति होईल. कारण कीं स्वभावतः मद्य हें अन्नाला रुचि आणणारें; कामोद्दीपक; हृदयाला आल्हाद देणारें; स्वर मधुर करणारें; तृप्ति देणारें; पुष्टि आणणारें; बळ देणारें; भय, शोक आणि श्रम यांस नाहींसें करणारें; ज्यास झोंप येत नसेल त्यास झोंप आणणारें; मुक्या मनुष्यास बोलका करणारें; अत्यंत झोपाळु मनुष्यास जागविणारें; बद्धकोष्टता नाहींशी करणारें; मारामुळें अथवा बंधनामुळें होणारे क्लेश व दुःख यांचें विस्मरण पाडणारें; मद्य प्याल्यानें होणाऱ्या रोगांस दूर करणारें; आणि अत्यंत वृद्ध पुरुषाला सुद्धां हर्ष व उत्साह देणारें असें आहे.

मद्याच्या पहिल्या मदाच्या अवस्थेंत तरुण व वृद्ध पुरुष शब्दादिक पांच विषयांचें जसें सुख भोगतो, तसें सुख दुसरे कोणासही मिळत नसेल. यास्तव अन्नपान, वय, व्याधि, बळ, काळ, तीन दोष आणि तीन प्रकारचें सत्व या सर्व गोष्टींचा विचार करून मद्यपान करावें.

**मद्यपानाची युक्ति**—देशकालादिकांचा विचार करणें हीच ती युक्ति. या युक्तीनें मद्यपान केलें असतां तें दोषास पात्र होत नाहीं.

यास्तव सत्वगुणी पुरुषानें मद्य पिणें तर प्रथम मदाच्या अवस्थेंत सत्व गुण वाढवील, द्वितीय मदाच्या अवस्थेंत सत्वगुणाच्या स्वरूपास स्पष्ट रीतीनें दाखवील, आणि द्वितीय मदाचें उल्लंघन करून तिसऱ्या मदाच्या अप्राप्तिरूप अवस्थेंत कामोद्दीपन करील, आणि जशी कसोटी सुवर्णाची प्रकृति दाखविते, त्याप्रमाणें पुरुषाची प्रकृति प्रगट करील, असें मद्यपान करावें.

**मद्यपानाचे तीन भेद**—ज्याप्रमाणें मदाचे तीन भेद वर सांगितले, त्याप्रमाणें मद्यपानाचेही सात्विक इत्यादि तीन भेद आहेत. ज्या मद्यपानांत सुगंधी पदार्थ, गायन, सुंदर वार्ताप्रसंग, सुखदायक पदार्थ आणि कामकलांची प्रीति इत्यादि गुण उत्पन्न होतात, तें सात्विक मद्यपान ह्मणावें. सात्विक मद्यपान करणाऱ्या सत्वगुणी मनुष्याची प्रकृति गुंगीनें विकृति पावत नाहीं. कारण कीं बळवान सत्व गुणाचें मर्दन तें मद्य करूं शकत नाहीं. ज्या मद्यपानांत चांगल्या व वाईट अशा दोन्ही प्रकारच्या गोष्टी बोलण्याची व ऐकण्याची इच्छा उत्पन्न होते, त्यांत क्षणक्षणीं निर्मळ व मळकट भावनेनें प्रकृति बदलते, आणि ज्यांत खाण्यापिण्याची अतृप्ति व हर्ष, स्मृति आणि गोष्टी सांगण्याची रुचि याप्रमाणें विचित्र प्रकारच्या चेष्टा चित्तांत उत्पन्न होतात, तें राजस मद्यपान ह्मणावें. आणि ज्या मद्यपानांत मोह, क्रोध आणि निद्रा इत्यादि उत्पन्न होतात, तें तामस मद्यपान ह्मणावें.

**निर्दोष मद्यपान**—मद्यपान करण्याची ज्या मनुष्यास इच्छा असेल त्यानें आपल्या जवळच्या इतर मनुष्यांस मद्य पाजावें, आणि त्यांच्या सात्विक, राजस आणि तामस गुणांची परीक्षा करून, त्यांच्या बरोबर मद्यपान करावें. वर सांगितलेले मद्याचे दोष, ज्यांच्या

बरोबर मद्यपान केल्यानें उत्पन्न होतील त्या मनुष्यांस मद्यपानाचे वेळेस जवळ करूं नये. चांगल्या स्वभावाचे, गोड बोलणारे, सुंदर मुख असलेले, सत्पुरुषांनीं सत्कार केलेले, सर्व कळांत कुशळ, निर्मळ अंतःकरणाचे, निर्मळ गोष्टींची प्रीति धरणारे, एकमेकांची मर्जी संभाळणारे, गळश्च कंठश्च स्नेह धरणारे, हर्ष, प्रीति आणि मधुरता यांनीं युक्त भाषणें करून मद्यपानाचें सुख वाढविणारे आणि एकमेकांस पाहून हर्ष पावणारे, अशा मनुष्यांच्या समागमांत मद्यपान केलें असतां, मद्यपान करणाऱ्या मनुष्यास निर्दोष मद्याच्या गुणाचा अनुभव प्राप्त होतो.

**मद्यपान करणाऱ्याची उत्कृष्टता आणि निकृष्टता—** आपणास आवडणारा शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध यांनीं युक्त होऊन, उत्तम स्थळीं, आणि उत्तम काळीं, हर्षयुक्त मनानें जें मद्यपान करावयाचें, तसें मद्यपान करणारे पुरुष पुण्यवान समजावे. त्याच प्रमाणें दृढ व सत्व शरीर असलेले, मद्यपान करणारांच्या वंशांत उत्पन्न झालेले आणि अतिशय मद्य पिण्याची सवय असलेले, अशा पुरुषांस मद्य पितांच लवकर अंमल चढत नाहीं. आणि मद्यपानाच्या पूर्वीं भुकेनें व तहानेनें पीडित, दुर्बळ, वातपित्तप्रकृतीचे, रुक्ष आणि थोडें खाणारे, स्तब्ध, सत्वगुणहीन, क्रोधी, मद्यपानास अपात्र, क्षीण, थकलेले आणि अंमल करण्यानें क्षीण झालेले अशीं मनुष्यें थोड्या थोडक्या मद्यपानानेंही चटकर मदोन्मत्त होतात.

**मद्याचे भेद आणि त्याचे गुण**—सर्व प्रकारचीं मद्यें स्वभावतःच अम्ल, उष्ण, आणि अम्लपरिणामी असतात. शक्तिहीन, मूत्र कृच्छ्राचे रोगी आणि ग्रहणी आणि अर्श हे विकार असलेले, अशा रोग्यांस वातहारक मद्य हितकर आहे. त्याच प्रमाणें जिला

दूध येत नाहीं अशा स्त्रीला, रक्ताचा क्षय झाला आहे अशा मनुष्यास, आणि उचकी, श्वास, खोकला, शैत्य, बद्धकोष्ठता. अरुचि, ओकारी, पोट फुगणें, शूळ, प्रवाहिका, वात, कफ; आणि नाडीग्रहण अशा रोगांसही तें हितकारक आहे. जांगल नांवाचें मद्य नाडीग्रहण करणारें, रूक्ष, उष्णवीर्य, सूज उतरणारें आणि खाल्लेल्या अन्नास पचविणारें असें आहे. अरिष्ट नांवाचें मद्य भोजनांत रुचि उत्पन्न करणारें, जठराग्नीला प्रदीप्त करणारें, आणि सूज, अर्श, ग्रहणी, पांडुरोग, अरुचि, कफरोग व ज्वर यांचा नाश करणारें असें आहे. गुळापासून जें मद्य बनवितात, त्यास गौड असें ह्मणतात. तें तोंडास गोड लागणारें, साधारण अंमल आणणारें, सुगंधी, बस्तिरोगास दूर करणारें, अन्न पचविणारें, बद्धकोष्ठता नाहींशी करणारें, स्वर व वर्ण यांस साफ करणारें, लेखन करणारें, शीतवीर्य, सूज, उदररोग व अर्श यांस बरें करणारें, मळ व अधोवात यांस साफ करणारें, तृप्ति करणारें, आणि अग्नीला प्रदीप्त करणारें असें आहे. बेहड्यापासून तयार केलेलें जें मद्य त्यास सुरा ह्मणतात. तें पांडुरोग आणि व्रण यांस हितकारक असून, अग्नीला प्रदीप्त करणारें आहे. आसव नांवाचें मद्य उग्र अंमल आणणारें, वातरोगाचा नाश करणारें आणि पीते वेळां तोंडाला प्रिय लागणारें असें असतें. मद्यापासून तयार केलेला आसव हा दोषाचें छेदन करणारा आहे. धायटीपासून तयार केलेलें आसव नांवाचें मद्य जुनें झालें ह्मणजे रूक्ष गुणाचें, रुचि उत्पन्न करणारें व जठराग्नीला प्रदीप्त करणारें असें असतें. द्राक्ष आणि ऊंस यांच्या रसाचा केलेला आसव अत्यंत उष्णवीर्य नाहीं. मधु नांवाचें मद्य रुचि उत्पन्न करणारें, अग्नीला प्रदीप्त करणारें, हृदयाला हितकर, बल देणारें, पित्ताचा अवरोध करणारें, बद्धकोष्ठता आणि कफ यांचा नाश

करणारें, आणि अंमळ वातप्रकृतीचें असें असतें. यवाचा मांड, तयार करून, त्यांचें बनविलेलें सुरा नांवाचें मद्य हें रूक्ष, उष्ण, वात प्रकृतीचें, गुरु आणि उशीरां पचणारें असें असतें. फार करून नवें मद्य बहुत दोषांस उत्पन्न करतें आणि जुनें मद्य नाडीची गति साफ करणारें, जठराग्नीला प्रदीप्त करणारें, हलकें, रुचिकर, कामोद्दीपक, तृप्तिकारक, बळ देणारें, शोक आणि श्रम दूर करणारें, चातुर्य, वीर्य, आणि अनेक प्रकारें ऊहापोह करण्याची बुद्धि देणारें आणि अत्यंत तुष्टि आणि पुष्टि देणारें असें आहे.

**अयोग्य मद्य**—घट्ट, विशेष दाह उत्पन्न करणारें, वाईट वास येत असलेलें, वाईट रसाचें, सूक्ष्म जंतु उत्पन्न झालेलें, वजनांत जड, पितांना वाईट लागणारें, तिखट, ऊन, नवें, वाईट भांड्यांत ठेविलेलें, गुणकारक पदार्थांपासून तयार न केलेलें, वासें, फार निर्मळ, पिऊन पिऊन भांड्यांत थोडकें राहिलेलें, आणि फार गढूळ असें मद्य पिण्यास लायक नाहीं. नवीन, फार गढूळ आणि जड असें मद्य कफास कोपवितें आणि चटकर पचत नाहीं. फार तिखट, ऊन आणि दाहकारक असें मद्य पित्ताला कोपवितें. आणि पिते वेळीं न आवडणारें, फेसाळ, दुर्गंधी, रसरहित, जड आणि वासें असें मद्य वायूला कोपवितें. याचप्रमाणें वर सांगितलेल्या सर्व दोषांनीं युक्त जें मद्य, तें सर्व दोषांस कोपविणारें समजावें.

**पिण्यास योग्य मद्य**—ज्यास मद्यपान करण्याचा शोख असेल, त्यानें सूक्ष्म, निर्मळ, सुगंधी आणि पहिला मद उत्पन्न करणारें असें मद्य प्यावें.

**मद्यपान केल्यावर अम्मल चढण्याचा वेळ आणि त्याचीं चिन्हें**—कफप्रकृतीच्या मनुष्याला मद्यपान केल्यावर फार वेळानें

अम्मल चढतो; वातप्रकृतीच्या मनुष्याला कांहीं वेळ लागतो; परंतु पित्तप्रकृतीच्या मनुष्याला तर मद्यपान केल्यावर लगेच अम्मल चढतो.

सात्विक प्रकृतीच्या पुरुषाला अंमल आला ह्मणजे पवित्रता, सुघडता, हर्ष, भूषण, गीत, अध्ययन आणि सुरतसुख याविषयीं त्याची रुचि वाढते. राजस प्रकृतीच्या मनुष्याला अम्मल चढला ह्मणजे दुःख, अपघात, साहस, क्लेश आणि वैर वगैरे कृत्यें करण्याचें सुचतें. आणि तमोगुणी मनुष्यास मलिनता, निद्रा, हेवा, अगम्यागमन आणि मिथ्या भाषण याविषयीं रुचि वाटूं लागते.

मद्य हितकारक कोणास आहे :—समुद्रकांठी राहणाऱ्या मनुष्यांस मद्य विशेष हितकारक होतें. मात्र उष्ण वीर्य पदार्थांबरोबर तें पिऊं नये.

मद्यानां गुणदोषभेदरचनामात्राप्रकारास्तथा
ग्राह्याऽग्राह्यविचारणा सुविपुला प्रोक्ता मया सवतः
एतस्मिन्विशदाशये प्रकरणे यस्मात्प्रतिष्ठापितं
नामैतस्य च मद्यरत्नमिति तत्स्वार्थानुकूलक्रमम् ॥



# तरंग ४ था.

## कौस्तुभ रत्न १२ वें.

### ज्वर.

निदान—या रोगाचीं, ज्वर, विकार, रोग, व्याधि, व आतंक अशीं वेगवेगळीं नांवें सांगितलीं आहेत. शरीरसंबंधी आणि मनःसंबंधी दोष हें ज्वराचें मुख्य कारण आहे. यास्तव दोषरहित प्राण्याला ज्वर येण्याचा मुळींच संभव नाहीं.

या रोगाची उत्पत्ति रुद्राच्या कोपापासून झाली आहे. रुद्राच्या कोपाचें कारण असें सांगितलें आहे कीं, त्रेतायुगांत एक हजार वर्षें-पर्यंत कोप प्रगट करावयाचा नाहीं असें व्रत घेऊन, शंकर एकांतांत जाऊन बसले. असें पाहून दुष्ट दैत्यांस आयतीच संधि मिळाली व ते सत्पुरुषांच्या तपश्चर्यादि उत्तम कार्यांचा भंग करूं लागले. त्यांच्या उपद्रवाचा प्रतिरोध करण्याला दक्षप्रजापति सर्व प्रकारें समर्थ होता, तरी त्यानें कित्येक दिवस मनाची शांति धरून उपेक्षा केली. परंतु दैत्यांच्या उपद्रवांनीं दुःख पावत असलेल्या देवादि-कांनीं दक्षप्रजापतीची प्रार्थना केली. तेव्हां दक्षप्रजापतीनें दैत्यांच्या नाशार्थ यत्न मांडला असतां त्यांत शंकराचें यजन केलें नाहीं. असें पाहून, अक्रोध व्रत संपतांच, दक्षावर क्रोध पावलेल्या शंकरानें, असुरांसहित त्यानें मांडलेल्या यज्ञाचा नाश करण्याच्या उद्देशानें, क्रोधाग्नीनें तापलेला बाण सोडला. त्यानें यज्ञाचा तर फडशा पडला,

पण आणखी तेथें आलेले सर्व देवसुद्धां भयभीत झाले. तेव्हां त्यांनीं सप्त ऋषींच्या तोंडून वैदिक ऋचांनीं शंकराची स्तुति करविली व त्याचा क्रोध शांत केला. मग शंकराला प्रथमच उत्पन्न झालेल्या क्रोधाग्नीनें ह्मटलें कीं आतां आपण मला काय आज्ञा करतां ? तेव्हां शंकर ह्मणाला " जगांत ज्वररूपानें तुझें अस्तित्व राहो." जगांत ज्वराची प्रवृत्ति कशी झाली व त्याचा प्रभाव कसा आहे याचें कारण याप्रमाणें आहे.

ज्वराचे आठ प्रकार आहेत, ते येणें प्रमाणेः-वातज्वर, पित्तज्वर, कफज्वर, वातपित्तज्वर, पित्तकफज्वर, वातकफज्वर, संन्निपातज्वर, आणि आगंतुक ज्वर.

आळस, जांभया, शरीरांत जडपणा, खेद, अग्नि, ऊन, वारा व पाणी यांविषयीं नियमावांचून आवड किंवा तिरस्कारा, अपचन, तोंडाला विरसता, बळ व वर्ण यांची हानि, स्वभावांत बदल, हीं सर्व ज्वराच्या पूर्वरूपाचीं लक्षणें होत.

केवळ शरीर अथवा मनासहित शरीर हेंच ज्वराचें अधिष्ठान ( राहण्याची जागा ) होय असें ह्मटलें आहे.

रुक्ष, लघु व शीतपदार्थ, कसरत, वमन, विरेचन, मैथुन, उद्वेग, शोक, जागरण इत्यादिकांच्या अतिशय सेवनानें वायु कुपित होऊन व आमाशयांत प्रवेश करून, उष्णतेबरोबर मिळून, खाल्लेल्या अन्नास पचविणाऱ्या " रस " नामक धातूला शांत पाडून, रस व घाम यांस वाहणाऱ्या नाड्यांस झांकून, पचनाच्या स्थानांतून उष्णता बाहेर काढून शरीरावर आणतो, तेव्हां वातज्वर उत्पन्न होतो.

ताप एकदम चढला तसाच एकदम उतरला. अर्थात ताप एकदम पुष्कळ व थोडा आला ह्मणजे, पचनाच्या अंतीं, संध्याकाळीं

अथवा उन्हाळ्याच्या अंतीं ताप येणें अथवा जास्त होणें, नखें, डोळे, मूत्र, मळ आणि कातडी यांची लाली जाणें आणि तीं खरखरीत होणें, शरीराच्या अवयवांत वेदना होणें, गोळे येणें, सांधे तुटणें, कंबर, कुशी आणि कणा फुटणें, तोंडाला रुचि नसणें, तोंडांत ताळूला आणि गळ्यांत शोष पडणें, सुका खोकला येणें, अरुचि असणें, जांभया येणें, कंप असणें, श्रम, प्रलाप, जागरण आणि उष्णता यावर प्रीति असणें, हीं वातज्वराचीं लक्षणें होत. उष्ण, आंबट, खारट, तिखट आणि अजीर्ण झालें असतां जेवणें इत्यादि गोष्टींच्या अतिसेवनानें पित्त कोपून, तें कोपलेल्या वाताप्रमाणेंच, पचन स्थानांतून उष्णतेला बाहेर शरीरावर आणतें, तेव्हां त्यास पित्तज्वर ह्मणतात.

एकदम शरीरांत ताप चढतो, आणि अन्न पचन होते वेळीं, दुपारीं, मध्य रात्रीं अथवा सकाळीं फार करून ताप येतो. तोंड तिखट होणें, नाक तोंड कंठ ओठ आणि ताळू या ठिकाणीं पाक येणें, तृषा श्रम मोह मूर्च्छा, पित्ताची ओकारी येणें; अतिसार, अन्नाचा द्वेष, घाम, बडबड, शरीरावर फोड येणें, नखें डोळे तोंड मूत्रमळ आणि कातडी लाल होणें आणि थंड पदार्थांवर प्रीति उत्पन्न होणें वगैरे पित्तज्वराचीं लक्षणें होत.

स्निग्ध, मधुर, जड, थंड, खारट, आंबट पदार्थ खाणें, दिवसा निजणें, हर्ष आणि अतिशय कसरत करणें, यांनीं कफ कुपित होऊन वर सांगितल्याप्रमाणें वात आणि पित्त यांच्या प्रमाणें, पचनस्थानांतून उष्णता शरीरावर आणतो, तेव्हां त्याला कफज्वर ह्मणतात.

कफज्वर जेवल्यानंतर लवकरच भरतो. दुपाराच्या पूर्वी आणि वसंतकाळीं विशेषें करून तो उत्पन्न होतो. त्यांत शरीर जड होणें,

घशाशीं येणें, ओकारी येणें, जठराग्नि मंद होणें, फार झोंप येणें, आळस, श्वास, आणि नखें तोंड मूत्र मळ आणि कातडी पांढरी होणें, शरीरावर पांढरीं चक्रदळें पडणें आणि उष्णपदार्थांची आवड वाटणें वगैरे चिन्हें होतात.

वातपित्ताचीं, कफपित्ताचीं, वातकफाचीं आणि तिन्ही दोषांचीं चिन्हें वर सांगितलेलीं एकदम झालीं ह्मणजे अनुक्रमें वातपित्तज्वर, पित्तकफज्वर, वातकफज्वर आणि सन्निपातज्वर उत्पन्न झाला असें समजावें.

अभिघात, अभिशाप वगैरे कारणांनी उत्पन्न झालेल्या ज्वरास आगंतुक ज्वर ह्मणतात. हा ज्वर आल्यावर मागाहून त्यांत वातादि दोष मिश्र होतात.

देह आणि मन यांत संताप उत्पन्न होणें हें ज्वराचें मुख्य लक्षण आहे. कारण कीं शरीरांत ताप भरला असतां त्याचा कोणताही भाग तप्त झाल्यावांचून राहत नाहीं.

ज्वर शारीर आणि मानस असा दोन प्रकारचा आहे. हे दोन भेद सौम्य ( ज्यांत चंद्राचा अंश अधिक आहे असा ) आणि आग्नेय (ज्यांत अग्नीचा भाग जास्त आहे असा) अशा दोन भेदांनी दोन दोन प्रकारचे होतात. या शिवाय आणखी अंतर्वेग ( ज्याचा वेग शरीरांतच आहे ) आणि बहिर्वेग ( ज्याचा वेग शरीरावर दिसून येतो ) अशा दोन भेदांनीं त्यांचेही फिरून दोन प्रकार होतात. आणखी प्राकृत, वैकृत, साध्य आणि असाध्य अशा चार भेदांनीं त्या प्रत्येकाचे आणखी चार चार प्रकार होतात. दोषकाळ, बळ आणि अबळ यांच्या योगानें हा ज्वर संतत, सतत, अन्येद्युः, द्वितीयक आणि चतुर्थक अशा भेदांनीं त्यांचे पांच प्रकार होतात.

आणि शरीरांत असलेल्या सात धातूंमध्यें राहिल्यानें त्याचे सात प्रकार होतात. आणि वर सांगितल्याप्रमाणें कारणांच्या भेदांनीं त्याचे . आठ प्रकार होतात.

शारीर ज्वर पहिल्यानें शरीरांत उत्पन्न होतो आणि मानस ज्वर पहिल्यानें मनांत उत्पन्न होतो. बेशुद्धि, प्रीतीचा अभाव आणि ग्लानि हें मनाच्या तापाचें लक्षण आहे. आणि शरीराच्या तापाचीं लक्षणें प्रसिद्धच आहेत. यास्तव तीं येथें लिहित नाहीं.

वातपित्तात्मक ज्वरांत ( शीत ) थंडीची प्रधानता असते. वातकफात्मक ज्वरांत उष्णतेची प्रधानता असते. आणि शीत व उष्ण या दोहोंची ज्यांत उत्पत्ति असते त्यास व्यामिश्र ( एकत्र मिळालेला ) ज्वर असें ह्मणतात. वायूच्या ठिकाणीं योगवाहित्व ( ज्याच्याशीं योग होईल त्याची अभिवृद्धि करण्याचा गुण ) आहे ह्मणून अग्निगुणप्रधान जें पित्त त्याशीं मिळून तो दाह उत्पन्न करतो, आणि सोमगुण प्रधान जो कफ त्याशीं मिळून शीत उत्पन्न करतो. ज्वराचा अंतर्वेग आला ह्मणजे अधिक तृषा, बडबड, श्वासोच्छ्वास, संधि व अस्थि यांत शूळ, घाम नसणें, आणि बद्ध-कोष्टता इत्यादि लक्षणें होतात. ज्वराचा बहिर्वेग स्पष्ट आहे. त्याचें व्याख्यान देण्याचें प्रयोजन नाहीं. वसंत ऋतूंत आणि शरद् ऋतूंत आलेला प्राकृत ज्वर सुखसाध्य ह्मटला आहे. या दोनही ऋतूंत प्रकृति ( स्वभावा ) नेंच ज्वर उत्पन्न होण्याचें कारण हें आहे कीं वर्षा ऋतूंत आंबट विपाक उत्पन्न करणाऱ्या औषधींशीं व जळाशीं एकत्र झाल्यानें, पित्त शरदऋतूंत सूर्याच्या किरणांनीं पातळ होऊन ज्वर उत्पन्न करतें. त्याच प्रमाणें हेमंत ऋतूंत एकत्र झालेला कफ, वसंत ऋतूंतल्या सूर्याच्या किरणांनीं पातळ होऊन, ज्वर उत्पन्न करतो. असा या ऋतूचा स्वभाव आहे. यास्तव या वेळीं

उत्पन्न झालेला ज्वर प्राकृत असें ह्मणतात. ह्मणून दोषांचें बळाबळ पाहून त्यावर उपाय केले असतां तो ज्वर सुखानें बरा होतो. ह्मणून त्यास सुख साध्य असें वर ह्मटलें आहे. आणि यावेळीं वाताच्या प्रकोपानें उत्पन्न झालेला ज्वर कष्टसाध्य आणि असाध्य अशा अवस्थांस पोंचतो. शरद् आणि वसंत या शिवाय इतर काळीं उत्पन्न झालेल्या ज्वरास वैकृत असें ह्मणतात. या वैकृत ज्वराचीं निरनिराळीं कारणें सांगितलीं आहेत. बळवान मनुष्याच्या शरीरांत दोषांचा प्रकोप थोडा असल्यामुळें उत्पन्न झालेला ज्वर उपद्रव रहित असला तर सुखसाध्य आहे असें समजावें. आणि अनेक प्रबळ कारणांनीं उत्पन्न झालेला व अनेक लक्षणांनीं युक्त असा इंद्रियांचा नाश करणारा ज्वर प्राण घेतो. यास्तव तो असाध्य समजावा. हा ज्वर सात दिवसांचा, दहा दिवसांचा अथवा बारा दिवसांचा असून बडबड होऊन, तीक्ष्णपणानें रोग्यास मारतो. रसवाहीं नाड्यामध्यें असलेले गुरु दोष शरीरांत पसरल्यानें सतत ज्वर उत्पन्न होतो. हा ज्वर बारा दिवस, दहा दिवस अथवा सात दिवस राहून निवर्तें अथवा मृत्यु आणतो. काळ, दूष्य आणि प्रकृति यांशीं समानस्वभावाचा दोष औषधानें लवकर बरा होत नाहीं. यामुळें हा न निवर्तणारा ताप दुःसह ह्मटला आहे. संतत ज्वरांत धातु, मूत्र, मळ यांस वातादि दोष धरून ठेवितात. हा ज्वर शुद्धि अथवा अशुद्धि यांनीं सात दिवसांत बरा होतो अथवा मरण आणतो. संतत ज्वराचे बारा आश्रय आहेत ते येणें प्रमाणें:—वायूचे विकार ३, सप्तधातूंचे ७, मूत्राचा एक आणि मळाचा एक. बाराव्या दिवशीं लक्षण स्पष्ट दाखवून फार दिवसपर्यंत हा सततज्वर चालू असतो. यास्तव या ज्वरांत अपतर्पण ( लंघनादि ) क्रिया वैद्यानें करवावी. फार करून रक्त धातूचा आश्रय करून दोष संतत ज्वराला उत्पन्न करितात.

हा सतत ज्वर रात्रीं व दिवसा मिळून दोन वेळां येतो. काळ, प्रकृति आणि दूष्य (धातु) यापैकीं कोणत्याही एका पदार्थामुळें बळवान होऊन दोष मेदधातला वाहणाऱ्या नाड्यांस व्यापून अन्येद्यु नामक ज्वरास उत्पन्न करितात. हा ज्वर अहोरात्रांत एकच वेळ येतो. अस्थि आणि मज्जा यात प्रविष्ट झालेले दोष तृतीयक आणि चातुर्थिक नांवाचे ज्वर उत्पन्न करतात. एक दिवस सोडून दुसऱ्या दिवशी येणाऱ्या तापास तृतीयक आणि दोन दिवस सोडून तिसरे दिवशी येणाऱ्या तापास चातुर्थिक ज्वर असे ह्मणतात. ज्याप्रमाणें जमीनींत पाहिलेलें बीज वेळेवर उगवतें, त्याप्रमाणें धातूंत राहिलेले दोष वेळेवर प्रगट होतात. प्रगट होते वेळीं वेग दाखवून, नंतर आपआपल्या स्थानांत प्रविष्ट होऊन, दोष स्थिर होऊन बसतात. यानंतर फिरून वेळ येताच पुन्हा वेग उत्पन्न होतो. कफपित्त-प्रधान ज्वर पहिल्यापासूनच त्रिक (पाठीच्या खालचा भाग) धरून बसतो. वातकफप्रधान ज्वर पाठीचा कणा धरतो आणि वातपित्तप्रधान ज्वर मस्तकाला धरतो. याचप्रमाणें तृतीयक ज्वर अनेक प्रकारची पीडा उत्पन्न करितो. चातुर्थिक ज्वर कफप्रधान असला तर मांड्यास धरतो आणि वातप्रधान असला तर मस्तक धरतो. हे सर्व विषमज्वर या नावाखालीं मोडतात. रस धातूंत ज्वरानें प्रवेश केला असला तर शरीरांत जडपणा, उद्वेग, वेदना, ओकारी आणि अरुचि हीं चिन्हें होतात. रक्तांत दोष राहिला तर शरीराच्या वरच्या भागीं दाह, आंग मोडणें, जांभया येणें, लाल व उष्ण असे फोड उठणें, तृष्णा, वारंवार रक्तमिश्र थुंकी येणें, दाह, राग (शरीरावर लाली येणें), भ्रम, मद व बडबड वगैरे उत्पन्न होतात. मांसांत ज्वर राहिला असला तर शरीरांत दाह, तृषा, मोह, ग्लानि, शौचास साफ न होणें, दुर्गंधी आणि कळा मारणें हीं चिन्हें

होतात. मेदामध्यें ज्वर प्रविष्ट झाला असला तर घाम अत्यंत तहान, बडबड, वारंवार ओकाऱ्या आणि आपल्या शरीराची असहनता ही लक्षणें होतात. हाडांत ज्वर प्रविष्ट झाला असला तर ग्लानि: अरुचि, शौचास होणें, वांति, पोटांत गुरगुराट, हाडांचे सांधे दुखणें, शरीरांत कळा मारणें व श्वास लागणें हीं लक्षणें होतात. मज्जेमध्यें ज्वर प्रविष्ट झाला असला तर उचकी, श्वास, खोकला, डोळ्यांस अंधाऱ्या येणें, मर्मस्थानांत पीडा, शरीराला थंडपणा आणि आंत दाह अशी लक्षणें होतात. शुक्रांत ज्वर शिरला असला तर तो शुक्राचा स्राव करून किंवा त्याचा क्षय करून, नाश करतो. हा ज्वर रस, रक्त, मेद आणि मांस यांत प्रविष्ट झाला असला, तर साध्य, अस्थि आणि मज्जा यांत प्रविष्ट झाला असला तर कष्टसाध्य, आणि शुक्रांत प्रविष्ट झाला असला तर असाध्य, असें समजावें.

मस्तकांत पीडा, सांधे फुटणें, दाह, रोमांच उभे राहणें, कंठ आणि मुख सुकणें, ओकारी, तहान, मूर्च्छा, भ्रम, अरुचि, निद्रेचा नाश, बडबड व जांभया येणें, हीं वातपित्तानें उत्पन्न झालेल्या तापाचीं चिन्हें होत.

थंडी वाजणें, शरीर जड होणें, तंद्रा (आळसट वाटणें) नाक पडणें, सांधे फुटणें, मस्तक धरणें, शैत्य, खोकला, घाम वारंवार येणें व बंद होणें, संताप आणि शरीराचा सामान्य दाह, हीं वातश्लेष्म दोषानें उत्पन्न झालेल्या ज्वराचीं लक्षणें जाणावीं.

वारंवार दाह होणें, वारंवार थंडी वाजणें, वारंवार घाम येणें व लगेच बंद होणें, मोह, खोकला, अरुचि, तहान, श्लेष्म आणि पित्ताची प्रवृत्ति, तोंड चिकट व कडू होणें, आणि सुस्ती वाटणें, हीं श्लेष्मपित्त दोषामुळें उत्पन्न झालेल्या ज्वराचीं लक्षणें होत.

वातपित्ताचा जोर अधिक आणि कफाचा कमी अशा संन्निपात ज्वरांत भ्रम, तहान, दाह व मस्तक जड होणें व वेदना हीं उत्पन्न होतात.

वातकफाचें प्राबल्य व पित्ताची न्यूनता अशा सन्निपात ज्व-रांत थंडी, खोकला, अरुचि, सुस्ती, तहान, दाह आणि पीडा हीं लक्षणें होतात.

पित्तकफाचें आधिक्य आणि वाताची न्यूनता अशा सन्निपात ज्वरांत ओकारी. थंडी. वारंवार दाह, तहान, मोह आणि हाडांत वेदना हीं लक्षणें होतात.

वाताचें आधिक्य आणि कफपित्ताची न्यूनता अशा सन्नि-पातांत सांधे. हाडें आणि मस्तक यांत शूळ, बडबड. शरीर जड होणें, श्रम. तृषा. आणि घशांत तोंडाला कोरड हीं लक्षणें होतात.

पित्ताचें आधिक्य आणि वातकफाची न्यूनता अशा सन्निपात ज्वरांत मूत्र आणि मळ हीं लालभडक असतात. आणि दाह, स्वेद, तृषा. शक्तिपात. आणि मूर्च्छा हीं लक्षणें होतात.

कफाचें आधिक्य आणि वातपित्ताची न्यूनता अशा सन्निपात ज्वरांत सुस्ती, अरुचि, तोंडाला पाणी सुटणें, दाह, ओकारी, चैन नसणें, श्रम, झोंप येत नसतांही झोंपेचा भास व खोकला हीं लक्षणें होतात.

वाताची हीनता. पित्ताची मध्यमता आणि श्लेष्म्याची अधि-कता अशा सन्निपात ज्वरांत शैत्य, ओकारी, सुस्ती, झोंप नसतांनाही झोंपेचा भास. अरुचि आणि जठराग्नीचा मंदपणा हीं लक्षणें होतात.

वाताची हीनता, कफाची मध्यमता आणि पित्ताची अधिकता अशा सन्निपात ज्वरांत मूत्र व नेत्र हळदीसारखे पिंवळे होऊन, दाह, तृष्णा आणि भ्रम हीं लक्षणें होतात.

पित्ताची हीनता, कफाची मध्यमता आणि वाताची अधिकता अशा सन्निपात ज्वरांत मस्तकांत वेदना. कंप. श्वास. ओकारी आणि अरुचि हीं लक्षणें होतात.

पित्ताची हीनता, वाताची मध्यमता आणि कफाची अधिकता अशा सन्निपात ज्वरांत थंडी, शरीर जड होणें, सुस्ती, बडबड आणि हाडांत व मस्तकांत अतिवेदना हीं चिन्हें होतात.

कफाची हीनता, पित्ताची मध्यमता आणि वाताची अधिकता अशा सन्निपात ज्वरांत श्वास, कास, शैत्य, तोंड सुकून जाणें आणि कुशींत वेदना हीं लक्षणें होतात.

कफाची हीनता, वाताची मध्यमता आणि पित्ताची अधिकता अशा सन्निपातांत सांधे फुटणें, अग्निमांद्य, तृष्णा, दाह, अरुचि आणि भ्रम हीं लक्षणें होतात.

तीन्ही दोषांचा समान कोप झाला असेल तर वर लिहिल्या प्रमाणें तीन्ही दोषांचा मिलाफ दिसून येतो.

क्षणांत दाह, क्षणांत थंडी, हाडांत, सांध्यांत आणि मस्तकांत पीडा, पाणी गळणें, तांबडी, गढूळ आणि खाली नमलेली दृष्टि, कानांत घणघणाट होणें व तोंड सुकणें, घसा घरघरणें, सुस्ती, मोह, बडबड, कास, श्वास, अरुचि, भ्रम, भाजल्यासारखी व खरखरीत जीभ, अंगाची शिथिलता, तोंडावाटे कफाचे व रक्ताचे बडके पडणें, डोकें कांपणें, तृष्णा, झोपेचा नाश, हृदयांत पीडा, स्वेद, मूत्र व मळ हीं फार दिवसांनीं थोडीं होणें, अशक्त होणें, घरघर शब्द होणें, काळें आणि×लाल मंडल व गांठी येणें, न बोलणें, नेत्र नासादिक पिकणें, पोट जड होणें आणि वातादिक दोष फार दिवसांनीं पिकणें हीं सारीं संन्निपात ज्वराचीं लक्षणें होत.

दोष वाढले आणि जठराग्नि मंद झाला ह्मणजे वर सांगितलेलीं सर्व लक्षणें ज्यांत आहेत असा सन्निपात ज्वर असाध्य समजावा आणि याच्या उलट प्रकार असेल तर कष्टसाध्य समजावा.

वर सांगितलेला आगंतुक ज्वर अभिघात, अभिषंग, अभिचार आणि अभिशाप अशा चार कारणांमुळें उत्पन्न होत असल्याकारणानें चार प्रकारचा मानिला आहे.

शस्त्र. मातीचे पिंड, चाबूक, लाकूड, मूठ, तळाथ आणि दांत हे अथवा यासारखे दुसरे पदार्थ शरीरास लागल्यानें उत्पन्न होणारा आगंतुक ज्वर अभिघातजन्य होय. अभिघातानें कोपलेला वायु रक्ताला दूषित करून, व्यथा, सूज आणि विवर्णता हीं लक्षणें उत्पन्न करून त्रासदायक ज्वर आणतो.

काम, शोक, भय, क्रोध आणि भूत यांच्या संबंधानें उत्पन्न झालेला ज्वर, अभिषंगजन्य होय. काम, शोक आणि भय यांनीं वायु कोपतो. क्रोधानें पित्त कोपतें. आणि भूत संबंधानें तीन्ही दोष कोपतात. यामुळें शरीरांत ज्वर उत्पन्न होतो. विषारी झाडावरून येणाऱ्या वाऱ्याच्या स्पर्शानें आणि इतर विषप्रयोगानें उत्पन्न झालेला ज्वरही अभिषंगजन्य ज्वर म्हणतात. हा ज्वर विषाचें निरसन करणाऱ्या चिकित्सेनेंच दूर होतो.

अभिचार (मारणप्रयोग) आणि अभिशाप यामुळें तीन्ही दोष कोपून, जो ज्वर येतो, तो सहन न होण्यासारखा व भयंकर असतो या ज्वराचीं लक्षणें सन्निपात ज्वरासारखीं असतात. या ज्वरांत चित्त, इंद्रियें व शरीर यासंबंधी अनेक प्रकारची पीडा उत्पन्न होते. या दोहोंपैकीं जो ज्वर अभिचाराच्या उपायानें बरा होतो, तो अभिचारजन्य समजावा आणि अभिशापाच्या उपायानें बरा होईल तो अभिशापजन्य समजावा.

ध्यान आणि उसासे टाकणें हीं लक्षणें ज्यांत दिसून येतात, तो कामज्वर समजावा. शोकज्वरांत अश्रु पुष्कळ येणें; भयज्वरांत

अतिशय भय वाटणें व क्रोधज्वरांत अतिशय क्रोध येणें; भूत ज्वरांत अलौकिक चेष्टा करणें आणि विषजन्य ज्वरांत मूर्च्छा, मोह, मद, ग्लानि यांची अधिकता असणें, हीं लक्षणें होतात. या कामज्वरादिकांच्या लक्षणांत केव्हां केव्हां पहिल्यानें संताप उत्पन्न होतो आणि केव्हां केव्हां मागाहून संताप उत्पन्न होतो. कफादिकांपासून उत्पन्न होणाऱ्या ज्वरांचीं लक्षणें वर सांगितलीं, तींच कामादिकांनीं उत्पन्न होणाऱ्या इतर रोगांमध्येंही होतात ह्मणून समजावें.

आगंतुक ज्वर उत्पन्न झाल्यावर मग त्यांत दोष येऊन मिळतात, ह्मणून ज्यांत जे दोष अधिक दिसतील, त्यांत त्या त्या दोषांची निवृत्ति करण्याचे उपाय योजावे. कामादिकांनीं मनाचा आश्रयास झाला तर जसें ज्वराचें बळ असतें तसें मन हें जेव्हां कामादिकरहित असतें, तेव्हां नसतें. दोन दोष, तीन दोष अथवा एकच दोष कोपून, जेव्हां रस धातूंत झिरतो व पक्वाशयांतून जठराग्नीला बाहेर काढून त्या अग्नीनें सगळें शरीर उष्ण करतो, त्याच प्रमाणें धातूंला वाहणाऱ्या नाड्यांस तो बंद करतो, तेव्हां शरीरांत अत्यंत संताप होतो. अशा पुरुषास ज्वरित असें ह्मणतात. नवीन ज्वरांत जठराग्नि आपल्या स्थानांतून भ्रष्ट होतो आणि नाड्या बंद झाल्यामुळें मनुष्यास घाम येत नाहीं.

आमज्वरांत अरुचि, अन्न न पचल्यामुळें पोटांत जाड्य, हृदय स्वच्छ न वाटणें, झोंप नसतांना झोंपेचा भास, आळस, ताप फार चढणें, वात, पित्त आणि कफ यांचा विषमपणा, मुखांतून लाळ गळणें, किळस येणें, क्षुधेचा नाश, तोंड चिकट होणें, गात्रें स्तब्ध, शून्य व जड होणें, लघवीस फार होणें, आणि ग्लानि हीं लक्षणें होतात. निरामज्वरांत भूक, कृशपणा, शरीर हलकें वाटणें, ज्वराची कोमलता आणि दोषांची समगति हीं लक्षणें होतात.

**चिकित्सा**—नवीन ज्वरांत दिवसास निजणें, स्नान, अभ्यंग, अन्न, स्त्रीसंग, फार वारा, मेहनत व कषाय पदार्थ यांचा त्याग करावा.

क्षय, वात, भय, क्रोध, काम, शोक व श्रम यांमुळें आलेल्या ज्वरांशिवाय इतर ज्वरांत पहिल्यानें लंघन करावें; कारण लंघनानें दोषाचा क्षय, जठराग्नीचें दीपन, ज्वराचा अभाव, शरीर हलकें वाटणें व क्षुधा उत्पन्न होणें वगैरे लाभ होतात. रोग्याचें शरीर शक्तिहीन होऊं नये इतकें लंघन करावें. कारणकीं आरोग्य बलाचा आश्रय करून राहतें. हे लक्षांत ठेवून चिकित्सेचा क्रम सांगितला आहे.

नव्या तापांत लंघन, स्वेदन, वेळ, यवागु, कडू रस, न पचलेल्या दोषास पचविणारा पदार्थ इतक्या गोष्टी हितकर आहेत. वातकफामुळें उत्पन्न आलेल्या ज्वरानें रोग्याला तहान लागली तर त्याला ऊन पाणी प्यावयास द्यावें. मद्यानें किंवा पित्तानें आलेल्या ज्वरावर कडू पदार्थ उकळून थंड केलेलें पाणी प्यावयास द्यावें. दीपन व पाचन औषधें ज्वरावर हितकर झालीं आहेत.

आपल्या स्थानांतून निघून आमाशयांत शिरलेल्या तापाला उत्पन्न करणाऱ्या कफप्रधान दोषांस प्रसंग पाहून बाहेर काढावें. दोष निघाल्या नसल अशा वेळीं, नव्या ज्वरांत, ओकारी काढल्यानें हृद्रोग, श्वास, पोट फुगणें वगैरे रोग उत्पन्न होतात. ज्याप्रमाणें कच्च्या फळांचा रस काढणें कठिण आहे, त्याचप्रमाणें सगळ्या देहांत पसरलेल्या व धातूंत शिरलेल्या दोषांसही बाहेर काढणें फार कठिण आहे. अथवा जाणल्यावांचून दोष बाहेर काढण्याचा प्रयत्न केल्यानें रोग्याचा नाशसुद्धां होण्याचा संभव आहे. ओकारी व लंघन करविलेल्या रोग्यास पहिल्यानें योग्य पदार्थांची केलेली

कण्हेरी वगैरे हलके पदार्थ द्यावे. याप्रमाणें साहा दिवस, अथवा ज्वर हलका पडे तोंपर्यंत, उपचार करतां येईल, तर हुताग्नीप्रमाणें जठराग्नि प्रदीप्त होतो. हा उपाय हळूहळू व औषधांच्या संयोगानें वात, मूत्र, पुरीष व दोष यांचें अनुलोमन व अग्नीचें उद्दीपन करणारा आहे. उष्णपणामुळें घाम आणणारें, पातळ असल्यामुळें तहान नाहींशी करणारें, खाण्या लायक पदार्थ असल्यामुळें, बळ देणारें, सरवणारा पदार्थ असल्यामुळें शरीराला हलकेपणा आणणारें आणि ज्वराला सात्म्य असल्यामुळें ज्वर हरणारें असें कण्हेरीचें पान आहे. ह्मणून तें रोग्यास पाजावी. जेवणाच्या वेळीं रोग्यानें आपल्या तोंडाच्या रसाहून वेगळ्या रसाचें व मनाला आवडेल अशा प्रकारचें, दांत घासण्याचें दांतवण असावें. ज्वर येऊन साहा दिवस झाल्यावर पचन करणारा व दोषास शमविणारा असा काढा द्यावा व हलकें अन्न खावयास घालावें. ज्वर येतांच काढा प्याल्यानें दोष पक्क होत नाहीं. पण उलटा अडथळा झाल्यामुळें कोपून विषमज्वर उत्पन्न करतात. साहा दिवसांपासून दहा दिवसांपर्यंत आंबट किंवा आंबटाशिवाय असें मुगांच्या डाळीचें पाणी व हलकें अन्न खावयास दिल्यानें ज्वर शांत होतो. कफाचा प्रकोप शांत झाल्यावर वातपित्ताच्या प्रकोपाची निवृत्ति करण्यासाठीं तूप प्यावयास द्यावें; त्याचा गुण अमृतासारखा आहे. दहा दिवस झाल्यावरही लंघन केल्याशिवाय कफाची शांति होणार नाहीं तर कषाय प्यावयास द्यावे, परंतु तूप देऊं नये. वातपित्त प्रधान अशा निरामज्वराची शांति करण्याकरितां दूध प्यावयास द्यावें. याप्रमाणें उपाय केल्यानेंही ज्वर शांत होत नाहीं असें दिसलें, तर रोग्याचें शरीर मजबूत असल्यास त्याला विरेचनही द्यावें. ज्वरामुळें अशक्त झालेल्या मनुष्यास वमन व विरेचन हीं हितकारक

नाहींत. यास्तव अशा रोग्यांस दुग्धपान आणि निरूह बस्ती देऊन आरोग्य प्राप्त होईल अशी तजवीज ठेवावी. जीर्ण ज्वरांत कफपित्त शांत झाल्यावर, जठराग्नि प्रबळ असल्यास, रोग्यास शौचास साफ व्हावें ह्मणून अनुवासन बस्ति द्यावा. जीर्ण ज्वरावर, शरीराची गुरुता, मस्तकशूळ आणि इंद्रियांचें असामर्थ्य वगैरे विकार दूर करण्याकरितां रुचि उत्पन्न करणारें शिरोविरेचन द्यावें.

कांजी, भात, लाह्या आणि भाजलेलें पीठ खावयास द्यावयाची जरूर पडली, तर ते पदार्थ करण्यांत जुनें भात आणि साठी तांदूळ घ्यावे. त्याच्या योगानें ज्वराची निवृत्ति होते. आंबट पदार्थ खाण्याची इच्छा करणाऱ्या रोग्याला डाळिंबाच्या रसांत कांजी तयार करून त्यांत सुंठ घालून द्यावी. ज्यांस शौचास फार होतें अशा रोग्यांस, पित्त ज्वरावर थंड केलेल्या कांजींत मध घालून ती प्यावयास द्यावी. ज्याचा अग्नि मंद झाला आहे अशा रोग्यास प्रथम भूक लागेल तेव्हांच लौकर पचणारी भाताच्या लाह्यांची पेज करताना तींत पिंपळी आणि सुंठ घालून उकळावी व ती प्यावयास द्यावी. कषाय, वमन, लंघन आणि हलकें जेवण यांच्या योगानें ज्याचा ज्वर शांत होत नाहीं अशा रूक्ष शरीराच्या रोग्यास तूप पाजणें हेंच उत्तम औषध आहे. त्याला काढा देण्याची जरूर दिसली तर त्यांतही तूप टाकावें. हजार वेळां वेगवेगळ्या पाण्यानें तूप धुऊन त्याचें अभ्यंग केल्यानें ज्वरासंबंधी दाह शांत होतो. ज्वरसंबंधी दाहानें पीडलेल्या रोग्यास पाणी शिंपून थंडगार केलेल्या पुष्पांचे शय्येवर निजविलें असतां त्याचा दाह शांत होतो.

रसांत दोष शिरून आमाशयांत असलेल्या अग्नीला बाहेर काढतात. तेव्हां अग्नीचें बळ क्षीण होतें, ह्मणजे खाल्लेलें अन्न

तो पचवूं शकत नाहीं. यास्तव ज्वरांत अग्नीचें संरक्षण करण्यासाठीं लंघनादिक उपायक्रमच उत्तम आहे. सात दिवसांनीं सर्व दोष पक्व होतात आणि आठव्या दिवशीं ज्वर शांत होतो. ज्याच्या शरीरांत दोष अत्यंत कोपले आहेत आणि जठराग्नि अत्यंत मंद झाला आहे. त्यास गुरुपदार्थांचें भोजन झालें असतां, लवकरच मरण येतें, अथवा पुष्कळ दिवसपर्यंत खितपणीस पडावें लागतें. कफप्रकृतीच्या मनुष्यास व वात नसल्यास, ग्रीष्म ऋतुशिवाय इतर कोणत्याही ऋतूंत आलेला कफज्वर सात दिवसपर्यंत पक्व होत नाहीं. त्याच प्रमाणें ज्याचा जठराग्नि मंद आहे त्या रोग्याचा ज्वरही सात दिवसपर्यंत पक्व होत नाहीं, यास्तव त्यास पक्व करण्याकरितां दहा दिवसपर्यंत लंघन करवावें किंवा अल्प भोजन द्यावें. नंतर काढ्याचा वगैरे उपयोग करावा. सामज्वर, कफज्वर आणि कफपित्तज्वर यांत लंघन करविणें हेंच उत्तम औषध आहे. कफपित्त आणि वात यापासून उत्पन्न झालेल्या ज्वरांत अनुक्रमें वमन, विरेचन आणि बस्ति यांचा उपयोग केल्यानें आराम वाटतो. जो दोष कमी झाला असेल तो वाढविल्यानें आणि वाढलेला ज्वर हटविल्यानें सान्निपात ज्वर शांत होतो. सन्निपात ज्वरांत कानाच्या मुळांत सूज येते आणि ती आली म्हणजे रोगी क्वचितच वांचतो. ही सूज उतरावली असतां अथवा घृतपान करविलें असतां, प्रसंगीं ज्वर बरा होतो. वर सांगितल्या औषधांनीं जे ज्वर बरे होत नाहींत ते शिरा काढल्यानें बरे होतात. विसर्प, अभिघात आणि विस्फोट यापासून आलेल्या ज्वरांत जर कफ किंवा पित्त प्रधान नसलें तर त्यावर तूप पाजावें हा उत्तम उपाय आहे. एकांत्राड तापावर आणि चातुर्थिक तापावर सर्व साधारण कर्माचा त्याग करून, जर ताप वातप्रधान नसला तर, त्याची चिकित्सा करतांना तूप, अनुवासनबस्ति आणि स्निग्ध व उष्ण अनुपान वगैरे

उपायक्रम ठेवावा. पित्तप्रधान विषमज्वरावर ज्वरहारक औष-धांचा संस्कार केलेलें दूध आणि तूप, विरेचन, आणि कडू व शीत वीर्य असे उपाय योजून चिकित्सा करावी. कफप्रधान विषम-ज्वरावर वमन, पाचन, लंघन आणि उष्ण कषाय हे उपाय योजून चिकित्सा करावी. विषम ज्वरांत मांसाहारी मनुष्यांस सपाटून मद्य पाजून ओकारी येईसें करावें. विषम ज्वराच्या रोग्यानें जेव-णापूर्वी तेलांत लसून तळून खावी.

रसधातूंत ज्वर राहिला असला तर वमन आणि उपवास करावा. रक्तांत असला तर शेक व बंधाण करवावें. मांस आणि मेद यांत ज्वर असला तर उपवास करून आणखी विरेचन द्यावें. आणि अस्थि व मज्जा यांत राहिला असेल तर अनुवासन बस्ति द्यावा. शाप, अभिचार आणि भूतसंसर्ग यामुळें आलेल्या ज्वराच्या निवृत्तीसाठीं दैवी उपाय योजावे, म्हणजे विष्णुसहस्रनामाचे पाठ, महादेवाचें पूजन वगैरे. अभिघात ज्वराच्या निवृत्तीसाठीं घृतपान आणि अभ्यंग हेच उपाय उत्तम आहेत. क्षत आणि व्रण यामुळें आलेल्या तापावर क्षत आणि व्रण यांची जी चिकित्सा तीच चिकित्सा करावी. काम, शोक आणि भय यामुळें आलेला ताप, आश्वासन, इष्ट वस्तूचा लाभ, वायूचें शमन आणि हास्यप्रसंग यांच्या योगानें शांत होतो. मनोहर पदार्थ, पित्तहारक औषध आणि विनवण्या यांच्या योगानें क्रोधज्वर शांत होतो. कामानें क्रोधज्वर बरा होतो. व क्रोधानें कामज्वर बरा होतो; आणि या दोहोंच्या योगानें भयजन्य व शोकजन्य ज्वर शांत होतो. तापाचें स्मरण झाल्यानें ज्याला ताप येतो, त्याला त्याचें विस्मरण पडेल अशीच चिकित्सा करावी. जेव्हां शरीरांतून खेद आणि ताप शांत होतो, इंद्रियें निर्मळ होतात, शरीर हलकें होतें आणि पूर्वीप्रमाणें प्रकृति आणि बळ हीं प्राप्त होतात,

तेव्हां शरीर ज्वरमुक्त झालें असें समजावें. ज्याच्या शरीरांत ज्वर असेल अथवा ज्याचा ज्वर नुकताच बंद झाला आहे. त्यानें आग उत्पन्न करणारें मिरचा वगैरे पदार्थ, गुरु आणि असात्म्य अन्नपान यांचा उपयोग करूं नये. शिवाय स्त्रीसंग, फार हालणें चालणें आणि स्नान या गोष्टींचा त्याग करावा. ह्मणजे ज्वर शांत होऊन उलटत नाहीं. औषधोपचारांनीं जो ज्वर बरोबर शांत झाला नाहीं, तो उलटतो. आणि उलटलेला ज्वर प्रथमच अशक्त झालेल्या मनुष्यास तात्काळ मरण आणतो. उलटलेल्या तापावर किराइत, कुटकी, नागरमोथा, खडसली आणि गुळवेल, ही सर्व औषधें वाटून प्यावयास द्यावी.

---

## रक्तपित्त.

**निदान**—उन्हांत अतिशय फिरल्यानें, महनत केल्यानें, अतिशय शोक केल्यानें, फार प्रवास केल्यानें, अत्यंत मैथुन केल्यानें, आणि तीक्ष्ण, उष्ण, क्षार, लवण, आंबट व तिखट पदार्थ खाल्यानें, पित्त फार खवळून लौकरच रक्ताला तापवितें. नंतर तें रक्त वरच्या व खालच्या किंवा दोन्ही मार्गांनीं सर्व शरीरांत पसरतें. वरच्या मार्गानें नाक, नेत्र, कान आणि तोंड यामधून रक्त वाहतें आणि खालच्या मार्गानें शिश्न अथवा योनि आणि गुदा यांतून वाहतें. हें रक्त जेव्हां अतिशय कोपतें तेव्हां अंगावरील लवेंतून घामाप्रमाणें तें बाहेर निघूं लागतें. रक्तपित्त होण्यापूर्वीं चित्तवृत्ति उदास होते, शरीरांत सुस्ती वाटते, थंड पदार्थांविषयीं प्रेम वाटतें, कंठांतून धूर निघत आहे असा भास होतो, ओकाऱ्या होतात, आणि तापलेल्या तव्यावर पाणी टाकलें असतां जसा गंध येतो तसा रोग्याच्या श्वासाला गंध येतो.

जर घट्ट, किंचित श्वेत व पिवळ्या रंगाचें, चिकट आणि चकचकित रक्त वाहत असेल, तर रक्तपित्तरोग कफयुक्त आहे असें समजावें. असमानी, लाल, फेसाळ, पातळ, व रूक्ष असें रक्त असेल, तर वातयुक्त रक्तपित्तरोग समजावा. जर भगव्या रंगाचें, गाईच्या मुतासारखें काळें, मृदंगाच्या शाईसारखें, धुरासारखें आणि सुरम्यासारखें रक्त असेल, तर तो पित्तयुक्त रक्तपित्त विकार समजावा. ज्यांत वातपित्तादि दोन दोषांचीं लक्षणें दिसतात, त्यास दोन दोषांनीं युक्त रक्तपित्तरोग ह्मणावा. ह्याचप्रमाणें ज्यांत तीन दोषांचीं लक्षणें आढळतील, त्यास त्रिदोषज रक्तपित्त रोग समजावा. ज्यांत ऊर्ध्व मार्गानें रक्त वहातें, त्यांत वायूचा रोग अधिक आहे असें समजावें. आणि ज्यांत दोनही ऊर्ध्व व अधो मार्गांनीं रक्त वाहूं लागलें, त्यास वात व पित्त यामुळें उत्पन्न झालेला रक्तपित्तरोग होय असें जाणावें.

ऊर्ध्व मार्गीं रक्तपित्त असेल तर तें साध्य समजावें; अधोभागीं असेल तर तें कष्टसाध्य; आणि दोनही मार्गीं असेल तर तें असाध्य जाणावें. याशिवाय तें रक्तपित्त जर बळकट मनुष्यास झालें असेल, ऊर्ध्व मार्गी वहात असेल व थोड्याच दिवसांवर उत्पन्न झालेलें असेल, शिशिर ऋतूंत सुरू झालें असेल, त्याचा वेग फार तीव्र नसेल, व त्याच्यापासून उपद्रवही विशेष होत नसेल, तर तें साध्य समजावें. त्याचप्रमाणें एकाच दोषापासून झालेलें असेल तर तेंही बरें होतें; दोन दोषांपासून आलेलें सुद्धां जेमतेम बरें होऊं शकतें; परंतु तीनही दोषांपासून आलेलें रक्तपित्त मात्र कधींच बरें होत नाहीं. ज्याचा जठराग्नि मंद झाला आहे, ज्याचें शरीर कृश झालें आहे, जो वृद्ध झाला आहे व ज्याला चापून जेवण जात नाहीं,

अशा रोग्याचें रक्तपित्तही असाध्यच होय. मांसाच्या धुवणीसारखें, कुजलेल्यासारखें, गढूळ पाण्यासारखें, मेद, पू व रक्त यांच्या सारखें, यकृतासारखें, पिकलेल्या पेरूसारखें, काळ्या व हिरव्या रंगाचें, उपद्रवानें युक्त अथवा अनेक रंगाचें असें रक्तपित्त असाध्य असल्यामुळें उपचार करण्यास योग्य नाहीं. आणखी रक्तपित्त झालेल्या ज्या रोग्यास पदार्थमात्र व आकाश हीं तांबडीं दिसतात, रक्ताच्या ओकाऱ्या होतात, ज्याचे नेत्र तांबडे झाले व ज्यास ढेंकरांत सुद्धां रक्त पडतें, असा रोगी सुद्धां असाध्यच समजावा.

रक्तपित्त झाल्यानें अशक्तता, श्वास, कास, ज्वर, ओकारी, बेशुद्धि, शरीर फिकट होणें, आग, मूर्च्छा, जेवल्यावर ढेंकर व जठर जळ, अधीरपणा, निरंतर हृदयांत अपूर्व दुःख, तहान, शौचास पातळ होणें, मस्तक तापणें, दुर्गंधयुक्त थुंकी, अन्नावर अरुचि व अपचन हीं लक्षणें होतात.

**चिकित्सा**- हा रोग अग्नीप्रमाणें मनुष्याला ताबडतोब मृत्यु देतो, यास्तव त्याची लौकर चिकित्सा करावी. ज्याचें बळ आणि मांस क्षीण झालें नाहीं आणि ज्याला जेवण्याची शक्ति आहे अशा मनुष्याच्या शरीरांत उपटलेलें रक्तपित्त एकदम बंद करूं नये. जर एकदम बंद केलें तर त्यामुळें गलग्रह, नाकांत गंध, मूर्च्छा, अरुचि, ज्वर, गांठ, कवळ, पोट फुगणें, किलास, मूत्रकृच्छ्र, कुष्ट, अर्श, कानकिरळी, शरीर पांढरें होणें, भगंदर आणि बुद्धि व इंद्रियें यांचा गोंधळ हीं लक्षणें होतात. यास्तव मनुष्याचें व रोग्याचें बलाबळ पाहून, वैद्यानें तें वाहूं द्यावें. फार करून हा रोग मेदाच्या विकारापासून उत्पन्न होतो. यास्तव या रोग्यास प्रथम लंघन द्यावें. त्याला तहान लागेल तेव्हां काळा वाळा, पांढरा वाळा,

चंदन, नागरमोथा व खडमली हीं औषधें घालून उकळलेलें अथवा नुसतें उकळविलेलें पाणी थंड करून प्यावयास द्यावें. काळ व प्रकृति जाणणाऱ्या वैद्यानें वरल्या मार्गी असलेल्या या रोगाच्या निवृत्तीसाठीं तर्पण उपाय योजावे. खालच्या मार्गी असेल तर पहिल्यानें पेया द्यावी. तर्पण करण्याचा प्रकार असा आहे कीं खजूर, द्राक्ष व फालसा हीं पाण्यांत उकळून, थंड झाल्यावर त्यांत साखर घालून, तें पाणी प्यावयास द्यावें. भाजलेल्या भाताच्या लाह्यांच्या पिठांत मध व साखर कालवून खावयास द्यावें. तेंही तर्पण म्हणून म्हटलें आहे. सातू, साठी तांदूळ, नाचणी, कोद्रू, शाता आणि कांग हे सर्व जिन्नस रक्तपित्ताच्या रोग्याला पथ्यकारक आहेत. रक्तपित्त वरल्या मार्गी असेल तर विरेचन, आणि खालच्या मार्गी असेल तर वमन करवावें. वरल्या मार्गी असलेल्या रक्तपित्ताच्या शांतीकरितां कडवा व तुरट रस आणि उपवास हीं योजावीं. खालच्या मार्गी असेल तर पौष्टिक उपाय व मधुर रस हितकर होत. निशोत्तर आणि काळी निशोत्तर याच्या काढ्यांत केलेला त्या दोन पदार्थांचा कल्क साखरेंत घालून चाटवावा, म्हणजे वरच्या मार्गी असलेला रक्तपित्ताचा विकार दूर होतो. मदनफळाचें चूर्ण साखर घालून, मध घालून, दूध घालून किंवा उंसाचा रस घालून पाजावें, म्हणजे उलटी होईल. तिच्या योगानें खालच्या मार्गी असलेलें रक्तपित्त शांत होईल. अशा रीतीनें वमनविरेचन देऊन शुद्ध झालेल्या रोग्यास क्रमानें मंथ आणि पेया द्यावी. हा मंथही मध, खजूर, द्राक्ष, फालसा आणि साखर यांच्या पाण्यांत तयार केलेला असावा. ज्याचा अग्नि मंद आहे अथवा आंबट पदार्थ खाण्याची ज्याला इच्छा होते, त्याला डाळिंबाचा व आंवळ्याचा रस घालून आंबट केलेला मंथ द्यावा. याशिवाय वाळा, धामणीचीं फुलें, बेलाचा गर्भ व धमासा हे पदार्थ घालून केलेली पेया

द्यावी, ह्मणजे रक्तपित्त रोग शांत होईल. हा रोग ज्याच्या योगानें उत्पन्न होतो, असे विदाही व उष्णवीर्य इत्यादि पदार्थांचा त्याग करावा. गांध्याळ झालेल्या रक्तपित्ताच्या निवृत्तीसाठीं पारव्याची विष्टा मधीबरोबर चाटवावी. चंदन, वाळा, नागरमोथा. भाताच्या लाह्या, मूग, पिंपळी आणि जव हीं वळाच्या पाण्यांत रात्रीं भिजत टाकावीं आणि सकाळीं गाळून तें पाणी प्यावें, ह्मणजे रक्तपित्ताचा नाश होईल. वर लिहिलेल्या काढ्याच्या योगानें अग्नि प्रदीप्त होतो व कफाचा क्षय होतो. तरी रक्तपित्त शांत न झाल्यास पांचपट पाण्यांत बकरीचें अथवा गाईचें दूध उकळून प्यावयास द्यावें मूत्रमार्गांत असलेल्या रक्तपित्ताच्या निवृत्तीसाठीं मुद्दां वर सांगितलेला हाच उपाय हितकारक आहे. गुदास्थानीं असलेल्या रक्तपित्ताच्या निवृत्तीसाठीं मोचरसांत तयार केलेलें अथवा वडाच्या बोंड्या अथवा सुंठ, वाळा व उत्पल हे पदार्थ घालून उकळलेलें दूध प्यावयास द्यावें. गळ्यांत रक्तपित्त रोग झाला असला तर त्याच्या निवृत्तीसाठीं कमळाच्या देठांचा क्षार, मध आणि तूप घालून चाटवावा. गुदा द्वारानें रक्त फार पडत असेल तर रक्तपित्ताला शांत करणाऱ्या औषधांच्या रसाचा बस्ति द्यावा. हा रोग नाकांत गेला असेल तर नस्य द्यावें. शीतवीर्य औषधांचें अभ्यंग केल्यानेंही रक्तपित्तरोग शांत होतो.



## कास—( खोकला ).

**निदान**—धुराच्या आणि धुळीच्या अभिघातानें, मेहनतीमुळें. रुक्ष अन्न खाह्यानें, जेवतां जेवतां ठसका लागल्यामुळें आणि मळमूत्रादिकांचा वेग व शिंक दाबून धरल्यानें प्राणवायु दूषित होऊन, उदान

वायूबरोबर मिळून, फुटलेल्या काशाच्या अवाजासारखा अवाज करून दोषसहित तोंडांतून बाहेर पडतो. यास खोकला असें ह्मणतात. वात, पित्त, कफ, क्षत आणि क्षय या पांच कारणांनीं पांच प्रकारचा खोकला उत्पन्न होतो. तो उत्तरोत्तर कारणानें अधिकाधिक बळवान आहे असें समजावें. हा पांच प्रकारचा खोकला बंद करण्याचे उपाय वेळींच न आले तर त्यापासून क्षयरोग उत्पन्न होतो. खोकला उत्पन्न होण्याच्या अगोदर गळ्यांत आणि तोंडांत कांट्यासारखें कांहीं लागतें आणि गळ्यांत फोड येतात. आणि जेवतांना घास अडकतो. वातकासामध्यें हृदय, कपोल, मस्तक, उदर, आणि कुशी यांत शूळ उत्पन्न होतो: तोंड सुकतें; बळ, स्वर आणि ओज हीं क्षीण होतात: वारंवार ठिकामका खोकला येतो; आणि अवाज घोगरा होतो. पित्तकासामध्यें छातींत जळजळ, ज्वर, तोंडांत शुष्कता व कडवटपणा, तहान, पिवळी तिखट ओकारी आणि शरीरावर पिवळटपणा व दाह हीं लक्षणें होतात. कफकासामध्यें कफामुळें मुख भरलेलें असतें: मस्तकांत पीडा, उरांत कफाचा संचय, अन्नावर अरुचि, शरीरांत जडपणा, खाज आणि घट्ट खाकेरे येणें हीं लक्षणें होतात. अतिमैथुनामुळें, फार ओझें उचलल्यामुळें, फार चाल पडल्यामुळें, अतिशय संग्राम केल्यानें, आणि धावणाऱ्या बळवान जनावरास पकडून धरल्यामुळें, दुर्बळ मनुष्याच्या छातींत क्षत पडून खोकला उत्पन्न होतो, तेव्हां त्यास क्षतकास ह्मणतात. यांत खोकला येतेवेळीं तोंडांतून रक्त पडतें, कंठांत अतिपीडा होते, उर ठोकून पाहिल्यास घोगरा जाणवतो, त्यांत तीक्ष्ण सुया टोचल्याप्रमाणें वेदना होतात, त्याला स्पर्श होतांच ती पीडा सहन होत नाहीं, सर्व शरीरांत शूळ उत्पन्न होतो, सांधे फुटूं लागतात, ताप येतो, श्वास लागतो, तहान लागते, अवाज बदलतो आणि रोग्याचा अवाज खोकतांना पारव्याच्या अवाजासारखा होतो.

विषमवेळीं ( बदललेल्या वेळीं ) आणि असात्म्य असें भोजन केल्यानें, अतिमैथुनानें, मळमूत्रादिकाचे वेग दाबल्यानें, मन बिघडल्यानें आणि अत्यंत शोक केल्यानें तीनही दोष कुपित होऊन अंतकाळ आणणारा खोकला उत्पन्न करतात. तेव्हां त्यास क्षयकास ह्मणतात. या क्षयकासांत शूळ, ताप, दाह, बेशुद्धि वगैरे लक्षणें होतात आणि मरणही ओढवतें. रोगी दिवसेंदिवस कृश होत जातो. त्याला खोकतांना जो कफ पडतो त्यांत रक्त व पू ही मिश्र असतो. हा क्षयकासरोग असाध्य ह्मटला आहे. क्षयकास जरी बळवानास झाला असला तरी तो मिटतां मिटतां मिटत नाहीं. मग अशक्तास झाल्यावर तो त्याचा प्राण घेईल यांत काय नवल ? रोग नवीन असला आणि वैद्य चांगला मिळाला व औषध श्रेष्ठ प्रतीचें सांपडलें तर कदाचित बरा होतो. वृद्ध मनुष्याला क्षयरोग झाला असेल तर पथ्यावर ठेवल्यानें तो वाढूं नये इतकेंच करतां येतें मूळांतून रोग नाहींसा करणें अशक्य आहे.

**चिकित्सा**—वायूनें खोकला उत्पन्न झाला असेल तर वात हर औषधें घालून तयार केलेल्या स्नेहाचें पान करावें. पित्तयुक्त कासाच्या निवृत्तीसाठीं जेवणापूर्वी तूप पाजावें आणि कफयुक्त कासाच्या निवृत्तीसाठीं स्नेहयुक्त विरेचन द्यावें. याशिवाय परिशिष्ट भागांत लिहिलेलीं कासावर लागूं पडणारीं औषधें योजावीं.

---

## श्वास—( दमा ).

**निदान**—श्वासरोग, महान, ऊर्ध्व, छिन्न, तमक आणि क्षुद्र असा पांच प्रकारचा आहे. वाताच्या अधिकतेनें क्षुद्र, कफाच्या

अधिकतेनें तमक, वात आणि कफ यांच्या अधिकतेनें छिन्न आणि वायूच्या अधिकतेनें महान आणि ऊर्ध्व असे श्वासाचे प्रकार होतात. श्वासामध्यें पहिल्यानें हृदयांत पीडा, शूळ, पोट फुगणें व ताणणें, तोंड स्वादरहित आणि गालफडांत सुया टोंचल्याप्रमाणें वेदना हीं लक्षणें होतात. जेव्हां वायु कफाशीं मिळून, नाड्यांचा प्रवाह बंद पाडून, चहूंकडे धावूं लागतो, तेव्हां श्वासरोग झाला असें समजावें.

महाश्वासांत वायु वर चढून आला असेल तर रोगी दुःख पावून व कण्हून श्वास घेतो; ज्ञानविज्ञान नष्ट होतें; मुख व नेत्र स्तब्ध होतात. मळमूत्राचा अवरोध होतो; बोलणें तोत्रट होतें; रोगी अत्यंत खिन्न होतो, आणि श्वास घेतो तो दूरपर्यंत ऐकूं जातो; अशीं महाश्वासाचीं लक्षणें ज्यास झालीं तो रोगी तत्काल मरण पावतो.

ऊर्ध्व श्वासांत रोगी श्वासाला वर ओढून घेऊं शकतो, पण बाहेर टाकतां येत नाहीं. मुख व कंठ कफानें भरून जातात; मूर्च्छा येते; तोंड सुकतें व जीवास चैन पडत नाहीं. ऊर्ध्व श्वास कोपल्यानें खालचा श्वास बंद होतो, आणि तो बंद झाल्यानें त्याचा कोंडमारा होऊन रोगी प्राण सोडतो.

छिन्न श्वासांत रोगी आपल्या आंगीं जेवढी शक्ति असेल तेवढी खर्चून श्वास ओढतो व बाहेर टाकितो; अथवा कष्टी होऊन श्वास-प्रश्वासच मुळीं करित नाहीं, तेव्हां हृदय फाटल्याप्रमाणें पीडा होते, पोट फुगतें, एक डोळा लाल होतो, रोगी बडबड करतो, अशीं चिन्हें ज्यास झालीं तो रोगी तत्काळ प्राण सोडतो. जेव्हां वायु कंठाला व मस्तकाला जड करून, कफाचें आकर्षण करून, नाड्यांत प्राप्त होतो, तेव्हां तो कफास अडवून, शैत्य आणि

गळ्यांत घरघर शब्द उत्पन्न करतो. आणि फार वेगानें छातींत दुखःदायक श्वास उत्पन्न होतो, तेव्हां रोगी बेशुद्ध पडतो. खोकतांना केव्हां केव्हां कफ येतो, तेव्हां दोन घटका बरें वाटतें; घशांत खाज उत्पन्न होते, मोठ्यानें ओरडतां येत नाहीं. झोप येत नाहीं, निजवत नाहीं, बसून राहिल्यानें अंमळ सुख वाटतें, उष्ण पदार्थ अनुकूल वाटतात, डोळ्यांवर सूज येते, कपाळावर घामाचे बिंदु येतात. तोंड सुकतें व श्वास चढल्यानें रोग्याचें सर्व शरीर खाली वर हालत असतें. हीं लक्षणें तमक नामें श्वासाचीं जाणावीं. तमक श्वास, पाऊस, थंडी, पूर्वेकडील वारा व कफकारक पदार्थ ह्यांनी वृद्धि पावतो. हा श्वास जरी कष्ट साध्य आहे, तरी तो होऊन थोडेच दिवस झाले असतील, तर लौकरच बरा करितां येतो. तमक श्वासामध्यें ज्वर, बेशुद्धि, हे दोन उपद्रव मुख्य असतात. हा श्वासरोग, उदावर्त, शूळ, अजीर्ण, मळमूत्राचा अवरोध आणि वृद्धपणा यामुळें उत्पन्न होतो. अंधारामुळें व तमोगुणामुळें तो वृद्धि पावतो व शीतोपचारानें शांत होतो. हा श्वास रोग ज्याला झाला आहे, तो रोगी आपल्या भोंवतीं अंधकार आहे असें मानतो.

शुष्क आणि रुक्ष पदार्थांच्या सेवनानें जो क्षुद्र श्वास उत्पन्न होतो त्यामध्यें वायु वर चढतो. या श्वासामुळें अन्नपानाला आडकाठी येत नाहीं, व इंद्रियांसही कांहीं इजा होत नाहीं. हा क्षुद्रश्वास साध्य आहे.

वर लिहिलेले सर्व प्रकारचे श्वास, अपूर्ण लक्षणांनीं बळवान मनुष्यास झाले असतां, साध्य समजावे. क्षुद्र श्वासाचीं संपूर्ण लक्षणें झालीं असलीं तरी तो साध्य समजावा. महाश्वास, ऊर्ध्व श्वास, आणि छिन्न श्वास यांचीं संपूर्ण लक्षणें झालीं असलीं तर ते असाध्य समजावे. इतर व्याधींपेक्षां हा व्याधि तत्काळ प्राण घेतो.

चिकित्सा—श्वास रोगानें पीडलेल्या रोग्यास स्निग्धपदार्थानें प्रथम स्वेदनविधि करवावा. ह्मणजे दबलेला श्वास मोकळा होतो. त्यावर दुधाचें पाणी पाजून हलकेंसें वमन द्यावें. वमन करावयाच्या पदार्थांत पिंपळी, सैंधेलोण आणि मध हीं टाकावीं. वमन करविल्यानें हृदय शुद्ध होतें आणि कफाचा नाश होऊन चांगल्या प्रकारें वायु चालू होतो. नमक श्वासाच्या रोग्याला निरचेन द्यावें. विरेचनानें व वमनानें आराम वाटेना, तर कफाच्या निवृत्तीसाठीं धूमपान करावें. धूमपानाच्या नळींत हळद, एरंडाचें मूळ, द्राक्ष आणि देवदार यांचें चूर्ण करून घालावें. विडी तुपांत बुचकळून, पेटवून, धुम्रपान करावें. श्वासरोग्यास भात, साठी तांदूळ, गहूं, जव आणि मूग हे पदार्थ पथ्यकर आहेत. श्वासरोग्याची तहान शांत करण्याकरितां दशमूळांचा किंवा देवदाराचा काढा प्यावयास द्यावा. गाय, उंट, हत्ती, गाढव, अथवा बकरी यांच्या विष्टेचा रस मधांत घालून प्यावयास द्यावा. आस्कंदाची राख मधांत घालून चाटावी. एरंडाचें मूळ व पिंपळी यांचें चूर्ण मधात घालून चाटावें. कवठाच्या रसांत मध घालून चाटावा. ह्या प्रयोगांचा उपयोग केला असतां सर्व प्रकारचे श्वास रोग बरे होतात. सुंठ आणि गूळ समभाग घेऊन कालवून खाल्ले असतांही श्वास शांत होतो. कास, श्वास, क्षय आणि ओकारी हे विकार परस्पर औषधांनीं बरे करतां येतात.

---

# राजयक्ष्मा (क्षय).

निदान—मळमूत्राच्या वेगाचा रोध केल्यानें, अत्यंत मैथुनानें, उपासानें, परक्याची ईर्षा केल्यानें, आळसानें, आणि ग्लानीनें, अधिक बळवान मनुष्याबरोबर युद्ध केल्यानें, अनियमित वेळीं खाल्ल्यानें आणि अशाच दुसऱ्या कित्येक कारणांनीं वात, पित्त आणि

कफ हे तीनही दोष कोप पावून क्षयरोग उत्पन्न करतात. गतीला प्रतिबंध केल्यानें वायु विकृत होतो; त्यामुळें जठराग्नि बिघडून कफ आणि पित्त हींही विकृत होतात व रसादि धातूंस शोषून घेतात. तेव्हां या विकारास शोष असें नांव दिलें आहे. शरीराच्या पचनादि क्रियांचा क्षय झाला ह्मणजे त्यास क्षय असें ह्मणतात. हा रोग पहिल्यानें चंद्राला झाला होता ह्मणून, आणि हा रोग सर्व रोगांत श्रेष्ठ आहे ह्मणून, याचें राजयक्ष्मा हेंही नांव प्रसिद्ध आहे. हा रोग धातूंचा क्षय झाल्यामुळें आणि शरीरांतील धातूंच्या गतीस प्रतिबंध झाल्यामुळें उत्पन्न होतो. कफप्रधान पित्तादि विकारामुळें धातूंचा वाहण्याचा मार्ग बंद झाला असतां, अनुलोम क्षय उत्पन्न होतो. अनुलोम क्षयांत त्याची वृद्धि आणि रूपांतर क्रमाक्रमानें होतें. अनुलोम क्षयाहून विरुद्ध जातीचा जो क्षय त्यास प्रतिलोम क्षय ह्मणतात. त्याची उत्पत्ति अत्यंत मैथुन केल्यानें वीर्याचा नाश होऊन होते. आणि तेणेंकरून मनुष्य दिवसेंदिवस थकत जातो. क्षयरोगांत पहिल्यानें श्वास उत्पन्न होतो. हातपाय गळून जातात. कफ पडतो, ताळूला शोष पडतो, ओकारी होते. जठराग्नि मंद होतो. ज्वर फार येतो, आणि पडसें व खोकला होतो. हीं लक्षणें धातूचें शोषण झालें असेल तर होतात. आणि तेव्हां रोग्याचे नेत्र पांढरे होतात. आणि मांस खाण्याची व मैथुनाची इच्छा फार होते. हीं लक्षणें स्वाभाविकपणें होतात असें नाहीं. तर तीं रोगाच्या विलक्षणपणामुळें होतात. त्याचप्रमाणें रोग्यास स्वप्नामध्यें कावळा, पोपट, चातकी, मयूर, गिधाड, वानर वगैरे प्राणी आपणास घेऊन जात आहेत असें दृष्टीस पडतें. जळरहित नद्यांत स्नान करित आहों असें वाटतें आणि अतिशय वाऱ्यानें व वणव्यानें सुकलेलीं झाडें घेरलीं आहेत असें पहातो. खांद्यांत आणि कुशींत पीडा होते. हातापायाची आग होते,

आणि सगळ्या शरीरांत ज्वर भरलेला असतो. हीं तिन्हीं लक्षणें क्षयरोगांत अवश्य होतात. आणि त्यांच्या योगानें मरण प्राप्त होतें. क्षय रोगांत वाताचा संबंध असला तर स्वरांत भेद पडतो, शूळ उत्पन्न होतो. खांदे व कुशी सुकून जातात. पित्ताचा संबंध असला तर ज्वर, दाह, अतिसार आणि तोंडांतून रक्त पडणें हीं लक्षणें होतात. कफाचा संबंध असला तर अरुचि, मस्तक जड होणें, खोकला, आणि स्वर बदलणें हीं लक्षणें होतात. याप्रमाणें वर सांगितलेलीं अकरा लक्षणें त्या रोग्यास झालीं; आणि खोकला, अतिसार, कुशींत शूळ, स्वर बदलणें, अन्नावर अरुचि आणि ज्वर हीं आणखी साहा लक्षणें झालीं; अथवा ज्याचें बळ आणि मांस नाहींसें झालें तो रोगी असाध्य जाणावा. रोग्यास हीं सर्व लक्षणें झालीं असतांही, बळ कायम असेल आणि मांस झडलें नसेल तर वैद्यानें याची चिकित्सा करावी. रोगी खातांपितांही कृश होत चालला, अतिसार आला, पोटावर व अंडकोशावर सूज चढली, तर तो क्षयरोगी कधींही वांचणार नाहीं. क्षयरोग्याला ताप येत नसेल, शरीर बळकट असेल, चिकित्सा करण्यास ती सहन करण्याची आंगीं शान्त असेल, तो सावधान असेल, त्याचा जठराग्नि प्रदीप्त असेल, आणि तो फारसा क्षीण झाला नसेल, तर त्याची चिकित्सा करावी. पण ज्याचे डोळे पांढरे झाले, अन्नाचें अवढणें पडलें, ऊर्ध्वश्वास लागला. आणि वारंवार मोठ्या कष्टांनीं लघवीस होऊं लागेल, तर तो रोगी नाश पावेल ह्मणून समजावें. क्षयरोग अनेक प्रकारचा आहे. त्यांत व्यवायशोषी, शोकशोषी, वार्धक्यशोषी, अध्वशोषी, व्यायामशोषी, व्रणशोषी, आणि उरःक्षतशोषी हे प्रकार मुख्य होत.

क्षयरोगी अत्यंत मैथुनानें क्षीण झालेला असेल तर त्यास व्यवायशोषी असें ह्मणतात. या रोगांत गुह्येंद्रियांत व अंडकोशांत

पीडा होते. मैथुन करण्याची शक्ति नसतांही रोगी जर मुद्दाम मैथुन करील तर त्यास पुष्कळ वेळां थोडथोडा धातुस्राव होईल, अथवा वीर्याच्या ऐवजीं रक्ताचे बिंदु पडतील, शरीर पांढरें पडेल आणि धातूंचा क्षय होत जाईल.

ज्याला फार खेद व चिंता लागली आहे, तो शोकशोषी रोगी समजावा. या रोग्याचे हातपाय गळतात. त्याचप्रमाणें शुक्रक्षयाच्या लक्षणांहून वेगळीं शोषाचीं लक्षणें त्यास होतात. वृद्धावस्थेमुळें क्षीण झालेला पुरुष जराशोषी जाणावा. त्याच्या शरीरांतील धातु क्षीण झाल्यानें, वीर्य, बुद्धिबळ आणि इंद्रियें यांची शक्ति मंद होते; शरीर कांपूं लागतें; अन्नावर अरुचि पडते व आवाज घोगरा होतो; मुद्दाम थुंकल्यानेंही थुंकीत कफ पडत नाहीं; शरीर जड वाटूं लागतें; तोंड नाक आणि डोळे यांतून पाणी व लाळ गळूं लागते; आणि त्याच्या शरीराची कांति शुष्क व मळीन होते.

फार चाल केल्यामुळें क्षीण झालेला पुरुष अध्वशोषी म्हणून समजावा. त्याचे हातपाय गळतात. शरीराची कांति नष्ट झाल्या ओल्या लांकडासारखी व खरखरीत दिसते. सर्वांग शिथिल होतें. आणि कंठ मुख व पिपासास्थान सुकून जातें.

अतिश्रमामुळें क्षीण झालेला पुरुष व्यायामशोषी म्हणावा. त्याला अध्वशोषी रोग्याचीं सर्व लक्षणें होतात. आणि उरःक्षत नसतांही उरःक्षताचीं लक्षणें जाणवतात.

व्रणशोषी रोग्यास रक्तक्षयामुळें, व्रणाच्या पीडेमुळें अथवा आहार कमी झाल्यामुळें व्रणयुक्तक्षय होतो. तो असाध्य आहे.

धनुष्य खेचल्यानें, फार बोजा उचलल्यानें, बळवानाबरोबर युद्ध केल्यानें, उंचावरून पडल्यानें, पळत चाललेल्या बलवान जना-

वराम एकदम पकडून धरल्यानें, शस्त्रास्त्रादि जोरानें फेकल्यानें, फार अभ्यास केल्यानें, फार चाल पडल्यानें, पाण्याच्या पूरांतून पोहून आल्यानें, फार धावल्यानें, फार उड्या मारल्यानें, अत्यंत वेगानें नाचल्यानें, आणि छाती फुटल्यानें उरःक्षत रोग उत्पन्न होतो. जो कोणी मैथुनाविषयीं अत्यंत आसक्ति धरतो आणि सुकें व थोडें अन्न खातो, त्याची छाती फुटून गेल्याप्रमाणें किंवा तिचे दोन भाग झाल्याप्रमाणें त्याला वाटतें; छातींत फार पीडा होते; फासळ्या दुखतात; शरीर सुकून जातें व कांपतें; ज्वर येतो; शक्ति, मांस, वर्ण, रुचि आणि जठराग्नि हीं हळूहळू कमी होत जातात; मन उदास होतें; जठराग्नीच्या मंदतेमुळें शौचास पातळ होतें; वारंवार खोकला येत असल्यामुळें घाणेरडे, रक्तयुक्त आणि काळे पिवळे कफाचे बडके पडतात. या प्रमाणें छातींत क्षत झाल्यानें उरःक्षताचा रोगी क्षीण होत जातो. त्याच प्रमाणें अनियमित रीतीनें स्त्रीसंग केल्यामुळें देखील शुक्र आणि ओज यांचा क्षय होऊन, रोगी दिवसेंदिवस क्षीण होत जातो. हीं सर्व लक्षणें जेव्हां अस्फुट असतात, तेव्हां तें उरःक्षताचें पूर्वरूप समजावें. जेव्हां उरःक्षतामुळें छातींत पीडा होते, रक्ताची ओकारी येते, खोकल्यांत रक्त पडतें आणि फासळ्या, बरगड्या आणि कंबर सुकून जातात, तेव्हां तें असाध्य लक्षण समजावें. वर लिहिलेलीं लक्षणें अपूर्ण असतील, रोग्याचा जठराग्नि प्रदीप्त असेल आणि रोग होऊन थोडेच दिवस झाले असतील, तर तो रोग बरा होऊं शकतो. रोग होऊन एक वर्ष झालें असेल तर तो मोठ्या कष्टानें बरा होऊं शकतो. व लक्षणें पूर्ण झालीं असतील तर तो मुळींच बरा होत नाहीं.

चिकित्सा—क्षयरोगी पुरुष जर शरीरानें बळकट असेल तर त्याच्या शरीरास स्नेहन व स्वेदन विधि करावे. आणि वमनविरेचनांनीं दोष बरा होईल असें वाटलें, तर त्याला अशक्तपणा येणार

# ओकारी, हृद्रोग आणि तृष्णा.

निदान.—विकृत वात, पित्त आणि कफ हे दोष वेगवेगळे अथवा एक झाल्यानें व वाईट पदार्थ पाहिल्यानें ओकारी येते. अत्यंत पातळ, अत्यंत चिकट, न आवडणारे आणि खारट पदार्थ खाल्यानें, [illegible] किंवा न सोसणारें जेवण जेवल्यानें, मेहनत केल्यानें, भयानें, दुःखानें, अजीर्णानें, कृमिदोषानें अथवा जेवतांना अत्यंत [illegible] ओकारी होते. गर्भिणीला गर्भाच्या वेदनेनेंही ओकारी होते. या रोगांत वायु प्रधान असेल तर हृदयांत व कुशींत दुखणें होतें, तोंड सुकतें, आवाज बदलतो, आणि फेसाळ, पातळ, [illegible] पाणी [illegible] अडखळत अडखळत पडतें. पित्त प्रधान असेल तर [illegible] येते, टाळूची व डोळ्यांची आग होते, [illegible], आणि हिरव्या पिवळ्या, ऊन व कडवट अशा ओकाऱ्या होतात. कफ प्रधान असेल तर झोप न येतां झोपेसारखें वाटणें, तोंड गुळमट होणें, अन्नाचें अवडणें व शरीर जड होणें हीं चिन्हें होतात; ओकारी चिकट होते, व ती दाट, गुळमट आणि पांढरी असते. तिन्ही दोषांचें प्राधान्य असेल तर शूळ, अजीर्ण, अरुचि, दाह, तृषा, श्वास आणि मोह हीं लक्षणें होतात; आणि ओकारी खारट, आंबट, श्याम रंगाची, घट्ट, उष्ण आणि लाल अशी होते. जेव्हां वायु हा, मळमूत्र, घाम आणि पाणी यांस वाहणाऱ्या नाड्यांचा प्रतिबंध करून, वर चढतो, तेव्हां मळादिक मुखमार्गानें बाहेर पडतात. रंगानें व वासानें ही ओकारी मळमूत्राप्रमाणेंच असते. ज्याला अशी ओकारी होते, त्याला अत्यंत तृषा लागते, खोकला येतो, व शूळ उत्पन्न होतो. या अति वेगाच्या ओकारीनें पीडलेला रोगी फार वेळ वांचूं शकत नाहीं. वाईट पदार्थ पाहि-

# ओकारी, हृद्रोग आणि तृष्णा.

निदान'-विकृत वात, पित्त आणि कफ हे दोष वेगवेगळे अथवा एक झाल्यानें व वाईट पदार्थ पाहिल्यानें ओकारी येते. अत्यंत पातळ, अत्यंत चिकट, न आवडणारे आणि खारट पदार्थ खाल्यानें, अवेळां भोजन किंवा न सोसणारें जेवण जेवल्यानें, मेहनत केल्यानें, भयानें, उद्वेगानें, अजीर्णानें, कृमिदोषानें अथवा जेवतांना अत्यंत घाई केल्यानें ओकारी होते. गर्भिणीला गर्भाच्या वेदनेनेंही ओकारी होते. [illegible] वायु प्रधान असेल तर हृदयांत व कुशींत वेदना होतात, तोंड सुकतें, आवाज बदलतो, आणि फेसाळ, पातळ, रुक्ष असें थोडें पाणी वांतीनें अडखळत अडखळत पडतें. पित्त प्रधान असेल तर मूर्छा येते, ताळूची व डोळ्यांची आग होते, [illegible] येतात, आणि हिरव्या पिवळ्या, ऊन व कडवट अशा ओकाऱ्या होतात. कफ प्रधान असेल तर झोंप न येतां झोपेसारखें वाटणें, तोंड गुळमट होणें, अन्नाचें अवदणें व शरीर जड होणें हीं लक्षणें होतात; ओकारी चिकट होते, व ती घट्ट, गुळमट आणि पांढरी असते. तिन्ही दोषांचें प्राधान्य असेल तर शूळ, अजीर्ण, अभाव, दाह, तृषा, श्वास आणि मोह हीं लक्षणें होतात; आणि ओकारी खारट, आंबट, श्याम रंगाची, घट्ट, उष्ण आणि लाल अशी होते. जेव्हां वायु हा, मळमूत्र, घाम आणि पाणी यांस वाहणाऱ्या नाड्याचा प्रतिबंध करून, वर चढतो, तेव्हां मळादिक मुखमार्गानें बाहेर पडतात. रंगानें व वासानें ही ओकारी मळमूत्राप्रमाणेच असते. ज्याला अशी ओकारी होते, त्याला अत्यंत तृषा लागते, खोकला येतो, व शूळ उत्पन्न होतो. या अति वेगाच्या ओकारीनें पीडलेला रोगी फार वेळ वांचूं शकत नाहीं. वाईट पदार्थ पाहि-

ल्यानें, अपचनानें, प्रकृतीला विरुद्ध वाटणाऱ्या पदार्थांनीं अथवा कृमि झाल्यानेंही आगंतुक ओकारी उत्पन्न होते. कृमींमुळें जी उलटी होते, तेणें करून शूळ व हृदयांत कंप उत्पन्न होतो.

ऊन, जड, आंबट, तुरट, आणि कडू असे पदार्थ खाल्यानें, श्रमांनीं, लागल्यानें, वारंवार जेवल्यानें, चिंतेनें आणि मलमूत्रादिकांचे स्वाभाविक वेग अडवून धरल्यानें, हृद्रोग ( छातीचा रोग ) होतो. या रोगांत वात, कफ आणि पित्त हे विकारयुक्त होऊन हृदयांतील रसाला विकृत करतात. व हृदयांत पीडा उत्पन्न करतात. हा हृद्रोग वातज, पित्तज, कफज, त्रिदोषज आणि कृमिज असा पांच प्रकारचा आहे. वातज हृद्रोगांत उराचा संकोच होतो व त्यांत सुया टोचल्याप्रमाणें वेदना होतात. पित्तज हृद्रोगांत तहान लागते, दाह होतो, मूर्च्छा येते, आणि तोंड सुकतें. कफज हृद्रोगांत कफ उत्पन्न होतो. अन्नाचें अवडणें पडतें आणि जठराग्नि मंद होतो. त्रिदोषज हृद्रोगांत तीनही दोषांची लक्षणें होतात. कृमिज हृद्रोगांत रोग्यास उम्हासे येतात, तोंडास वारंवार थुंकी सुटते. शूळ उत्पन्न होतो, डोळ्यांस अंधेऱ्या येतात, आणि शोष पडतो. हृद्रोगांत ग्लानि होणें, भ्रम होणें व शोष पडणें हीं लक्षणें साधारण आहेत.

भयानें, श्रमांनीं, बळाच्या क्षयानें, आणि क्रोध, उपवास वगैरे कारणांनीं, आपआपल्या स्थानीं एकत्र झालेले पित्त व वायु हे दोन दोष कोपून, पिपासास्थान ( ताळू ) शुष्क करून, तृष्णारोग उत्पन्न करतात. जळ वाहणाऱ्या नाड्या विकृत झाल्यानें, अन्न, कफ आणि आम यामुळें तीन प्रकारची तृष्णा उत्पन्न होते. आणि चौथी, जखम झालेल्या माणसाला क्षतामुळें होते; पांचवी, क्षय रोगामध्यें; साहावी, आमामुळें; आणि सातवी, अन्नाचा आहार केल्यानंतर उत्पन्न होते.

**चिकित्सा**—ओकारीच्या रोगामध्यें वायूचें आधिक्य दिसत नसेल, तर प्रथम लंघन देऊन नंतर वमन करवावें. दाळिंबाचें सरबत आणि भूरावळा हीं चाटावयास द्यावीं. सुगंधी द्रव्यें खावयास द्यावीं, व आंगास लावावीं. वातप्रधान ओकारीवर सैंधव घालून एरंडेल तेलाचें विरेचन द्यावें. आणि दहीं व डाळिंबाचा रस घालून तयार केलेलें अन्न खावयास द्यावें. पित्तप्रधान ओकारीवर द्राक्षांचा आणि ऊसाचा रस, त्यांत निशोत्तर घालून प्यावयास द्यावा, पाण्यात द्राक्षें चुरून तें पाणी गाळून प्यावयास द्यावें, आणि मुगाच्या डाळीच्या पाण्यांत आंवळ्यांचा रस घालून तें प्यावयास द्यावें. कफप्रधान ओकारीमध्यें कडुलिंबाचीं पानें, पिंपळी आणि शिरीश यांचें चूर्ण ऊन पाण्याच्या तोटाबरोबर प्यावयास द्यावें, व ओकारी करवावी. आणि रोगी अशक्त असेल तर ओकारी न काढतां उपवास करवावा. ओकारीच्या रोगावर दुसरेही अनेक स्तंभनकारक आणि पुष्टिकारक उपाय आहेत. चूर्ण गुळ वगैरे आहेत. ते देश, काळ आणि सात्म्य याचा विचार करून योजिल्यानें ओकारीचा प्रतिबंध होतो.

हृद्रोगाविषयीं, याच पुस्तकांत, इतर ठिकणीं, हा रोग शांत करण्याचे कांहीं प्रयोग सांगितले आहेत त्यांचा उपयोग करावा.

तृष्णा रोगावर वात आणि पित्त शांत करणारे जे प्रयोग आहेत ते सर्व योजावे. त्याच प्रमाणें बाह्य आणि आभ्यंतर शीत विधि, शमन आणि शोधन हीं करावीं. अंतरिक्षाचें पाणी मध घालून प्यावयास द्यावें. आणि शीतवीर्य द्रव्याचा आहार ठेवावा. या रोग्यानें कोणतेही काम करूं नये.



# मदात्यय.

**निदान**—जे गुण विषांत आहेत तेच गुण मद्यांतही आहेत मद्याचा गैरशिस्त उपयोग झाला तर त्यापासून मदात्यय रोग उत्पन्न होतो. मद्यपान निरंतर व अन्नावांचून करीत गेल्यास हा कष्टकारक व्याधि जडतो. त्यानें शरीर कृश होतें. कोपलेला, भय पावलेला, तान्हेला, शोकामुळें परिताप पावलेला, क्षीण झालेला, थकलेला, कृश, आणि फार जेवल्यामळें ज्याचें पोट फुगलें आहे असा, अशा मनुष्यानें जर मद्यपान केलें तर त्यापासून अनेक प्रकारच्या व्याधि उत्पन्न होतात. ते परमद, पानाजीर्ण आणि पानविभ्रम या नांवांनी प्रसिद्ध आहेत. मदात्ययामध्यें उचकी, श्वास, मस्तककंप आणि बडबड वगैरे चिन्हें होतात तेव्हां तो वातप्रधान आहे असें समजावें. पित्तप्रधान मदात्ययामध्यें तृष्णा, दाह, ज्वर, अतिसार आणि भ्रम वगैरे चिन्हें होतात. कफप्रधान मदात्ययामध्यें ओकारी, अन्नाचें अवरुणे व शरीर जड होणें हीं चिन्हें होतात. तिन्ही लक्षणें ज्यांत आहेत, त्यास त्रिदोषज मदात्यय म्हणतात. परमदामध्यें कफ अत्यंत कोपतो, शरीर जड होतें आणि मळमूत्रांचा अवरोध होतो. पानाजीर्णामध्यें पोट फुगतें, ढेंकर येतात व दाह होतो. पानविभ्रमांत छातींत पीडा होते, मूर्च्छा येते, ओकारी होते, ताप येतो, व मस्तकांत शूळ उत्पन्न होतो. या रोगांत वरला ओठ खालच्या ओठापेक्षां मोठा असेल, शरीर बाहेरून थंड, पण आंतून ऊन, वाटत असेल, तोंडावर तजेला मारीत असेल, आणि जीभ, ओठ आणि दांत हे काळे पडले असतील, तर रोगी कधींही वांचणार नाहीं.

चिकित्सा—या रोगांत वातादिकांपैकीं जो दोष अधिक असेल त्याची प्रथम चिकित्सा करावी. तिन्ही दोष समान असतील तर प्रथम कफाची, नंतर पित्ताची, आणि शेवटीं वाताची चिकित्सा करावी. कारणकीं, या रोगांत कफ अधिक असतां, पित्त व वायु हे दोष कमी असतात. थोडें अथवा बहुत मद्य प्याल्यानें जो व्याधि उत्पन्न होतो, तो मद्याची सम मात्रा प्याल्यानें शांत होतो. वाताची अधिकता असेल तर पिठापासून केलेल्या मद्याचे पानानें तो शांत होतो. ह्या रोगांत लेप करावयाचे, चोळावयाचे, आणि स्नान घालण्याचे सर्व उपाय उष्ण असून, पांघरावयाचीं वस्त्रेंही उष्णच असावीं. स्त्रीच्या आलिंगनानें हा रोग दूर होतो. ह्या रोगांत पित्ताचें आधिक्य असेल तर पुष्कळ पाण्यांत साखरेचें मद्य प्यावयास द्यावें. ह्या रोगांत वाताच्या आणि पित्ताच्या प्रकोपानें तहान फार लागते. यास्तव रोग्यास द्राक्षारस प्यावयास द्यावा. मद्याची उष्णता त्वचेपर्यंत पोचून रक्त पित्तावरोबर मिळून, तेव्हां भयंकर दाह उत्पन्न करते. यास्तव या वेळीं सर्व प्रकारचे शीतोपचार करावे व शिरा घ्याव्या. श्लेष्मप्रधान मदात्ययामध्यें रोग्यास वमन द्यावें आणि उपवास करवावा. सन्निपातज मदात्ययामध्यें दोषाचें बळाबळ पाहून योग्य उपचार करावे. अति-मद्यपान केल्यानें रोगी मूर्च्छा येऊन पडला असेल, तर त्यास तीक्ष्ण नस्य द्यावें. अत्यंत मद्यपान केल्यानें मन गढून गेलें असेल, तर रोग्यास विस्मय उत्पन्न होईल व आठवण पडेल अशा गोष्टी ऐकवाव्या. प्रिय पदार्थांचें दर्शन व श्रवण करवावें. उत्तम गीतवादनादिकांचे सूर कांनीं पाडावे. कसरत करवावी. शीरा द्याव्या व असेच दुसरे योग्य उपचार करवावे.



# अर्श—(मूळव्याध.)

**निदान**—अर्शरोग वात, पित्त, कफ या प्रत्येकामुळें व हे तीनही दोष एकत्र झाल्यानें, रक्तामुळें अथवा जन्मापासून, अशा साहा कारणांनीं उत्पन्न होतो. हा रोग मळद्वारापाशीं तीन वळ्यांवर होतो. हा दोष त्वचा, मांस आणि मेद यांस दूषित करून, मळद्वारांत लहान मोठ्या आकृतीचे मांसाचे, अंकुर उत्पन्न करतो; त्या अंकुरांसच अर्श ह्मणतात. तुरट, तिखट, रूक्ष, अतिथंड आणि अति हलकें अशा पदार्थांचें सेवन केल्यानें, अवेळीं व बहुत भोजन केल्यानें, तीक्ष्ण मदिरा सेवन केल्यानें, अति मैथुनानें, शोकानें, लंघनानें आणि अति वारा व ऊन सहन केल्यानें, वातार्श रोग उत्पन्न होतो. तिखट, खारट, आंबट व उष्ण पदार्थ खाल्ल्यानें, अति कसरत केल्यानें, श्रमामुळें, क्रोधामुळें, मद्यामुळें आणि याशिवाय इतर अनेक कारणांनीं पित्तार्श उत्पन्न होतो. गुळमट, स्निग्ध, थंड व जड पदार्थ खाल्ल्यानें, कसरत केल्यानें, दिवसा निद्रा केल्यानें, नेहमीं बसून राहिल्यानें, आणि अशाच दुसऱ्या कारणांनीं कफार्श होतो. दोन्ही दोषांचीं कारणें एकत्र होऊन जेव्हां अर्शरोग उत्पन्न होतो, तेव्हां त्यास द्वंद्वज ह्मणतात; आणि तिन्ही दोषांचीं कारणें एकत्र झाल्यानें उत्पन्न झालेल्या अर्शास त्रिदोषज ह्मणतात. जन्मापासून झालेल्या अर्शाचीं लक्षणें त्रिदोषजन्य अर्शाच्या लक्षणांसारखीं असतात.

वातप्रधान अर्शाचे अंकुर शुष्क, कंडुयुक्त, लाल, चामखिळासारखे, वाकडे तिकडे, तीक्ष्ण टोकाचे आणि तोंडें फुटलेले असे असतात. पित्तप्रधान अर्शाच्या अंकुराचे अग्रभाग हिरवे असतात. त्यांतून पातळ रक्त वाहत असतें व त्याची आकृति पोपटाच्या जीभेसारखी व जळूच्या तोंडासारखी असते. कफाचें आधिक्य असेल

तर अर्शांकुरांचीं तोंडें मोठीं असून ते कठीण असतात. त्यांपासून वेदना थोडी होते. ते गुळगुळीत, फणसाच्या अठीसारखे व गाईच्या आचळासारखे असून, स्पर्श केल्यानें सुख वाटे असे व पांढरे व लांब असतात. रक्ताचे विकारानें झालेले अर्शांकुर पित्तज अर्शांकुरासारखे असतात. अर्श रोग कष्टकारक अशा दुसऱ्या बहुत रोगांस उत्पन्न करून, प्रसंगीं असाध्य सुद्धां होतो. त्याचे अंकुर बाहेरच्या वळीवर झाले असतील आणि एकाच दोषामुळें झाले असतील, तर ते बरे होतात. दोन दोषांनीं झाले असतील व ते होऊन एकच वर्ष होऊन गेलें असेल, तर ते कष्टसाध्य समजावे. तीनही दोषांमुळें झाले असतील तर व जन्मापासून झाले असतील आणि हे अंकुर आंतल्या वळीवर होऊन ते फुटले असतील, तर असाध्य जाणावे. तथापि हा असाध्य अर्श रोगही योग्य साधनांनीं कांहींसा समान अवस्थेंत आणून ठेवतां येतो. या रोग्यास अन्नाचें अवडणें पडलें, शरीरांतून फार रक्त पडूं लागलें आणि शरीराला सूज आली व अतिसार झाला, म्हणजे तो रोगी अर्शाच्या पंजांतून सुटण्याची आशा नाहीं. पुरुषाचें शिश्न, पाय, नाक, कान, नाभि इत्यादिकांवर विकारामुळें अर्शाचे जे अंकुर उत्पन्न होतात ते चिकट व नरम असतात. व्यान नामक वायु, कफास बरोबर घेऊन कातडीवर चामखिळासारखे खडबडीत व स्पष्ट असे जे अर्शाचे अंकुर उत्पन्न करतो, त्यास चर्मकील असें ह्मणतात. त्यांत वायूचें आधिक्य असलें तर सुया टोंचल्याप्रमाणें पीडा होते. पित्ताचा संबंध असला, तर रक्त काळें स्रवतें; आणि कफाचा संबंध असला, तर ते अंकुर चकचकित, गांठ्याळ आणि चामडीच्या रंगाचे असतात.

**चिकित्सा**—अर्शरोगानें पीडलेला मनुष्य जर बळवान असेल तर त्याला योग्य स्नेहन व स्वेदन क्रिया करवून जेवावयास घालावें.

नंतर एकांत स्थळीं घेऊन जाऊन, सपाट फळीवर अथवा अंथरुणावर सूर्याकडे गुदद्वार करून, दुसऱ्या कोणा मनुष्याच्या मांडीवर कंबर उंच राहील अशा बेतानें, पोक्त मनुष्याकडून धरवून निजवावें; आणि घृतानें गुळगुळीत केलेलें यंत्र त्याच्या गुदद्वारांत घालावें. त्यानंतर त्या यंत्रानें मूळव्याधीच्या मोडाला पकडून शलाकेनें टोचावें. मग त्यावर क्षार टाकून त्याला जाळावा; पण अग्नीनें जाळावयाचें नाहीं. क्षार लावल्यावर यंत्र काढून घेऊन, तुपाचें अभ्यंग करावें व रोग्याला ऊन पाण्यांत बसवावें. याप्रमाणें प्रत्येक मोडावर चिकित्सा करावी. परंतु सर्वत्र मोडांवर एकदम क्षार टाकूं नये. ज्याला बहुत मोड आले आहेत अशा रोग्याच्या गुदद्वारांत, प्रथम दक्षिण बाजूकडील मोडाची चिकित्सा करावी; मग डाव्या बाजूची करावी; आणि शेवटीं कण्याकडील बाजूच्या मोडाची चिकित्सा करावी. या रोगांत जर शौचास साफ होत नसेल, तर एरंडेल तेलाचा जुलाब द्यावा. जो मोड क्षारानें जळण्यासारखा नसेल, त्याला रुईचें मूळ, शमीचीं पानें, मनुष्याचे केंस, सर्पाची कांत आणि मांजराच्या कातडीचें चूर्ण हीं तुपांत कालवून त्यांची धुरी द्यावी. रुईचा चिक, थोर वृक्षाच्या डिगऱ्या, कडु भोपळीचीं पानें आणि करंजाच्या बिया बकऱ्याच्या मुतांत वांटून, त्यांचा लेप करावा. ज्या मोडांतून रक्त निघत नसून, पीडा मात्र फार होत आहे, असा मोड शस्त्रानें कापून रक्तस्राव करावा. या रोगांत ज्याचा जठराग्नि मंद झाला आहे, त्यास ताक प्यावयास द्यावें. या रोगांत जठराग्नीचा सांभाळ करावा, शौचास साफ होईल व अग्नि प्रदीप्त असेल असें अन्नपान ग्रहण करावें आणि याच्या उलट गुणाच्या पदार्थांचा त्याग करावा. सुरण १६ भाग, चित्रक ८ भाग, सुंठ २ भाग, व मिरीं १ भाग घेऊन त्यांचें चूर्ण करून गुळांत गोळ्या वळून घेत जाव्या. याप्रमाणें दुसरेही योग्य उपाय करावे, म्हणजे अर्श अदृश्य होतो.



# अतिसार.

निदान—गुरु, अति स्निग्ध, तीक्ष्ण, अति उष्ण, विरुद्ध व विषम भोजन केल्यानें, विष खाल्यानें, ऋतु बदलल्यामुळें, कृमि त्यांचेनें आणि अशाच इतर कारणांनीं अतिसार रोग उत्पन्न होतो. विकारामुळें दुष्ट झालेल्या जळासारखा एखादा धातु जठराग्नीला मंद करून, मळमिश्रित वायुसहित जेव्हां वारंवार खालीं उतरतो तेव्हां अतिसार झाला असें ह्मणतात. वातातिसार, पित्तातिसार, कफातिसार, सन्निपातातिसार, शोकातिसार आणि आमातिसार, अशा प्रकारें अतिसाराचे सहा भेद आहेत. वातातिसारांत मळ लाल, फेसाळ, व अपक्व असतो व शौचास होते वेळीं वेदनांसहित पोटांत गडगडाट होतो. पित्तातिसारांत मळ पिवळा व हिरवा असतो, रोग्यास तहान लागते, दाह होतो, व मळद्वाराच्या जागेवर पाक होतो. कफातिसारांत मळ पांढरा, घट्ट, कफयुक्त, कच्च्या मांसासारख्या दुर्गंधाचा व थंड असा होतो. सन्निपातातिसारामध्यें तीनही दोषांचीं लक्षणें आढळतात व मळ मांसाच्या धुवणासारखा असतो, हा अतिसार कष्टसाध्य आहे. इष्ट पदार्थाच्या नाशामुळें शोक प्राप्त होऊन धातूचा क्षय होतो, आणि अश्रु व उष्मा हे दोनही पदार्थ शरीरांत जाऊन, अग्नीला मंद करतात व कोठ्यांत प्रविष्ट होऊन रक्ताला तापवितात. तेणेंकरून तें रक्त मग मळद्वारानें बाहेर पडतें. त्याचा रंग तांबडा असतो, व त्याबरोबर मळ पडतो अथवा पडतही नाहीं. शोकातिसार झाला हें ओळखणें व तो दूर करणें मोठें कठिण आहे. अन्न न पचल्यामुळें वात, पित्त व कफ हे दोष कोठ्याला दूषित करतात, व जेव्हां धातूला आणि मळाला वेगवेगळ्या रंगांनीं गुदाद्वारानें बाहेर टाकतात तेव्हां आमातिसार झाला. असें समजावें. आमातिसाराचे, अपक्व

आणि पक्व, असे दोन भाग होऊं शकतात. अपक्व आमातिसारांत, मळ पाण्यांत टाकतांच बुडतो आणि तो चिकट असतो. पक्व आमातिसारांत याच्या उलट प्रकार नजरेस येतो. जो मळ पातळ, मांसाच्या धुवणासारखा व ज्याला दुर्गंधि अत्यंत आहे, तसेंच ज्यांत रोग्याला फार तहान लागते, दाह होतो, श्वास लागतो व अन्नाची अरुचि पडते, असा आमातिसार ज्याला झाला तो रोगी कधींही वांचत नाहीं. क्षीणतेमुळें ज्या रोग्याम मळद्वाराचा संकोच करतां येत नाहीं व मळोत्सर्गही दाबतां येत नाहीं, ज्याचें पोट फुगतें, ज्याचा जठराग्नि मंद झाला आहे, व ज्याचें शरीर थंड पडलें आहे, तो रोगी अतिसाराच्या तडाक्यातून सुटणें कठिण आहे. या रोगांत सूज येणें, शूळ उत्पन्न होणें, ताप येणें, मूर्च्छा येणें, ओकाऱ्या येणें व उचकी लागणें वगैरे चिन्हें होतात, तीं मरणाचींच चिन्हें समजावीं. आणखीं जर तो रोगी वृद्ध असला तर क्वचितच वांचतो. पित्तातिसार व्हावयाचा असतां व झाल्यावरही पित्तकारक पदार्थ खाण्यांत आले तर त्यांपासून अति उग्र असा रक्तातिसार होतो.

**चिकित्सा**—जठराग्नि मंद पडल्यामुळें फारकरून अतिसार आमाशयांतून उत्पन्न होतो. यास्तव या रोगांत पहिल्यानें लंघन करवावें. शूळ व पोटफुगी असेल तर रोग्यास ओकारी काढवावी. अन्न न पचल्यामुळें अतिसार झाला असेल तर औषध घेण्याचें प्रयोजनच नाहीं; तर जेव्हां कडकडून भूक लागेल तेव्हां जेवावें म्हणजे झालें; अतिसार आपल्या आपणच बंद होतो. थोडथोडा मळ होत असेल व पोटांत फुगारा वाटत असेल तर हरड्याच्या चूर्णाची फकी मारावी. या रोगांत रोग्याला भूक लागेल तेव्हां हलकें अन्न जेवूं घालावें. तेणेंकरून अन्नावर रुचि, जठराग्नीचें बळ व शरीराचें बळही वाढतें. केव्हां ताकाबरोबर तर केव्हां कांजीबरोबर, केव्हां सुरेसहित

तर केव्हां द्राक्षारसासहित अन्न खावें. याप्रमाणें क्रम चालू ठेवल्यावर ग्राही ह्मणजे मळ बांधणारे, अग्नि प्रदीप्त करणारे व अन्न पचविणारे पदार्थ आंत घालून जेवण तयार करावें. या रोगांत सर्व उपायांपेक्षां तेलाचा उपयोग करणें फार हितावह आहे. मळ क्षीण झाला असेल, कफ व पित्त हीं आपल्या स्थानापासून भ्रष्ट झालीं असतील, व वाताची वृद्धि झाली असेल, तर बाह्य व अभ्यंतरीं तेलाचें सेवन केल्यानें जिवाचें संरक्षण होईल. जेवणापूर्वीं मध, साखर, व लोणी चाटून खाल्ल्यानें रक्तातिसार बंद होतो. शतावरीचें चूर्ण बकरीच्या दुधांत प्यावयास देऊन त्यावर दूधभाताचें जेवण करावें ह्मणजे रक्तातिसार बरा होईल. कफातिसारांत आमाला पक्क करण्याचेच उपाय विशेषें करून योजावे. भयामुळें व शोकामुळें उत्पन्न झालेल्या अतिसारांत वातातिसाराची चिकित्सा करावी. याप्रमाणें उपाय केल्यावर व त्याला योग्य दुसरे उपाय या पुस्तकांत दिले आहेत तेही योजल्यावर, जर शौचास झाल्यावांचून लघवी होऊं लागली आणि जठराग्नीचें बळ वाढल्यामुळें अन्न चांगल्या प्रकारें पचूं लागलें, तर रोगी अतिसाराच्या विकारापासून मुक्त झाला असें समजावें.



# ग्रहणी.

**निदान**—अतिसार बरा झाल्यावर ज्याचा जठराग्नि मंद झाला असतांही, जो रोगी अहितकारक पदार्थ सेवन करतो, त्याचा अग्नि विकारयुक्त होऊन संग्रहणी उत्पन्न करतो. अत्यंत विकार पावल्यामुळें तीनही दोष वेगवेगळे अथवा एकत्र होऊन जर संग्रहणी उत्पन्न झाली असेल तर रोगी जें खातो तें पचल्यावांचून अथवा पचन होऊन मळद्वारानें बाहेर पडतें. तेव्हां रोग्याच्या पोटांत मुरडा होतो व मळ अत्यंत दुर्गंधयुक्त असतो. हा विकार वायूच्या विकृतीमुळें झाला असेल तर घट्ट मळ वारंवार पडतो; आणि जर पित्ताच्या विकृतीमुळें झाला असेल तर पातळ होतो. वायूच्या दोषामुळें उद्भवलेल्या संग्रहणींत अन्न मोठ्या कष्टानें पचतें, भूक व तहान फार लागते, आमासहित आंबट ओकारी व शौचास होतें. शरीर अशक्त होतें, गुदद्वारांत कातरीनें कातरल्यासारखी पीडा होते. अन्न पचत असतें तेव्हां किंवा पचून गेल्यावरही पोट फुगतें, आणि वातगुल्म, हृद्रोग व कवळू झाली असावी अशी शंका येऊं लागते. पित्तसंग्रहणीमध्यें पित्त हें जठराग्नीला मंद करून, अपक्व व हिरवा पिवळा, पातळ मळ उत्पन्न करून बाहेर पाडतें; याशिवाय ढेकर येतात, गळ्यांत व हृदयांत जळजळ होऊं लागते, व अन्नावर वीट पडतो. जड, स्निग्ध व थंड भोजन जेवल्यानें अथवा अत्यंत भोजनामुळें अथवा जेवल्यावर लगेच निजून राहिल्यानें कफ कोप पावून जठराग्नीला मंद करतो, तेव्हां कफसंग्रहणी झाली असें ह्मणतात. या कफसंग्रहणीमुळें रोग्यास अन्न नेहमींप्रमाणें पचत नाहीं. हृदयामध्यें वेदना होतात, ओकारी होते, पोट जड भरलेलें वाटतें, आणि शरीर सडपातळ न झालें तरी अशक्त मात्र होतें, आणि अत्यंत आळस उत्पन्न होतो. वर सांगितले तिन्ही दोषांचीं लक्षणें एकदम दिसलीं तर त्रिदोषज संग्रणी झाली असें समजावें. तींत आंतड्यांत

गुरगुराट, आळस, आणि अशक्तपणा वाटूं लागतो; आणि शौचास होतें तें पातळ, घट्ट, थंड, स्निग्ध, फेसाळ, शब्दसहित व मंद वेदनायुक्त असें होतें. अशा रीतीनें शौचास झाल्यावर दहा पंधरा दिवसांनीं, किंवा कित्येक महिन्यांनीं, किंवा दोन चार दिवस बंद होऊन पुन्हां होऊं लागतें. ही संग्रहणी दिवसा विकारयुक्त, रात्रौ शांत, असून बरोबर समजुतीनेंही येत नाहीं व जिची चिकित्साही कांहीं गुणावह होत नाहीं. अशी संग्रहणी लौकर बरी न होतां पुष्कळ दिवसपर्यंत पीडा देत असते. ही असाध्य आहे.

**चिकित्सा** या रोगाचा आश्रय करून राहिलेले दोषांची चिकित्सा अजीर्णातल्याप्रमाणें करावी, आणि अतिसार बरा करण्याकरितां योजावयाचे उपाय करून, आम पक्क करावा. आम फार वाटल्या तर अतिविष व सुंठ घालून केलेली कण्हेरी आंबट पदार्थ घालून द्यावी. ताक हें दीपन, ग्राही, व लघु असल्यामुळें अत्यंत पथ्यकर आहे. आपल्या मधुर पाकामुळें ताक हें पित्ताला शांत करतें; तें कषाय, उष्णवीर्य आणि रूक्ष असें असल्यामुळें कफाचा नाश करतें; स्वादु, अम्ल व घट्ट असल्यामुळें वाताचा प्रकोप शांत करतें. आमयुक्त पातळ शौचास होत असल तर डाळिंबाच्या रसांत बीडलवण घालून प्यावयास द्यावें, अथवा बेलफळ, चित्रक, व सुंठ यांचें चूर्ण करून पाण्यांत द्यावें. या रोगांत कफाचा प्रकोप दिसला तर तीक्ष्ण पदार्थ देऊन ओकारी काढवावी. नंतर तिखट, आंबट, व खारट या पदार्थांच्या सेवनानें जठराग्नीला प्रदीप्त करावा. संग्रहणीच्या मनुष्याचें शरीर रूक्ष झालें असलें तर अग्नीला प्रदीप्त करणारे पदार्थ घालून तूप किंवा तेल प्यावयास द्यावें. स्नेहाच्या सेवनानें अग्नि मंद झाला तर क्षार, आसव, अरिष्ट इत्यादिकाचा उपयोग करून, शिवाय दुसरेही योग्य उपचार करावे. ग्रहणी रोगांतून मुक्तता झाल्यावर, अग्नि मंद वाटल्यास, त्याचें दीपन करण्यास स्नेहपान प्रशस्त आहे.



# मूत्रकृच्छ्र.

**निदान**—फार मेहनतीमुळें, तीक्ष्ण औषधांनीं, रूक्ष पदार्थांनीं, मद्यानें, नेहमीं भरधाव वाहनावर बसल्यामुळें, पचन बरोबर झालें नसतां जेवल्यामुळें, अपक्व पदार्थ खाह्यानें व दुसऱ्या अशाच कारणांमुळें मूत्रकृच्छ्र व्याधि उत्पन्न होतो. याचे आठ प्रकार आहेत. (१) वातामुळें, (२) पित्तामुळें, (३) कफामुळें, (४) सन्निपातामुळें, (५) शल्यामुळें, (६) मळावरोधामुळें, (७) वीर्यदोषामुळें, व (८) मुतखड्यामुळें. वातामुळें होणाऱ्या मूत्रकृच्छ्रामध्यें पाठ, कंबर व शिश्न यांत पीडा होते व वारंवार थोडथोडें लघवीस होतें. पित्तामुळें मूत्र पिंवळ्या रंगाचें व किंचित तांबूस असतें, व तें मोठ्या कष्टांनीं बाहेर पडतें व पडते वेळीं दाह होतो. कफामुळें होणाऱ्या मूत्रकृच्छ्रामध्यें बस्ति व शिश्न जड होऊन, तीं सुजतात, व मूत्रास चिकटपणा येतो. संनिपातजन्य मूत्रकृच्छ्रामध्यें तीनही दोषांचीं लक्षणें होतात; हा व्याधि कष्टसाध्य आहे. ज्या मूत्रकृच्छ्रामध्यें मूत्रवाहक नलिकेंत उदरांतील शल्यामुळें छिद्रें पडतात, त्यास शल्यामुळें झालेलें मुत्रकृच्छ्र ह्मणतात. या मूत्रकृच्छ्राचीं लक्षणें वातापासून होणाऱ्या मूत्रकृच्छ्राच्या प्रमाणेंच असतात. मळाचा अवरोध झाल्यानें, वात विकृत होऊन मूत्र बंद करतो. दोष कोपल्यामुळें वीर्यामध्यें विकार होऊन मूत्रकृच्छ्र उत्पन्न होतें. या व्याधींत मूत्राबरोबर वीर्याचाही थोडथोडा स्राव होत असतो. मूत्राच्या अवरोधामुळें वातादि दोष कोप पावून तेरा प्रकारचे मूत्राघात होतात. मूत्रादिकांचा वेग अडवून धरल्यानें मळद्वारीं वायु कोपून, मूत्रास अडवितो व आपल्या स्वाभाविक गतीनेंच विरुद्ध होऊन, वावटळीच्या वायूसारखा फिरतो. यामुळें मोठ्या कष्टांनीं थोडथोडी लघवी होऊन जळजळ सुटते. या मूत्रा-

घातास वातकुंडलिका असें म्हणतात. वायु हा बस्ति व गुदाद्वार यांस फुगवून, तेथें खड्यासारखी गांठ उत्पन्न करतो व तेणें करून मूत्रमार्ग बंद करतो. या रोगास अष्टीला असें म्हणतात. मुद्दाम मूत्र अडवून धरल्यास, वायु हा कोपून बस्तीचें तोंड बंद करतो ; तेणें करून मूत्र अडकून राहतें, व बस्ति आणि ओटीपोट यामध्यें पीडा होते. या रोगास वातबस्तिक असें म्हणतात. हा मोठ्या कष्टांनीं बरा होतो. लघवीस वारंवार अडकवून धरल्यानें मागाहून ती हळूहळू होऊं लागते. तेव्हां तो मूत्रातीत व्याधि असें म्हणतात. मूत्रवेग दाबून धरल्यास अपानवायु कोप पावून पोट व ओटीपोट यांत फुगोशी उत्पन्न करतो व अधोबस्तीचा मार्ग अडवितो, तेव्हां त्या व्याधीस मूत्रजठर असें म्हणतात. मळद्वारांत, शिश्नांत, किंवा त्याच्या अग्रभागीं आल्यावर मूत्र अडकावें, आणि मुद्दाम लघवीस गेलें असतां वायूच्या जोरानें हळुहळु थोडें मात्र लघवीस व्हावें, आणि तींत रक्ताचा अंशही असावा, जळजळाट मात्र एकाद् वेळीं असावा व एकाद् वेळीं नसावा. याप्रमाणें अपानवायु कोपल्यामुळें जो मूत्राघात व्याधि उत्पन्न होतो तो मूत्रोत्संग या नांवानें प्रसिद्ध आहे. धातु शुष्क झाल्यामुळें शरीर रूक्ष होतें अथवा चिंतेमुळें दुर्बळ होतें, तेव्हां मळद्वारांतील पित्तदोष व अपानवायु हे मूत्राचा क्षय करितात आणि वेदनासहित दाह उत्पन्न करितात; म्हणून या व्याधीस मूत्र-क्षय म्हणतात. बस्तीच्या मुखांत एकदम वाटोळी व स्थिर अशी लहानशी गोळी अथवा गांठ उत्पन्न होते, व तिच्यापासून अश्मरी-सारखी पीडा होते. या व्याधीस मूत्रग्रंथि असें म्हणतात. लघवीस होत असतां स्त्रीसंग केल्यानें वायु वीर्याला उडवून देतो, म्हणजे स्वाभाविक मार्गाहून अन्य मार्गानें घेऊन जातो. यामुळें लघवी होतांना अथवा झाल्यावर वीर्य पडतें आणि त्याचा रंग पाण्यांत राख टाक-

त्याप्रमाणें भुरकट असतो. या व्याधीस मूत्रशुक्र असें म्हणतात. फार मेहनत, फार वाटचाल व अतिशय कडक ऊन हीं महन केल्यामुळें पित्त कोपून बस्तीमध्यें शिरतें आणि वायूशीं मिळून शिश्नांत आणि मळद्वारांत जळजळाट उत्पन्न करतें. लघवी हळदी-सारखी पिवळी किंवा तांबडी होऊन वारंवार थोडथोडी व मुद्दाम जोर करावा तेव्हां मात्र होते. या व्याधीस उष्ण वात म्हणतात. वायु हा रुक्ष गुणामुळें पित्ताला व कफाला अथवा दोघांसही शुष्क करून घट्ट करितो, तेव्हां दाह होऊन पिवळी, तांबडी व घट्ट अशी लघवी होते. आणि लघवी सुकल्यावर त्या जागीं गोरोचन किंवा शंख यांच्या पुडीसारखा माखा बसतो. या व्याधीस मूत्रसाद असें म्हण-तात. दुर्बळ व रुक्ष मनुष्याचा मळ पोटांतून जेव्हां वायु हा काढून टाकितो तेव्हां तो मळ मूत्रमार्गानें येतो व त्यामुळें मोठ्या कष्टानें लघवीस होतें. तिला वासही मळासारखा येतो. या व्याधीस वीर्य-विघात असें म्हणतात. फार लवकर लवकर चालल्यानें, लंघन केल्यानें, जननेंद्रियास चोळल्यानें आणि अशाच दुसऱ्या कारणांनीं बस्ति आपलें स्थान सोडून वर चढतो, आणि तेथें वृद्धि पावून गर्भाप्रमाणें कठीण होऊन राहतो. तेव्हां शूळ, कंप, आणि दाह यां-सहित लघवी थेंबथेंब पडूं लागते आणि जननेंद्रियास फार जोरानें दाबल्यास कारंजाप्रमाणें एकदम धार निघते; परंतु मागाहून इंद्रियास सूज येते व ओटीपोटांत सूया टोचल्याप्रमाणें पीडा होते. या व्याधीस बस्तिकुंडल या नांवानें ओळखतात. हा व्याधि अति भयंकर आहे व त्यांत फारकरून वायूचें बळ प्रधान आहे. या व्याधींत पित्त प्रधान असलें तर लघवीस जळजळाट होऊन ती रंगीबेरंगी होते; कफ प्रधान असला तर सूज येते आणि लघवी घट्ट, चिकट आणि पांढऱ्या रंगाची असते. जर या रोगांत शिश्नाच्या

छिद्रांत कफ भरून राहिला असला तर रोग बरा होण्याची आशा सोडूनच द्यावी. आणि पित्त भरलें असलें तर तीच गति समजावी. परंतु जर इंद्रियाचें छिद्र साफ मोकळें असलें तर मात्र हा रोग साध्य आहे असें समजण्यास हरकत नाहीं.

चिकित्सा—वात कोपल्यामुळें जो मूत्रकृच्छ्र व्याधि उत्पन्न होतो, त्यांत वाताला हरण करणारा असा तैलाचा अभ्यंग करावा; उष्ण पाण्यांत रोग्यास बसवावें; आणि उष्ण पाण्याचा शेक करावा. जर रोग्यास मद्य चालत असेल तर संचळखार पुष्कळ टाकून मद्य प्यावयास द्यावें. पित्तप्रकोपामुळें मूत्रकृच्छ्राचा व्याधि झाला असेल, तर शेक, लेप आणि अवगाहन क्रियेमध्यें चंदनादिक शीतळ पदार्थ असावे. कफामुळें झालेल्या मूत्रकृच्छ्र व्याधीवर वमन, स्वेदन आणि तीक्ष्ण, उष्ण आणि कटु भोजन, जवांचे पदार्थ व क्षार यांची योजना करावी; अथवा बारिक वेलचीचें चूर्ण मद्यांत किंवा आंवळ्याच्या रसांत प्यावयास द्यावें; अथवा करंजाच्या बिया बारीक वांटून, ताकांत कालवून, तें प्यावयास द्यावें. सन्निपातामुळें झालेल्या मूत्रकृच्छ्र व्याधीवर पूर्वी सांगितलेले उपाय क्रमेंकरून योजावे. बस्तीमध्यें मुतखड्याचा रोग झाला असेल, तर रोगाच्या बाल अवस्थेंतच औषध केल्यानें तो बरा होतो : पण प्रौढ झाल्यावर तो काढण्यास शस्त्रक्रियाच केली पाहिजे. मुतखड्याचें पूर्वरूप दिसूं लागतांच स्नेहादिक उपचारांचा क्रम सुरू करावा. जुनें मद्य पाजून, रथावर किंवा घोड्यावर रोग्यास बसवून, त्यास फार धावडाविल्यानें प्रसंगीं मुतखडा हालल्यामुळें पडण्याचा संभव आहे. वीर्याचा खडा जमला असल्यास प्रथम बस्ति द्यावा आणि मग पुष्टीचें उपाय करावे. अथवा रोग्यास प्रतिबंध नसेल तर त्यास कोंबड्याचें मांस खावयास घालून मदोन्मत्त स्त्रियांशीं संग करवावा. या योगानें मुतखड्याचा व्याधि बरा होतो. इतकीही क्रिया करून मुतखड्याचा रोग बरा होणार नाहीं, तर, राजाची परवानगी घेऊन, शस्त्रक्रिया करावी. व दुसरेही योग्य उपाय करावयाचे ते करावे.

# प्रमेह.

**निदान**—नेहमी बसून राहिल्यानें, अथवा निजून राहिल्यानें, फार दहीं खाल्यानें, गांवांत अथवा पाण्यांत फिरणाऱ्या जनावरांच्या मांसाचा रस फार खाल्यानें, नवें अन्न व नवें पाणी यांचा उपयोग केल्यानें, फार दूध प्याल्यानें, गुळाची विकृति वगैरे खाल्यानें, आणि कफास कोपविणारे पदार्थ खाल्यानें, प्रमेह उत्पन्न होतो. बस्तींत जमलेला कफ हा, मेद, मांस आणि शरीरांतील क्लेद यांस दूषित करून जो प्रमेह उत्पन्न करतो, तो कफजन्य प्रमेह म्हटला आहे. उष्णवीर्य पदार्थ फार खाल्यानें पित्त कोपून, बस्तींत जमा होऊन, वर सांगितल्याप्रमाणें मेद आदिकांस दूषित करून, जो प्रमेह उत्पन्न करितात, त्यास पित्तजन्य प्रमेह म्हणतात: आणि दोषाचें बळ कमी झाल्यानें वायु कोपून, मेद आदिकांस खेचून बस्तीच्या मुखभागीं आणतो व प्रमेह रोगास उत्पन्न करतो ; त्यास वातजन्य प्रमेह म्हणतात. कफापासून जे दहा प्रकारचे प्रमेह होतात ते साध्य आहेत. पित्तापासून साहा प्रकारचे प्रमेह होतात, ते कष्टसाध्य होत. व वायूपासून चार प्रकारचे होतात, ते असाध्य होत. कारणकीं कफजन्य प्रमेहांत कफ, दोष आणि मेदआदिक दूष्य या दोहोंवर तिक्तादिक स्वभावाचें एक औषध लागू पडतें. पित्तजन्य प्रमेहांत पित्ताची शांति करणारीं औषधें योजलीं असतां तो बरा होतो. परंतु हे उपाय मेद आदिकांची अभिवृद्धि करणारे आहेत. वातजन्य प्रमेहांत वाताची निवृत्ति करणारीं औषधें योजावीं लागतात. त्यांच्या योगानें मेद आदिकांची अत्यंत अभिवृद्धि होते. कफ, पित्त आणि वायु हे तीन दोष होत आणि मेद, रक्त, शुक्र, उदक, मांस, स्नेहलसिका, मज्जारस आणि ओज हे पदार्थ मेहाला दूषित करणारे

आहेत. अशा प्रकारें मनुष्यास वीस प्रकारचे प्रमेह होतात. यारोगाच्या आरंभींच दांत, जीभ आणि टाळु यांवर मळ सांचतो, हातपाय इत्यादि अवयवांची आग होत असते, शरीर चिकट होतें, तहान फार लागते, चालल्यानें श्वास लागतो, मस्तकाचे केश गुंततात, आणि हातापायांचीं नखें वाढतात. या रोगाचें सामान्य लक्षण हें आहे.कीं लघवीला पुष्कळ होतें व लघवी गढूळ असते. या रोगाच्या वेगवेगळ्या भेदांत दोष आणि दूष्य हीं एकसारखीं असतात, तरी त्यांच्या संयोगाच्या भेदामुळें मूत्राच्या रंगादिक भेदावरून प्रमेहाचे वेगवेगळे भेद कल्पिले आहेत. वर सांगीतलेल्या कफजन्य प्रमेहाच्या दहा भेदांपैकीं उदक नांवाच्या प्रमेहांत निर्मळ, फार पांढरें, शीतळ आणि गंधरहित, पाण्यासारखें, किंचित मळीन आणि तेलासारखें बुळबुळित असें रोग्याचें मूत्र असतें. इक्षु नामक प्रमेहांत उसाच्या रसासारखें मधुर मूत्र असतें. सांद्र नांवाच्या प्रमेहांत रोग्याची लघवी धरून ठेवली असतां, ती घट्ट होते. सुरानामक प्रमेहांत प्रथम निर्मळ आणि शेवटीं गढूळ अशी लघवी होते. पिष्ट नामक प्रमेहांत, पिठांत पाणी घातल्याप्रमाणें घट्ट व पांढरें मूत्र असतें व तें वीर्यसहित अथवा वीर्यासारखें असतें. सिकता नामक प्रमेहांत रेतीच्याकणा सारखे चकचकित रजःकण मूत्रांत दृष्टीस पडतात. शीतनामक प्रमेहांत अत्यंत शीतळ व मधुर अशी लघवी वारंवार होते. शनैर्मेहामध्यें हळुहळु व थोडथोडी लघवी होते. आणि लालामेहामध्यें तंतुयुक्त व तेलासारखी लघवी होते. आतां पित्ताच्या प्रकोपामुळें जे साहा प्रकारचे प्रमेह होतात, त्यांपैकीं क्षार प्रमेहांत स्पर्श, गंध, वर्ण आणि रस यांच्या संबधानें खारट पाण्यासारखी लघवी होते. नीलमेहांत जी लघवी होते तिचा रंग निळा असतो. कालमेहांत लघवीचा रंग श्याम

असतो. हारिद्रमेहांत लघवीचा रंग पिंवळा, रुचि तिखट, आणि स्पर्श उष्ण असतो. मांजिष्ठमेहांत लघवी कुजक्या मांसासारखी वाईट घाण येणारी व मंजिष्ठाप्रमाणें तांबड्या रंगाची असते. रक्तप्रमेहांत दुर्गंधयुक्त, रुचीनें खारट, स्पर्शानें उष्ण, व रंगानें रक्ताप्रमाणें अशी लघवी असते. वातप्रकोपापासून जे चार प्रकारचे प्रमेह होतात, त्यांपैकीं वसा (चरबी) नामक मेहामध्यें वसायुक्त अथवा वसेसारखी लघवी होते व ती वारंवार होते. मज्जामेहामध्यें लघवी मज्जामिश्रित अथवा मज्जेसारखी असून ती वारंवार होते. क्षौद्रमेहांत लघवी तुरट, गुळचट आणि चिकट असते. हस्तिमेहामध्यें जी लघवी होते, तिची धार मदोन्मत्त हत्तींच्याप्रमाणें वेगरहित आणि अडखळत अडखळत अशी होते, व तींत लस असते. कफजन्य प्रमेहांत अन्न पचत नाहीं, अन्नावर वीट पडतो, ओकारी होते, ताप येतो, खोकला उचलतो व पडसें होतें. पित्तजन्य प्रमेहांत, गुदा आणि शिश्न यांत सुया टोचल्याप्रमाणें वेदना होतात. अंडकोशावरील चामडी पिकून फाटते, ताप भरतो, तहान लागते, आंबट ढेकर येतात, मूर्च्छा येते आणि शौचास पातळ होतें. वातजन्य प्रमेहांत उदावर्त होऊन, कंठाचा व छातीचा निरोध होतो. चांगलें चांगलें भोजन जेवण्याची इच्छा वाढते, शूळ उपटतो, निद्रेचा नाश होतो, पाण्याचा शोष पडतो, आणि खोकला व दमा लागतो. ज्या प्रमेह रोगांत, अन्न न पचणें इत्यादि वर लिहिलेले उपद्रव जाणवतात, बारिक बारिक फोड उद्भवतात आणि लघवीस फार होतें, असा प्रमेह असाध्य जाणावा. त्याचप्रमाणें जो प्रमेह मूळ धरून, रोग्याच्या शरीरांत घर करून बसला, तो, आणि मधुमेही पुरुषाच्या संसर्गानें उत्पन्न झालेला मेह, हाही असाध्यच जाणावा. ज्याप्रमाणें वंशपरंपरागत प्राप्त झालेले कुष्टादिक व्याधि असाध्य होत, त्याच-

प्रमाणें वंशपरंपरागत प्रमेहही असाध्यच होय. सर्व प्रकारच्या प्रमेहावर लौकरच औषधोपचार केला नाहीं, अथवा त्याच्या विरुद्ध कांहीं जरी आचरण घडलें तरी ते मधुमेहासारखे दुःखदायक होऊन असाध्य होतात. मधुमेहाच्या रोग्याची लघवी रंगानें मधासारखी असते. मधुमेहाचे दोन प्रकार आहेत. एक धातूचा क्षय झाल्यामुळें मधुमेह जडतो तो; आणि दुसरा प्रकार असा कीं, इतर दोष वायूचा मार्ग अडवून त्याला घेरतात, तेव्हां जो उत्पन्न होतो तो. वायूच्या गतीला प्रतिबंध झाला असतां, होणाऱ्या मधुमेहांत जर पित्ताचें बळ जास्त असेल, तर त्याचीं चिन्हें एकदम अकल्पितच दृष्टीस पडतात. तीं क्षणांत क्षीण व क्षणांत पूर्ण भासतात. हा मधुमेह कष्टसाध्य आहे. कोणत्याही प्रकारचा मेह असो—ज्यांत मुख्यत्वें करून मधाच्या रंगासारखी लघवी होते आणि सर्व शरीरांत गुळचटपणा उत्पन्न होतो, ते मेहाचे वेगवेगळे सर्व प्रकार मधुमेह या नांवाखालींच मोडतात.

चिकित्सा—प्रमेहाचा रोगी जर बळवान असला, तर प्रथम त्यास वमनविरेचन द्यावें. नंतर प्रशमनाचे उपाय करावे; तथापि कर्षण उपाय करूं नयेत. वमनरूप शोधन उपायाला नालायक अशी गर्भिणी स्त्री, त्याचप्रमाणें विरेचनरूप शोधन उपायाला नालायक असा नवीन तापकरी इत्यादि रोग्यासही प्रमेह रोगावर प्रशमन उपाय योजावे. आंवळ्याच्या रसांत कुटलेली हळद घालून व त्यांत आणखी मध घालून, चाटावयास द्यावी; किंवा दारुहळद, देवदारु, त्रिफळा, आणि नागरमोथा यांचा काढा करून द्यावा. या रोगांत तृण धान्य, शामाक, मूग, जुने तांदूळ, साठी चोखा वगैरे पदार्थ पथ्यकर आहेत. जुनी मध, व दर्भाचीं मूळें

पाण्यांत उकळून दिलीं असतां गुणावह आहेत. प्रमेहाच्या रोग्यानें शरीर खरबरीत पदार्थांच्या पुडीनें खूप चोळावें, त्याच्याकडून मेहनत करवावी, रात्रीस जागरण करवावें; याशिवाय कफ व मेद हरणारी अशा गोष्टी या रोगावर हितकारक होत. या रोगांत बारिक फोड उत्पन्न होतील. मग ते पिकोत किंवा न पिकोत; तरी त्याची चिकित्सा सूज आल्याप्रमाणें करावी. या फोडांस प्रमेह पिटिका अशी संज्ञा आहे. या फोडांच्या पहिल्या अवस्थेंत क्षीरयुक्त वृक्षाचा चीक घालून उकळविलेलें पाणी प्यावयास द्यावें, अथवा बोकडाचें मूत्र प्यावयास द्यावें, आणि नंतर तीक्ष्ण विरेचन द्यावें. शर्करा नामें प्रमेहाच्या रोग्यास शिलाजित योजावा, ह्मणजे रोग बरा होईल. या रोगावर उपयोगी असे चंद्रकलारस, चंद्रप्रभा गुटिका वगैरे, यास पुस्तकास जोडलेल्या परिशिष्ट भागांत, तसेच दुसरे ठिकाणी जे प्रयोग सांगीतले आहेत, ते विशेष हितकारक आहेत.

## विद्रधि.

**निदान**—वात, पित्त आणि कफ हे दोष, अतिशय कोप पावून, हाडांचा आश्रय करून, राहतात, आणि त्वचा, रक्त, मांस आणि मेद यांस दूषित करून, हळुहळू दारुण सूज उत्पन्न करितात. मग तींत शूळ व अनेक प्रकारची पीडा जाणवूं लागते. ही सूज बहुधा वर्तुळाकार किंवा लांबट असते. वात, पित्त, कफ, सन्निपात, क्षत आणि रक्त यांपासून साहा प्रकारचा विद्रधि रोग उत्पन्न होतो. वातजन्य विद्रधीचा रंग काळवट व तांबूस असतो. तो केव्हां मोठा तर केव्हां लहान, असा असतो, व त्यांत अतिशय वेदना होतात. पित्तजन्य विद्रधि हा वरून पिकलेल्या उंबराप्रमाणें रंगानें काळसर

असून, त्यांत आग होते, व ज्वरही येतो. त्याची उत्पत्ति व पक्व दशा लवकर होते. कफजन्य विद्रधि हा फोडाप्रमाणें मोठा, पिवळट पांढऱ्या रंगाचा, शीतळ, चिकट असा असून, त्यांत वेदना कमी होतात. तो उत्पन्न होणें व पिकणें याम कांहीं अवधी लागतो. वर लिहिलेले तीनही प्रकारचे विद्रधि पिकल्यावर, वातजन्य असेल तर त्यांतून पातळ पू निघतो; पित्तजन्य असेल तर पिवळा, आणि कफजन्य असेल तर पांढरा पू निघतो. सन्निपातजन्य विद्रधि हा वंटेप्रमाणें हालणारा, लहान किंवा मोठा असून, त्यांत अत्यंत वेदना होतात. तो पिकला तर बरा, नाहींतर तो पिकतही नाहीं. जर पिकला तर त्यांतून पुवाचा पुष्कळ स्राव होत असतो. शस्त्राच्या प्रहारानें आंग सोलवटलें असलें तर, अथवा चुरलें असलें तर, अथवा जखमी मनुष्यानें पथ्य न पाळतां कुपथ्य केलें असलें तर, वात कोपून, शरीरांत घावाची अथवा माराची जी गरमी उत्पन्न करतो, तिच्या योगानें रक्तासहित पित्ताला कोपवून, दाह व तृषा यांनीं युक्त असा ज्वर उत्पन्न करतो. या क्षतजन्य विद्रधीचीं लक्षणें पित्तजन्य विद्रधीच्या लक्षणांसारखींच असतात. रक्तजन्य विद्रधीमध्यें काळसर फोड उत्पन्न होऊन, रंगानें काळसर, तीव्र दाहयुक्त असा असून, अत्यंत पिडा होते. या रक्तजन्य विद्रधीचीं लक्षणें पित्तजन्य विद्रधीसारखींच असतात. विद्रधि हा, गुदद्वार, शिश्नाचें मुख, नाभि, काख, बरगड्या, कुक्षिपिंड, प्लीहा, काळीज, हृदय व पिपासास्थान या जागीं होतो. गुदद्वारीं विद्रधि झाल्यानें अपान वायूचा प्रतिबंध होतो. शिश्नावर झाल्यानें लघवी कष्टानें थोडथोडी मात्र होते. नाभीमध्यें झाल्यानें उचकी लागून पीडा उत्पन्न होते, व रोगी घाबरा होतो. काखेंत झाल्यानें वायूचा कोप होतो. कण्यावर झाल्यानें कंबर व कणा ताठ होऊन दुःख होतें.

कुशीवर झाल्यानें फासळ्यांचा संकोच होतो. प्लीहेवर झाल्यानें श्वास-प्रश्वासाला प्रतिबंध होतो. हृदयावर झाल्यानें शरीराचे सर्व अवयव धरल्यासारखे होतात, आणि त्यांस कंप सुटतो. काळिजावर झाल्यास श्वास व उचकी लागते. पिपासास्थानावर झाल्यास रोग्यास पाणी पिण्याची वारंवार इच्छा होते. नाभीवर विद्रधि होतो, तो पिकून फुटल्यावर, त्याच मुखाच्या मार्गानें बाहेर पडतो. आणि नाभीच्या खालच्या आंगास विद्रधि झाला असतां, पिकल्यावर त्याचा स्राव दोनही मार्गांनीं बाहेर येतो. गुदाद्वारानें स्राव होईल तर रोगी वांचण्याची आशा असते; पण मुखद्वारानें होऊं लागल्यास रोगी मरण पावतो. प्लीहेवर व पिपासास्थानावर विद्रधि झाल्यास, बाहेरून फुटेल तर मात्र वेळानुसार रोगी वांचतो; परंतु दुसऱ्या ठिकाणीं कोठें झाल्यास, रोग्याच्या प्राणांची आशा नको. पहिल्या पांच प्रकारचा विद्रधि साध्य आहे. सन्निपातापासून झालेला विद्रधि मात्र असाध्य आहे. कच्ची, कच्ची पक्की, व पूर्ण पक्की या अवस्था सुजेप्रमाणेंच याही रोगास आहेत. रोग्याचें पोट फुगलें, लघवीचा प्रतिबंध झाला, ओकारी झाली, उचकी लागली व तहान लागली, म्हणजे रोगी वांचण्याची आशा नलगे.

**चिकित्सा**—विद्रधि जोंपर्यंत कच्च्या अवस्थेंत आहे, तोंपर्यंत सुजेवर सांगितलेले उपचार करावे, रक्त काढवावें, व पिकल्यानंतर व्रण बरा करण्याकरितां करावयाचे ते सर्व उपाय करावे. औषधानें जेव्हां आराम वाटेनासा होईल तेव्हांच शिंगानें किंवा शस्त्रानें रक्त काढवावें. कोठ्यांत विद्रधि झाला तर पिकते वेळीं बाहेरून त्याची गांठ दिसेल, तेव्हां तिच्यावर पिकण्याकरितां पिकवण वगैरे बांधावें. पिकल्यावर फोडून, व्रणाप्रमाणें, चिकित्सा करावी.

या रोगाची चिकित्सा, फार करून, गळवासारखी करावी. ज्या दोषांनीं हा रोग झाला असें वाटेल, त्या दोषांवर लागू पडेल अशा औषधांच्या काढ्यांत गुग्गुळ किंवा शिलाजित घालून तो व्यावयाम द्यावा. होईल तोंपर्यंत हा रोग पिकूं देऊं नये. कारण कीं पिकल्यावर या रोगाची शांति होणें केवळ दैवाधीन गोष्ट आहे. स्त्रियांच्या स्तनावर विद्रधि झाला तर त्यावर पिकवण वगैरे न बांधतां, इतर व्रणाची चिकित्सा करावी. कदाचित् त्यावर शस्त्रप्रयोग करण्याची गरज पडली तर स्तन्य वाहणाऱ्या नाड्यांचें आणि काळ्या बोंडीचें रक्षण करावें.

---

## गुल्म.

**निदान**—मिथ्या आहारविहार केल्यापासून वातादिक दोष, कोपून, कोठ्यांत गांठ उत्पन्न करितात. या गांठीचे पांच प्रकार आहेत, त्यांस गुल्म ह्मणतात. दोहों बाजूंच्या फासळ्या, हृदय, नाभि आणि बस्ति हीं त्यांचीं पांच स्थानें होत. हृदय, नाभि आणि बस्ति यांत जी गांठ हालती चालती अथवा स्थिर भासते, आणि जी लहान मोठी व वाटोळी असते, ती गुल्म या नांवानें प्रसिद्ध आहे. स्त्रियांस रजस्वलावस्थेंत जें रज पडतें, त्याची एक प्रकारची गांठ होते, ह्मणजे वात, पित्त, कफ, सन्निपात आणि रज यांच्या योगानें या गुल्म रोगाचे पांच प्रकार होतात. या सर्व प्रकारच्या गुल्म रोगांत साधारणपणें अन्नावर अरुचि पडते; मळमूत्राचें विसर्जन मोठ्या कष्टानें होतें; आंतड्यांत करकर शब्द होतो आणि पोट फुगतें. स्वाभाविक वेगांस प्रतिबंध केल्यानें, बळवंताबरोबर

युद्ध केल्यानें, उपवास केल्यानें, आणि अशाच दुसऱ्या कित्येक कारणांनीं वातगुल्म होतो. ही गांठ केव्हां केव्हां नाभींत, केव्हां केव्हां फासळ्यांत, केव्हां केव्हां बस्तींत, आणि लांबट, मोठी, लहान किंवा वाटोळी असते. तिच्या योगानें वेदना होतात; त्या केव्हां फार, केव्हां थोड्या होतात. ही गांठ वातजन्य समजावी. तेणें करून मळ आणि अपान वायु सुटत नाहीं; कंठ व तोंड यांस कोरड पडते; आणि अन्न पचते वेळीं अंमळ अधिक जोर करून ती गांठ फुगते, आणि जेवल्यानंतर अंमळ दबते. अतिशय मद्य प्याल्यानें, सूर्याचा व अग्नीचा ताप सहन केल्यानें आम झाल्यानें व रक्त बिघडल्यानें, पित्तगुल्म उत्पन्न होतो. या गुल्मानें ताप येतो, तृषा वाटते, अन्न पचते वेळीं शूळ उत्पन्न होतो व पोटावर हात फिरविल्यानें अतिशय वेदना होतात. थंड, जड व निकट पदार्थ खाल्ल्यानें, आळंबळं जवल्यानें, व दिवसा निजल्यानें, कफ गुल्म होतो. तेणें करून शरीर जड होतें; थंडी वाजून ताप येतो; अंग फुटतें; खोकला होतो; अरुचि पडते, व पीडा कांहीं थोडी होते. ही गांठ कठीण व फुगलेली असते. कफगुल्माचीं जीं कारणें सांगितलीं तींच सन्निपातगुल्माचींही समजावीं. सन्निपातगुल्म झाला असतां, वेदना फार होतात व गांठ दगडासारखी कठीण, फुगलेली आणि अतिभयंकर असते. ती असाध्य ह्मणून समजावी. बाळंत झाल्यावर लगेच कुपथ्य केलें असतां, अर्धवट गर्भपात झाला असतां, ऋतुप्राप्तीचे वेळीं कुपथ्य झालें असतां, वायु कोपून, स्त्रीच्या रजाचें ग्रहण करून, दाह व पीडा यांसहित गांठ उत्पन्न करतो; आणि त्याचीं चिन्हें पित्तजन्य गुल्मासारखीं असतात; मात्र दाबल्यानें ही गांठ हालत नाहीं. स्त्रियांच्या उदरांतील रक्ताच्या या गुल्माची चिकित्सा, दहा महिने होऊन गेल्यावर, करावी. कां कीं, ही गांठ झाली असतां, गर्भसंभवाची भ्रांति उत्पन्न होते. गांठ क्रमें

करून सर्व पोटभर पसरत जाते. तिचीं मूळें खोल धातूपर्यंत पोंचतात, आणि ती कासवाच्या पाठीप्रमाणें वाढते. तेव्हां रोगी दुर्बळ होतो. त्याला अन्नावर वीट पडतो, ताप येतो, खोकला होतो, ओकारी होते व शैत्य होतें. अशा स्थितींत हा रोग असाध्य समजावा. आणखी या रोगांत शौचास अतिशय पातळ होऊं लागलें, हातपाय, उर आणि नाभि यांवर सूज आली, म्हणजे हा रोग असाध्य समजावा.

चिकित्सा—वातापासून आलेल्या गुल्मावर वातरोगाची शांति होईल असे तैलपान, बस्ती आणि अभ्यंग वगैरे उपाय करावे. नंतर स्वेदनविधि करावा. नाभीच्या वरल्या अंगाला गुल्म आला तर स्नेहपान करावें; खालच्या अंगास आला तर बस्ति द्यावा; आणि उदरांत आला तर दोनही उपचार करावे. याप्रमाणें उपचार करून जठराग्नि प्रदीप्त आला असें दिसेल, आणि शौचास व लघवीस प्रतिबंध होतो असें वाटेल, तर वातगुल्माच्या रोग्याला स्निग्ध, उष्ण आणि पुष्टिकारक अन्नपान द्यावें; आणि वारंवार स्नेहपान करवावें. हिंगाच्या तिप्पट सैंधव, सैंधवाच्या तिप्पट एरंडेल, आणि त्याच्या तिप्पट लसनीचा रस एकत्र करून प्यावयास दिल्यानें, सर्व प्रकारचे गुल्म व उदर रोग बरे होतात. वातप्रधान व कफप्रधान गुल्माच्या रोग्याला, एरंडेल मद्यांत घालून, प्यावयास द्यावें; पित्तप्रधान व वातप्रधान गुल्माच्या रोग्याला दुधांत घालून द्यावें. पित्तप्रकोपजन्य गुल्माच्या रोग्याला द्राक्षाचें व गुळाचें पाणी प्यावयास देऊन, वर विरेचन द्यावें. पित्तज गुल्मांत दाह होतांच, त्याच्या शांतीसाठीं शीतवीर्य औषधें घालून तूप कढवावें व त्याचा लेप करवावा. पित्तगुल्मावर शस्त्रक्रियेनें रक्त काढविणें हा उत्तम उपाय आहे. साळीचे तांदूळ, गाईचें व बकरीचें दूध, द्राक्ष,

खजूर, साखर आणि डाळिंब हे सर्व पदार्थ पित्तगुल्मावर हितकारक आहेत. कफगुल्माच्या रोग्याला वमन द्यावें. आणि वमन देण्याला लायक नसेल तर त्याच्या कडून उपोषण करवावें नंतर जठराग्नीला प्रदीप्त करण्यासाठीं कडवट, तिखट व उष्णवीर्य अशा पदार्थांचें चूर्ण योजावें. सर्व प्रकारच्या गुल्मावर स्नेहन, व स्वेदन क्रिया करवावी. रूक्ष क्रियेनें गुल्माची शांति होत नाहीं. कफजन्य गुल्मावर तीळ, एरंडी व मशेप यांचा लेप करून, सहन होईल इतका तापवलेल्या लोखंडाच्या भांड्याचा शेक करावा. असें केलें असतां कफगुल्म शिथिल होईल. मग विरेचन व स्नेहन बस्ति देऊन तो शुद्ध करावा. निशोत्तराच्या चूर्णाला थोराच्या चिकाची भावना देऊन त्यापैकीं एक रुपया भार मद्यांत किंवा तुपांत कालवून खावयास द्यावें, म्हणजे विरेचन चांगलें लागू पडेल. हें विरेचन तीव्र असल्यामुळें वैद्याच्या संमतीनेंच द्यावें. पिंपळी, पिंपळमूळ, चित्रक आणि सैंधव हीं मद्यांत व जंगली जनावराच्या मांसरसांत घालून प्यावयास दिल्यानें, गुल्म रोगाचा त्वरित नाश होतो. नाभि, बस्ति, आंतडीं, हृदय वगैरे स्थानीं न होतां, इतर ठिकाणीं गुल्म झाला असतां, त्यावर डाग द्यावा. डाग दिल्यावर त्याची चिकित्सा व्रणाप्रमाणें करावी. स्त्रीला दहा महिने गेल्यावर, जर गुल्म रुधिरजन्य आहे असें सिद्ध झालें, तर स्नेहन व स्वेदन विधि करवून स्निग्ध विरेचन द्यावें; त्याच प्रमाणें त्या स्त्रीस मांसरस आणि तांदुळाचा भात यांचा आहार द्यावा व नवें ताजें मद्य प्यावयास द्यावें.



# उदररोग.

निदान—फार करून जठराग्नि मंद झाल्यामुळेंच सर्व रोग उत्पन्न होतात. त्यांतही उदररोगाची उत्पत्ति सर्वस्वीं अग्निमांद्यापासूनच आहे. अजीर्णामुळें, मलिन अथवा न आवडणारे पदार्थ खाल्ल्यामुळें, आणि मळमूत्राचा संचय झाल्यामुळें, उदररोग होतो. स्वेद आणि जळ यांस वाहणाऱ्या नाड्यांची गति रोधून वातादिक दोष विकार पावतात, आणि प्राणवायु, जठराग्नि व अपानवायु यांस दूषित करून उदर रोग उत्पन्न करितात. उदररोगाचे आठ प्रकार आहेत. (१) वातोदर, (२) पित्तोदर, (३) कफोदर, (४) सन्निपातोदर, (५) प्लीहोदर, (६) बद्धोदर, (७) क्षतोदर, आणि (८) जलोदर. सर्व प्रकारच्या उदररोगांत बहुतकरून पोट फुगणें, हालण्याचालण्याची शक्ति नसणें, दुर्बळपणा, अग्निमांद्य, सूज वगैरे उपद्रव होतात. वातोदर झालें असेल तर हात, पाय, नाभि व कुशी यांवर सूज येते व त्यांत वेदना होतात, सांधे फुटतात, चांबडीचा वगैरे रंग काळसर तांबूस होतो, एकदम पोट फुगतें किंवा एकदम बसून जातें, पोटावर टिचकी मारली असतां डबडब अवाज होतो व गडगडाट होतो. पित्तोदरांत ज्वर, मूर्च्छा, दाह, तृषा व अतिसार हीं लक्षणें होतात. चांबडीचा रंग पिवळट होतो व उदरावर हिरवी छटा दिसूं लागते, व अवयव कापसासारखे पोचट होतात. कफोदरांत सूज येते, झोप फार लागते, खोकला व श्वास होतो, चांबडीचा रंग पांढरा होतो व स्पर्श केल्यानें ती कठीण, थंड व स्थिर लागते. वाईट आचरणाच्या स्त्रिया नखें, केश मूत्र, विष्टा, आर्तव वगैरे पदार्थ खाण्यापिण्याच्या पदार्थांत घालून पुरुषास खाऊं घालतात. तेणें करून, विष खाल्ल्याप्रमाणें व वाईट पाणी प्याल्याप्रमाणें कोप पावलेलें रक्त व वातादिक दोष सन्निपातोदरास उत्पन्न करितात. थंडी वाजते, वायु सुटतो व अत्यंत ढगें येतात, त्या दिवशीं सन्निपातोदर पूर्ण जोरांत

येतें. तेणेंकरून अंगाचा रंग फिक्कट होतो, व शरीर सुकतें. सन्निपातोदरालाच दूष्योदर असेंही नांव आहे. दहीं वगैरे कफ उत्पन्न करणारे पदार्थ खाल्ल्यानें व विदाही अन्नाचें भोजन केल्यानें, रक्त आणि कफ, वृद्धि पावून, कौलुस मोठी करतात, तेव्हां प्लीहोदर झालें असें समजावें. तें पोटांत डावीकडे होतें. तेणें करून रोगी कृश होतो, त्यास बारिक ताप येतो, व अग्नि मंद होतो. उदरांत उजव्या कुशींत असलेली यकृत नांवाची गांठ दूषित झाली असतां, जो उदररोग होतो त्यास "यकृद्दाल्युदर" असें म्हणतात. तूप, तेल यासारखे बुळबुळित पदार्थ प्याल्यावर ओकारी, रेचक घेतल्यावर व शौचास साफ होण्यासाठीं कोरड्या औषधाची पिचकारी मारल्यावर, जर थंड पाणी पिण्यांत आलें, तर जळाचें वहन करणाऱ्या नाड्या बिघडून तेलासारख्या चिकट पदार्थानें लिंपून जातात व तेणें करून जलोदर होतें. हा रोग झाल्यावर फार दिवस झाले असले तर नाभीजवळ पोट असळ वर उचलल्यासारखें दिसतें. या रोगामुळें, स्त्रियांस जशा प्रसवकाळीं वेदना होतात तशा दुःसह वेदना रोग्यास होतात. पोटांत पाणी पूर्ण भरलें असल्यामुळें, त्यांतून डबक डबक असा ध्वनि निघतो. सर्व प्रकारचे उदररोग बहुशः कष्टसाध्य होत. रोगी सशक्त असला, पाण्यानें पोट पूर्ण भरलें नसलें व रोग अलीकडेच जडला असला, तर प्रयत्नांतीं तो बरा झाला तर होतो. रोग्याचें बळ, रक्त, मांस व जठराग्नि हीं सर्व नष्ट झालीं असलीं आणि अन्न पहातांच त्यास शिसारी येऊं लागली, सूज व अतिसार झाला असला, आणि रेचक दिल्यावरही जर पुन्हां पोट भरून येऊं लागलें; तर तो उदररोग रोग्याचे प्राण घेऊनच दूर होतो.

**चिकित्सा**—या रोगावर रोग्यास नेहमी विरेचन द्यावें. एक अथवा दोन महिनेपर्यंत दोषांचें बळाबळ पाहून एरंडेल गाईच्या

दुधांत अथवा मूत्रांत घालून अथवा लशीच्या मूत्रांत घालून प्यावयास द्यावें. गाईचें किंवा उंटिणीचें दूध आहारादाखल प्यावयास द्यावें. त्याचप्रमाणें जंगली जनावराचा मांसरस व साळीचा भात यांचें भोजन द्यावें. सुंठ, मिरीं आणि पिंपळी यांचें चूर्ण घालून, दूध उकळावें व तें साहा दिवस प्यावें. हा प्रयोग सर्व प्रकारच्या उदररोगांचा नाश करतो. उदराच्या रोग्याला पुष्कळ वेळां गोमूत्राची भावना दिलेल्या हजार हरड्यांचें चूर्ण दुधाबरोबर द्यावें. अथवा थेराच्या चिकाच्या पुष्कळ भावना देऊन हजार पिंपळ्या खावयास द्याव्या व यावर दूध पाजावें. अथवा दुधांत आल्याचा रस बरोबरीनें घालून तें प्यावयास द्यावें. याप्रमाणें विरेचनक्रिया केल्यावर पोट उतरलें ह्मणजे कांहीं पिकवण बांधून त्यावर फडकीं गुंडाळावीं, ह्मणजे वायु पुन्हा आंत शिरून पोटाला फुगवूं शकणार नाहीं. जलोदर, बद्धोदर, किंवा क्षतोदर हीं कोणत्याही उपायांनीं हटत नाहींत असें दिसेल, तर त्यावर शस्त्रक्रिया करावी. या रोगांत मुख्यत्वें करून अग्नि मंद होतो. यास्तव दीपन करणारीं द्रव्यें घालून पदार्थ खावयास द्यावे. गाईच्या मूत्राची भावना देऊन साठी तांदुळाची कांजी करावी. ती या रोगावर फार हितकारक आहे. उंसाचा रसही या रोगावर हितकारक आहे. अतिशय ऊन, आंबट, खारट, रूक्ष, थंड, ग्राही, गूळ, तेलांत परतलेली भाजी, अति पाणी पिणें, मेहनत, दिवसा निद्रा, प्रवास व वहनावर बसणें, या गोष्टींचा या रोगांत त्याग करावा. उदराच्या रोग्यानें दूध प्यावें; तेणें करून धातूची स्थिरता व बळाची वृद्धि होते, आणि फिरून बद्धकोष्ट होत नाहीं.



# पांडुरोग.

**निदान**—वात, पित्त, कफ, व सन्निपात यांच्या योगानें आणि माती खाल्यानें पांडुरोग होतो. अत्यंत मैथुन केल्यानें, आंबट व खारट पदार्थ खाल्यानें, मद्य प्याल्यानें, दिवसा निजल्यानें व अशाच इतर कारणांनीं वातादि दोष, मनुष्याच्या रक्तास दूषित करून, चांमडीचा रंग पिवळट व पांढरट करतात; तेव्हां पांडुरोग झाला असें समजावें. वातजन्य पांडुरोगांत चांमडी, मूत्र व नेत्र रुक्ष होतात व त्यांवर काळेपणा व अंमळ तांबूसपणा येतो. पित्तजन्य पांडुरोगांत मूत्र, विष्टा, व नेत्र हीं पिवळीं पडतात. कफजन्य पांडुरोगांत हीं पांढरीं पिवळीं होतात. सन्निपातजन्य पांडुरोगांत हींच सर्व लक्षणें एकदम जाणवतात. माती खाल्यानें पांडुरोग झाला असतां, डोळे, गाल, भुंवई, पाय, नाभि व शिश्न यांवर सूज येते, कोठ्यांत कृमि होतात, व कफमिश्रित रक्त मळाबरोबर पडतें.

पांडु रोगांत रोग्याच्या अंगाचा रंग हिरवा, काळा व पिवळा होतो, बळ व उत्साह नाश पावतात, अग्नि मंद होतो, बारिक ताप येतो, व स्त्रीसंगाविषयीं इच्छा राहत नाहीं. असें झालें ह्मणजे वातपित्तामुळें होणारा "हलीमक" नांवाचा रोग झाला असें समजावें. या रोगांतच जो पानकी ह्मणून रोग होतो तो झाला असतां, संताप उत्पन्न होतो, शौचास पातळ होतें, शरीराचे आंतले व बाहेरले दोन्ही भाग पिवळे पडतात; इतकेंच नव्हे तर डोळ्यांसही पिवळेपणा येतो.

**चिकित्सा**—या रोगावर रोग्यास प्रथम स्नेहन विधि करवून, तीक्ष्ण वमन द्यावें व फिरून स्नेहन विधि करवावा. त्यानंतर गोमूत्र

आणि दूध घालून अथवा नुसतेंच दूध घालून विरेचन द्यावें. गोमूत्रांत हरडा वांटून प्याल्यानें अथवा गोमूत्रांत त्रिफळा उकळून प्याल्यानें हा रोग बरा होतो. सात दिवस गोमूत्रांत लोह भस्म भिजवून ठेवून तें प्यावें, नंतर त्यावर दूधभात अथवा मधुर मांसरस व भात खावा, म्हणजे पांडुरोग बरा होतो. या रोगांत वमनविरेचन केल्यावर, मध व तूप यांत हरडयाचें चूर्ण कालवून खाल्ल्यानें लवकर आराम वाटतो. या रोगावर द्राक्षांचा व आंवळ्याचा रस हितकारक आहे. या रोगांत वातातिक्रय असेल तर अतिशय स्नेहयुक्त औषध द्यावें. हा रोग पित्तप्रधान असेल तर शीतवीर्य, कफप्रधान असेल तर उष्णवीर्य, आणि सन्निपातजन्य असेल तर मिश्रगुणाचें औषध द्यावें. माती खाल्ल्यानें पांडु रोग झाला असेल, तर तीक्ष्ण विरेचन देऊन ती बाहेर काढून टाकावी व नंतर बळ देणारीं औषधें घालून उकळलेलें तूप प्यावयास द्यावें. कमळा रोगावर त्रिफळाचा, गुळवेलीचा व कडूलिंबाचा रस मधांत घालून प्रातःकाळीं प्यावयास द्यावा. हलीमक रोगावर गुळवेलीच्या रसांत व दुधांत उकळलेलें म्हशीचें तूप प्रथम प्यावयास द्यावें. नंतर आंवळ्याच्या रसांत निशोत्तरेचें चूर्ण घालून विरेचन द्यावें. नंतर द्राक्षाचा अवलेह अथवा दारू प्यावयास द्यावी आणि हरड्याचा अवलेहही द्यावा. सूज उतरविण्याचे जे उपाय आहेत तेच पांडु रोग बरा करण्यांतही कामास येतात.

## सूज.

**निदान**—वायु कोपून आपल्याच गतीनें रक्त, पित्त आणि कफ यांस बाहेरच्या शिरांत घेऊन जातो व तेथेंच त्यांस अडवून धरतो, तेव्हां तो त्वचेचा व मांसाचा आश्रय करून सूज उत्पन्न

करतात. सूज फार करून कठीण व उंचवट असते वात. पित्त, कफ हे दोष, दोन दोन एकवटून, त्याच्यापासून, सन्निपातापासून, अभिघातापासून, आणि विषापासून सूज उत्पन्न होते. अशा प्रकारें तिचे नऊ प्रकार होतात. वमनाची व विरेचनाची औषधें वारंवार खाल्ल्यामुळे, ज्वरादिक रोगामुळे, कच्चे पदार्थ खाल्ल्यामुळे, माती खाल्ल्यामुळे विरुद्ध आहार केल्यामुळे, अर्श [illegible]मुळें, [illegible] फिरणें न केल्यामुळे विरेचनाची जरूर असता तें न घेतल्यामुळे, आमामुळे, गर्भ पडल्यामुळें आणि वमनादिक क्रियांनी शरीर जड [illegible] येण्याच्या इच्छेनें [illegible] प्रयोगामुळें, सूज उत्पन्न होते. जर वातापासून सूज आली असेल तर वरची त्वचा पातळ असते. तिचा रंग तांबूस व काळसर असतो. [illegible] ही उतरते: बोटानें दाबली असतां [illegible] वेदना उत्पन्न [illegible] वेळ दिवसा जास्त असते. पित्तामुळें [illegible] तर ती [illegible] असते; तिचा रंग काहींसा काळा पिवळा असतो. [illegible] रिक गंध येतो. अत्यंत दाह होतो. स्पर्श केल्यानें [illegible] होतात. डोळे लाल होतात व शेवटीं ती पिकते. कफापासून आली असेल तर तिचा वर्ण पांडु असतो. तिच्या योगानें रोग्याला सुस्ती होते, अन्नावर अरुचि उत्पन्न होते. जठराग्नि मंद होतो. झोप येत नाही. ही सूज येण्याला जसा बराच वेळ लागतो तसा उतरण्यालाही वेळ लागतो. दाबल्यानें ती उंच होत नाहीं. आणि तिचा जोर रात्रीं जास्त असतो. दोन दोन लक्षणें एकदम दिसून येतील तर द्वंद्वापासून उत्पन्न झालेली, आणि सगळीं लक्षणें दिसतील तर ती सन्निपातापासून झालेली आहे असें समजावें. अभिघात, शस्त्राचा छेद, क्षत, शीत वायूचा स्पर्श, समुद्राच्या कांठच्या वाऱ्याचा झपाटा आणि बिब्बा यांच्या पासूनही सूज सर्व शरीरावर येते. तीत तीक्ष्ण आग होत अ-

सते व तिचा रंग तांबूस असतो. विषारी प्राणी शरीरावर चालून गेल्यानें किंवा मुतल्यानें, विषरहित प्राण्याची दाढ, दांत किंवा नख लागल्यानें, विषारी प्राण्याचा मळ मूत्र व वीर्य यांचा स्पर्श झाल्यानें, विषारी वृक्षाच्या वाऱ्यानें, आणि अशाच अन्य कारणांनीं सूज येते. आमाशयांतील दोष छातीवर सूज उत्पन्न करितात. पक्वाशयांतील दोष कमरी व पोट यांच्या मधल्या भागीं सूज उत्पन्न करितात. मलस्थानांतील दोष पायांवर, व सर्व शरीरांतील दोष सर्व शरीरावर सूज आणतात. कमरेच्या भागीं अथवा सर्वांगावर आलेली सूज कष्टसाध्य आहे. परंतु प्रथम खालच्या भागीं येऊन, मग जर सूज वर चढत गेली तर ती असाध्यच जाणावी. स्त्रियांस तोंडावर प्रथम सूज येऊन, मग ती चोहोंकडे पसरत गेली, तर ती त्या स्त्रीचा नाश करिते. स्त्रीपुरुषांच्या गुह्येंद्रियांवर प्रथम सूज येऊन, नंतर ती इतरत्र पसरत गेली, तर तीही प्राणहारकच आहे.

**चिकित्सा**—सर्व दोषांपासून उत्पन्न झालेली आणि सर्वांगावर पसरलेली आमयुक्त व आमरहित अशी सूज ज्यास आली असेल, त्यास प्रथम उपोषण करवावें व हलकें अन्न खाऊं घालावें. नंतर सुठगूळ नाकांत घालून तें व्यायाम द्यावें. गूळ व आलें यांचा कल्क समभाग घेऊन, पहिल्या दिवशीं दोन तोळे, दुसऱ्या दिवशीं चार तोळे, याप्रमाणें पांच दिवसपर्यंत चढतें व पांच दिवस उतरतें, असें हें औषध द्यावें. याप्रमाणें एक महिनाभर करावें म्हणजे गुल्म, उदर, अर्श, सूज, प्रमेह, श्वास, कमळा व कफरोग यांचा नाश होतो. वातजन्य सुजेवर उष्णवीर्य पदार्थांचा लेप करावा. पित्तजन्य सुजेवर शीतवीर्य पदार्थांचा लेप करावा. आणि कफजन्य सुजेवर जुना गुळ, शेवग्याची साल, अळशीचें चूर्ण आणि पिंपळी, गोमूत्रांत

खदखदावून, सोसेल इतका ऊन लेप करावा. क्षतजन्य सुजेवर रक्त काढवावें आणि रक्तशुद्धीचे उपाय योजावे. विषजन्य सुजेवर विषहारक चिकित्सा करावी. ज्यास सूज आली त्या रोग्यानें गांवांत व पाण्यांत संचार करणाऱ्या प्राण्यांचें मांस, सुकवणीची भाजी, तेल, गूळ, दहीं, मीठ, आंबट मद्य, रात्रीची निद्रा आणि मैथुन हीं वर्जावीं.

---

# विसर्प.

**निदान**—खारट, आंबट, तिखट व उष्ण पदार्थ खाण्याच्या सवईनें दोष कोपून, विसर्प रोग उत्पन्न करितात. रक्त, लसवाहिन्या, त्वचा, आणि मांस हीं चार दूष्य, आणि वात, पित्त व कफ हे तीन दोष एकत्र झाल्यानें विसर्प रोग उत्पन्न होतो. वातजन्य विसर्पाचीं लक्षणें वातज्वरासारखीं असतात. सूज, अवयव फुरफुरणें, सुया टोंचल्याप्रमाणें वेदना होणें व रोमांच उभे राहणें वगैरे लक्षणें होतात. पित्तजन्य विसर्पाचीं लक्षणें पित्तज्वरासारखीं असतात व तो फार त्वरेनें पसरतो. कफजन्य विसर्प असेल तर खाज सुटते, आणि त्वचा चकचकते; त्याचीं लक्षणें कफज्वरासारखीं असतात. हीं सर्व लक्षणें सन्निपातजन्य विसर्पामध्यें एकदम होतात. वातपित्तजन्य विसर्पांत ज्वर, ओकारी, मूर्च्छा, अतिसार आणि अन्नावर अरुचि इत्यादि उपद्रव होऊन, जीवंत निखाऱ्यासारखी अंगाची लाही होते. शरीराच्या ज्या ज्या अवयवांवर विसर्प पसरतो, ते ते अवयव कोळशासारखे काळे, हिरवे अथवा तांबडे पडतात. त्यांवर लौकरच सूज येते. हा विसर्प अग्निविसर्प या नांवानें प्रसिद्ध आहे. ज्या विसर्पांत लांबट, लहान व वाटोळ्या गांठीची ओळ उत्पन्न होते, ताप येतो, श्वास लागतो, खोकला उचलतो व ओकारी येते, तो ग्रंथिविसर्प

जाणावा. हा विसर्प कफापासून होतो. कफपित्तजन्य जो विसर्प होतो, त्यास कर्दमविसर्प असें म्हणतात. त्यांत ताप येतो, अग्नीचा नाश होतो व तत्संबंधी इतर लक्षणें होतात. आमाशयावर प्रथम जोर करून, नंतर तो चोहोंकडे पसरतो. त्याच्या आजूबाजूस पिवळा, तांबूस व पांढरा पुरळ उठतो. हा विसर्प चकचकीत, शाईसारख्या काळ्या रंगाचा, आंतून पिकणारा व त्यांतून चिखलाप्रमाणें कुजलेलें मांस बाहेर टाकणारा असा असतो. क्षतजन्य विसर्पांत कुळिथाएवढे बारिक फोड उत्पन्न होतात, सूज येते, ताप येतो, व विकृत भागांतलें रक्त काळें पडतें. विसर्प कोणत्याही जातीचा असो; तरी ताप, अतिसार, ओकारी, तृषा वगैरे हीं त्याचीं सामान्य लक्षणें होत. वात, पित्त आणि कफ यांपासून झालेला विसर्प साध्य जाणावा. सन्निपातजन्य व क्षतजन्य विसर्प असाध्य जाणावा. आणि मर्मस्थानावर झालेला विसर्प कष्टसाध्य जाणावा.

**चिकित्सा**—विसर्प रोगावर लंघन, वमन, विरेचन वगैरे देऊन प्रथम रक्त काढवावें; यास स्नेहनक्रिया हितकारक नाहीं. द्राक्षाच्या रसांत, त्रिफळाच्या रसांत, तुपांत अथवा दुधांत निशोत्तराचें चूर्ण घालून प्यावयास द्यावें. हें विरेचन यावर चांगलें आहे. हा रोग कोठ्यांत प्रविष्ट झाला असेल तर विरेचन घेण्याची फारच अवश्यकता आहे. शोधनाला अपात्र अशा रोग्याच्या शरीरांत दोष अल्प असेल तर चंदन व कमळ यांचा क्वाथ, अथवा नागरमोथा, कडूलिंब व पटोळ यांचा क्वाथ, अथवा आंवळकटी, वाळा आणि नागरमोथा यांचा क्वाथ अत्यंत हितप्रद होय. एके ठिकाणीं जो विसर्प स्थिर राहत नाहीं, त्यास पचणारा विसर्प म्हणतात. त्यावर दशांग लेप योजावा. कोणत्याही प्रकारचा विसर्प असो, त्यावर दशांग लेप अथवा बाहव्याची साल आणि वेहळ्याचें चूर्ण पाण्यांत घालून खदखदावें व त्याचा लेप,

सहन होईल त्याप्रमाणें करावा. भाजल्यानें व पिकल्यानें व्रण पडेल तर व्रणाची चिकित्सा करावी. ग्रंथिविसर्पांत रक्त काढविणें हा उत्तम उपाय आहे. या रोगावर तूप कुपथ्यकारक आहे. कारणकीं तूप खाल्ल्यानें विकृत झालेले दोष त्वचा, रक्त आणि मांस यांस पिकवितात.

---

## कुष्ठ ( कोड ).

**निदान**-विरुद्ध भोजन केल्यानें, वमनादिक वेदनांस दाबून धरल्यानें, जेवल्यावर कसरत केल्यानें, किंवा उन्हाचा तडाका सोस-ल्यानें, लंघन आणि भोजन हीं अनियमित क्रमानें केल्यानें उडीद, मुळा, तीळ, गूळ हीं अत्यंत खाल्ल्यानें, अन्न पच ल्यावांचून स्त्रीसंग केल्यानें, आणि पापकर्म केल्यानें, त्याचप्रमाणें अशाच इतर कारणांनीं, वात, पित्त आणि कफ हे तीनही दोष कोपून, त्वचा, रुधिर, मांस आणि पाणी यांस दूषित करून, कुष्ठरोग उत्पन्न करतात. हा रोग अठरा प्रकारचा आहे. त्यांत सात महाकुष्टें आणि अकरा क्षुद्रकुष्टें होत. ज्या अवयवावर कुष्ट व्हावयाचें, तो अवयव अतिशय कोमळ व खडबडीत लागतो, त्यांत दाह होतो, त्याला कंडु सुटते, त्वचा मेहरते, गळवें उठतात व तेथें व्रणाची उत्पत्ति लवकर होते. अंमळ कांहीं कारण झालें कीं तेथें वेदना उत्पन्न होतात, व रक्त काळें पडतें. सात महाकुष्टांपैकीं कापाल नांवाच्या कुष्टाचा वर्ण काळसर तांबूस असतो, व ती जागा हाताला खडबडित व पातळ लागते. आणि तींत सुया टोचल्याप्रमाणें वेदना होतात. औदुंबर नांवाच्या कुष्टामध्यें दाह होतो, शूळ होतो, त्वचा लाल होते, कंडु

सुटते व त्याचा आकार उंबराच्या फळासारखा दिसतो. मंडळ नामक कुष्टामध्यें चकदळें पडतात. त्यांचा रंग पांढरा तांबूस असतो व तीं एकाशीं एक लागून असतात. ऋष्यजिव्ह नामक कुष्ट खडबडित असून, आजुबाजूच्या भागीं तांबूस व मध्यें काळसर असतें. त्यांत वेदना होतात. व त्याचा आकार हरिणाच्या जिभेसारखा असतो. पुंडरीक नामें कुष्ट असळ पांढरें, आजुबाजूस तांबूस असून, उंचवट व श्वेत कमळाच्या पत्रांप्रमाणें दिसतें. सिध्म नामें कुष्ट पांढरें, तांबूस व पातळ असून, त्यास कंडु सुटून व नेणेंकरून त्यांतून स्राव होतो. हें कोड बहुत करून छातीवर होतें. व कोहळ्याच्या फुलासारखें दिसतें. काकण नामक महाकुष्टामध्यें तें काळसर व आजुबाजूस तांबूस असें असतें, अथवा मध्यें तांबूस व आजुबाजूस काळसर असतें. तें पिकतें आणि त्यांत तीव्र वेदना होतात. या कुष्टांत तीनही दोषांचीं चिन्हें असल्यामुळें तें असाध्य जाणावें.

अकरा क्षुद्र कुष्टांपैकीं चर्म नामक कुष्टाच्या जागीं घाम बिलकुल येत नाहीं. त्याचा विस्तार बहुत जाग्यावर असतां माशाच्या पाठीवरील खवल्यांप्रमाणें व हत्तीच्या त्वचेप्रमाणें तें जाड दिसतें. किटिभ नामक कुष्ट काळसर असून, त्याच्या व्रणाची त्वचा मेहरलेली, खडबडित व शुष्क असते. वैपादिक कुष्टांत रोग्याच्या हातापायांस भेगा पडतात व फार वेदना होतात. अलसक नामक कुष्टांत अत्यंत कंडु सुटून तांबूस फोड उठतात. दद्रुमंडळ नामें कुष्टाचा वर्ण तांबूस असून, त्यांत कंडु सुटून, फोड उठतात, व ते पहिल्यापासूनच उठलेले असतात. चर्मदळ नामें कुष्टांत शूळ होतो, कंडु सुटते. त्याचा वर्ण तांबूस असतो. कंडु उठून ते फुटतात. स्पर्श सहन होत नाहीं व त्वचेला भेगा पडून ती फाटते; ह्मणूनच या कुष्टाला चर्मदळ असें नांव दिलें आहे. पामा नामक कुष्टांत बारिक

बारिक पुरळ उठून त्यांतून लस स्रवते, दाह होतो, व कंडु सुटते. उग्रा नामक कुष्ट कमरेवर होतें, आणि त्यांत काळसर तांबूस आणि पातळ त्वचेचे फोड उठतात. त्यास विस्फोटक कुष्ट असेंही ह्मणतात. ज्या कुष्टाचा वर्ण तांबूस असतो, ज्यांत शूळ होतो व दाह होतो व बहुत व्रण पडतात, त्यास शतारु कुष्ट असें नांव आहे.

वर सांगितल्या पामाकुष्टांत बारिक असलेले फोड मोठे होऊन, जेव्हां हातावर उठूं लागतात, तेव्हां त्यास कच्छु कुष्ट असें ह्मणतात. वैपादिक कुष्ट प्रथम विचर्चिका नांवानेंच ओळखलें जातें; पण त्यांत कंडु उठून फोड होतात, व ते फुटून त्यांतून लस गळते, तेव्हां त्यास वैपादिक असें नांव आहे. वायुमुळें जें कुष्ट उठतें तें खडबडित, काळसर तांबूस, रखरखीत आणि पीडायुक्त असतें. पित्तजन्य कुष्ट तांबूस असून, त्यांत आग होते व त्यांतून लस गळते. कफजन्य कुष्टांत लस स्रवते; तें जाड, चिकट, कंडुयुक्त व जड असतें. द्वंद्वज कुष्टांत दोन दोन दोषांचीं चिन्हें एकदम दिसतात आणि सन्निपातज कुष्टांत तीनही दोषांचीं चिन्हें दिसतात. जेव्हां रसधातूंत कोडाचा प्रवेश होतो तेव्हां रोग्याचा चेहरा बदलतो, शरीर कृश होतें, त्वचा मेहरते व घाम फार येतो. त्याचा रक्तधातूंत प्रवेश झाल्यानें कंडु फार सुटते व पू उत्पन्न होतो. मांसधातूंत प्रवेश झाल्यानें तोंडास कोरड पडते, शरीर खडबडीत होतें, त्यावर गांठी गांठी उठतात, त्यावर फोड उत्पन्न होतात व ते बहुत काळ राहतात. मेदधातूंत प्रवेश झाला असतां हातपाय आंखडतात व शरीरांत क्षत पडून त्यांत वेदना होतात. हाडांत व मज्जेंत प्रविष्ट झालें असतां नाकाचा दांडा मोडतो, डोळे तांबडेलाल होतात, क्षतांत किडे पडतात व घसा बसतो. स्त्री-पुरुषांच्या आर्तवांत व शुक्रांत कुष्टाचा कमीजास्ती कसाही प्रवेश

झाला असो, तरी त्यापासून उत्पन्न होणारीं मुलेंही कुष्टानें ग्रस्त होतात. रस, रक्त व मांस यापर्यंतच प्रविष्ट झालेलें कुष्ट आणि वातप्रधान व कफप्रधान कुष्ट हीं साध्य जाणावीं. मेदापर्यंत पोंचलेलें व द्वंद्वज कुष्ट हीं कष्टसाध्य जाणावीं. आणि मज्जा आणि अस्थि यांत प्रविष्ट झालेलें कुष्ट, किडे पडल्यामुळें, असाध्य जाणावें.

कापाल कुष्ट वातापासून, औदुंबर कुष्ट पित्तापासून, मंडळ आणि विचर्चिका कफापासून, ऋष्यजिव्ह वातपित्तापासून, चर्म, किटिभ, सिध्म, अलसक, आणि वैपादिक हीं कुष्टें वातकफापासून, दद्रुमंडळ, शतारु, पुंडरीक, विस्फोटक, पामा, कच्छु आणि चर्मदळ हीं कफपित्तापासून आणि कंकण हें त्रिदोषापासून उत्पन्न होतें.

कोडाचीं जीं कारणें वर सांगितलीं त्याच कारणांपासून श्वित्र ( पांढरें कोड ) आणि किलास ( तांबडें कोड ) होतें. या दोहोंतून रस गळत नाहीं; आणि दोन्हीही वात, पित्त, कफ, रक्त, मांस आणि मेद यांचा आश्रय करून असतात. श्वेत कुष्टावरची लव व केसही पांढरे झाले नसतील, तसेंच तें पातळ असेल व चट्टे एकमेकांत मिसळून पसरले नसतील व तें होऊन थोडेच दिवस झाले असतील तर तें साध्य ह्मणून समजावें. वातजन्य किलास रक्त असतें; पित्तजन्य किलास तांबड्या कमळाच्या पत्रासारखें असतें; कफजन्य किलास पांढरें व जाड असतें. रक्ताचा आश्रय करून असलें तर तें लाल असतें; मांसाचा आश्रय करून असलें तर अंमळ तांबूस असतें; आणि मेदाचा आश्रय करून असलें तर त्याचा रंग श्वेत असतो. हें किलास कुष्ट एकाहून दुसरें अधिक कष्टसाध्य आहे. जें किलास कुष्ट गुदाद्वार, हातपायाचे तळवे व ओठ यावर झालें असतें तेंही असाध्य आहे. मग तें नवीनच झालें असलें तरी बरें होणें कठिण आहे.

**चिकित्सा**—सर्व प्रकारच्या कुष्टाचे रोग्यास स्नेहपान करावें, व स्नेहाचें अभ्यंग करावें. नंतर विसर्प प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें विरेचन द्यावें. कपाळ, हात व पाय यांचें रक्त काढवावें. उपचार केल्यानें कोड आंतून बाहेर प्रगट होईल तेव्हां त्याच्या मंडळावर शस्त्रक्रिया करून त्यावर लेप करावा. शस्त्रक्रिया होत नसेल तर किंवा करतां येत नसेल तर क्षार योजून रुधिर काढून टाकावें. वातप्रधान कुष्टांत तुपाचा उपयोग करावा. कफप्रधान कुष्टांत वमनाचा, आणि पित्तप्रधान कुष्टांत रक्त काढणें व विरेचन देणें यांचा उपयोग करावा. कोडाच्या रोग्याला पंधरा दिवसांनी वमन, महिन्या महिन्यास विरेचन, तीन तीन दिवसांनी शिरोविरेचन, आणि साहा साहा महिन्यांनी रक्तस्राव करवावा. साळ, जव, गहूं मूग, मसूर, तूर, कडवी भाजी व जंगली जनावराचा मांसरस हे पदार्थ कुष्ट रोग्याला हितकारक आहेत. खारट, आंबट, तिखट, दही, गूळ, जलचराचें मांस, तीळ आणि उडीद हे पदार्थ अहितकारक आहेत.

---

## कृमि–( जीव व जंत ).

**निदान**—बाहेरचे व आंतले असे कृमींचे दोन प्रकार आहेत. मळ अथवा घाण यापासून उत्पन्न होणारे कृमि प्रमाणानें, आकृतीनें व रंगानें, पांढऱ्या किंवा तांबड्या तिळाप्रमाणें असतात. त्यांस बहुत पाय असतात; आणि ते केश व वस्त्र यावर होतात. त्यास चालु भाषेंत उवा व लिखा म्हणतात. या कृमींच्या योगानें दुर्गंधि, खटें, कंडू व गांठी वगैरे उपद्रव होतात. अन्न पचल्यावांचून जेवल्यानें, अति गोड व आंबट पदार्थ खाल्ल्यानें, विरुद्ध आहार

केल्यानें, व उडीद, पिठाचे पदार्थ व गुळाचे पदार्थ खाल्ल्यानें, कृमि उत्पन्न होतात. कृमि पोटांत झाल्यावर ताप येतो, शरीराचा वर्ण फिकट होतो, पोटांत दुखतें, हृदयांत पिडा होते, जठराग्नि मंद होतो, ओकारी येते, भ्रम येते आणि पिनस वगैरे विकार उत्पन्न होतात. हे कृमि कित्येक रुंद, कित्येक आखूड, कित्येक लांब व बारिक, कित्येक ग्रंथियुक्त, कित्येक वाटोळे, कित्येक पायांशिवायचे आणि कित्येक पांढरे तांबडे वगैरे असे असतात. पक्काशयांत विष्ठेपासून होणारे कृमि गुदद्वारानें बाहेर पडतात अथवा आंत वाढून आमाशयाकडे येतात; तेव्हां रोग्याच्या ढेकराला विष्ठेसारखी दुर्गंधि येते.

चिकित्सा—ज्याला कृमि झाले त्या रोग्याला स्नेहनविधि, स्वेदनविधि, वमन आणि विरेचन करवावें. कडू, तिखट, तुरट रसाचीं द्रव्यें घालून रोग्यास स्नान घालावें. घोड्याच्या लिदीची पूड करून तिला शंभर वेळ वावडिंगाच्या काढ्याची भावना देऊन अथवा त्रिफळाच्या काढ्यांत उकळून, मध घालून, रोग्यास चाटावयास द्यावी. कृमीच्या रोग्यास दूध, मांस, तूप, गूळ, दहीं, भाजीपाला आणि आंबट व मधुर रस हीं वर्ज्य आहेत.

---

## वातव्याधि.

निदान—रूक्ष, थंड व हलकें अन्न खाल्ल्यानें, अति मैथुनानें, लंघन केल्यानें, उड्या मारल्यानें, धातूंचा क्षय झाल्यानें, चिंता लागल्यानें, शोक झाल्यानें, स्वाभाविक वेग आवरून धरल्यानें, आणि धावत्या वाहनावर बसल्यानें, शरीरांतील वायु कोपून, नळ्यांत

मरून, सर्व शरीरांत किंवा एखाद्याच अवयवांत नाना प्रकारच्या व्याधि उत्पन्न करतो. तेणें करून शरीराचा संकोच, सांधे धरणें, हाडें व सांधे फुटणें, वेगवेगळे अवयव लटके पडणें, लुलेपणा, पांगळेपणा, कुबडेपणा, अंगांवर सूज येणें, गर्भाचा नाश होणें, वीर्याचा व आर्तवाचा नाश होणें, अंगास मेहरी येणें, मस्तक, नाक, डोळे, गळसरी, व गळा बसून जाणें अथवा हीं वाकडीं तिकडीं होणें, हे व दुसरे अनेक उपद्रव होतात. वात हा हेतु व स्थान या भेदें करून ज्या रोगांस उत्पन्न करतो, ते त्याच्या गुणापासून वेगळे असल्यामुळें ओळखतां येतात. त्यांचीं नांवही त्या त्या स्थानास व हेतूस अनुसरून पडलीं आहेत; जशीं कीं, आक्षेपक, अपतंत्रक, अपतानक, दंडापतानक, धनुःस्तंभ, पक्षघात, अर्दित, हनुग्रह, मन्यास्तंभ, जिव्हास्तंभ, शिरोग्रह, गृध्रसी, विश्वाची, कंटक, पाददाह, पादहर्ष, अंसशोष, अवबाहुक, प्रतूनि, आध्मान, प्रत्याध्मान, वाताष्ठीला, प्रत्यष्ठीला, वेपथु, खल्ली, ऊर्ध्ववात, उदावर्त वगैरे. हनुग्रह अर्दित, आक्षेपक, पक्षघात, आणि अपतानक या नांवाचे वायु बहुत काळानें व मोठ्या प्रयत्नानें बरे होतात; अथवा बरे होतही नाहींत. जर नवीनच असतील व बळवंत मनुष्यास झाले असतील व त्यास इतर उपद्रव नसतील तर ते साध्य होतात. पक्षघात वगैरे वातव्याधीच्या रोग्याला जर विसर्प, दाह, शूळ, स्वाभाविक वेगांचा अवरोध, मूर्च्छा, अरुचि, आणि अग्निमांद्य इत्यादि उपद्रव झाले असतील अथवा मांस व बळ क्षीण झालें असेल तर वातव्याधि त्या रोग्याचा नाश करतो.

**चिकित्सा**—इतर दोषांपासून न होतां केवळ वायूचाच प्रकोप झाला आहे असें दिसेल, तेव्हां रोग्यास पहिल्यानेंच स्नेहनविधि

करवावा. स्नेहनद्रव्यांत तेल तूप वगैरे पदार्थ योजावे. स्नेहनविधीनें आकळून गेलेल्या रोग्यास दुधानें आश्वासन देऊन, स्नेहयुक्त सार, गांवांत व जळांत संचार करणारे व पाणथळ जमिनींत फिरणारे जनावरांचा मांसरस द्यावा. दूधपाक, खिचडी व खारट आंबट पदार्थ, स्नेह घालून, खावयास द्यावे. स्नेहनविधीनंतर स्वेदनविधि करावा. सुकलेलें लाकूड सुद्धां तेल लावून विस्तवावर शेकलें असतां हवें तसें वळवून कांमी पडतें; मग तसेंच केल्यानें शरीराचे वाकडे तिकडे झालेले अवयवही पुन्हां स्वस्थितींत आणतां येतील यांत आश्चर्य नाहीं. वातजन्य उपद्रव स्वेदन विधीनें बरे होतात आणि शरीरास कोमळता आणतात. स्नेहन विधीनें सुकून गेलेल्या रसादि धातूला पुष्टि मिळते; शरीराचें बळ, जठराग्नीचें बळ, पुष्टि आणि प्राणाची वृद्धि याही गोष्टी साधतात. यास्तव वातव्याधीवर वारंवार स्नेहनविधि आणि स्वेदनविधि करवावे. तेणें करून शरीराच्या आंतील व बाहेरील वायूचे तमाम रोग शांत होतील. स्नेहनविधीनें व स्वेदनविधीनें आराम न वाटेल तर मृदु विरेचन स्नेहांत घालून द्यावें ह्मणजे दोन तीन वेळां शौचास साफ होईल. वातव्याधीवर एरंडेलाचें विरेचन उत्तम आहे. त्यासच वैद्यलोक वातगजकेसरी असें नांव देतात. अशक्तपणामुळें वातरोग्यास विरेचन देतां येत नसेल तर निरूह बस्ति द्यावा, आणि जठराग्नीला प्रदीप्त करणारीं व खाल्लेल्या अन्नास पचविणारीं औषधें घालून भोजन करवावें. याप्रमाणें केल्यावर जठराग्नि प्रदीप्त झाला ह्मणजे फिरून स्नेहनविधि व स्वेदनविधि करवावे. ज्या ठिकाणीं वातरोग उत्पन्न झाला असेल त्या ठिकाणीं वमन, विरेचन, स्नेहन, स्वेदन यांतून जो उपाय लायक असेल तो करावा. शिरा घेणें हाही एक या रोगावर हितकारक उपचार आहे. वायूनें तोंड फाटलें असेल तर दाढी हालवून रोग्यास वर उंच उचलावें; अथवा वैद्यानें स्वतांच्या दोन

आंगठ्यांस चिरगूट गुंडाळून, ते आंगठे रोग्याच्या तोंडांत घालून बोटांनीं जबडे धरून जोरानें तोंड सारखें बसवावें. वातामुळें जीभ धरली असेल तर स्नेहन, स्वेदन वगैरे वातरोगावरील साधाण चिकित्सा करावी. अर्दित नामक वातरोगांत नस्य द्यावें. मस्तकावर तेल घालावें आणि कान व नेत्र यांचें तर्पण करावें. या रोगांत सूज आली असेल तर वमन करवावें. आग होत असल व लाल रंग आला असेल तर पक्षघातावर स्नेहन व विरेचन द्यावें : हीं हितकारक आहेत. पण ऊरुस्तंभ नामक वातरोगावर स्नेहन व शोधन हितकारक नाहींत. कारणकीं ह्या रोगांत श्लेश्मा, आम आणि मेद यांचें आधिक्य असतें. यास्तव या रोगांत श्लेश्मादिकांस शांत करणारे उपाय योजावे. जवाचें अन्न व मीठ व स्नेह घातल्यावांचून केलेली भाजी व जंगली जनावराचा मांसरस हे पदार्थ खावयास द्यावे. मद्य आणि पाणी एकत्र करून प्यावयास द्यावीं. गोमूत्रांत हरड्याचें चूर्ण द्यावें. आणि गोमूत्रांतच गुग्गुळ व शिलाजित द्यावा. या रोगावर गुग्गुळाच्या प्रयोगाचा चांगला गुण येतो. ज्याला ऊरुस्तंभ झाला अशा रोग्यानें यथाशक्ति कसरत करावी, उड्या माराव्या, कोंडलेल्या पाण्यांत व नदीच्या डोहांत पोहावयास जावें व नंतर जरूर वाटेल तर स्नेहन व स्वेदन विधि करवावे.



## वातरक्त.

**निदान**—खारट, आंबट, तिखट, क्षारयुक्त, स्निग्ध, उष्ण, तिळाची पेंड, मुळा, कुळीथ, उडीद, वाल, तिळांची चटणी, दहीं, मद्य, लोणचें, ताक हे पदार्थ खाल्ल्यानें, उंचस्वरानें अभ्यास केल्यानें, क्रोध आल्यानें, मिथ्याआहारविहार केल्यानें, हत्ती, घोडा व उंट

यावर बसल्यानें, गादीतक्यावर पडून राहिल्यानें व अशाच अन्य कारणांनीं, वातरक्त व्याधि उत्पन्न होतो. या व्याधींत वायूची प्रबळता असल्यामुळें यास, वातरक्त म्हणतात. वातरक्तांत रक्ताचें आधिक्य असल्यास सूज येते, अतिशय पीडा होते, तांबूस लस वाहते, सुजलेल्या भागीं टोचल्याभारखें होतें व त्यांत कंडु सुटते व त्यांतून पाणी येतें. पित्ताचें आधिक्य असेल तर दाह होतो, घाम फार येतो, मूर्च्छा येते, तहान फार लागते, स्पर्श सहन होत नाहीं. शरीर तांबूस होतें, सूज येते व ती पिकते. कफाचें प्राधान्य असेल तर शरीरांत ओलसरपणा भासतो. मेहरी येते. अंगाचा रंग चकाकतो, थंडी वाजते, कंड सुटते. परंतु पीडा कमी होते. दोन दोषांचीं चिन्हें एकत्र दिसतील तर दोहोंचें प्राधान्य, आणि तिन्ही दोषांचीं चिन्हें दिसतील तर तीहींचें प्राधान्य आहे असें समजावें. वातरक्त रोग पायाच्या मुळांत उपटून वेळानुसार हातावरही पसरतो. आणि हळूहळू उंदराच्या विषाराप्रमाणें तो सर्व शरीरभर पसरतो. वातरक्त रोग जर गुडघ्यापर्यंत येऊन पोंचला असेल, वरची त्वचा निघून गेली असेल, चिरा पडल्या असतील व त्यांतून स्राव होत असेल, तर तो व्याधि असाध्य जाणावा. वातरक्त व्याधि होऊन एक वर्ष होऊन गेलें असेल तर तो कष्टसाध्य आहे. वातरक्तग्रस्त ठिकाणचें मांस सडून गेलें असेल, ताप येत असेल, पांगळेपणा आला असेल, सूज पिकली असेल, विसर्प आला असेल, आणि बोटें वाकडीं झालीं असतील, तर हा रोग असाध्य समजावा.

**चिकित्सा**—वातरक्ताच्या रोग्यास प्रथम स्नेहनविधि करवून थोडें थोडें पुष्कळवेळां शरीरांतून रक्त काढवावें. ते वेळीं रोग्याच्या बळाकडे व दोषांकडे लक्ष पुरवावें. या रोगांत दाह होत असेल तर

जळवा लावून रक्त काढवावें आणि आंत चावत असेल तर तुंबडी लावावी. परंतु रोग्याचें शरीर आरंभींच काळसर पडलें असेल तर रक्त काढवूं नये. पण एक देशांतून दुसरे ठिकाणीं राहावयास जाऊन हवेचा पालट करावा. रोग्याचें शरीर पहिल्यानेंच निस्तेज दिसेल तर वायूचें प्राधान्य झाल्यामुळें व रक्त काढविल्यानें, वात हा वृद्धि पावून, सूज व दुसरे अनेक प्रकारचे उपद्रव उत्पन्न करतो. रोग्यास विरेचन देतां येत नसेल तर स्नेहयुक्त विरेचनाचीं औषधें द्यावीं आणि जुनें तूप पाजावें. सडांतून काढलेलें ताजें दूध व गोमूत्रांत दूध घालून तें दिलें असतां या रोगांत फार फायदेशीर आहे. या रोगावर विरेचन देणें असेल तर एरंडेल तेल दुधांत घालून द्यावें, आणि रेच झाल्यावर दुधभात जेवावयास द्यावा. हरड्यांच्या काथाला तुपाची फोडणी देऊन तो प्यावयास द्यावा. निशोत्तरचें चूर्णाची फकी मारून वर दूध प्यावें: अथवा द्राक्षारस प्यावा. दुधांत तूप घालून त्याचा बस्ति दिला असतां या रोगाची जशी शांति होते तशी इतर उपायांनीं होत नाहीं. विशेषें करून गुदास्थान, कुशी, तळहात, सांध्यांचीं हाडें आणि जठर यांत पीडा होत असेल तर या बस्तीचा अवश्य उपयोग करावा. या रोगावर गुळवेलीचा काढा अवश्य देण्यासारखा आहे. याप्रमाणें शरीराच्या आंतल्या भागीं क्रिया करून नंतर बाह्य क्रिया करावी. दाह होत असेल तर शीतळ स्नेहन शिंपावें; गाय, बकरी किंवा मेंढी यांच्या दुधांत तेल घालून त्याचें सिंचन करावें. द्राक्षाचा रस, उसाचा रस अथवा त्याचें मद्य, दह्यावरचें सायटें, आंबट राब, भात, मध व साखरेचें पाणी यांचें सिंचन करावें. या रोगांत दाह, पीडा आणि खेद यांची निवृत्ति करण्यासाठीं, प्रिय बोलणारी, चंदनाचा लेप केल्यामुळें जिचे स्तन व हात शीतळ आहेत, स्पर्श शीतळ आहे

व अंग कोमल आहे, अशी स्त्री उत्तम औषध आहे. वायुहारक औषधाच्या काढ्यांत तीळ घालून तो उकळावा. मुगांची खिचडी अथवा दुधांत वातहारक औषधें घालून कढवलेले तीळ व सर्शप एकत्र करून व त्यांचे पिंड करून, व्याधिग्रस्त भागावर बांधावे. मूत्र, क्षार आणि सुरा यांत तूप उकळून अभ्यंग केलें असतां, या रोगावर हितकारक आहे. लेप केल्यावर कांहीं वेळानें आंबट पाण्याचें सिंचन करावें. वातकफप्रधान असेल, तर या रोगावर उष्णवीर्य द्रव्यांचा उष्ण लेप केला असतां हितकारक आहे; आणि पित्तरक्तप्रधान असेल तर वातरक्तावर शीतळ लेप हितकारक आहे.



## वृषणवृद्धि.

**निदान**—खालची गति असलेला आणि सूज व शूळ उत्पन्न करणारा वायु, कोपून अंडसंधीच्या मार्गानें वृषणांत प्रवेश करून, तेथील नाड्यांस पीडा देऊन, वृषणाची वृद्धि करतो. ती वृद्धि वातापासून, पित्तापासून, कफापासून, रक्तापासून, मेदापासून, मूत्रापासून, आणि आंतड्यापासून अशी सात प्रकारची होते. वायूनें भरलेल्या रबराच्या चेंडूप्रमाणें ज्याचा स्पर्श आहे अशा आणि कारणाशिवाय ज्याची वृद्धि झाली आहे अशा वृषणाची वृद्धि वातापासून आहे असें समजावें. ज्यांत काळे फोड आहेत आणि ज्यांत पित्तवृद्धीचीं लक्षणें आढळतात, तो वृषणवृद्धिरोग पित्तापासून व रक्तापासून झाला आहे असें समजावें. कोमळ व ताडाच्या फळासारखी जी वृद्धि दिसते, ती मेदापासून समजावी. मूत्राचा अवरोध करण्याची ज्यास सवय असेल, त्यास जी वृषणवृद्धि होते ती मूत्रा-

पासून होते. तिचा शब्द पाण्यानें भरलेल्या भिस्त्याच्या पिशवीप्रमाणें होतो. ती कोमळ असते, लवकी मोठ्या कष्टानें उतरते आणि अंडकोश खालीं वृद्धि पावून लटकत असतो. वायूला कोपविणारा आहार केला असतां, फार चाल केली असतां, फार जड पदार्थ उचलला असतां, फार बळ केलें असतां आणि अशींच क्षोभ करणारीं इतर कारणें घडलीं असतां, वायु हा लहान लहान आंतड्यांच्या अवयवांस घेऊन, त्यांच्या वांकड्या तिकड्या स्थानांतून खालीं उतरतो, आणि अंडसंधींत गांठीसारखा संयोग उत्पन्न करतो. त्यास अंत्रज वृद्धि असें म्हणतात. सुजलेली, पीडायुक्त व कठीण झालेली जी अंडवृद्धि, ती बरी करण्यांत जर उपेक्षा झाली, तर मागाहून, त्यास दाबलें असतां, त्यांतून शब्द करित वायु वर चढतो, व दाबणें बंद केलें असतां, लगेच खालीं उतरतो व स्वस्थानांत भरून राहून वृद्धि करतो. लहान लहान आंतड्यांच्या संबंधासहित व अंडांत वायु भरल्यामुळें वातवृद्धिसारख्या आकृतीची अंत्रज वृद्धि झाली असल्यास ती असाध्य जाणावी. लस उत्पन्न करणारा, जड व शिजलेल्या अन्नाच्या भोजनानें एकत्र झालेला दोष अंडसंधिमध्यें गांठीसारखी सूज उत्पन्न करतो. सूज आली म्हणजे ताप येतो, शूळ निघतो आणि जळजळ होते. या अंडवृद्धि रोगाला वध्म असें नांव दिलें आहे.

**चिकित्सा**—चंचल वृद्धि रोग्याला एरंडेल तेलाचें शोधन द्यावें; नंतर बस्ति द्यावा; स्वेद व प्रलेप करण्यांत वातहारक औषधें योजावीं. पिकला म्हणजे तो फोडून त्याची व्रणाप्रमाणें चिकित्सा करावी. पित्त व रक्त यापासून उत्पन्न झालेली वृद्धि कच्ची व पक्क या दोन्हीं स्थितींत क्रमानें सूज उतरण्याची चिकित्सा व व्रणाची चिकित्सा करावी. आणि त्यांतून पुष्कळसें रक्त काढवावें. श्लेष्मापासून

झालेल्या वृद्धीवर दारुहळदीची पूड गोमूत्रांत कालवून प्यावयास द्यावी. आणि मर्दनावांचून श्लेश्मग्रंथीप्रमाणें चिकित्सा करावी. पिकल्यावर व्रणाप्रमाणें चिकित्सा करावी. मेदापासून झालेल्या वृद्धीवर स्वेदनविधि करावा. आणि पिकल्यावर त्यांतून मेद काढून टाकून त्याची व्रणाप्रमाणें चिकित्सा करावी. आणि स्नेहन व स्वेदन विधि पुनःपुन्हा करावे. मूत्रापासून उत्पन्न झालेल्या वृद्धीवर पहिल्यानें स्वेदन करवून, तेलांत भिजविलेल्या फडक्याचा पट्टा बांधावा. मग पिकल्यावर शिवणीच्या खालच्या भागीं छिद्र करून जलोदराप्रमाणें पाणी बाहेर काढावें. आणि मग व्रणाप्रमाणें चिकित्सा करावी. आंतड्याच्या वृद्धीवर वातवृद्धीप्रमाणें चिकित्सा करावी.

---

## व्रण.

निदान—सूज एके ठिकाणीं उत्पन्न होऊन पसरत नाहीं, तें व्रणाचें पूर्व रूप समजावें. वात, पित्त, कफ, सन्निपात व रुधिर यापासून झालेले आणि आगंतुक याप्रमाणें व्रणाचे साहा भेद आहेत. वायूपासून झालेला व्रण थोडा पिकतो अथवा पिकतही नाहीं; पित्तापासून झालेला लवकर पिकतो; आणि कफापासून झालेला फार दिवसांनीं उशीरां पिकतो. रक्तापासून झालेला आणि आगंतुक व्रण हे पित्तापासून झालेल्या व्रणाप्रमाणें लवकर पिकतात. व्रण अपक्व असेल तर सुजलेल्या भागीं हात लाविला असतां, उष्ण जाणवतो, कठीण लागतो, व त्यांत अंमळ वेदना होतात. पिकते वेळीं विस्तव लाविल्याप्रमाणें किंवा क्षार लाविल्याप्रमाणें आग होऊन वेदना होतात, रंग बदलतो, ताप येतो, आणि तहान लागते. पूर्णपणें पिकला ह्मणजे वेदना कमी होऊन बसतो. त्वचेवर सुरकुत्या पडतात आणि खाज सुटते, व इतर उपद्रवही शांत होतात. व्रणांत वाय-

वांचून कळ निघत नाहीं आणि पित्तावांचून व कफावांचून आग होत नाहीं. ह्मणून व्रण पिकते वेळीं तिन्ही दोष एकत्र होतात. व्रणांत पू झाला असतां तो काढून न टाकतां आंतल्या आंतच राहूं दिला तर तो मांस, नाडी आणि लहान स्नायु यांस दूषित करतो.

व्रण दोन प्रकारचे आहेत—शारीर आणि आगंतुक. वातपित्तादि दोषांपासून जर व्रण उत्पन्न होईल तर तो शारीर ह्मणावा; आणि शस्त्रादिकांच्या क्षतापासून होईल तर तो आगंतुक ह्मणावा ज्या व्रणांत आंतून वसा, मेद, मज्जा आणि मस्तकाच्या आंतील स्नेह हीं सर्वच असतात, तो व्रण आगंतुक असेल तरच बरा होतो. आणि शारीर ह्मणजे दोषापासून उत्पन्न झाला असेल तर तो रोग्यास अवश्य मारतो. ज्या व्रणाला गंध मदिरा, अगरु, तूप, फूल, चंदन व चाफा यांच्या सारखा येतो, तो व्रण रोग्याचे प्राण घेतल्यावांचून बरा होणार नाहीं. आणखी जो व्रण अत्यंत वेदना उत्पन्न करतो, जो मर्मस्थानीं झाला आहे, ज्याच्या आंत आग व बाहेर शीतळता भासते, जो बाहेरून आग व आंतून शीतळ असा आहे, त्याचप्रमाणें ज्याच्या योगानें बळाचा व मांसाचा क्षय झाला असून, श्वास, खोकला इत्यादि उपद्रव उत्पन्न झाले आहेत, असा व्रण असाध्य समजावा. आगंतुक व्रणाचे साहा भेद आहेत—छिन्न, भिन्न, विद्ध, क्षत, पिच्चित, आणि घृष्ट. जो व्रण तिरका छेदलेला असेल आणि कोमळ व लांबट असेल तो छिन्न समजावा. भाला, बाण, तलवार यांचे अग्रभाग अथवा शिंग यांच्या योगानें कोठ्याचा भेद होऊन थोडथोडें रक्त स्रवतें, तो भिन्न व्रण समजावा. अणिदार शल्यापासून अंगास भोंक पडलें व शल्य निघून गेलें, तर त्या व्रणास विद्धव्रण असें नांव आहे. शरीराचा जो भाग साफ छेदला व भेदला तर गेला नाहीं, पण छिन्न आणि भिन्न व्रणाचीं लक्षणें ज्यांत आहेत, व जो वाकडा

तिकडा आहे, तो क्षतव्रण समजावा. प्रहार झाल्यानें व फार दाबल्यानें शरीराचा जो भाग हाडासहित चुरला जाऊन चिरतो, आणि ज्यांतून मज्जा व रक्त निघतें, त्यास पिच्चित व्रण ह्मणतात. शरीराचा जो भाग अतिशय घासल्यामुळें त्यावरची कातडी सोलते, त्यांत आग होते व थोडें रक्त निघतें, तो व्रण घृष्ट ह्मणावा. जो व्रण काळसर असून, ज्यांत सूज व फोड आहेत, ज्यांतून वारंवार रक्त गळत आहे, जो अंमळ वर उचलला आहे, व ज्याच्यावर पाण्याच्या बुडबुड्याप्रमाणें मांसाचे अंकुर उत्पन्न झाले आहेत, आणि ज्यांत वेदना उत्पन्न होत आहेत, तो व्रण सशल्य समजावा; ह्मणजे लागलेल्या पदार्थाचा भाग त्यांत राहून गेला आहे असें समजावें. जर शल्य आंतल्या कोठ्यांत प्रविष्ट झालें असेल तर रक्त आंतल्या आंत दाबून राहतें, बाहेर वाहत नाहीं; रोग्याचा चेहरा पांडुरोग्याप्रमाणें होतो व असेच दुसरे उपद्रवही त्यास होतात; तेव्हां तो व्रण बरा होत नाहीं. जो व्रण मर्मस्थानीं झाला आहे अशा व्रणाच्या योगानें रोग्यास चक्कर येते, तो बेशुद्ध पडतो, त्याच्या शरीरांतून क्लेद निघतो, वर श्वास लागतो, व वातजन्य उग्र वेदना होतात. साधारण शिरांमध्यें क्षत आल्यानें तांबडें रक्त वाहतें आणि तेणें करून फार रक्त गेल्यानें आक्षेपकादि व्याधि उत्पन्न होतात. बारिक स्नायूंत क्षत आल्यानें कुबडेपणा, शरीराचा भंग व अत्यंत वेदना वगैरे उपद्रव होतात. सांध्यांत क्षत झालें तर त्यावर सूज येते, बळाचा क्षय होतो, आणि सांधे तुटतात. हाडांत क्षत झालें असेल, तर रोग्यास अत्यंत भयंकर वेदना होतात, रात्रंदिवस सुख वाटत नाहीं. शिरांत क्षत पडलें असेल तर त्याचीं लक्षणें स्नायुगत क्षतासारखीं असतात. मांस मर्मावर क्षत झालें तर रोग्याचें शरीर फिकट होतें व त्वचा

मेहरते. सर्व प्रकारच्या व्रणामध्यें विसर्प, मोह, ताप, खोकला वगैरे उपद्रव साधारणपणें होतात.

**चिकित्सा**—व्रणाची पहिली अवस्था सूज; ती जर शरीराच्या वरल्या भागीं असेल तर वमन, आणि खालच्या भागीं असेल तर विरेचन यांनीं शोधन करून, चिकित्सा करावी. तेणें करून सूज आणि व्रण हीं त्वरित बरीं होतात. पहिल्या प्रकारच्या पडलेल्या व्रणावर शीतळ उपचार करावे. सूज आणि व्रण कठिण, विवर्ण, वेदनायुक्त आणि विषयुक्त असतील तर जळवा वगैरे लावून रक्त काढावें. रक्त काढल्यावर शीतळ द्रव्यें बारिक वाटून त्यांचा ताजा लेप करावा; त्याच प्रमाणें बहुत वेळां धुतलेल्या तुपांत दूध व उंसाचा रस घालून त्याचा लेप करावा. वातप्रधान, कठीण, फार वेदनायुक्त व रक्त काढलेल्या अशा सुजेच्या व व्रणाच्या जाग्यावर जलचर प्राण्याचें मांस उकडून ऊन ऊन बांधावें, अळशी व तेल एकत्र शेकून, दुधांत वाटून, ऊनऊन बांधावें. ह्मणजे आग शांत होईल. गव्हांच्या जाड्या कणकीचें पिकवण बांधावें. याप्रमाणें उपचार केल्यानें सूज बसली नाहीं, पिकली, तर तिला फोडावी. फोडल्यावर आंतून होईल तसें करून सगळा पू पिळून काढावा. छेदाचें तोंड बारीक असेल तर उंच वाढलेल्या सुजेच्या आजू-बाजूस ओढा धरणाऱ्या द्रव्यांचा लेप करावा. व सुकला तर तो भिजवावा. कुजलेलें मांस निघून गेल्यानें जर खाडा पडला असेल व तो बुजत नसेल तर तिळांची पूड मधांत कालवून त्या खाड्यांत भरावी. हस्तिदंत जाळून त्याची पूड, तेल व रसांजन अथवा चतुष्पद प्राण्यांचीं नखें, केस, हाडें, कातडें, शिंगें, व खूर यांच्या राखेंत खल करून लेप करावा ह्मणजे गळवाच्या जाग्यावर त्वरित केंस येतात.

चमेलीचीं पानें, पटोळीचीं पानें, कडू लिंबाचीं पानें, वेखंड, हळद, मंजिष्ठ, दारूहळ व मोरचुदाची फटकी हीं द्रव्यें घालून सिद्ध केलेल्या तुपाचा लेप, लहान तोंडाच्या व मर्मस्थानीं असलेल्या, आंतून कुजलेल्या, जो खोल आहे, व ज्याला कंडु आहे अगर नाहीं अशा अनेक प्रकारच्या व्रणावर केला असतां तो व्रण बरा होतो.

आगंतुक व्रणावर जेष्टीमध घालून सिद्ध केलेलें तूप, सहन होईल तेवढें ऊन ऊनच शिंपडावें. तलवार वगैरे शस्त्रें लागून झालेल्या विस्तीर्ण आगंतुक व्रणाला सांधण्यासाठीं मध आणि तूप हीं योजावीं, आणि पित्तहारक शीतळ उपचार करावे. ज्याचा व्रण अत्यंत कोपला आहे अशा रोग्यास वमनविरेचनानें शुद्ध करून उपास करवावा. त्याचप्रमाणें रक्त काढवावें. याप्रमाणें सात दिवस-पर्यंत आगंतुक व्रणाची चिकित्सा करून, नंतर दोषजन्य व्रणाप्रमाणें चिकित्सा करावी. न फुटलेला पण बाहेर निघून पडलेला डोळा निघालेल्या ठिकाणीं बसवून, कमळाच्या पानांसहित हातानें दाबावा. नंतर त्यावर जेष्टमध व कमळ यांचा कल्क दुधांत कालवून त्यांत बकरीचें तूप घालून उकळावें. मग तें तूप डोळ्यावर शिंपडावें. कान तुटून गेला असेल तर तो शिवून त्यावर तेलाची घडी बांधावी. कंठ व मस्तक यांच्या सांध्यावर घाव लागून वारा निघत असेल तरी तो बरोबर बसवून, शिवून टाकून, त्वरित घडी बांधावी व त्यावर बकरीचें तूप शिंपडावें. अशा रोग्यानें उताणें निजूनच जेवावें. हातापायास घाव लागला असेल तर रोग्यास आडवें निजवून, घावाला टांके देऊन, जाड वस्त्राची वर घट्ट पट्टी बांधावी. वृषणावर घाव लागून गोळी बाहेर निघून पडली असेल तर प्रथम त्या रोग्याच्या नेत्रांवर व पायांवर पाणी शिंपडून गोळी आंत बसवावी, व तिला टांके

द्यावे. पण त्यावर सेचनादि क्रिया करूं नये. पण व्रण पडेल तर त्यावर जात्यादि तेलाची योजना करावी. घाव लागून शरीरांपासून तुटून अवयव वेगळा पडला असेल तर, तो ऊन तेलांत बुडवून, तुटल्या ठिकाणीं बसवून, वर पट्टा बांधावा. नंतर व्रणाप्रमाणें चिकित्सा करावी. अंगांत शिरलेलें शल्य बाहेर काढून व्रण बुजविणाऱ्या तेलांत वात भिजवून ती त्यांत घालावी. कोठ्यांत घाव लागला असेल तर व आमाशयांत रक्त शिरलें असेल तर वमन करवावें; आणि पक्वाशयांत गेलें असेल तर विरेचन द्यावें. कोठ्यांत घाव लागून आंतडीं तुटलीं असतील, तर रोगी वांचणार नाहीं; परंतु तुटलीं नसतील, आणि केवळ बाहेर निघून पडलीं असतील तर तीं आंत घालून त्यास टांके द्यावे. आंतडीं आंत घालते वेळीं तीं दुधानें धुऊन व तुपानें चोपडून, वैद्यानें आपल्या हाताचीं नखें काढून, त्या हातानें तीं आंतडीं हळुहळु आंत बसवावीं. व्रण लहान असून आंतड्यांचा भाग फार मोठा असेल, तेव्हां फार अधिक चिरून आंतडीं आपल्या मूळच्या ठिकाणीं बसवून त्यास टांके द्यावे, व त्यावर स्नेहाचा मोठा पट्टा बांधावा. घाव लागून बाहेर निघून पडलेल्या मेदाच्या वातीवर राख, धूळ अथवा कषाय द्रव्यांची पूड भरावी, व तीवर सूत्र घट्ट बांधावें. व विस्तवांत तापवलेल्या शस्त्रानें ती वांत कापून टाकावी. नंतर व्रणावर मध लावून पट्टा बांधावा. रोग्यास खाल्लेलें अन्न पचलें म्हणजे त्यास तूप पाजावें. मूढमार लागला असेल अथवा उंचावरून पडला असेल तर त्याची चिकित्सा वातरक्ताप्रमाणें करावी. आणि मार लागून ज्याच्या शरीराचे सांधे खिळखिळे झाले त्याला तेलाच्या पिंपांत बसवावें, व मांसरस खावयास घालावा.

# भग्नास्थि.

**निदान.**—कांडभंग आणि संधिभंग याप्रमाणें भग्नाचे दोन प्रकार आहेत. पैकीं संधिभंगाचे आणखी उत्पिष्ट, विश्लिष्ट, विवर्तित, तिर्यग्गत, क्षिप्त व अधःक्षिप्त असेही साहा प्रकार आहेत. संधिभंगामध्यें अवयव आखूड लांब करतांना व वळवितांना हाडें फारच दुखतात. त्यास स्पर्शही सहन होत नाहीं, अशी वेदना होते. हें त्याचें सामान्य लक्षण झालें. आतां सांध्यांचीं हाडें वेगळीं पडून एकमेकांशीं घासल्यामुळें उत्पिष्ट नामक संधिभंगामध्यें त्याच्या चारी बाजूला सूज येते; त्याच्या वेदना रात्रीं जास्त होतात. ज्यांत सांधे सुटे होऊन त्या जागीं खाडा पडतो अशा विश्लिष्ट नामें संधिभग्नामध्यें ही चारी बाजूला सूज येते व रात्रींच्या वेदना होतात आणि दिवसाही तशाच होतात; ह्मणजे रात्रंदिवस वेदना संपतच नाहींत. ज्यांत दोहींकडचीं हाडें वाटोळीं फिरतात, तो विवर्तित नांवाचा संधिभंग. त्यांत कुशींत पीडा होते. सांध्यांतून निघून एकच हाड आडवें तिडवें होतें तेव्हां तो तिर्यग्गत संधिभंग; त्यांत कळा व वेदना अत्यंत होतात. एका हाडामुळें दोन्ही हाडें परस्परांपासून दूर सरतात, तो विक्षिप्त नामक संधिभंग. त्यांत अत्यंत शूळ उत्पन्न होतो, आणि केव्हां केव्हां फार व केव्हां केव्हां थोडी अशी अनियमित वेदना होते. हाडें वेगळीं तर पडतात पण शरीरांतच अंमळ चिकटून असतात, तेव्हा त्यास अधःक्षिप्त संधिभंग असें ह्मणतात. यांत अत्यंत पीडा होते. कर्कट, अश्वकर्ण, विचूर्णित, पिच्चित, अस्थि झल्लिका, कांडभग्न, अतिपातित, मज्जागत, स्फुटित, वक्र आणि दोन प्रकारचे छिन्नभग्न, याप्रमाणें कांडभंग बारा प्रकारचा आहे. जो मधले भागीं उंचवट असेल तो कर्कट. भग्न झाल्यानें अथवा चुरडल्यानें ज्या हाडाचा आकार घोड्याच्या कानासारखा होतो तो अश्वकर्णभंग. ज्यांत स्पर्शानें अथवा शब्दानें भंगून हाडांचा चुरा होतो तो विचूर्णित-

भंग. ज्यांत हाड चिरलेलें किंवा अर्धेच मोडलेलें दिसून येईल तो पिच्चित अस्थिभंग. ज्यांत हाडांचा कोणता तरी भाग कोठें तरी अडकून राहिला असतो तो अस्थि नलिका संधिभंग. ज्यांत हाडांच्या सांध्याचा दांडा मोडून जातो तो कांडभग्न. ज्यांत शरीरांतील कित्येक हाडें एकमेकांपासून दूर सरतात तो अतिपातित. ज्यांत हाडें मोडून मज्जेमध्यें शिरतात व मज्जा बाहेर पडते तो मज्जागत अस्तिभंग. ज्यांत हाडांचे सांधे मोडून बहुत तुकडे होतात तो स्फुटित अस्थिभंग. ज्यांत हाडें वांकडीं वळतात. तो वक्रअस्थिभंग. ज्यांत प्रहारानें अथवा दाब पडल्यामुळें हाडांचे बारिक बारिक तुकडे होऊन जातात आणि त्यांत हाड एका अंगानें सगळें शाबूत व दुसऱ्या अंगानें अगदीं चुरडलेलें असें होतें, तो दोन प्रकारचा छिन्नभग्न अस्थिभंग जाणावा. जव्हां कांडभग्न होतो तेव्हां शरीर गळत जातें, सूज चढते, कळा मारतात, दाबल्यानें अवाज होतो, आणि रात्रंदिवस सुखास पडत नाहीं. थोडें खाणारा, वातप्रकृतीचा आणि ज्वरादिक उपद्रवांनी ग्रस्त अशा रोग्याचीं मोडलेलीं हाडें बरीं होणें कठीण आहे. कमरेंत असलेलें फळी-सारखें हाड जर मोडून गेलें अथवा जागचें सरलें अथवा साफ वेगळें पडलें, त्याचप्रमाणें जर जांघेंतलें हाड मोडलें तर तें पूर्ववत होऊन बरें होत नाहीं. कपाळाचें हाड मोडून चुरा होऊन गेलें असलें अथवा मोडल्यावर तें ठिकाणीं बसवितां येणें अशक्य असलें; त्याचप्रमाणें छातींतील हाड मोडलें असलें; तसेंच मस्त-कांतील व पाठीच्या कण्यांतील हाड भंगलें असलें ; तर तीं बरीं होणें असाध्य आहे. हाड मोडलें अथवा जागचें सरलें ह्मणजे तें जागचेजागीं चांगलें बसविल्यावर जर त्याची जतन बरोबर केली नाहीं अथवा वस्त्राचा पट्टा बरोबर सारखा बांधला नाहीं, तर

फिरून सरेल व पहिल्यापेक्षां फार भयंकर स्थिति प्राप्त होऊन रोग असाध्य होईल.

चिकित्सा— घात लागल्यानें हाड खालीं सरलें असेल तर तें वर करावें; आणि वर सरलें असेल तर खालीं करावें. त्याचप्रमाणें वेगळें पडलें असेल तर एकाशीं एक जवळ आणावें, नंतर त्यावर तुपाचा पट्टा बांधावा व तो बांधल्यावर रुंद व पातळ फळकटी चांगल्या रीतीनें बांधावी. ही फळकटी शिथिल असली तर घाव मिळत नाहीं, आणि ताणून बांधली तर तेणें करून अत्यंत पीडा, आग, सूज व पिकणें वगैरे उपद्रव होतात. याप्रमाणें उन्हाळे दिवसांत तीन तीन दिवसांनीं, थंडीच्या दिवसांत सात दिवसांनीं व साधारण वेळीं पांच पांच दिवसांनीं हा पट्टा बदलावा. जखमेच्या व्रणांत मांस तुटून हलत असेल तर त्यावर मध व तूप यांचा लेप करून तें जागच्या जागीं बसवून, त्यावर पट्टा बांधवा. याप्रमाणें केल्यानें व्रण भरून येईल. नंतर तो रुजण्याचे उपाय करावे. बाळक, तरुण आणि वृद्ध याप्रमाणें मनुष्यांचें मोडलेलें हाड एक दोन व तीन महिन्यांनीं बळकट होतें. कंबर, जंघा आणि मांड्या यांतलीं हाडें मोडलीं असतील, तर रोग्याला प्रथम फळीवर निजवून, पांच फळकट्यांचा पट्टा बांधावा, ह्मणजे जंघा व मांडी यांच्या वरील पट्ट्यांत दोहों बाजूंस दोन दोन आणि खालीं एकेक याप्रमाणें पांच, त्याचप्रमाणें कंबरेवर दोहों बाजूला दोन दोन व मध्यें एकेक याप्रमाणें पांच फळकट्या बांधाव्या. हाडांचा सांधा तुटून बरेच दिवस झाले असतील तर पहिल्यानें स्नेहन व स्वेदन विधि करून वर सांगितल्याप्रमाणें चिकित्सा करावी. मोडलेल्या हाडाचा तुकडा आडवा तिडवा चिकटून बसला असेल तर तो फिरून वेगळा पाडून व नंतर बरोबर सांधून वर सांगितल्याप्रमाणें त्याची चिकित्सा करावी. मोडलेल्या हाडांची जागा

पिकणार नाहीं याविषयीं जपावें. कारणकीं पिकल्यास नाड्या आणि मांस कुजून गेल्यामुळें सांधा मिळणें कठीण पडतें. वायाळ झालेल्या रोग्याला साळीचे तांदूळ, तूप, मांसरस व दूध वगैरे पुष्टिकारक खाणें द्यावें. असें खाणें न दिलें तर त्याचें शरीर दुर्बळ होऊन वाय मिळणार नाहीं. जखमी पुरुषाला खारट, तिखट, आंबट व रूक्ष पदार्थ, त्याचप्रमाणें मैथुन, ऊन व श्रम हीं वर्ज होत.



## भगंदर.

**निदान**—गुदद्वारापाशीं दोन बोटाच्या अंतरावर एक फोड होतो व त्यांत फार पीडा उत्पन्न होते. तो फोड फुटला म्हणजे त्यास भगंदर म्हणतात. त्याचे पांच प्रकार आहेत. शतपोनक, उष्ट्र-शिरोधर, परिस्रावी, शंबुकावर्त, व उन्मार्गी. तुरट आणि रूक्ष पदार्थ खाल्यानें अत्यंत कोपलेला वायु गुदद्वाराशीं फोड उत्पन्न करितो. त्याची उपेक्षा केल्यास तो पिकतो व फुटतो; तेव्हां त्यांतून लाल फेणाप्रमाणें पू निघतो, व त्या ठिकाणीं बहुत छिद्रें पडतात. त्यांतून मळमूत्र व वीर्य यांचा स्राव होतो. या भगंदरास शतपोनक म्हणतात. पित्त कोपून गुदाद्वाराशीं लाल फोड उत्पन्न करतें. ते त्वरेनें पिकतात व त्यांतून ऊन पू निघतो. या फोडाचा आकार उंटाच्या डोक्यासारखा असतो, म्हणून त्यास उष्ट्रशिरोधर असें म्हणतात. कफजन्य भगंदरांत फार कंडु येते, घट्ट पू वाहतो, फोड कठीण असतो व रंगानें पांढरा असतो; त्यास परिस्रावी भगंदर असें नांव आहे. ज्यांत गाईच्या आंचुळासारखा फोड येतो; व ज्याचा वर्ण, ज्यांत होणारी पीडा व ज्यांतून स्रावणारा पू हीं विचित्र असतात. त्याच प्रमाणें ज्याची जखम आंतून वाटोळी व खोल असून शंखासारखी दिसते, त्यास शंबुकावर्त भगंदर म्हणतात. गुदद्वारापाशीं जेव्हां क्षत

अथवा जखम पडते तेव्हां तिची हयगय झाल्यानें ती हळुहळु वाढून तींत कि॰ पडतात व त्यांनीं कोरल्यामुळें त्यांत बहुत छिद्रें पडतात. अशा भगंदरास उन्मार्गी भगंदर म्हणतात. बहुतकरून कोणत्याही प्रकारचें भगंदर असो, तें असाध्यच होय. ज्या भगंदरांतून वायु, मळमूत्र, किडे आणि वीर्य हीं पडूं लागतात तें भगंदर रोग्याचा नाश करतें.

**चिकित्सा**—भगंदराच्या जागीं आलेल्या फोडांची, वमनविरेचन–रुधिरस्राव वगैरे उपचारांनीं प्रथमतः शुद्धि करावी, म्हणजे तें पिकणार नाहीं. उपचार करित असतांही तें पिकलेंच तर स्नेह, स्वेद व अवगाहन हे विधि करून अर्श रोगाप्रमाणें त्याची परीक्षा करावी. जर हा रोग अंतर्मुख असेल तर सांडशीनें तो बाहेर काढून शस्त्रप्रयोगानें कापावा. आणि बहिर्मुख असेल तर त्यावर क्षार लावावा अथवा डाग द्यावा. उष्ट्रशिरोधर भगंदर नामक रोगाची तर क्षारानेंच चिकित्सा करावी. शतपोनक नामक भगंदर रोगांत एक एक नाडी कापून ती रुजली म्हणजे दुसरी नाडी कापावी. असें न करतां सगळ्या नाड्या एकदम कापल्या तर रोग्यास मृत्यु येईल. अर्शसहित भगंदर रोग झाला असेल तर प्रथम अर्श बरा केल्यावर मग भगंदरावर उपाय करावे. घाव लागल्यानें भगंदर झालें असेल तर त्याला तपासून त्यांत शल्य दिसेल तर तें बाहेर काढून, त्यांतील किड्यांचा नाश करणाऱ्या औषधांचा त्यावर लेप करावा. विरेचनें देऊन भगंदाराच्या रोग्याच्या कोठ्याची वारंवार शुद्धि करावी. भगंदरावर त्रिफळाच्या रसांत वांटून मांजराच्या हाडाचा लेप करावा. सामान्यें करून भगंदराची चिकित्सा व्रणाप्रमाणेंच करावयाची आहे. भगंदर बरें झाल्यावरही एक वर्षपर्यंत घोड्यावर बसूं नये, मद्य पिऊं नये, मैथुनाचा त्याग करावा, अजीर्ण होईल असें अथवा असात्म्य अन्न खाऊं नये व फार जोराचें काम करूं नये.



# अपस्मार ( फेपरें ).

**निदान**—हा रोग झाला असतां अंधारामध्यें शिरल्याप्रमाणें वाटतें; तुबळें भयंकर रीतीनें फिरतात आणि दोषाच्या प्रबळतेनें रोग्याची स्मृति नाहींशी होते. वातजन्य अपस्मारांत रोगी कांपतो, दांत चावतो, श्वास फार लागतो, व त्याच्या तोंडांतून फेस निघतो. पित्तजन्य अपस्मार झाला असला तर रोग्याचा फेस, त्याचें आंग, मुख व नेत्र हीं पिवळीं असतात. त्यास तहान लागते. शरीर ऊन लागतें व सर्व जग अग्नीनें व्याप्त झालें आहे असें त्यास वाटतें. कफजन्य अपस्मारांत रोग्याचा फेस, त्याचें आंग, मुख व नेत्र हीं पांढरीं होतात, शरीर शीतळ होतें, व रोमांच उभे राहतात. कफजन्य अपस्माराचें बळ नाहींसें होण्यास बहुत वेळ लागतो. वातजन्य व पित्तजन्य अपस्माराचें बळ थोड्याच वेळांत नाहींसें होतें. तीन्ही दोषांच्या लक्षणांनीं व्याप्त असेल तर त्यास सन्निपातजन्य अपस्मार ह्मणतात. तो बहुत करून असाध्य आहे. या रोगावर फार करून औषध चालू असेल तोंपर्यंतच त्याचें बळ दिसून येत नाहीं. परंतु औषध बंद करतांच तो फिरून उपटतो. वात, पित्त, कफ हे तीन्ही दोष, कोपल्यानें, क्रमें करून, बारा दिवशीं, पंधरा दिवशीं व तीस दिवशीं, अपस्माराचा झटका उत्पन्न करितात. वेळानुसार या मुदतीच्या आंतही त्याचा वेग येतो; नाहीं असें नाहीं.

**चिकित्सा**—अपस्माराच्या रोग्याला प्रथम तीक्ष्ण वमन-विरेचनादिक कर्में करावीं. जेणें करून बुद्धि, चित्त, इंद्रियें आणि हृदय हीं मोह सोडून त्यांस प्रबोध प्राप्त होईल व वातिक अपस्मारांत इतर उपायांपेक्षां बस्तीचाच विशेष उपयोग करावा. पित्तप्रधान

अपस्मारांत विरेचनाचा आणि कफप्रधान अपस्मारांत वमनाचा उपयोग करावा. यानंतर दुसरे उपाय योजावे. गाईच्या शेणाचा रस, दूध, दहीं आणि मूत्र यांत उकळलेलें तूप प्यावयास दिल्यानें, अपस्मार ज्वर, उन्माद वगैरे रोग बरे होतात. आणखी जेष्टीमधीचें चूर्ण घालून अठरापट कोहळ्याच्या रसांत तूप उकळावें. तें प्यावयास दिल्यानें अपस्मार रोग दूर होतो. आणि बुद्धि, वाणी व स्वर यांचें बळ वाढतें. कुत्रें, कोल्हा, मांजर अथवा सिंह यांच्या पित्ताचें नस्य दिलें असतां अथवा मुंगूस, सर्प; बैल व अस्वल यांच्या पित्तांत सिद्ध केलेल्या तेलाचें नस्य दिले असतां व अभ्यंग करविलें असतां, अथवा मुंगूस, घुबड, मांजर, गिधाड, किडे, सर्प व कावळे यांचीं मस्तकें, पंख व विष्टा यांची धुरी दिली असतां, अपस्मार रोग बरा होतो. अपस्माराच्या रोग्यानें तेलांत लसून कालवून खावी, अथवा दुधांत शतावरीचें चूर्ण व मधांत वेखंड घालून खावें, ह्मणजे अपस्मार कमी होतो. वेग बंद पडल्यावर वेगांत त्यानें केलेल्या चेष्टा त्यास सांगूं नयेत; त्याच प्रमाणें मनाला आनंद वाटेल अशाच गोष्टी त्याच्या पाशीं बोलाव्या.

---

## कर्णरोग.

**निदान**—कानांतील वायु हा दोषांनीं घेरला गेल्यामुळें, व उलटी गति प्राप्त झाल्यामुळें कानांत अत्यंत शूळ उत्पन्न करतो, त्यास कर्णशूळ ह्मणतात. हा कष्टसाध्य आहे. वायु हा कानांच्या द्वारांत राहिला असल्यामुळें भेरी, मृदंग, शंख वगैरे यांच्या सारखा विविध प्रकारचा नाद कानांत उत्पन्न करतो, तेव्हां त्यास कर्णनाद असें ह्मणतात. शब्दाला वाहणाऱ्या नाड्यांस घेरून त्या केवळ

वायु अथवा कफासहित वायुच जेव्हां असतो तेव्हां कानांनीं कांहींच ऐकूं येत नाहीं; तें बहिरेपण. पित्तानें व कफानें युक्त असा वायु कानांत अलगुजाच्या अवाजाप्रमाणें अवाज उत्पन्न करतो, तेव्हां त्यास कर्णक्ष्वेड ह्मणतात. मस्तकावर कांहीं लागल्यानें, पाण्यांत बुड्या मारल्यानें अथवा कानांत आलेला विद्रधि पिकल्यानें, वायु हा कोपल्यामुळें कानांतून पू स्रवतो; त्यास कर्णस्राव ह्मणतात. कफसंयुक्त वायु कानांत खाज उत्पन्न करतो. पित्ताच्या उष्णतेमुळें कानांतील कफ सुकून जो मळ उत्पन्न होतो, त्यास कर्णगूथक ह्मणतात. हा कानांतील मळ, स्नेह, स्वेदादिकामुळें पातळ होतो व नाक व मुख यांतून बाहेर पडूं लागतो; त्यास कर्णप्रतिनाह म्हणतात. आणि यामुळेंच अर्धशशीचा रोग उद्भवतो. जेव्हां कानांत किडे पडतात किंवा माशी बसून ती त्यात आपली अंडीं घालते, तेव्हां कान ज्या रोगांनीं व्याप्त होतो, त्यास कृमिकर्ण या नांवानें ओळखतात. कानाच्या आंत कांही वस्तु गेल्यामुळें किंवा क्षत पडल्यामुळें विद्रधि उत्पन्न होतो अथवा दोषांनी सुद्धां उत्पन्न होतो. पुढें तो फुटला म्हणजे त्यांतून तांबूस पिंवळट पू निघतो, व त्यांत अनेक प्रकारचे व्याधि उत्पन्न होतात. पित्तामुळें, विद्रधि पिकल्यानें अथवा कानांत पाणी शिरल्यानें कर्णपाक होतो. आणि तेणें करून कान पिकून गेल्यामुळें दुर्गंधयुक्त पू निघतो, त्यास पूतिकर्ण म्हणतात. जर वायूमुळें कानांत व्याधि उद्भवला असेल तर त्यांत वेदनासहित शब्द होतो, पातळ लस वाहते व बहिरेपणा येतो. पित्तामुळें झाला असेल तर लालभडक सूज येऊन फाट पडते, पिंवळ्या रंगाची दुर्गंधयुक्त लस स्रवते, व आग होते. कफामुळें व्याधि झाला असेल तर भलभलतेंच ऐकूं येतें, पांढऱ्या रंगाचा चिकट पू वाहतो व वेदना होतात. तीनही दोषांचा संबंध असेल

तर सगळीं लक्षणें एकदम दिसूं लागतात. ज्या दोषाचें प्राधान्य असेल त्या दोषाच्या रंगाचा पू वाहतो. कान उपटल्यानें त्याच्या आजूबाजूस फार वेदना होऊन व फोड येऊन सूज उत्पन्न होते, त्यास कर्णशोथ असें म्हणतात. कानांत दागदागिने घातल्यामुळें, कांहीं लागल्यामुळें अथवा घासल्यामुळें, त्याच्या आजूबाजूस काळी किंवा तांबूस सूज येते. जसा विंधावा तसा कान न विंधल्यामुळें, सूज येऊन त्यांत वेदना होऊं लागल्यास व पिकल्यास, त्या रोगास दुःखवर्धन म्हणतात. कफ, रुधिर, व कृमि यांच्या दोषांमुळें आलेली सूज पसरून, तींतून मांस कुजून गळून पडतें, तेव्हां त्यास परिलेही म्हणतात.

चिकित्सा—वातापासून झालेला कर्णशूळ बरा करण्याकरतां वातहारक औषधें घालून सिद्ध केलेलें तूप, रात्रौ मांसरसाचें भोजन करून, मग प्यावें. आणि पिंपळ, बेल, रुई व एरंड यांच्या पानांस तेल व सैंधव चोपडून, विस्तवावर शेकावीं व मग त्यांचा रस काढावा, व ह्या रसाचे बिंदु कानांत सोडावे. वातहारक औषध गोमूत्रांत घालून, त्यांत सिद्ध केलेल्या तेलाचे बिंदु कानांत घातल्यानें पीडा बंद होते. पित्तामुळें कानांत शूळ उद्भवला असेल तर तूपसाखर खावयास देऊन व स्नेहन विधि करवून विरेचन द्यावें, आणि द्राक्ष व जेष्ठमध घालून स्तनांचें दूध उकळावें व त्याचीं टिपें कानांत घालावीं. कफप्रधान कर्णरोगाच्या शांतीसाठीं तुपांत पिंपळी घालून उकळावी व तें रोग्यास प्यावयास देऊन मग ओकारी काढवावी. लसूण घालून आल्याचा रस अंमळ ऊन करून, त्याचे बिंदु कानांत घालावे. अथवा कवठाचा रस व बिजोऱ्याचा रस यांचे बिंदु कानांत घालून त्यावर समुद्रफेणाची भुकटी भरावी. बकरीचें व मेंढीचें मूत्र व कळकाची साल यांत सिद्ध केलेलें तेल, अथवा हिंग व सुंठ यांत सिद्ध केलेलें

सर्षप तेल कानांत घातल्यानें कर्णरोग बरा होतो. कान पिकून पू वहात असेल तर त्यास ऊन पाण्याच्या पिचकारीनें धुऊन काढून, व्रणाप्रमाणें चिकित्सा करावी. अथवा गुग्गुळाचा धूप देऊन कानांत मद्याचे बिंदु घालावे. सर्षपाच्या तेलाचे बिंदु घातल्यानें कर्णनाद बरा होतो. कानांत किडे पडल्यासही सर्षपाच्या तेलाचे बिंदु घालावे. कानांत अर्श, अर्बुद वगैरे झाल्यास, सदरहू रोगाची जी चिकित्सा सांगीतली आहे, तीच येथेंही करावी. परिलेहिका नामक कर्णरोगावर गाईचें शेण ऊन करून वारंवार कानावर बांधावें. याशिवाय सर्व प्रकारच्या कर्णरोगावर दुसरेही योग्य उपचार करावे. कर्णरोग्यानें डोईवरून आंघोळ करूं नये व दिवसास मुद्दां थंड पाणी पिऊं नये.

## हिक्का—( उचकी ).

**निदान**—स्वाभाविक वेग दाबून धरल्यामुळें, उपवास केल्यामुळें, वाटचालीमुळें, जड वजन उचलल्यामुळें, थंड पाण्याची आंघोळ केल्यामुळें, व अशाच अन्य कारणामुळें उचकी उचलते. उचकी लागली असतां, यकृत, प्लीहा व आंतडीं हीं तोंडापर्यंत वर आलीं कीं काय असे भासतें. तसाच उदान वायुसहित प्राणवायु हा शब्द करीत करीत वर येतो. हा व्याधि त्वरित प्राण हरण करतो. वायूचा व कफाचा मिलाफ झाल्यानें अन्नजा, यमला, क्षुद्रा, गंभीरा, व महती असे उचकीचे पांच प्रकार आहेत. अन्नपान फार केल्यानें वायु एकाएकीं कोपून ऊर्ध्वगतीनें उचकी उत्पन्न करतो ती अन्नजा. उचकी बहुत वेळां उचलल्यावर एकदम ओळीनें दोन दोन वेळां येऊं लागते व ते वेळीं मस्तक व मान कांपते, तेव्हां ती यमला. पुष्कळ वेळानें व मंद वेगानें जी उचकी येते व जी बरगड्यांच्या मूळांतून

येतेशी वाटते, ती क्षुद्रा. नाभींतून उत्पन्न होऊन गंभीर शब्द करीत येते व येतांना फार त्रास देते ती गंभीरा. आणि मर्मस्थानीं पीडा करून जी वरचेवर येते व जी सर्व गात्रांस कांपविते ती महती. उचकीनंतर आणखी दुसरे रोग उपटले असले, रोगी दुर्बळ झाला असला, मैथुन करण्यांत फार आसक्त असला, त्याला तहान फार लागत असली व प्रलाप करीत असला तर तीतून रोगी सहसा वांचत नाहीं.

चिकित्सा—या रोगांत रोग्याली प्रथम स्निग्ध स्वेदन विधि करवावा, म्हणजे तेणें करून छातींत गोठलेला कफ गळून पडतो, नाड्या नरम होतात व वायूची गति सरळ होते. इच्छेप्रमाणें स्वेदन-विधि झाल्यावर, मत्स्य व डुकर यांच्या मांसाचा रस किंवा दहीं याबरोबर पुष्कळ तूप घालून शिजविलेला भात खाऊं घालावा. यापासून रोग वाढला असें वाटलें तर ओकारी काढवावी. पित्ताच्या प्राधान्यामुळें ज्याच्या शरीरांत दाह उत्पन्न होत आहे व घाम येत आहे त्याला, आणि ज्याच्या शरीरांत धातु व बळ नसल्यामुळें तें रूक्ष झालें आहे, त्याला व गर्भिणी स्त्रीला हा रोग झाला असेल तर त्यांस स्वेदनविधि करूं नये; तर छातीवर व कंठावर साखर घालून अंमळ ऊन केलेल्या तुपाचें सिंचन करावें; अथवा पुष्कळ तूप घालून साखरेची लापशी ऊन ऊन अशी वर सांगितलेल्या जागीं बांधावी. आमसहित नवीन ज्वर असून, उचकी झाली असेल तर रूक्ष पदार्थांचा शरीरावर लेप करून घाम येईल असें करावें व लंघन करवावें. ओकारी काढण्याला लायक रोगी असेल तर मीठ घालून, खारट पाणी पाजून, ओकारी काढवावी. रोग्याचें पोट फुगलेसें वाटलें तर लिंबू, हिंग, पीलु व बिडलवण हे पदार्थ घालून अन्न जेवावें. त्याचप्रमाणें श्वास रोगावर सांगितलेली चिकित्सा करावी.

ह्या रोगांत कफ प्रधान असेल तर त्यांत वमन व विरेचन हे दोनही उपाय करावे. परंतु कफ उत्पन्न झाला नसतां. वमनविरेचन जर करविण्यांत आलें तर कोपलेला वायु रोग्याचे प्राणच हरण करतो. यास्तव कफाची अधिकता असेल तरच वमनविरेचनादि शोधन उपाय योजावे. एकाएकीं थंड पाणी डोक्यावर शिंपल्यानें, त्रास उत्पन्न झाल्यानें, विस्मय वाटेल अशा गोष्टी ऐकल्यानें, त्याच-प्रमाणें हर्ष, क्रोध, व उद्वेग उत्पन्न करणारे प्रसंग आल्यानें साधा-रण उचकी बंद होते. श्वासरोगांत त्याग करण्यासारखा आहा-रविहारादि जो विधि सांगितला आहे तोच याही रोगांत पाळावा.

---

## उन्माद.

**निदान**—वात, पित्त व कफ हे दोष आपापले मार्ग सोडून, मनास भ्रमवून, मद उत्पन्न करतात, त्यासच उन्माद असें नांव आहे. हा रोग वातापासून, पित्तापासून, कफापासून, सन्निपातापासून, मना-च्या दुःखापासून व विषारापासून अशा साहा कारणांपासून होतो. तो नवीनच झालेला असेल व त्याची पूर्ण वाढ झालेली नसेल तोंपर्यंत त्यास मद हेंच नांव आहे. अपवित्र भोजन केल्यानें, देव, गुरु आणि ब्राह्मणें ह्यांचा तिरस्कार केल्यानें, एकाएकी भय व हर्ष प्राप्त झाल्यानें आणि विषम चेष्टा केल्यानें, ज्याच्या आंगीं सत्वगुण थोडा आहे अशा मनुष्याचे दोष कोपून, बुद्धीचें स्थान जें हृदय तें दूषित करतात व मनाला वाहणाऱ्या नाड्यांमध्यें प्रवेश करून मोह उत्पन्न करतात. भ्रम, सत्वगुणाचा नाश व अधीरता वगैरे हीं उन्माद रोगाचीं सामान्य लक्षणें होत. रूक्ष, थोडें व शीत असें अन्न खाल्ल्यानें, विरेचन घेतल्यानें, धातूंचा क्षय झाल्यानें आणि

उपवास केल्यानें वायु वाढून, चिंतातुर असलेल्या मनुष्याचें हृदय दूषित करून बुद्धि व स्मृति यांचा तत्काळ नाश करतो आणि कारणावांचून अतिशय हसणें, नाचणें, गाणें व रडणें इत्यादि चिन्हें उत्पन्न करतो. याप्रमाणें वातापासून झालेल्या उन्मादरोगांत रोग्याचें आंग कृश व लाल रंगाचें होतें आणि अन्न पचल्यावर रोगाचें बळ वाढतें. अपक्व, तिखट, खारट, व दाह करणारें असें अन्न भोजन केल्यानें, पित्त एकत्र होऊन, कोपतें व अल्प सत्वगुणाच्या मनुष्याच्या हृदयांत शिरून वर लिहिल्याप्रमाणें उन्माद उत्पन्न करतें. तेणें करून रोगी रागीट व तापट होतो, नागवा होऊन फिरतो, त्याचें आंग ऊन असतें व शीतळ अन्न व छाया मिळावी म्हणून तो इच्छा करतो. तृप्त करणारे पदार्थ पोट भरून खाल्ल्यावर पडून राहीलें असतां, हृदयांतील पित्तयुक्त कफ कोपून बुद्धि, स्मृति, व मन यांची शक्ति हरतो. हा कफकृत उन्माद. यांत वाचाळता कमी असते; अन्नावर अरुचि असते; स्त्रीची इच्छा होते; निद्रा वाढते; आणि व्याधीचें बळ जेवल्यावर अधिक उचलतें. तिन्ही दोषांपासून झालेल्या उन्मादांत सर्व लक्षणें एकदम होतात. चोर, राज्यकारणी मनुष्यें, शत्रु व इतर लोक यांच्यापासून अत्यंत त्रासलेल्या मनुष्यांस उन्माद झाला असतां, त्याचप्रमाणें धनाचा नाश झाल्यानें, इष्टमित्राच्या मरणानें, व स्त्रीसमागमाची इच्छा पूर्ण न झाल्यानें उन्माद झाला असतां, रोगी विलक्षण प्रकारचीं भाषणें करतो. अत्यंत मूढ होऊन घटकेंत गातो, घटकेंत हसतो व घटकेंत रडतो. विषारापासून झालेल्या उन्मादांत रोग्याचे डोळे लाल भडक होतात व बळ, इंद्रियें व कांति यांचा नाश होतो. उन्माद रोगांत रोगी आपलें डोकें खालीं करीत असेल किंवा उंच ठेवीत असेल, मांस व बळ यांचा नाश झाला असेल व रोग्यास बिलकुल झोप येत नसेल तर तो रोगी मृत्यु पावतो.

चिकित्सा—वातजन्य उन्मादांत प्रथम रोग्यास स्नेहपान करवावें; आणि वायूमुळें नाड्या भरल्या असतील तर स्नेह घालून हलकें विरेचन द्यावें. कफ व पित्त ज्यांत प्रधान आहेत अशा उन्मादावर स्नेह, वमन, विरेचन, बस्ति व नस्य हीं योजावीं. इतकें करूनही उन्मादाची शांति होणार नाहीं तर तीक्ष्ण नस्य द्यावें, व अंजन करावें. त्याच प्रमाणें हर्ष, आश्वासन, त्रास, ताडन, तर्जन, अभ्यंग, व घृतपान वगैरे उपाय करावे. हिंग, संचळ खार आणि सुंठ हे तीन पदार्थ आठ आठ रुपये भार घेऊन, गोमूत्रांत घालून, त्यांत दोनशें छप्पन्न रुपये भार तूप सिद्ध करावें. मग त्यापैकीं पिववेल तेवढें तूप पाजावें, म्हणजे उन्मादाचा नाश होईल. या रोगांत शीतळ, मधुर व हलकें अन्नपान करवावें. तशाच शिरा द्याव्या. पुष्ट जनावराचें मांस दिल्यानें व ज्या स्थळीं वारा नाहीं तेथें निजविल्यानें मतीचा भ्रम दूर होतो. उन्मादाच्या रोग्यास पाणी नसलेल्या विहिरींत सोडून त्यास लंघन द्यावें; आणि धर्म व अर्थ यांनीं युक्त स्नेहसूचक वाक्यें त्याशीं बोलावीं, प्रिय वस्तूचा नाश झाला असें त्यास ऐकवावें. आश्चर्यकारक वस्तु दाखवावी व शरीरास खाजवणी लावावी, शिरसाचें तेल अंगास चोळून उन्हांत निजवावें, डाग द्यावा, चाबूक मारावे, बांधून खाड्यांत टाकावें, वीज लावावी, अपघात करण्याचें साधन नसेल अशा अंधार खोलींत कोंडावें, दातांशिवायचा सर्प आणून त्याच्याकडून चाववावें, राज्याच्या अधिकाऱ्यांकडून पकडवून वधस्थानांत घेऊन जाऊन भय दाखवावें. सर्वांत मृत्यूचें भय मोठें म्हणून तें दाखविलें असतां लवकर चित्त ठिकाणावर येतें. हे सर्व उपाय देशकाळ पाहून करावे. सात्विक आहार करणाऱ्यास उन्माद होत नाहीं म्हणून नेहमी सात्विक पदार्थांचें सेवन करावें.



# शिरोरोग.

**निदान.**–शिरोरोग हा वातज, पित्तज, कफज, सन्निपातज, रक्तज, क्षयज, कृमिज, सूर्यावर्त्त, अनंतवात, अर्द्धावभेदक, आणि शंखक असा अकरा प्रकारचा आहे. कांहीं एक कारण नसतां एकदम डोकें दुखूं लागावें, रात्रीं त्याचा जोर वाढावा, आणि डोकें बांधल्यानें अथवा शेकल्यानें तें बरें व्हावें, असें झालें असतां, तो वातज शिरोरोग. विस्तव ठेविल्याप्रमाणें डोकें फार तापावें, डोळे व नाक ह्यांची आग व्हावी आणि थंड उपचारानें व रात्रीस कांहीं शांति वाटावी, असें झालें असतां, तो पित्तज शिरोरोग. ज्यांत मस्तकांतून कफ पडतो, लिंपल्याप्रमाणें भासतें, डोक्यांत भार व कठिणपणा व थंडपणा वाटतो, डोळ्यांचीं पोटें सुजतात, व तोंडावरही किंचित सूज येते, तो कफज शिरोरोग. ज्यांत तिन्ही दोषांचीं लक्षणें आढळतात तो सन्निपातज शिरोरोग. ज्यांत सर्व लक्षणें पित्ताप्रमाणें होऊन आणखी मस्तकास हात लावल्यानें वेदना होतात तो रक्तज शिरोरोग. ज्यांत मस्तकांतील रुधिर, वसा, कफ व वायु यांचा क्षय झाल्यानें मस्तकांत फार पीडा होते व मस्तक तापतें, फार शिका येतात, आणि वाम आणल्यानें, शिंक काढविल्यानें, धुरी दिल्यानें, नस्य दिल्यानें व रुधिर काढल्यानें वगैरे उपायांनीं मस्तकांतल्या वेदना शांत न होतां उलट्या वाढतात, तो क्षयज शिरोरोग जाणावा. ज्यांत मस्तकांत फार पीडा होते, त्यांत किडे कोरित असून ते हलत चालत आहेत असें भासतें, आणि नाकांतून पुवासहित रक्त वाहतें, तो कृमिज शिरोरोग. सूर्योदय झाला ह्मणजे हळुहळु डोकें दुखूं लागतें, डोळे व भुवया ह्यांच्या मध्यें फार पीडा होते व सूर्य मावळूं लागला ह्मणजे ती पीडा कमी होत जाते व शीतळ आणि उष्ण उपचारांनीं मस्तक शांत होतें, तो सन्निपातिक शिरोरोग सूर्यावर्त

जाणावा. वात, पित्त व कफ हे तीन दोष कोपून मानेच्या मागच्या आंगच्या शिरा फार ओढून धरून, डोळे, भुवया व कपाळ यांच्या लगतच्या भागीं राहून, अत्यंत उग्र वेदना उत्पन्न करतात व तेणें करून कानाच्या आसपास कंप होतो, दाढी ताठते व डोळ्यांस विकार होतो, तेव्हां त्या शिरोरोगास अनंतवात ह्मणतात. रूक्ष अन्न जेवल्यानें, पूर्व दिशेचा वायु अंगावर घेतल्यानें, अत्यंत मैथुन केल्यानें, स्वाभाविक वेग अडवून धरल्यानें व अशाच इतर कारणांनीं एकटा वायु अथवा कफसहित वायु कोपून मस्तकास जखडून धरतो तेव्हां त्यास अर्द्धाव भेदक शिरोरोग ह्मणतात. हा रोग वृद्धि पावला तर डोळा जातो अथवा कान बहिरा होतो. पित्त अत्यंत कोपून तें, रक्त व वायु अशी तिन्ही कपाळाजवळच्या शंखदेशावर दारुण सूज उत्पन्न करतात, तेव्हां तींत अत्यंत दाह होतो आणि विषाच्या वेगाप्रमाणें वेग गळ्यापर्यंत चढत जाऊन ती त्यास व्यापिते. यास शंखक शिरोरोग असें ह्मणतात. हा रोग झाला असतां रोगी तीन दिवसांत मरण पावतो.

**चिकित्सा**—वायूमुळें झालेल्या शिरोरोगांत वात रोगाची चिकित्सा करावी, ह्मणजे मस्तकास अभ्यंग करून रात्रीं ऊनऊन दूध प्यावें व उडिद, मूग व कुळीथ हे पदार्थ पुष्कळ तूप घालून खावे. तिळाचें तेल किंवा तळवट दुधांत घालून प्यावें, व कानांत तेल घालावें. कापशीचें बीं, दालचिनी व नागरमोथा हे तीन जिन्नस पाण्यांत वांटून त्याचें नस्य दिलें असतां सर्व प्रकारचे मस्तकरोग बरे होतात. साखर व केशर तुपांत घालून कढविलें असतां पित्त व रक्त यामुळें झालेल्या मस्तकरोगावर तें हितकारक आहे. इतकें करूनही मस्तकरोग शांत होणार नाहीं व रोग वातप्रधान असेल तर डाग द्यावा; आणि कफप्रधान असेल तर उष्ण उपचार करावे. शिरसाचें बीज, अघाडा व बीडलवण यांच्या रसाचें नस्य

दिल्यानें अर्धावभेदक ( अर्धशशी ) रोग बरा होतो. सूर्यावर्त्त नामें शिरोरोगावरही अर्धशशींतल्याप्रमाणेंच उपचार करावे. ते करूनही जर रोग बरा होणार नाहीं तर शिरा काढाव्या. पित्तापासून आलेल्या मस्तकरोगावर स्नेहपान करून शिरा काढाव्या, आणि मस्तकावर व तोंडावर शीतळ पदार्थाचा लेप करावा. फारकरून सर्व प्रकारच्या शिरोरोगावर एकसारखे उपाय करावयाचे असतात. कफापासून आलेल्या मस्तकरोगावर जुनें तूप प्यावयास देऊन, ओकारीच्या औषधांत तिखट पदार्थ घालून, ओकारी काढवावी. शरीरास रूक्ष पदार्थ वासून घाम काढवावा व उपवास करावा. कृमि पडल्यामुळें आलेल्या शिरोरोगांत रुधिराचें नस्य द्यावें, म्हणजे मस्तकांतील कृमि मूर्च्छित होऊन नाकांतून व तोंडांतून बाहेर पडतात. ते लवकर बाहेर पडावे म्हणून तीक्ष्ण नस्य व तीक्ष्ण पदार्थांची धुरी द्यावी. बकरीच्या मुतांत वावडिंगें वांटून नाकांत त्याचे थेंब सोडल्यानें कृमि तत्काळ बाहेर पडतात. कृमिज मस्तक रोगांत कृमि रक्त प्याले असतील तर शिरा घेऊं नयेत. मस्तक थरथर कांपत असेल तर वातनिवर्तक उपाय करावे, पण डाग देऊं नये. डोक्यावर उंदरी आली असतां हस्तिदंत तेलांत उगाळून तें तेल लावावें. मेंढ्याचें शिंग जाळून त्याच्या राखेंत तेल घालून ती राख चोळल्यानें पांढरे केस गळून पडून काळे केस उगवतात. परंतु जोंपर्यंत नवे केस आले नाहींत तोंपर्यंत डोक्यावरून आंघोळ करूं नये.



# नासारोग.

**निदान**—नाक आंतून बंद झालें असेल, शुष्क झालें असेल, ओलें राहत असेल, धूर निघत असेल, व त्यास रस व गंध यांची ओळख नसेल, तर तो नासारोग वात व कफ यापासून झाला आहे असें समजावें. वायु कोपून गळ्यांतील व नाकांतील विकृत दोषां बरोबर मिळून नाकांतून व तोंडांतून दुर्गंधयुक्त स्राव करतो, तेव्हां त्यास पूतिनस्य म्हणतात. पित्तामुळें नाकांत व्रण होऊन पिकतो व त्यांतून पू गळतो तेव्हां त्यास नासापाक म्हणतात. दोष कोपित झाल्यानें व बाजूस कांहीं लागल्यानें नाकांतून रक्त व पू स्रवतो तेव्हां त्यास पूयरक्त असें म्हणतात. घ्राणाचा आश्रय करून राहिलेला मस्तकस्थाना-तील वायु दूषित होऊन कफासहित मोठा शब्द करीत नासिका मार्गानें बाहेर निघतो तेव्हां त्यास क्षवथु (शिंक) म्हणतात. तीक्ष्ण व तिखट पदार्थ हुंगल्यानें, सूर्याकडे टक लावून पाहिल्यानें किंवा नाकांत वात घातल्यानें, आगंतुक क्षवथु होतो. सूर्याच्या तापामुळें मस्तक तापून, जमून राहिलेला दूषित व खारट कफ नाकांतून बाहेर निघतो तेव्हां त्यास भ्रशथु म्हणतात. याशिवाय दीप्त, प्रतिनाह, नासास्राव, नासापरिशोष वगैरे आणखी नाकाचे रोग आहेत. अपक्व पीनस असतां डोकें जड होतें, स्वर मंद होतो आणि नाकांतून निरंतर स्राव होतो. पक्व पीनस असेल तर कफ कठिण होऊन नाकाच्या मार्गांत भरून राहतो. डोकें आपटल्यानें, क्रोधानें, ऋतूचा पालट झाल्यानें आणि अशाच दुसऱ्या कारणांनीं मस्तकांत कफ एकत्र होऊन कोपलेल्या वायूमुळें नासिकाद्वारानें बाहेर निघतो, त्यास प्रतिश्याय (पडसें) म्हणतात. तें जर वातामुळें झालें असेल तर नाकपुडींत दडा बसतो, ओढल्यासारखें वाटतें, आणि त्यांतून

स्राव होतो. पित्तामुळें झालें असेल तर नाकांतून ऊन व पिवळा स्राव होतो. कफापासून झालें असेल तर शीतळ व पांढरा कफ पुष्कळ पडतो. सन्निपातापासून झाला असेल तर पिकून अथवा पिकल्यावांचून वारंवार नासारोग होतो व तो बरा होतो. सात प्रकारचीं अर्बुदें, चार प्रकारचे शोथ, चार प्रकारचे अर्श व चार प्रकारचे रक्तपित्त रोग हीं सर्व नाकांतही होतात.

चिकित्सा—सर्व जातीचे पीनस वगैरे नासिकारोग ज्याला झाले असतील, त्या मनुष्यानें वारा नसेल अशा घरांत रहावें. स्नेहन, स्वेदन, वमन, धूम, आणि गंडूश यांचा उपयोग करावा. गरम कापडानें डोकें गुंडाळावें. हलकें, खारट, स्नेहयुक्त, ऊन व द्रवरहित असें भोजन करावें. मुळा घालून केलेलें सार अथवा कुळिथ ह्याचें पाणी प्यावें. चालत असेल तर जुनें मद्य प्यावें, वेखंड हुंगावें, स्नान, शोक, क्रोध, भय, पुष्कळ झोप व थंड पाणी यांचा त्याग करावा. कफापासून नासिकारोग झाला असेल तर रोग्यानें लंघन करावें व पांढरा शिरीष वाटून डोक्यावर लेप करावा. दुष्ट पीनसावर क्षयहर व कृमिहर चिकित्सा करावी. कोणतेही प्रकारचा नासारोग असो, त्यावर बहुधा तीक्ष्ण द्रव्याचें नस्य योजावें.



# मुखरोग.

निदान—मुखरोगांतच दंतरोग, ओष्ठरोग, दांताच्या हिरड्यांचा रोग, ताळूचा रोग, जिभेचा रोग व कंठरोग यांचा समावेश होतो. तो वात, पित्त, आणि कफ हे तिन्ही दोष एक झाल्यानें होतो व त्यांचीं लक्षणें सदरहु दोषांप्रमाणें असतात. ओष्ठरोगांत मांस व

रुधिर यांच्या विकारामुळें झालेले रोग, दंतमूळांत संनिपातज किंवा सौशीर (नाडीगत) नांवाचे रोग असाध्य होत. दंतरोगांपैकीं श्याव, दालन व भंजन हे रोग असाध्य होत. जिव्हारोगांपैकीं अलासरोग असाध्य होय. तालुरोगांपैकीं अर्बुदरोग असाध्य आहे. कंठरोगांपैकीं स्वरघ्न, वलय, वृंद, बलास, विदारी, गलौघ, मांसतान, शतघ्नी व रोहिणी हे रोग असाध्य आहेत.

**चिकित्सा**—तुटलेल्या ओंठाच्या दोनही कडांस स्नेहस्वेद क्रिया करून शस्त्रानें किंचित विलेखन करावें व त्या कडा बरोबर एकीशीं एक मिळवून शिवाव्या. नंतर त्याची व्रणाप्रमाणें चिकित्सा करावी. पित्त व अभिघात यामुळें ओष्ठरोग झाला असतां जळवा लावाव्या; आणि रुधिर दोषामुळें झाला असतांहि तशीच चिकित्सा करावी. मेदापासून झाला असतां स्वेदनादिक केल्यावर चिरून मेद काढून टाकावा. दंतहर्ष (दांत आंबणें) या विकारावर वात-प्रकोप दूर करणारी क्रिया करावी. दांतावर दांत उगवला असेल तर त्यावर नेहमी क्षार लावावा आणि तेणेंकरून शमन न झाल्यास तो शस्त्रानें खरवडून काढावा. रक्त बंद झालें नाहीं तर त्यावर डाग देऊन व्रणाप्रमाणें चिकित्सा करावी. हिरडीस अडचण न येईल अशा रीतीनें दांतांपासून निघालेली शर्करा काढून टाकावी आणि त्यावर मधुयुक्त क्षार लावावा. ऊन तुपाचे बोळे दांतावर ठेवल्यानें दातांची पीडा शांत होते. सर्व प्रकारच्या दंत-रोगावर व दांत बळकट करण्याकरितां तेलाचे चूळ तोंडात धरले असतां हितकर होत. याप्रमाणें उपचार करूनही पीडा शांत होणार नाहीं तर आणि मूळ झिजत चाललें असें दिसेल व दांत वरून दृढ असेल तर तो सांडशीनें उपटून काढून तेलांत जेष्ठीमधाचें चूर्ण कालवून त्याचा अथवा मधाचा चूळ तोंडांत धरावा. कृश, वृद्ध

व वातव्याधिग्रस्त मनुष्याचा दांत बळानें उपटून काढूं नये. पित्ताच्या प्रकोपामुळें जिभेवर आलेला कांटा घासून काढून, नंतर तिच्यावर मधुर द्रव्याचा लेप करून लाळ पाडवावी. मुलाचें तोंड येऊन चट्टे पडलें असले तर टांकणखाराचें चूर्ण मधांत कालवून तोंडांत वारंवार चोळावें. मुखपाक रोगावर मुख स्वच्छ करणारे पदार्थ मधांत कालवून मुखाच्या आंतल्या भागांत चोळावे. त्रिफळाच्या काढ्यांत मध घालून त्याचा चूळ तोंडांत धरला असतां सर्व प्रकारचे मुखरोग बरे होतात व दांतहि बळकट होतात. मुखरोगाच्या रोग्यानें फार-करून कफनाशक आहार करावा. गळ्याच्या रोगांत प्राणवायु जाणें बंद होतो म्हणून या रोगावर त्वरित उपाय करावा.

---

## नेत्ररोग.

**निदान**.—फार रडल्यामुळें, शोकामुळें, क्रोधामुळें, मस्तकावर कांहीं लागल्यामुळें, अतिस्त्रीसंगामुळें, अश्रूंस प्रतिबंध केल्यामुळें, व अशाच दुसऱ्या कारणामुळें. तीनही दोष कोपून नेत्रविकार उत्पन्न करतात. नेत्ररोगांत प्रथम डोळे येतात व दुःखतात, तेव्हां तो अभिष्यंद रोग होय. यापासूनच सर्व प्रकारचे भयंकर नेत्ररोग उत्पन्न होतात. वायूमुळें डोळे दुःखूं लागतात, व ठणका, थंड पाण्याचा स्राव, जडपणा व शुष्कपणा हीं लक्षणें होतात. पित्तामुळें, दाह, आजुबाजूनें डोळा सुजणें व त्यावर थंड पदार्थ लावावा असें वाटणें, हीं लक्षणं होतात. कफामुळें उष्ण पदार्थ डोळ्यास लावावा अशी इच्छा वाटते, डोळे जड होतात व त्यांस सूज येते. रक्तामुळें डोळे दुःखूं लागले तर डोळ्यांतून लाल अश्रु गळतात, डोळे तांबडे लाल होतात, व पित्तामुळें दुःखूं लागले तर जीं लक्षणें होतात तशीं

लक्षणें होतात. खुपऱ्या, चट्टा, फूल, कृष्णमंडळाचे विकार (वडस) मोतींबिंदु, खीळ, पडळ, डोळ्यांतला कण, नासूर, रांजणवडी वगैरे डोळ्याचे बहुत रोग आहेत. त्याच प्रमाणें रातांधळें, अस्वट दृष्टि, ज्या रोगामुळें पदार्थाचें रूप भलतेंच दिसतें तो [illegible]पणाचा रोग, ज्यांत वायुमुळें संकोच पावून दृष्टि खोल जाते तो गंभीरदृष्टि रोग, वडस वगैरे डोळ्याचे आणखी पुष्कळ रोग आहेत.

**चिकित्सा**—वातावांचून इतर दोषापासून झालेल्या डोळ्याच्या रोगांत तीक्ष्ण पदार्थांचा चूर्ण तोंडात भरावा व तीक्ष्ण द्रव्यांचें [illegible] नाकांत घालावें व उपवास करावा. अस[illegible] चोळणे, [illegible], पाणी गळणें व सूज याची शांति व्हावी ह्मणून, [illegible], [illegible], [illegible], सोनकाव, रसांजन, जेष्ठीमध, चंदन व [illegible] लेप करावा. व त्यांची पुरचुंडी करून डोळ्यावर [illegible]. वातजन्य नेत्ररोगांत सैंधव व [illegible] बांधावी. जंगली कुळिथ उकडून ते [illegible] त्यांची पुरचुंडी डोळ्यावर ठेवावी. ह्मणजे [illegible] पावतात. शेगळ्याच्या पानाचा रस मधांत [illegible] केल्यानें तिन्ही निरनिराळ्या दोषांनीं अथवा [illegible] डोळे तत्काळ निर्मळ होतात. वातामुळें दुखत असल्यास [illegible] एरंडाचें पान अथवा एरंडाच्या मुळांचें चूर्ण करून [illegible] उकडून डोळ्यावर बांधावें. मंजिष्ठ, हळद, आणि [illegible] काढ्यांत साखर घालून थंड झाला ह्मणजे डोळ्यावर शिंपडावा. [illegible] करित गेल्यानें रक्तविकार व पित्तविकार यामुळें दुखत असलेले डोळे बरे होतात. वायुविकारामुळें जडलेल्या नेत्ररोगावर जुनें तूप प्यावें. पित्तविकारामुळें जडलेल्या नेत्ररोगावर तूपसाखर खावी. कफविकारांत सुंठ घालून तूप प्यावें. डोळ्यांस ठणका लागला असेल, व आग होत असेल तर दूध आणि तूप यांत

थंड पदार्थ कालवून त्यांचा लेप मस्तकावर व तोंडावर करावा. लोखंडाच्या पत्र्यावर गोमूत्राचा थेंब सोडून त्यांत तांब्याचा तुकडा घांसावा, जो कीस निघेल त्याचें डोळ्यांत अंजन करावें. ह्मणजे डोळ्यांची खाज व पीडा दूर होते. शेवग्याच्या पानांचा रस तांब्याच्या संपुष्टाला चिकटवून त्याला तुपाची धुरी द्यावी. नंतर तो रस डोळ्यांत घालावा. या योगानें डोळ्यांची खाज, सूज, अश्रु, व पीडा बरी होते. सैंधव, त्रिफळा, सुंठ, शंखाची नाभि, आणि तांब्याचें चूर्ण एकत्र खलून त्याची लांब वात करावी व ती डोळ्यांत फिरवावी. ह्मणजे सव्रण व अव्रण अशा दोनही प्रकारच्या शुक्राचा नाश होतो. डोळेदुखरे मनुष्यानें जुने जव, गहूं, साळीचे तांदूळ, साठी तांदूळ, कोद्रु व अतिशय तुपासह मूग हीं धान्यें खावीं. जंगली जनावरांचें मांस, डाळिंब व साखर खावी. सैंधव, त्रिफळा व द्राक्ष यांचें सेवन करावें. पावसाचें अधांतरीं धरलेलें पाणी प्यावें. छत्रा व जोडा ह्यांवांचून चालूं नये. वेळानुसार वमन-विरेचनादि देऊन शुद्धि करावी. आणि स्वाभाविक वेगांचा निरोध, अजीर्ण झालें असतां भोजन, शोक, क्रोध, दिवसा निद्रा, रात्रौ जागरण व दाह करणारा आणि मळ शुष्क करणारा असा आहार किंवा औषध यांचा त्याग करावा. पायाचे तळव्यांस नेहमी स्नेह चोळल्यानें मुळीं नेत्ररोगच उत्पन्न होत नाहीं. कारणकीं पायांचे तळव्यांतील नाड्यांचा संबंध डोळ्यांशीं आहे, ह्मणून तेथें घांसलेला स्नेह डोळ्यांस पोंचतो. आणखी डोळ्यांच्या रोग्यानें अभ्यंगादिक नेत्ररोगाची शांति करणारे इतर उपायही नेहमी करित असावें.

**दुर्बोधामयहेतुबोधकतया प्रौढप्रकाशान्वितं**
**ज्ञात्वा श्रीपुरुषोत्तमस्य हृदयालंकारभूतं तथा।**
**नाम्ना कौस्तुभरत्नमित्यभिहितं ग्रंथांगमेतन्मया**
**सादृश्यान्मणिशंकरेण समुदायेशानसेवार्थिना ॥**



# शार्ङ्ग रत्न १३ वें.



**शस्त्रोपचार करण्याची गरज**— ज्या व्याधि शारीरिक नसून कोणेका स्थानीं उत्पन्न होतात, आणि म्हणूनच ज्यांवर औषधोपचार लागू पडत नाहीं, अशा व्याधींचा नाश करण्याकरितां त्यांनीं दुष्ट व दूषित करणाऱ्या भागावर शस्त्रोपचार करून नाश करण्याची गरज आहे. यास्तव, कित्येक वेळां पडल्यामुळें, जखम झाल्यामुळें किंवा कांहीं अपघात झाल्यामुळें शरीराच्या एखाद्या भागाला इतकें लागतें कीं त्याचा कांहीं भाग फिरून पूर्वस्थितीवर येणें अशक्य असतें, इतकेंच केवळ नव्हे, तर त्यांत फिरून जीवनशक्ति येणेंही अशक्य असतें. तेव्हां असा भाग दूर करण्याकरितां त्याच प्रमाणें शरीराच्या मर्मस्थानांत कांहीं वस्तु शिरली असतां शस्त्राचा प्रयोग करणें जरूर पडतें.

**शस्त्रोपचार म्हणजे काय?**— औषध खावयास दिल्या-वांचून ज्या युक्तींनीं व्याधींचा नाश करण्यांत येतो त्या सर्व युक्तींचा शस्त्रोपचारांत समावेश करण्यास नड नाहीं. जसें कीं हत्यारानें गळू फोडणें, अथवा गांठ कापून काढणें, मूतखडा, मोतीबिंदु वगैरे काढणें, नंतर फळ्या बांधणें, पट्ट्या बांधून फायदा होईलसें करणें, हस्तक्रियेनें हातापायांचीं हाडें जागच्या जागीं बसविणें वगैरे जे जे उपाय व्याधीच्या शांतीसाठीं करावयाचे, त्या सर्वांस शस्त्रोपचार म्हणतात.

**कशा प्रकारच्या शस्त्रोपचारांत रोग्याला बेशुद्ध पाडावा आणि त्यावेळीं त्याला कसें जपावें?**—शस्त्रोपचार जर क्षुल्लक असेल आणि रोग्याला विशेष पीडा होण्याचा संभव नसेल तरच

त्याला बेशुद्ध पाडण्याची गरज नाहीं. मोठा शस्त्रोपचार करणें असेल व त्यांत रोग्यास फार पीडा सोसावी लागणार असेल, तर त्याला बेशुद्ध पाडण्याची गरज आहे. यासाठीं इंग्रजी औषध क्लोरोफार्म फार उपयोगीं आहे. एक वर्षावरील व चार वर्षांच्या आंतील मुलाला एक ड्राम क्लोरोफार्म हुंगावयास दिलें असतां बस्स आहे. मोठ्या मनुष्याला प्रसंगानुसार एक अथवा दीड औंस क्लोरोफार्म हुंगावयास देण्याची जरूर आहे. क्लोरोफार्म कमी जास्ती किती द्यावयाचें याचा निर्णय रोग्याच्या प्रकृतिमानावर अवलंबून आहे. ईथर नांवाचें औषध सुद्धां बेशुद्ध पाडण्यासाठीं योजतात. परंतु तें क्लोरोफार्मासारखें सोइचें नाहीं. क्लोरोफार्म देते वेळीं फार काळजी घेतली पाहिजे. एका मदतनीस डाक्टराचें पहिलें काम म्हटलें म्हणजे हें कीं बेशुद्ध पाडावयाच्या मनुष्याची नाडी त्यानें तपासीत असावें व श्वासोच्छ्वास पहावा. श्वासोच्छ्वास कुचंबत येऊं लागला तर क्लोरोफार्म एकदम बंद करून, रोग्यास भानावर आणण्याचा यत्न करावा. थंड पाणी त्याच्या डोक्यावर शिंपावें, अमोनिया हुंगावयास द्यावा, डोकें टेबलाच्या कांठावरून खालीं लोंबकळत ठेवून जीभ बाहेर ओढावी, वीज लावावी, आणि एकदम कृत्रिम श्वास त्यास द्यावा. हृद्रोग झालेल्या रोग्यास क्लोरोफार्म देतांना फारच सावधगिरी ठेविली पाहिजे.

शस्त्रोपचार करतांना शस्त्र कसें चालवावयाचें, तें चातुर्य वैद्यास असलें पाहिजे. इतकेंच नव्हे, तर कापाकाप केल्यावरतींही रोग्याची जतन कशी करावी हें त्यास चांगलें माहित असलें पाहिजे. कारण शस्त्रक्रिया केल्यावर रोग्याची चांगली जतन झाली तरच मागाहून जे कित्येक भयंकर उपद्रव होण्याचा संभव असतो ते होत नाहींत.

शस्त्रक्रिया करण्यांत ज्या अडचणी आहेत त्या येणें प्रमाणें:—घेरी येणें, रक्त वाहणें, आंकडी वगैरे व्याधि उद्भवणें व ज्वर येणें. रोगी फार अशक्त असला तर बेशुद्ध पाडल्यावांचून शस्त्रक्रिया करूं ह्मटलें तर त्याला फार भय वाटतें; आणि केव्हां केव्हां तर तो बेशुद्ध होऊन पडतो.

शस्त्रक्रियेचा प्रयोग पहाण्याकरितां आलेल्या सशक्त मनुष्यांस देखील घेरी येते. रक्त निघालेलें पहातांच केव्हां केव्हां रोग्याला घेरी येते. कित्येक वेळां स्वतां शस्त्रवैद्य देखील फार रक्त निघालेलें पाहून घाबरतात. परंतु जर मोठी नाडी कापण्यांत आली नसेल तर, आणि तिच्यावर दाब वगैरे ठेवतां येईल तर, ती कापण्यांत आली तरी देखील भिण्याचें कारण नाहीं. शस्त्रवैद्याला शरीरावयवांचें चांगलें ज्ञान असलें पाहिजे. कोणत्या ठिकाणीं कोणती धमनी आहे तें जाणून ती कशी संभाळून शस्त्रक्रिया करावी हें त्यास कळलें पाहिजे. कापाकाप केल्यावर विशेष करून धनुर्वात आणि आंकडी हे विकार उद्भवण्याचें भय आहे. जखमी मनुष्याला धनुर्वात झाला तर तो फारकरून वांचत नाहीं. तथापि तो झाला असतां योग्य उपाय करण्यास हयगय करूं नये. जखम बराबर साफ करावी. विषारी जंतु, किंवा विषारी हवा, यांचा स्पर्श होणार नाहीं असें करावें. आंत सडका पदार्थ असला तर तो काढून टाकावा व जखम ऊन पाण्यानें धुवावी. गरज असेल तर या ऊन पाण्यांत विषजंतुनाशक कार्बालिक आसीड किंवा रसकापूर वगैरे औषधें टाकावीं. मळाचा अवरोध झाला असेल तर एक दोन रेच होतील असें औषध द्यावें. पोट्याश, ब्रोमाइड, क्लोरल हैड्रेट, व क्रोटन क्लोरल हैड्रास हीं औषधें योग्य प्रमाणांत द्यावीं. रोग्याला क्लोरोफार्म हुंगावयास द्यावें, कण्यावर बर्फाची रबरी पिशवी ठेवावी,

अफू द्यावी, आणि रोगी फारच क्षीण असेल तर त्याला ब्रांडी अथवा रम दारू देऊन योग्य आहार खाऊं घालावा.

**शस्त्रोपचारें केल्यावर होणाऱ्या रोगांची चिकित्सा**—कापाकाप केल्यावर रोग्याला साधारणपणें ज्वर भरतो. हा ज्वर एक दोन दिवसांतच उतरतो. परंतु कदाचित् शस्त्रक्रिया मर्मस्थानावर केली असून, मर्मस्थानच्या धर्मामुळें ताप भरत असेल तर मर्मस्थानच्या धर्माची योग्य चिकित्सा करून ताप कमती पडेल असे उपाय योजावे.

अतिशय रक्तस्राव होईल तर तो बंद करण्याकरितां शस्त्रवैद्यानें एकदम तजवीज करावी. यासाठीं कापलेल्या भागावर थंड पदार्थ लावावा, बर्फाचा तुकडा ठेवावा, अतिशय थंडगार पाणी शिंपडावें. तुरटी, सोरचून, कारेग्वार, टिंकचर फेरी पर क्लोराइड व शेपगोंद वगैरे पदार्थ लावावे. दांत उपटल्यावर तेथून अतिशय रक्तस्राव होऊं लागला तर शेपगोंद त्यावर दाबावा, ह्मणजे फार फायदा होईल. जी शीर कापली गेली असेल तिच्या वरच्या भागीं जवळच्या हाडावर अथवा दोन बोटांच्या चिमटींत घट्ट दाबल्यानें रक्तस्राव बंद होतो. कापलेला भाग वर ठेवल्यानेंही रक्त स्थिर होऊन स्राव बंद होतो. त्याच प्रमाणें कापलेल्या शिरेचें तोंड धरून तिला वळवून ठेविली असतां अथवा तिजवर सुताची गांठ दिली असतां रक्त बाहेर येऊं शकत नाहीं.

**शस्त्रोपचाराला योग्य रोग**—पुढें सांगितलेल्या रोगावर शस्त्रक्रिया करण्याची गरज पडते:-गळवें, गांठी, अवाळू, मणिच्छदाचा संकोच, पटल, पडकेस, चामखीळ, मूळव्याधीचा अंकुर, दांत हालणें, अर्बुद, जलोदर, मूतखडा, अंडवृद्धि, मूत्रावरोध, श्लीपद (हत्तीचा पाय) वगैरे.

याशिवाय दुसरे कित्येक रोग असे आहेत कीं ते शरीरांत जीर्णरूपानें वास्तव्य करतात. यामुळें शरीराचा कांहीं एखादा भाग बेडौल होतो. ह्मणून अशा रोगांवर शस्त्रक्रिया करावी असें सांगितलें आहे. असे रोग ह्मटले ह्मणजे दोन भाग जखडून जाणें, पायाच्या तळव्याची, कण्याची, मनगटाची, किंवा दुसऱ्या कोणत्याही अवयवाची वक्रता; त्याच प्रमाणें जबड्यांतील हाडांचा रोग व निरनिराळ्या अवयवांस आकस्मिक इजा झाल्यामुळें केव्हां केव्हां ते शिवून जागच्या जागीं बसवावे लागतात, आणि केव्हां केव्हां तर एखादा भाग काढून देखील टाकावा लागतो.

कित्येक रोग असे आहेत कीं रोगट भाग कापून काढला नाहीं तर ते वृद्धि पावतात, व कापून काढल्यानें बरे होतात. उदाहरणार्थ ग्यांग्रीन, सर्पदंश, इत्यादि. याशिवाय हस्तक्रिया आणि दाहक्रिया यांचा समावेशही शस्त्रोपचारामध्येंच होतो.

हाड मोडलें असतां अथवा खरून गेलें असतां हाताच्या कुशलतेनें अथवा यंत्रांच्या साहाय्यानें तें हाड जागचे जागीं बसवितां येतें. त्याच प्रमाणें मोडलेलें हाड सांधण्याकरितां त्याचीं दोन शेवटें बरोबर बसवून कांहीं दिवस त्यास विश्रांति दिल्यानें तीं सांधतात. अंतर्गळ, ओटीपोटांतील गुल्म, गर्भाशयाचा भ्रंश, गुदद्वार बाहेर येणें, पापण्या उलट्या फिरणें वगैरे विकारांवर हस्तक्रियेचे प्रयोग फार जरूरीचे आहेत.

**दाहक्रियेला योग्य रोग**—उपदंश झाला असतां पडणारे व्रण, सांध्यांचे रोग, अर्शांकुर, पडकेस, आणि दुष्ट व्रण वगैरे रोगांवर दाहक्रियेची जरूर आहे.

**शस्त्रोपचाराला योग्य गळवें वगैरे**—गळवें पिकल्यावर तीं फोडलीं पाहिजेत. तीं पिकलीं ह्मणजे मऊ होतात. गळूं फोडतांना इतकेंच पहावयाचें कीं तो छेद त्याच्या खालच्या भागीं दिला आहे. छेद वरचे वर केल्यानें खालच्या भागांत पू रहातो. आणि तेणें करून पुन पुन्हा हांवर भरतें, आणि जें भरतें व पुनःपुन्हा फुटतें असें गळूं उत्पन्न होतें. कित्येक गळवें शरीरांत आपोआप उत्पन्न होतात. तीं दाबलीं असतां पोंचट ग्रंथीप्रमाणें लागतात. त्यांपासून बिलकुल पीडा होत नाहीं, आणि पिकण्याचें कांहीं चिन्हही दिसत नाहीं. इतर गळवांप्रमाणें यांतूनही, कापलें असतां, पुष्कळ पू निघतो. या गळवांस इंग्रजींत कोल्ड अबसेस ह्मणतात. अशा गळवांत पू आहे किंवा नाहीं याची खात्री करून घेणें असेल तर बांबुडी (पोत्यातून धान्याचा नमुना काढण्याचा पोकळ दाभण) आकृतीची सुई भोंसकल्यानें पू तिच्या पोकळ फटींत दिसून येईल. फोडल्यावर त्या जागीं एक भाग कार्बोलिक असीड, आणि सोळा भाग गोडें तेल यांच्या मिश्रणांत लिंटची वात बुडवून ती छेदांत खुपसून ठेवावी, आणि जसजसा आंतून व्रण भरत येईल तसतशी ही वात काढून घेत जावी. मागाहून शेवटीं फक्त मलमांची पट्टी लावावी. साध्या गळवांपेक्षां कोल्ड अबसेस भरून येण्यास फार वेळ लागतो.

**गांठी आणि अवाळूं**—कांहीं गांठी कठिण आणि एकसारख्या अशा असतात; कांहीं पोंचट असतात. त्यांतून पाणी अथवा तेलासारखा चिकट पदार्थ भरलेला असतो. कांहीं गाठींतून गव्हांची कणिक भिजवून वळलेल्या गोळीसारखीं शितें निघतात. पोंचट गांठ कठिण गांठीप्रमाणेंच दिसते; मात्र ती पोंचट असते. केव्हां केव्हां तिच्यावर हिरव्यागार शिरा उठलेल्या दिसतात. कोल्ड अबसेस ज्या ठिकाणीं होतें त्या जागा एकमेकींशीं जोडलेल्या असतात. आणि अवाळूं याचा कोणाशीं संबंध नसतां तें वेगळेंच होतें.

पोंचट अवाळूंवर गळवांप्रमाणें छेद केला असतां आंतला भाग बाहेर निघून येते. गळूं फोडल्यावर त्यांतून पू व रक्त नेहमीं निघत असतें. तें गळूं भरून आलें म्हणजे बंद होतें. अवाळू फोडल्यावर त्यांतून चिकट पदार्थ निघून जातांच तेथें लहानसा खळगा पडतो, आणि त्यांत बोट घातलें असतां पिशवीप्रमाणें तो भासतो. ही पिशवी फाडून टाकून जखम धुवावी आणि शिवून टाकावी, आणि इतर जखमांप्रमाणें ती भरून येईल असे उपाय करावे. जर गांठ कठिण असली तर अमळ अधिक मेहनत पडून कठिण गांठ सगळी कापून काढावी लागते. ती कापण्याला सुलभ पडावी म्हणून तिच्यावर + अशा आकृतीची फुली करून वरच्या कातडीचे चार तुकडे करावे. नंतर आंतलें गळूं कापून काढावें. इतकें केल्यावर ते चार तुकडे सुईनें शिवून जखम भरून येईल असे उपाय करावे.

**मणिच्छदाचा संकोच**—शिस्नाच्या अग्रभागावर जी सुटी कातडी असते त्याला मणिच्छद म्हणतात. आणि ती स्वाभाविकपणें मागें पुढें सरते. जेव्हां ही कातडी फारच संकोच पावते तेव्हां ती मण्यावरून मागें पुढें सरकूं शकत नाहीं. तिचें छिद्र इतकें बारीक होतें कीं कातडीच्या आंत पू, मळ, वगैरे सांचून रहातो. केव्हां केव्हां तर लघवी देखील बाहेर येत नाहीं. मळ वगैरे सांचल्यानें त्या ठिकाणीं खाज सुटते, आणि केव्हां तर तो भाग कुजतो. प्रौढ वयाच्या पुरुषाला जर हा विकार झाला तर आंत वीर्य सांचून रहातें, आणि थोडथोडें स्रवतें, अथवा लघवीस झालें असतां ती कातडी फुगून फार पीडा करते. या विकारावर शस्त्रोपचार केल्यावांचून सुटका नाहीं. बांबुडीच्या आकृतीची एक बोथट सळई छिद्रांत घालून आणि ती थेट मण्याच्या कोरीपर्यंत शिरवून सुरीनें वरची कातडी कापून टाकावी. आणि नंतर बाकीची कातडी चौफेर वळवावी.

जेव्हां हा मणिच्छद अपुरा असेल तेव्हांच वर सांगितलेली रीत कामास येईल; परंतु तो लांब असेल त्या वेळेस सुंता केल्यावांचून गत्यंतर नाहीं. चिमटींत जननेंद्रिय धरून मण्याच्या कोशीचा भाग चिमट्याच्या आंतल्या बाजूवर वळवावा आणि फाजील राहिलेल्या कातडीचा भाग चिमट्याच्या दुसऱ्या बांजूवर ठेवून, चाकूच्या बाजूनें छेद करून सर्व कातडी कापून काढावी. नंतर त्याचा शिश्नपटाचा भाग वरून बाजूला वळवून तो कातडीशीं सांधावा. नंतर जखमेप्रमाणें रुजण्याचे उपाय सुरू करावे.

**पटल**—पटलाचे दोन प्रकार आहेत. एक मृदु व एक कठिण. मृदु पटल अल्पवयी मनुष्यासच होतें, अथवा जन्मतःच असतें. तीस वर्षांच्या वयानंतर मृदु पटल होत नाहीं. कठिण पटल साधारणपणें वयाच्या पन्नासाव्या वर्षापुढें होतें. पटल येते वेळीं डोळ्यांस कोणत्याही प्रकारची पीडा होत नाहीं. आरंभीं किंचित् अंधक दिसूं लागतें. परंतु शेवटीं जेव्हां पटल पक्क होतें तेव्हां पूर्ण आंधळेपण येतें. क्लोरोफार्म हुंगावयास दिल्यावर पटल आलेला डोळा चिमट्याच्या साहाय्यानें उघडा ठेवावा, चिमटीनें कृष्णमंडळाखालच्या रसपटलाला धरून डोळा स्थिर ठेवल्यावर लांब चाकू कृष्णमंडळाच्या बाहेरच्या बाजूनें आंत घालून, आरपार दुसऱ्या बाजूपर्यंत नेऊन, त्याचा एक तृतीयांश वाटोळा भाग श्वेतमंडळाच्या संयोगांतून वरल्या भागीं कापावा. नंतर वळविलेल्या चिमट्यानें कनीनिका आंतून धरून बाहेर काढावी आणि वांकड्या कातरीनें तिचा कांहीं भाग कापावा. नंतर कांट्यानें बुबुळाचें पटल फोडावें, ह्मणजे मोतीबिंदु वेगळा पडेल. मग चिमटीनें संभाळून कृष्णमंडळाचा भाग दाबावा, ह्मणजे मोतीबिंदु फारकरून वरच्या भागीं केलेल्या छेदानें बाहेर गळून पडेल. तथापि तसें नाहीं झालें, तर चमटा आंत घालावा, आणि मोतीबिंदु बाहेर काढून घ्यावा. एवढें

केल्यावर अट्रोपीन याचा एक थेंब टाकून डोळा बं[illegible] करावा, व त्यावर पट्टा बांधावा. कांहीं एक पीडा झाली नाह[illegible] तर पांचवे दिवशीं तो पट्टा सोडावा. आणि सोमाळच्या पाण्यानें डोळा धुऊन अट्रोपीन याचा थेंब टाकून फिरून पट्टा बांधावा. [illegible]तर कांहीं दिवसांनीं तो पट्टा फिरून सोडावा. याप्रमाणें चार पाच वेळां सोडबांध केल्यावर आराम वाटेल. जर डोळ्याच्या इतर भागांतला एखादा व्याधि उत्पन्न झाला तर त्याची योग्य चिकित्सा करावी. कनीनिकेचा आणि कृष्ण मंडळाचा व्रण होण्याची फार धास्ती असते. कनीनिकेचा व्रण, अट्रोपीन याचे थेंब घालीत गेल्यास, कांहीं दिवसांनीं बरा होतो, आणि आराम वाटतो. कृष्णमंडळाच्या रोगांत दृष्टि शाबूत राहाण्याची आशा कमी असते.

**पडकेस**—डोळ्याच्या वरच्या पापणीची कोर आंत वळल्या-मुळें केस बुबुळास खुपतात, आणि पापणी हालविली असतां डोळ्यांत मारल्याप्रमाणें वेदना होतात. यामुळें डोळ्यांतून नेहमीं पाण्याची गळ लागते. डोळा नेहमीं लाल असतो. आणि केसाच्या घर्षणानें कृष्णमं-डळावर शुभ्र फुलासारखा ठिबका पडतो. चिमट्यानें अशा स्थितींत केस उपटून काढावे, आणि कास्टीक पोट्याशांत सुई बुचकळून ती त्याच्या मुळांत भोसकावी, ह्मणजे मूळ जळून गेल्यानें त्या ठिकाणीं फिरून केस येणार नाहींत. जर केस फार फिरलेले असतील तर उपटल्यानें फक्त दोन चार दिवसांतच आराम वाटतो; परंतु केस उगवतांच फिरून पूर्व स्थिति सुटत नाहीं; यास्तव पापणीसुद्धां कापून काढण्याची पाळी येते. पापणी कापण्याकरितां चपट्या टोंकाचा एक विशेष प्रकारचा चिमटा असतो, तो घ्यावा. त्याचें टोंक बुबुळावर आणि पापणीच्या खालीं धरतात, आणि वरलें टोंक पापणीच्या बाहेरच्या बाजूला धरतात, आणि ताठ करण्याकरितां

म्कु दाबण्यापूर्वी पापणीची ढिली कातडी मागें ओढून घेतात. आतां ही कातडी जर कापण्यांत येईल तर वारंवार रक्तस्राव होण्याचा संभव आहे; परंतु हा चाप लावल्यानें तो होत नाहीं. नंतर शस्त्रानें पापणीच्या कोरीवर दोन छेद करावे. त्यांतून एक पापणीच्या बाहेरच्या भागावर व दुसरा आंतल्या भागावर करून, पापणीची कोर कापून काढावी. हे छेद अगदीं पापणीच्या कूर्चापर्यंत पोंचतील असे खोल करावे. पापणीची कातडी पुष्कळ असल्या कारणानें ती शिवून टाकण्याची गरज नाहीं; केवळ दोन चार वेळां पट्टा बांधला ह्मणजे आराम होईल.

**चामखीळ व अर्श**—चामखीळ हा उघड्या जागेवर व गुह्यभागींही होतो. उघड्या भागीं झालेला चामखीळ चिमट्यांत धरून कापून काढतां येतो आणि त्यावर कास्टीक लावून तो भाजतां येतो. परंतु केव्हां केव्हां नाकांत, कानांत, दोन दातांच्या मध्यें, अशा अडचणीचे जागीं सुद्धां तो होतो. गर्भाशयांत देखील चामखीळ सांपडतो. हा चामखीळ अतिशय रक्त असतो, आणि तो कापला असतां फार रक्तस्राव होतो. यास्तव चिमट्यांत धरून, पीळ देऊन, मग तो कापावा, ह्मणजे रक्त वहाण्याची धास्ती रहात नाहीं. अर्श हा गुदेच्या आंत होतो. केव्हां केव्हां तो गुदेचे अगदीं खालच्या भागीं आंतल्या बाजूनें होतो. कित्येक वेळां तो वाढून बाहेर येतो. बाहेरच्या अर्शाचा चामखीळ कठोर आणि वरल्या भागाचा पुवानें युक्त असा दिसतो. आणि दिसण्यांत तो उपदंशानें झालेल्या परंतु मागाहून फुटलेल्या चामखिळासारखा असतो. आंतल्या अर्शाचा देखावा कानांतल्या व नाकांतल्या चामखिळासारखा असतो. आंतला अर्श कापण्यांत फार जोखीम आहे, आणि तो न कापतां केवळ दोऱ्यानेंच बांधावा हें उत्तम. क्लोरोफार्म हुंगवून मग

चिमटच्यानें अर्श बाहेर ओढून काढावा आणि दुहेरी दोर सुईंत घालून ती सुई अर्शाच्या मूळांत खुपसून आरपार न्यावी. नंतर तीं दोन्ही टोंकें दोहों बाजूंस घट्ट आंवळून बांधावीं, व टोंकें लोंबत राखावीं. सर्व अर्श याप्रमाणें बांधल्यावर ते फिरून जेथच्या तेथें बसवावे. रोग्याला तिसरे दिवशीं एरंडेल तेलाचा जुलाब द्यावा, ह्मणजे आठ दिवसांच्या आंतच अर्श गळून पडतील.

**दांत हालणें वगैरे**—वृद्धावस्थेमध्यें आणि अल्प वयांत देखील कित्येक वेळां दांत सडतात व त्यांचीं मूळें कुजतात. त्यामुळें पाणी पितांना व खातांना दांत दुखतात. दांत फार हालत असला तर अन्नाचा स्पर्श होतांच अथवा जिभेनें चाटतांच तो गळून पडतो. कित्येक लोक हातानें देखील दांत उपटतात. हालणारे दांत उपटून काढण्याकरितां दांतांच्या घटनेप्रमाणें चिमटे केले असतात. या चिमट्यांत दांत धरून हालवतांच तो चटकन निघून येतो.

**अर्बुद**—अर्बुदावर ग्रंथीप्रमाणेंच शस्त्रोपचार करण्याची जरूर आहे. जेवढा भाग विकृत झाला असेल तेवढा सर्व कापून काढावा. जर त्याचा कांहीं दुष्ट परमाणु शिल्लक राहिला तर तो फिरून वाढतो. यामुळें अर्बुद कापलें असतांही फिरून तीन चार वेळ तें उत्पन्न होतें. जेव्हां मोठ्या धमनीच्या आसपास अर्बुद उत्पन्न होतें तेव्हां तें दोऱ्यानें बांधतात. पण अशा प्रकारें अर्बुदाचा नाश होण्याला फार वेळ लागतो, व पीडाही फार सोसावी लागते.

**जलोदराचें पाणी काढणें**—जलोदरानें पोट मोठें झालें असून त्यांत पाणी भरलें आहे, अशी खात्री झाली ह्मणजे पोट फोडून पाणी बाहेर काढलें पाहिजे. पोटाच्या एका बाजूवर तळाथ ठेवून दुसऱ्या बाजूवर बोट मारलें असतां आंतलें पाणी हालतें, तें

लक्षांत येतें. बेंबीच्या खालीं तीन इंचांवर बरोबर मध्यभागीं एक अथवा दीड इंचाचा उभा छेद करावा. रोग्याला खाटल्याच्या गातावर बसवून पोटाला रुंद पट्टा बांधावा. आणि तो पट्टा पोटाच्या मध्यभागीं ठेवून बाकीच्या भागीं साहा उभे चिरे पाडावे. आणि दोघां मनुष्यांनीं तो पट्टा घट्ट ओढून धरावा. ज्या जागीं छेद करावयाचा असेल त्या जागीं फडक्याचाही छेद करून त्यांतून शस्त्रानें पोटावर सुमारें एक इंच छेद करावा. त्यांत ट्रोकार अथवा सुई भोंसकावी. पाणी काढण्याची सुई आणि नळी अशा प्रकारें धरावीं कीं नळीच्या आंत सुई राहील. आणि ती सुई नळीसहित पोटांत शिरली ह्मणजे काढून घ्यावी; आणि नळी तशीच ठेवावी. सुई बाहेर काढली कीं लागलेंच पाणी बाहेर येऊं लागेल. जसजसें पाणी बाहेर निघत जाईल तसतसा पोटावरचा पट्टा ओढीत जावा. या योगानें पोटांत पाणी शिल्लक रहाणार नाहीं. जेव्हां समग्र पाणी निघालें, व पाणी नळीवाटे येत नाहीं, असें दिसेल तेव्हां नळी काढून घेऊन त्यावर कोलोडियनची पुरचुंडी ठेवावी. नंतर पट्टी लावावी. तेथें लिंटची गादी ठेवून आडवा पट्टा बांधावा. पट्टी लावते वेळीं कोलोडियनची पुरचुंडी काढून घ्यावी. याप्रमाणें केलें असतां दोन तीन दिवसांत तो छेद रुजेल.

मूतखडा—जलोदरांत पोट फोडण्यापूर्वीं आंत पाणी सांचलें आहे किंवा नाहीं याची खात्री करून घ्यावी लागते, तसा मूतखडा झाला असतांही शस्त्रोपचार करण्यापूर्वीं मूतखड्याची खात्री करून घेतली पाहिजे. मूतखडा झाल्यानें रोग्याला वारंवार लघवीस जावें लागतें; परंतु लघवी साफ होत नाहीं. केव्हां केव्हां तर लघवी होत असतांच मूत्राशयाच्या तोंडावर मूतखडा येऊन लघवी एकदम बंद होते, आणि ओटींत व कासोट्यांत नेहमीं पीडा

होत असते. त्याचप्रमाणें शिस्नाच्या अग्रभागीं देखील कळा येऊं लागतात. कांहीं मुलें लघवी करतांना जननेंद्रिय हाताने चोळतात किंवा उडी मारतात, याचें कारणही हेंच. केव्हां केव्हां मूतखड्यां-मुळें लघवींत रक्त पडतें. अशा दुःखानें रोगी नेहमीं क्षीण होत जातो, आणि मूत्राशयाचे व मूत्रपिंडाचे इतर विकारही जडतात. विशेषेंकरून या विकारांची संपूर्ण खात्री करून घेण्यास लोखंडाची शलाका घालून मूत्राशय तपासणें जरूर आहे. [illegible] शलाका जी मूत्रावरोधाच्या रोगांत उपयोगीं पडते तिच्यापेक्षां मूतखडा तपासण्याची ही लोखंडाची शलाका अंमळ कमी बांकदार असते. या शलाका मूत्राशयांत घालते वेळीं रोग्याला उताणा निजवावा. आणि त्याचे गुडघे वळवून उभे करावे. नंतर वैद्यानें रोग्याच्या डाव्या बाजूला उभें राहून, शलाका तेलांत बुचकळून, डाव्या हातांत शिस्न धरून, उजव्या हातानें शलाका त्याच्या डाव्या कुशीवर ठेवून, मूत्रमार्गाच्या छिद्रांत घालावी. जसजशी शलाका आंत जाईल तसतशी उजव्या हातानें रोग्याच्या पोटावर मध्य भागापर्यंत येऊन हात आस्ते आस्ते उचलावा, ह्मणजे शलाका उभी होईल, आणि आंत शिरत जाईल. शलाका आंत बरोबर गेली ह्मणजे ती मूत्राशयाच्या मागल्या भागीं फिरवावी. तेथें मूतखडा सांपडला नाहीं तर शलाका दोहों बाजूंस व आडवी अशा प्रकारें मागें पुढें फिरवावी. इतकें करूनही मूतखडा सांपडला नाहीं तर शलाकेची मूठ दोन्ही जांघांच्या मध्यें दाबून मूत्राशयाचा अग्रभाग तपासावा. या योगानें फारकरून मूतखडा आहे कीं नाहीं ही खात्री होईल. जर मूतखडा शलाकेला लागला तर त्याचा आवाज स्वतां तपासणाराला व आजुबाजूस उभें असणाऱ्या मनुष्यांनाही ऐकूं येतो. मूतखडा काढण्यास तयार होण्यापूर्वीं याप्रमाणें शलाका घालून मूतखडा आहे कीं नाहीं हें प्रथम

पहावें. नमला तर मग शस्त्रोपचार करावा. केव्हां केव्हां असेंही होतें कीं मूतखडा आंत आहेसा वाटतो आणि पुन्हां पहावा तों तो हातांला लागत. नाहीं. यास्तव शस्त्रोपचार करतेवेळीं तो बिनचुक कळलाच पाहिजे. मूतखडा काढण्याकरितां शस्त्रोपचार करण्याची रीत अशी आहे कीं रोग्याला क्लोरोफार्म हुंगावयास देऊन बेशुद्ध पाडल्यावर ४ ते ६ औंस ऊन पाणी पिचकारीनें मूत्रशलाकेच्या वाटे मूत्राशयांत भरावें. हातपाय बांधून रोग्याला टेबलाच्या कांठावर आणावा. त्याचा कटिपश्चात् भाग टेबलाच्या कांठाबाहेर ठेवून बैठकीच्या आजूबाजूस केंस असतील तर ते काढून टाकावे. मग योग्य आकाराची, मध्यें खाडा असलेली, शलाका शिस्नांत शिरवून मदतनीस मनुष्याच्या हातांत द्यावी. मदतनिसानें उजव्या हातांत शलाका धरून अमळ ऊर्ध्व आकर्षणानें मजबूत सरळ स्थिर ठेवावी. आणि डाव्या हातानें वृषणाला शिस्नासहित वर धरून मूतखडा काढणाऱ्यानें बैठकीच्या भागीं छेद द्यावा. बैठकीच्या वरच्या भागाच्या डाव्या बाजूला गुदद्वारापासून वर दीड इंच शिवणीपासून तिर्यक् छेद करून खालीं गुदद्वार व कटिपश्चाद्भाग यांच्या हाडामध्यें तो चिरित न्यावा. ही जखम सुमारें अर्धा इंच खोल असावी. नंतर जखमेच्या वरच्या भागीं थोडेंसें खोल कापून, डाव्या हाताच्या तर्जनीनें शलाकेचा खाडा चांचपून पहावा. हा खाडा सांपडण्याला अडचण पडली तर मदतनिसानें शलाका हालवावी म्हणजे तो लागलाच सांपडेल. शलाकेच्या खाड्याच्या आंत बोटाचें नख बरोबर रोवून त्याच्या आधारानें अश्मरीशस्त्राची अणी त्या खाड्याच्या आंत घालावी, आणि मूत्राशयांत जाण्याकरितां खोल छेद करावा. छेद खोल व्हावा म्हणून शस्त्राची धार जखमेच्या दिशेनें तिरकी धरावी, आणि शस्त्राची मूठ उंच करावी, म्हणजे अणी

खालीं होईल. अणी शलाकेच्या खाच्यांत बरोबर ठेवून त्याच्याच्या आधारानें त्याच्या शेवटापर्यंत शस्त्र पुढें चालवीत न्यावें. मूत्राशयांत पोंचल्यावर त्या खाच्याच्या आधारानेंच शस्त्र मागें खेचून घ्यावें. डाव्या हाताची तर्जनी जिच्यावर ठेवून शस्त्र पुढें चिरित नेलें होतें त्या तर्जनीला आतां शस्त्रानें केलेल्या मार्गानें शलाकेच्या आधारानें पुढें न्यावी. खोल गेली असतां कांहीं मृदुभाग आडवा लागला तर तो युक्तीनें सारून मूत्राशयांत तर्जनी दाखल करावी. दाखल झाल्यानंतर ती हालविली असतां मूतखडा लागतो. तो लागला म्हणजे मदतनिसास शलाका काढून घेण्यास सांगावें आणि तर्जनी आजुबाजूस फिरवावी, म्हणजे खोल जखम लांबरुंद होईल. नंतर तर्जनी काढून घेऊन लागलाच चिमटा आंत घालावा. जों पर्यंत तर्जनी आंत होती तों पर्यंत पाणी आंतून बाहेर येऊं शकत नव्हतें. तें तर्जनी बाहेर काढतांच येऊं लागतें, आणि त्याच्या बरोबरच मूतखडा पण गडगडत पुढें येतो. मध्यंतरीं चिमटा आंत घातल्यावर त्याच्या दोहों पात्यांत तो सांपडतो. न सांपडला तर चिमट्याचें तोंड आंत उघडावें व एक पातें खालीं टेंकून दुसरें हालवावें, म्हणजे खडा दोहों पात्यांच्या मध्यें सांपडेल. मग आंवळून धरून हळूहळू जोरानें तो खडा ओढून काढावा. " एक खडा काढल्यानंतर फिरून तर्जनी आंत घालावी, आणि दुसरा खडा आहे कीं काय हें तपासून पहावें. रक्त वहात असलें तर थोडा वेळ बोट तसेंच आंत ठेवावें, अथवा थंड पाण्याची पिचकारी मारावी, म्हणजे रक्त बंद होईल. धमनी वहातांना दृष्टीस पडली तर दोऱ्यानें बांधावी. नंतर मूत्रवाहिनी नळीत ठेवून ती बाहेरून कमरेच्या दोऱ्याबरोबर बांधावी, आणि दोन्ही पाय जुळून बांधावे. नळी दुसरे दिवशीं काढून घ्यावी. रोग्याच्या वेदना बंद व्हाव्या म्हणून व झोंप यावी म्हणून मारफिया औष-

धाची योग्य मात्रा देत असावी. तीनचार आठवड्यांत रोगी बहुत करून बरा होईल. जर जखम रुजण्याला विलंब लागला तर थोडेंसें कास्टीक लावावें.

या शिवाय मूतखडा फोडून त्याचा चुरा करून तो बाहेर काढतात. वर सांगितल्याप्रमाणें छेद करून मूतखडा बाहेर काढण्यांत मोठ्या वयाच्या मनुष्यास बरेंच जोखीम आहे. लीथोट्राईट म्हणजे अश्मरीभंजक शस्त्र मूत्राशयांत घालण्याच्या शलाकेच्या आकाराचें परंतु जाड आणि गुळगुळीत मुठीचें असें असतें. त्याला दोन पातीं असतात. तीं मिटतां व उघडतां येतात. या दोन पात्यांच्या मध्यें मूतखडा दाबून धरतां येतो, आणि त्याच्या मुठींत असलेला स्क्रू फिरविल्याबरोबर मूतखड्याचा चुराडा होऊन जातो. एकदा फुटल्यावर हें शस्त्र काढून घ्यावें. रोग्याला निजूं द्यावें, व निजूनच लघवी करण्यास सांगावें, म्हणजे लघवीबरोबर मूतखड्याचा चुरा निघून येईल. तथापि अजून मोठमोठे खडे आंतच राहिले असतात म्हणून आणखी एक आठवड्यानें फिरून तीच क्रिया करण्याची गरज पडते. याप्रमाणें दोन चार वेळां केल्यावर मूतखडा नाहींसा होतो.

**वृषणवृद्धि**——वृषणवृद्धि अनेक प्रकारची आहे. तथापि जींत पाणी सांचतें, तींतच शस्त्रक्रिया करण्याची जरूर पडते. जलोदरांत पोटावर टिचकी मारल्यानें समोरच्या बाजूवर ठेवलेल्या तळाथाला पाण्याचा धका बसतो, त्याच प्रमाणें वृषणवृद्धींतही घडतें. वाढलेल्या वृषणाचा आकार पायरीच्या आंड्याप्रमाणें दिसतो. जलोदराप्रमाणें या वृषणवृद्धीलाही शस्त्रानें (ट्रोकार आणि क्याजूला) फोडतात. वृषणाच्या वरची कातडी डाव्या हातानें चांगली वर खेंचून धरून खालच्या भागीं जेथें शस्त्रोपचार करावयाचा, तेथें

सुरकुती वगैरे न राहील अशी तजवीज ठेवावी. नंतर त्याची मूठ बरोबर तळाथावर ठेवून त्याच्या पुढील भागावर ती आर खालीं भोंमकावी, आणि आंत बरोबर गेल्यावर हात खालीं करून त्या आरेची अणी उंच करावी. नंतर आर काढून घ्यावी, म्हणजे नळीच्या वाटेनें पाणी एकदम वाहूं लागेल. तें वाहून गेल्यावर इथरचा बोळा त्यावर ठेवावा आणि नळी काढून घ्यावी. पाणी निघून गेलें म्हणजे रोगी लागलाच आपल्या पायीं जाऊं शकतो. परंतु याप्रमाणें पाणी काढल्यावर फिरून वृषणांत पाण्याचा संचय होण्याचा संभव आहे. यास्तव तो संचय होऊं नये म्हणून वृषणांत एकभाग टिंकचर आयोडिन समभाग पाण्यांत घालून, त्याची पिचकारी मारावी. या योगानें रोग्याला फार पीडा होते, वृषण सुजतें, आणि थोडा बहुत तापही येतो. परंतु या उपद्रवाची योग्य चिकित्सा केली असतां दहा बारा दिवसांत रोग्याला आराम प्राप्त होतो.

मूत्रावरोध—लघवी उत्पन्न झाली असतां ती बाहेर काढून टाकण्याची शक्ति मूत्राशयांत नसली अथवा मूत्रमार्गांत कांहीं अडचण उत्पन्न झाल्यानें मूत्राशयांत लघवी कोंडून राहिली, बाहेर येऊं शकली नाहीं, म्हणजे मूत्रावरोध झाला असें समजावें. या विकारांत रुप्याची मूत्रशलाका शिरवून लघवी बाहेर काढतात. जेव्हां मूत्राघातामुळें किंवा दुसरा कोणताही मूत्रमार्गाचा व्याधी झाल्यामुळें मूत्रावरोध होतो, आणि रुप्याची मूत्रशलाका आंत शिरवितां येत नाहीं, तेव्हां एका प्रकारच्या गोंदाच्या ( गम इलास्टीक काथीटर ) शलाकेचा उपयोग करावा. मूत्रावरोध झाला असतां शलाका कशी घालावी तें मूतखडा काढण्याच्या प्रकरणांत लिहिलें आहे.

**श्लीपद** (हत्तीचा पाय)—या रोगांत प्रथम रोग्याला गांठीसारखें कांहीं भासतें. नंतर ती गांठ पिकते व शेवटीं फुटते. तींतून पुष्कळ रस वहातें; व या लशींत शुभ्र अथवा काळ्या रंगाच्या खसखशीच्या दाण्यासारखा कांहीं पदार्थ निघतो. या रोगांत योग्य नियमाप्रमाणें शस्त्रोपचार करून ती गांठ कापावी.

**शिवणें**—जेव्हां कोणताही भाग कापतात, तेव्हां कापलेल्या भागाचे दोन्ही कांठ एकाशीं एक मिळविण्याकरितां त्यास टांके मारून ते शिवावे लागतात. जखमेला टांके मारल्यावर रुजल्याप्रमाणेंच ती जागा साफ होते.

शरीराचा कोणताही भाग बेडौल असला अथवा ग्रंथि वगैरे आल्यानें तो बेडौल दिसूं लागला, त्याच प्रमाणें शरीराच्या वेगवेगळ्या भागांत आघात झाल्यामुळें पीडा होऊं लागली, तर ती नाहींशी करण्याकरितां योग्य नियमास अनुसरून शस्त्रोपचार करण्याची गरज आहे असें समजावें.

**हाड सरणें अथवा मोडणें**—हाड सरलें अथवा मोडलें, तर कांहीं क्रिया करून सरलेलें अथवा मोडलेलें हाड जागच्या जागीं बसविण्याची गरज पडते. हाड सरलें असतां व मोडलें असतां, केव्हां केव्हां जखम होते, व केव्हां केव्हां होत नाहीं. जखम झाली नसून, हाडाला केवळ इजा झाली असली तर ती लौकर बरी होते. सरलेलें हाड अथवा मोडलेलें हाड यांचीं दोन्ही शेवटें, होईल तेवढी जलदी करून, जागचे जागीं बसवावीं. साधारणतः अशा हाडाचा बाहेरचा तुकडा खेंचल्यानें व आंतला तुकडा दाबल्यानें सरलेलें व मोडलेलें हाड सारखें बसतें; व बसतें त्या वेळीं कटकन आवाज होतो. हा आवाज जवळ उभे असलेल्या मनुष्यांस देखील

ऐकूं येतो. नंतर त्या भागाच्या वक्रतेप्रमाणें योग्य आकृताच्यी फळ्या आणि पट्टे बांधून तो स्थिर ठेवतात.

**अंतर्गळ**—याशिवाय अंतर्गळ, ओटीपोटांतील गांठ, गर्भाशयाचा भ्रंश, गुदाद्वाराचें बाहेर येणें, पायण्या उलट्या फिरणें इत्यादि विकारांतही औषधरूप चिकित्सा किंवा हस्तक्रियारूप चिकित्सा करावी लागते. अंतर्गळाच्या आत आंतडें वृषणाच्या गोळ्यांत उतरतें. पोटाच्या पडद्यांत दोन 'छिद्रें आहेत: एक आतल्या बाजूला आणि दुसरें बाहेरच्या बाजूला. आंतल्या छिद्रांतून आंतडें उतरून वृषणाच्या पिशवींत शिरतें, तेव्हां त्यास अंतर्गळ असें ह्मणतात. आणि बाहेरच्या बाजूच्या छिद्रांतून उतरून जेव्हां तें मांड्यांत उतरतें तेव्हां त्याला ओटीपोटांतील गुल्म ह्मणतात. रोग्याला उताणा निजवून, त्याचे पाय मांड्यांपासून पोटाकडे वळून उतरलेलें आंतडें, छिद्राच्या मार्गावर बोट ठेवून त्या बाजूनें दाबलें असतां, सरतें. आणि जेव्हां सरतें तेव्हां हुक्यांत फुंक मारली असतां जसा पाण्याचा आवाज होतो, तसा गुड गुड आवाज ऐकूं येतो. आतां आतडें पोटांत सरलें कीं लागलाच चापाचा पट्टा कमरेला अडकवावा ह्मणजे झालें.

**गर्भाशयाचा भ्रंश**—गर्भाशय केव्हां केव्हां आपलें स्थान सोडून बाहेर निघून येतो, अथवा मागें पुढें सरकतो. अशक्त बांध्याच्या स्त्रीनें जोराचें काम केलें असतां, नाचलें असतां, किंवा उड्या मारल्या असतां, गर्भाशय बाहेर पडलासा वाटतो. गर्भार स्त्रीनें फार वेळ लघवी कोंडून धरल्यानें गर्भाशयावर दाब पडतो, व तेणेंकरून तो मागल्या बाजूला पडतो. आणि शौचास होत असतां त्याचा निरोध केल्यानें, त्याच्या दाबामुळें तो पुढल्या भागीं पडतो. गर्भाशयाच्या पुढल्या भागीं मूत्राशय आहे व मागल्या भागीं

मळाशय आणि मोठ्या आंतड्यांचा भाग आहे. जेव्हां गर्भाशय पुढल्या बाजूकडे पडतो तेव्हां मूत्राशयावर थोडकासा दाब पडतांच स्त्रीला लघवीस फार होतें. परंतु तोच दाब अतिशय पडला तर लघवी मुळींच बंद होते.' याचप्रमाणें मळाशयावर थोडाथोडका दाब पडला असतां शौचास वारंवार जावें लागतें. परंतु अतिशय दाब पडला तर शौचास मुळींच होत नाहीं, आणखी पोटांत फार दुखूं लागतें. ज्या भागाकडे गर्भाशयाचा कल असेल त्याच्या विरुद्धभागीं दाबलें असतां तो आपल्या मूळ स्थितीवर येतो. नंतर त्याच जागीं तो स्थिर रहावा ह्मणून त्याला बोडी (पेसरी) चा टेकू द्यावा लागतो.

**गुदद्वार बाहेर येणें**—मुलांस शौचास होते वेळीं त्यांचें गुदद्वार बाहेर येतें. आरंभीं आरंभीं तें कांहीं वेळानें पुन्हा आंत जातें. परंतु पुढें पुढें त्याला सूज येऊन तें आंत जात नाहीं. तर्जनीला जगन्नाथीचा भिजलेला फडका गुंडाळून ती तर्जनी बाहेर आलेल्या आंतड्यांत घालून उभी खुपसावी, म्हणजे तर्जनीबरोबर आंतडें आंत जाईल. नंतर बोट स्थिर ठेवून हळुच काढून घ्यावें. फार करून पहिल्याच खेपेला आंतडें आंत जाऊन स्थिर राहील. तसें न झालें तर दोन तीन वेळां ही क्रिया केली म्हणजे झालें. नंतर कमरेला करगोटा बांधून घट्ट लंगोटी घालावी; आणि शौचास त्रास पडणार नाहीं व शक्ति येईल अशा औषधांची योजना करावी.

**पापणी उलटणें**—या पापणीला वरच्या बाजूनें मध्यभागीं बोटानें दाबून तिची कोर दुसऱ्या हाताच्या चिमटींत धरून उंच केली असतां ती उलटी होते.

**ग्यांग्रीन व सर्पदंश**—ग्यांग्रीनमध्यें कांहींएक भाग मृततुल्य होतो, आणि तेणेंकरून दुसरा चांगला भाग देखील मेहरल्यासारखा

होतो. असें झालें असतां मृतप्राय भागाला कापून का णें भाग आहे याचप्रमाणें सर्पदंश झाला असतांही दंशाच्या आ पासची जाग कापून काढावी हा उत्तम मार्ग आहे.

**दाहक्रिया**—उपदंश झाला असतां, चट्टे पड च्या भागाचें विष आसपासच्या भागाला दूषित करणार नाहीं अश मार्टी, त्याच-प्रमाणें सुजलेले सांध्यांतील दुष्ट चिकट पदार्थ नाहींसे करण्याकरितां दुष्ट व्रणांतील कुजक्या भागाचा प्रतिबंध करण्याकरितां व ते रुजविण्याकरितां ते ते भाग जाळून टाकणें भाग पडतें पडकेश फिरून न उगवावें म्हणून लिकर पोट्याश यांत सुईचें अग्र बुडवून पडकेश उपटून काढल्यावर त्याच्या मूळांत ती सुई खुपसून द्यावी. नंतर अर्शाच्या अंकुरांसही जाळून टाकावें. यासाठीं लोखंडाची तापविलेली सळई, तीव्र नाईट्रिक आसीड, तीव्र सल्फ्यूरिक आसीड, लायकर पोट्याश व व्हीएना पेस्ट वगैरे पदार्थांचा उपयोग करावा.

**आर्यानार्यभिषग्वरैर्विरचितप्रौढप्रबंधाहृता**
**शस्त्रास्त्रैकचिकित्स्यसद्व्रणगणोच्छेदादिकृत्यावलिः।**
**योग्यत्वादधिरोपिताऽस्ति सकला श्रीशार्ङ्गरवे मया**
**यस्याऽऽलोचनतो भवंति विभया दुष्टामयेभ्यो नराः॥**



# गजेंद्र रत्न १४ वें.



**पुरुष आणि व्याधींचीं कारणें याविषयीं मतभेद**— आत्मा, इंद्रियें, मन आणि अर्थ यांचा जो समुदाय त्यास पुरुष ह्मणतात. हा पुरुष आणि त्याच्या शरीरांत उत्पन्न होणारे रोग यांचें कारण एकत्र आहे किंवा वेगवेगळीं आहेत? असा संदेह उत्पन्न आला असतां निरनिराळीं मतें दर्शवून, सिद्धांत ठरविणें वाचकांकडे संपवितों.

यासंबंधानें कोणी एका महात्म्याचें मत असें आहे कीं पुरुष आणि रोग यांचें कारण आत्मा आहे. ह्मणून आत्मा हा कर्म करणारा व त्यांचीं फळें भोगणारा असें ह्मटलें आहे. चेतनाधातुरूप आत्म्यावांचून सुखदुःखांची प्रवृत्ति आणि त्यांचा अनुभव होऊं शकत नाहीं. हें मत ऐकून दुसरा एक महात्मा असें ह्मणतो कीं वरील निर्णय ठीक दिसत नाहीं. कारण कीं आत्म्याला तर दुःख आवडत नाहीं. मग तोच स्वतांला दुःखदायक व्याधि कां ह्मणून उत्पन्न करील? करणार नाहीं. यास्तव सत्व असें दुसरें नांव ज्याला आहे, तें मन, रजोगुण व तमोगुण एकत्र झाल्यानें शरीराला व दुःखदायक रोगांना उत्पन्न करतें, असें ह्मणावें हें बरें. तिसरा एकजण ह्मणतो कीं एका मनालाच कारण समजणें वाजवी नाहीं. कारण कीं शरीराचे रोग आणि मन हीं शेवटीं टिकत नाहींत. यास्तव जलादिक पंच महाभूतें कारण होत, असें समजावें. यावर दुसराच एकजण असें ह्मणतो कीं वरील मत बरोबर नाहीं. तर पुरुष हा रसादिक साहा धातूंपासून उत्पन्न झाल्यामुळें हे साहा धातुच

रोगाचें कारण होत. या आमच्या मताला सांख्य सिद्धान्ताचेंही पाठबळ असल्यामुळें तेंच खरें आहे. यावर कोणी असें म्हणतो कीं हें म्हणणें संभवत नाहीं. कारण कीं आईबापांवांचून [illegible]पासूनच पुरुष कसा उत्पन्न होईल? पहा कीं मनुष्यापासून मनुष्य, घोड्यापासून घोडा, गाढवापासून गाढव, याप्रमाणें उत्पत्तीचा क्रम आहे त्याचप्रमाणें प्रमेहादिक रोग आईबापांच्या शरीरांत असतात तेच पुत्राच्या शरीरांत प्रबळ होतात असें म्हटलें आहे. यावरून पुरुषाचें आणि रोगाचें कारण आईबाप होत, हें सिद्ध आहे. यावर आणखी एकजण म्हणतो की वरील म्हणणें फारच शिथिल आहे जर पुरुषाला आणि रोगाला आईबाप कारण होत, तर आंधळ्याची संतति आंधळी असली पाहिजे. परंतु असा नियम नाहीं. म्हणून आईबाप कारण आहेत असें म्हणतां येत नाहीं. तर, पुरुष आणि रोग यांचें कारण केलेलीं कर्में हेंच होय. शास्त्रांतही असेंच म्हटलें आहे कीं, कर्म व पुरुष यांवांचून रोग उत्पन्न होत नाहींत. यावर आणखी एकजण म्हणतो कीं, वर सांगितल्याप्रमाणें विचार केला असतां सिद्ध होत नाहीं. कारण कीं कर्म करतांना कर्माचा कर्ता कर्मापूर्वींच दृष्टीस पडतो. कर्त्यानें न केलेलें आणि स्वतःसिद्ध असें कोणतेंही कर्म आम्हीं कानांनीं ऐकलें देखील नाहीं. मग त्याचें कार्य पुरुष आणि व्याधि हें होय, असें कसें म्हणतां येईल? यास्तव पृथ्वी, आप, वायु आणि तेज, यांच्या ठिकाणीं यथानुक्रम ज्याप्रमाणें कठिणता, द्रवता, चंचलता आणि उष्णता, स्वभावेंकरून वास करते, त्याचप्रमाणें त्यांतही असा स्वभाव आहे कीं तेणेंकरून पुरुष आणि व्याधि हीं उत्पन्न होतात. यावर आणखी एकजण म्हणतो की वरील गोष्ट अप्रमाण आहे. जर स्वभावें करूनच सर्व कांहीं होत असेल तर सुखाची प्राप्ति आणि दुःखाची निवृत्ति घडावी म्हणून वेद

व लोक यापासून सिद्ध अशा अनेक कर्मांचा प्रारंभ निष्फळ होणार आहे. स्वभाव हें कारण होय, असें मानणाऱ्या महात्म्याला आह्मी असें विचारतों कीं पृथ्वी आदि करून वस्तूंमध्यें उत्पन्न करण्याचा स्वभाव आहे, किंवा नाश करण्याचा स्वभाव आहे? उत्पन्न करण्याचा स्वभाव असेल तर त्याचा नाश होऊं नये. परंतु नाश तर आपण प्रत्यक्ष पहातों. आतां नाश करण्याचा स्वभाव असेल तर उत्पत्ति होऊं नये. परंतु ही उत्पत्ति तर आपण पहातों. याशिवाय काल तरी त्यांत फेरफार आला तर तो त्या वस्तूचा स्वभाव असें ह्मणतां येत नाहीं. अशा रीतीनें स्वभावालाच कारण मानण्यांत फार अडचणी येतात. आतां ब्रम्हदेवाला कारण मानावें तर तो सर्व प्रजेचा पिता असल्यामुळें तिचें नेहमीं हितच इच्छील; तो प्रजेला दुःख कसें देईल? परंतु जगांत तर सुखी आणि दुःखी असे दोनही प्रकारचे लोक दिसून येतात. ह्मणून ब्रह्मा हेंही कारण मानतां येत नाहीं. याप्रमाणें विचार करतां करतां, असें सिद्ध होतें कीं पुरुष आणि व्याधि यांचें कारण काळ आहे. पहा कीं, सर्व जग प्रत्यक्ष प्रमाणावरून काळाच्या ताब्यांत आहेसें दिसतें. यास्तव काळ हेंच कारण मानण्यांत कांहीं विकल्प दिसत नाहीं.

वर सांगितलेल्या महात्म्यांचा असा वादविवाद ऐकून, कोणी त्रिकालदर्शी महात्मा म्हणतो कीं तुह्मी याप्रमाणें वाद करूं नका. कारणकीं आपआपल्या पक्षाचा आश्रय करून वाद करणारांस तत्व कळत नाहीं. इतकेंच केवळ नव्हे, तर घाण्याला जोडलेल्या बैलांप्रमाणें त्यांच्या वादप्रतिवादाचा शेवट कधींच येत नाहीं. यास्तव वादविवाद टाकून देऊन आत्मज्ञानाचा आश्रय करा. जोंपर्यंत ज्ञेय पदार्थाविषयीं अज्ञान गेलें नाहीं तोंपर्यंत ज्ञान त्या पदार्थास विषय करूं शकत नाहीं. म्हणून या ठिकाणीं असा विचार करावा कीं

ज्या पदार्थांच्या समृद्धीनें पुरुष उत्पन्न होतो, त्या पदार्थांची असमृद्धि झाल्यानेंच व्याधि उत्पन्न होतात. हें या महात्म्याचें भाषण ऐकून संतुष्ट होत्सातां प्रथम प्रश्न करणारा, प्रशंसा करून, फिरून प्रश्न करतो कीं समृद्धीनें उत्पन्न झालेल्या पुरुषाची व असमृद्धीनें उत्पन्न होणाऱ्या व्याधींची अभिवृद्धि कोण करतो? याचें उत्तर, शेवटलें यथार्थ उत्तर देणाऱ्या महात्म्यानें दिलें आहे तें असें. हितकर आहार हा पुरुषाच्या अभिवृद्धीचें कारण आहे आणि अहितकारक आहार व्याधींच्या अभिवृद्धीचें कारण आहे. यावर प्रश्न करणारा म्हणतो कीं हितकारक आहाराचें व अहितकारक आहाराचें लक्षण, वर सांगितल्याप्रमाणें, व्यभिचारहीन आहेसें वाटत नाहीं. यामुळें मात्रा, काल, क्रिया, भूमि, देह, दोष, पुरुष, आणि अवस्थांतर यांच्या संबंधानें हितकर म्हणून जो आहार सांगितला, त्याचा अहितकारक परिणाम होतो, आणि अहितकारक ह्मणून सांगितलेल्या आहाराचा परिणाम हितकारक होतो. अर्थात् हितकारक आहार कोणता व अहितकारक आहार कोणता, हें निश्चित होत नाहीं. ही शंका ऐकून तिचें समाधान करण्याच्या इच्छेनें हा शेवटला महात्मा सांगतो कीं सगळ्या आहारद्रव्यांतून जें द्रव्य समावस्थेनें असलेल्या रसादिक धातूंची अवस्था पालटूं देत नाहीं आणि पालटली असतां रसादिक धातूंस समावस्थेप्रत आणतें, तेंच द्रव्य खरोखर हितकारक समजावें. याहून जें उलट तें अहितकारक होय. हिताहित आहाराचें हें लक्षण व्यभिचार दोषास पात्र नाहीं. हा निर्णय ऐकून प्रश्न करणारा विचारतो कीं तुह्मी सांगतां त्याप्रमाणें सर्व वैद्य समजतात काय समाधान करणारा उत्तर करतो—"जे वैद्य गुण, द्रव्य, कर्म, आणि सर्व अवयव, यासंबंधानें आहाराचें तत्व जाणतात तेच माझ्या उत्तरांतील आशय जाणतील; इतरांस तो समजणें दुर्लभ आहे."

**वातादि दोष हे ज्वरादि व्याधींचें कारण आहेत कीं नाहींत ?**—कांहीं कारणामुळें वातादिक दोष कोपून आपली साधारण गति सोडतात आणि शरीरांत धावाधाव करून ज्या स्थानीं थांबतात, त्या स्थानीं विकृति उत्पन्न करून व्याधिरूपानें प्रगट होतात. अशा प्रकारच्या खऱ्या सिद्धांतांत स्थूणाखननन्यायानें ( ह्मणजे हलवून खुंटा बळकट करण्याच्या कृतीनें ) त्यास ज्यास्ती दृढ करण्याकरितां जो शास्त्रार्थ सांगितला आहे तो येणें प्रमाणें:—कोपलेले वातादि दोष शरीराच्या ज्या ज्या भागांत अडून रहातात, त्या त्या भागीं ते व्याधीस उत्पन्न करतात असें जें वर ह्मटलें आहे, त्यावरून ज्वरादि व्याधींचें कारण वातादिक दोष होत, असें होतें. यावर अशी शंका येते कीं वातादिक दोष व ज्वरादिक व्याधि हीं नेहमीं एकत्र असतात किंवा वेगवेगळीं असतात ? जर पहिल्या पक्षाचा ( अर्थात नेहमी एकत्र असतात या पक्षाचा ) अंगीकार केला तर मनुष्यादि सर्व प्राणी नेहमीं ज्वरादिक व्याधींनीं पीडलेले असले पाहिजेत असें मानावें लागेल. आतां दुसऱ्या पक्षाचा ( अर्थात वेगवेगळीं असतात या पक्षाचा ) स्वीकार केला तर ज्यापेक्षां संबंधावांचून कोणताही पदार्थ कशाचेंही कारण होऊं शकत नाहीं असा नियम आहे, त्यापक्षीं वातादिक दोष ज्वरादिक व्याधींचें कारण नाहींत असें मानावें लागेल. या शंकेचें समाधान असें आहे कीं ज्याप्रमाणें आकाशावांचून वीज, वारा, कडकडाट आणि पाऊस हीं होऊं शकत नाहींत, त्याचप्रमाणें केव्हां केव्हां आकाश असतांही वीज वगैरे पदार्थ होऊं शकत नाहींत, आणि कांहीं कारणानें एखादे वेळीं आकाशांतूनच तीं उत्पन्न होतात; याच न्यायानें वातादिक दोषांवांचून व्याधि उत्पन्न होत नाहींत आणि नेहमी वातादिकांचा व व्याधींचा कांहीं एक संबंध नाहीं. परंतु कांहीं कारणानें

केव्हां केव्हां वातादिक दोषांतूनच ज्वरादिक व्याधि उत्पन्न होतात आणखी ज्या कारणामुळें पाण्यात तरंग ( लाटा ) [illegible] बुडबुडे [illegible] आकृतीनें मात्र वेगळे दिसतात तरी ते पाणीच होत. आणि त्यांचा पाण्याशीं संबंध अथवा असंबंध हा सांगता [illegible] नाहीं त्या कारणानें वातादिक दोषातून उत्पन्न झालेले त्यात [illegible] पावलेले वातादिक दोषच होत अर्थात त्यांचा संबंध [illegible] संबंध सांगतां येत नाही. तरी पण दृष्टांतानें [illegible] स्पष्ट [illegible]

**रसविचार**–शब्दादिक पांच [illegible] ज्याचें ग्रहण होतें, तो रस [illegible] आणि [illegible] नाही, असें कोणा महात्म्याचें मत आहे. दुसरा कोणी [illegible] म्हणतो की छेदनीय ( छेदण्यास योग्य ) आणि उपशमनीय ( उपशमनास योग्य ) असे दोन प्रकारचे रस आहेत. आणखी [illegible] महात्मा सांगतो की छेदनीय, उपशमनीय आणि साधारण असे तीन प्रकारचे रस आहेत. कोणी [illegible] म्हणतो [illegible] स्वादु असून आहेत, अस्वादु असून आहेत, स्वादु असून [illegible] आणि अस्वादु असून हित, याप्रमाणें चार प्रकारचे रस आहेत. कोणी असेंही ह्मणतात कीं भौम ( जमिनीसंबंधी ), औदक ( जलसंबंधी ), आग्नेय ( अग्निसंबंधी ), वायव्य ( वायुसंबंधी ) आणि आंतरीक्ष ( आकाशासंबंधी ), याप्रमाणें पांच प्रकारचे रस आहेत. यात कोणी असेंही ह्मणतात कीं गुरु, लघु, शीत, उष्ण, स्निग्ध, आणि रुक्ष असे त्याचे साहा प्रकार आहेत. कोणी ह्मणतो की मधुर, अम्ल, लवण, कटु, तिक्त, कषाय, व क्षार असे त्याचे सात प्रकार आहेत. याशिवाय कित्येक महात्म्यांचें असेंही ह्मणणें आहे की रस धारण करणारीं द्रव्यें असंख्य असून औषधीच्या असंख्य मिश्रणांमुळें रसांची संख्या सांगतां येत नाहीं.

याप्रमाणें रसासंबंधानें उपस्थित झालेला वाद पाहून कोणी विचक्षण पंडित आजुबाजूच्या गोष्टींचा विचार करून ह्मणतो कीं मधुर, अम्ल, लवण, कटु, तिक्त व कषाय असे साहा रस आहेत. या साहा प्रकारच्या रसांच्या उत्पत्तीचें स्थान जळ होय. ह्मणून रस हा जळापासून भिन्न नाहीं. व एकच आहे असें पहिल्यानें बोलणाराचें मत ही विरुद्ध आहे. छेदन व उपशमन अशीं रसाचीं दोन कार्यें असून तीं दोन्ही रसरूप आहेत. असें समजून, रसाचे दोन भेद मानणाराचें मतही मान्य नाहीं. हीं दोन्ही कार्यें एकत्र करून साधारण या नांवाचें आणखी एक तिसरें रसाचें कार्य आहे. यास्तव साधारण या तिसऱ्या भेदाची भर घालून रसाचे तीन भेद आहेत असें सांगणाराचेंही ह्मणणें बरोबर नाहीं. स्वादुपणा व अस्वादुपणा हेही प्रत्येक रसांत असलेले दोन विभाग आहेत, तसेंच हितपणा व अहितपणा हे रसांत असलेले दोन प्रभाव आहेत; यास्तव या चार नांवांनीं रसाचे चार भेद करणें हेंही योग्य नाहीं. पंच महाभूतांतून (पृथ्वी, आप, तेज, वायु आणि आकाश, यांतून) उत्पन्न झालेले पांच पदार्थ हे तर रसाचे आश्रय होत. त्यांस रस मानून पांच प्रकारचे रसाचे भेद करणें हें अतिशय चुकीचें आहे. या आश्रयांत देशकालविशेषामुळें उत्पन्न झालेल्या गुरु, लघु, शीत, उष्ण, स्निग्ध, आणि रुक्ष या नांवाच्या गुणास रस मानून, रसाचे सहा भेद करणें हेंही अयोग्य आहे असें विचारी मनुष्यास आपल्या आपणच वाटेल. त्याचप्रमाणें वर सांगितलेल्या मधुरादिक गुणांत क्षार गुणाची भर घालून रस सात आहेत असेंही ह्मणतां येत नाहीं. कारण कीं क्षार हें द्रव्य आहे; रस नाहीं. आणि हें क्षार द्रव्य अनेक रसांपासून उत्पन्न झालें आहे व अनेक रसांनीं युक्त आहे. फक्त त्यांत तिखट आणि खारट हे दोन रस प्राधान्येंकरून वसतात,

ह्मणून ते स्फुटपणें अनुभवास येतात. याचप्रमाणें अनेक इंद्रियांचे अर्थ जे शब्दादिक, त्यांनीं ते संयुक्त आहेत. आणि ते क्षार वगैरे ल्यानें उत्पन्न होतात, यास्तव ते रस नव्हेत. ह्मणून मधुरादिक रसांची संख्या साहाहून कमी अथवा अधिक होऊं शकत नाहीं.

## द्रव्य, रस, गुण, वीर्य आणि विपाक यांत प्रधान कोण

द्रव्य, रस, गुण, वीर्य आणि विपाक यात प्रधान कोण, या प्रश्नाचा विचार करतांना ज्या शंका उत्पन्न होतात, त्यांचें समाधान असें आहे कीं कच्च्या फळांत जे रसादिक आहेत ते पिकलेल्या फळांत नसतात, आणि फलरूप द्रव्य तर दोनही अवस्थांत एक रूपच आहे. यास्तव त्याची अचळ स्थिति असल्यावरून सर्व पदार्थांत द्रव्यच प्रधान होय. आणि आणखी द्रव्यापासून बनलेली कल्क आदिक औषधें पुष्कळ रसयुक्त व पुष्कळ गंधयुक्त अशी असतात. आणि केव्हां केव्हां तर गंध व रस यांनीं रहितही असतात. यास्तव गंधरसाचें अनित्यत्व आणि कल्कादि द्रव्यांचें नित्यत्व प्रसिद्धपणें दिसून येतें. या नित्यत्वावरूनही द्रव्याचेंच प्राधान्य सिद्ध होतें. वर लिहिलेल्या द्रव्याचें प्राधान्य सिद्ध करणाऱ्या पहिल्या वाक्यांत पहिल्या अवस्थेंत असलेल्या पदार्थाची दुसऱ्या अवस्थेंत अभावरूप अव्यवस्थिति (स्थितीचा अभाव) हें गौणतेचें कारण होय असें ठरवून, त्या कारणापासून मुक्तता असें दाखवून द्रव्याचें प्राधान्य सिद्ध केलें आहे. आणि दुसऱ्या वाक्यांत कोणा एका वेळीं कोणा एका वस्तूंमध्यें त्याचा सद्भाव आणि कांहींएका त्याच जातीच्या वस्तूमध्यें त्याचा असद्भाव असतो, यावरून असद्भावरूपी अनित्यत्वाला पदार्थाच्या गौणतेचें कारण ठरवून कारणाच्या स्पर्शाच्या अभावावरूनही द्रव्याचें प्राधान्य सिद्ध

केलें आहे. या रीतीचा दोन वाक्यांत तफावत आहे तो सुज्ञांनीं सूक्ष्म दृष्टीनें समजून घ्यावा. आतां द्रव्याच्या प्राधान्यामध्यें तिसरा हेतु असा आहे कीं, तें आद्यंत अवस्थेंत आपल्या जातीला सोडीत नाहीं. जसा पृथ्वीपासून झालेला पदार्थ पृथ्वी हा पृथ्वीपणाला न सोडतां तिच्यांतच सदा आपलें अवस्थान दर्शवितो. ही स्थिति रसादिकांत दिसत नाहीं. यास्तव द्रव्यच प्रधान होय असें ठरतें. विस्तारभयास्तव अधिक येथें लिहित नाहीं. पंचेंद्रियांपासून द्रव्याशिवाय रसादिक पदार्थ पंचेंद्रियांचे विषय होऊं शकत नाहींत. यावरूनही द्रव्याचेंच प्राधान्य सिद्ध होतें. या वाक्याला, "बहुत लोक मानतात तो मोठा" या न्यायानेंही चांगला आधार मिळतो. सर्वांचा आश्रय द्रव्य आहे, यावरूनही त्याची प्रधानता मानण्याला पुष्टीकरण होतें. पहा कीं शर्करादि द्रव्यात मधुरादि रसाची अधिकरणता जशी स्पष्ट अनुभवाला येते, तशी रसादिकांची वर्तणूक नसल्यामुळें द्रव्यच प्रधान ठरतें. अशा प्रसंगीं "आश्रयत्वात्" या पदाला हेतु करून महात्म्यानीं मोठमोठे निबंध लिहिले आहेत. आणखी आयुर्वेदप्रसिद्ध सर्व संस्कारांची पात्रता जशी द्रव्यांत दिसून येते, तशी मधुरादिक रसादि पदार्थांत दिसून येत नाहीं. यावरूनही द्रव्याचेंच प्रधानत्व स्पष्टपणें प्रत्यक्ष दिसून येतें. पहा कीं विदारीगंधा इत्यादिक औषधीवरच अनेक प्रकारचे असंख्य संस्कार आगमप्रसिद्ध अनुभवी लोक अपरोक्ष करितात ; परंतु रसादिकावरच आजपर्यंत कोणीही अनुभवी लोकांनीं लेखणी चालविलेली नाहीं. यावरूनही द्रव्याचेंच प्राधान्य सिद्ध होतें. आणि शास्त्रांतही सर्व व्यवहार द्रव्याश्रितच असल्याचें दृष्टीस पडतें. अशा अनेक कारणांवरून द्रव्यच सर्व पदार्थांत प्रधान आहे. त्याचप्रमाणें सर्व पदार्थांचा शास्त्रसिद्धक्रम पाहिला असतांही, प्रथम

स्थळ द्रव्यानेंच सुशोभित केलें आहे. यावरून द्रव्याच्या प्राधान्या वांचून दुसरें काय दिसून येतें? याशिवाय हाही एक विचार आहे कीं रसादिकांच्या अवस्थांचा भेदही द्रव्याच्या अवस्था[illegible]चाच आश्रय करून असतो. यावरूनही द्रव्य प्रधान [illegible] हें हाच अ[illegible] सिद्ध होतो. एका असहाय महावृक्ष नांवाच्या [illegible] शरीर अवयव व्याधीचा निवर्तक असल्याचें सांगितलें आहे. त्याप्रमाणें एकेकट्या मधुरादि रसादिक पदार्थ असहाय व्याधि निवर्तक [illegible] त्याचें सांगितलें नाहीं. यावरून देखील द्रव्याचेंच प्राधान्य मान[illegible] भाग आहे.

या सर्व हेतूंवरून सर्व पदार्थांत द्रव्यच प्रधान होय. अ[illegible] द्रव्यप्राधान्यवाद्यांचा युक्तिवाद ऐकून, रसप्रधानवादी म्हणतात. कीं सर्व पदार्थांत रसच प्रधान आहे. रसप्रधानवादांत आगम हेंच कारण आहे, असें ते म्हणतात. आश्रित सर्व प्राण्यांचे प्राण अशी ज्या आहाररूप द्रव्याची योग्यता आहे, त्यांतही रसप्रधान असल्याचें वर्णिलें आहे. या सर्व कारणांस्तव रसाचेंच प्राधान्य सिद्ध होतें. अर्थात द्रव्याचें प्राधान्य सिद्ध करण्याकरितां जीं प्रमाणें वर लिहिलीं आहेत, तीं दुरूनच मग आपल्या पायीं पळून जातात. रसादिक हे व्याधीस बरें करीत नाहींत अशी जी निंदा कोणी करितात, ती, मधुरादिक रस वातादिकांचें शमन करितात, अशा अर्थाचें जें वाक्य आगमांत आहे, त्यावरूनच शुष्क होते. याच प्रमाणें रसादिक हेच द्रव्याची ओळख देणारे आहेत असें मानिलें आहे. यावरूनही रसाचें प्राधान्य अनुभवास येतें. याशिवाय महात्म्यांनीं "मधुरमाहरेत्" ( यजनामध्यें मधूर योजावें ) अशा अर्थाच्या वाक्यांवरून मधुरादि रसाचेंच प्राधान्य दर्शित केलें आहे. याशिवाय रसाला गुण असेंही नांव दिलें आहे. यास्तव गुणाचें व्याख्यान

रसाच्या या व्याख्यानांतच येऊन गेलें आहे, असें समजून त्यांचें वेगळें व्याख्यान देत नाहीं.

याप्रमाणें रसाचें प्राधान्य मानणाऱ्यांचा सिद्धांत ऐकून, वीर्य हेंच प्रधान असें मानणारा दुसरा कोणी एक महात्मा म्हणतो कीं शोधन, शमन, लेखन, बृंहण, मारण, इत्यादि कर्म औषध करतें. परंतु त्यास वीर्यावांचून इतराचा आश्रय तें मागत नाहीं. यावरून वीर्याचेंच प्राधान्य सिद्ध होतें. याशिवाय इतर कोणत्याही पदार्थाला प्राधान्य मानणें आम्हाला योग्य दिसत नाहीं. हें वीर्य, अग्नि आणि चंद्र यांच्या प्रभावानें प्रगट झालेल्या सर्व पदार्थांत उष्ण आणि शीत अशा दोहों रीतींनीं दोन प्रकारचें आहे. कित्येक लोक वीर्य हें उष्ण, शीत, स्निग्ध, रूक्ष, विशद, पिच्छिल, मृदु, आणि तीक्ष्ण, अशा प्रकारें आठ प्रकारचें समजतात. यास्तव आपले ठिकाणीं बळाच्या आणि गुणाच्या उत्कर्षानें द्रव्यांत असलेल्या रसाचा पराभव करून तें स्वतां आपलें स्वतंत्रपणें कार्य करतें. उदाहरणार्थ पंचमूळ हें कषाय व कडवट रस यांस धारण करतें. तरी तें उष्णवीर्य असल्यामुळें वाताचें शमन करतें, असेंही म्हटलें आहे. जर रसाचेंच प्रधानत्व असतें तर वातकारक कषाय आणि तिक्त अशा गुणांनीं युक्त पंचमूळ वाताचें शमन करतें, असें शास्त्रांत लिहिलें नसतें. त्याचप्रमाणें कषाय रसयुक्त कुळीथ आणि तिखट रसयुक्त कांदा हे वाताचें शमन करणारे पदार्थ असें म्हटलें आहे. तेंही त्यांच्या स्निग्धवीर्यत्वामुळेंच योग्य आहे. यास्तव स्निग्ध वीर्यही वेगळेंच होय. त्याचप्रमाणें कफाची अभिवृद्धि करणाऱ्या मधुर रसाशीं संयुक्त असा उंसाचा रस वाताची अभिवृद्धि करतो. यावरून देखील त्यांत असलेल्या शीतवीर्याचेंच सामर्थ्य सिद्ध होतें. रसानें तिखट अशी लेंडी पिंपळी ही पित्ताचें शमन करते. हाही तिच्यांत

असलेल्या कोमल शीतवीर्याचाच प्रभाव होय. याचप्रमाणें आंबट आंवळे आणि खारट लवण या दोहोंत पित्ताचें शमन करण्याचा गुण आहे असें ठरविलें आहे, तेंही त्यांत असलेल्या मृदु शीत वीर्याकरू-नच निश्चित केलें आहे असें दिसतें. कडू कारलीं व गोडे मासे हीं त्यांत असलेल्या उष्णवीर्यामुळेंच पित्ताची अभिवृद्धि करितात. कफाचा नाश करणारा व तिखट रसानें युक्त असा मुळा हा त्यांत असलेल्या स्निग्ध वीर्यामुळेंच कफाची अभिवृद्धि कर-णारा झाला आहे. कफाची अभिवृद्धि करणारा जो रस त्यानें युक्त अशी मद्य आणि आंबट रसानें युक्त कवठाचें फळ कफाचें शमन करतें, हेंही त्यांत असलेल्या रूक्षवीर्यानेंच काम होय. हीं उदाहरणें थोडक्यांत सांगितलीं आहेत. परंतु जो रस वाताची शांति करणारा असून त्यांत रूक्षपणा, लघुपणा व शीतपणा, या तीन प्रकारच्या वीर्यांतून कोणतेंही वीर्य असेल तर तो वाताची शांति करण्यास समर्थ होत नाहीं. याचप्रमाणें पित्ताची शांति कर-णाऱ्या रसांत तीक्ष्णपणा, उष्णपणा व लघुपणा असेल तर तो पित्ताचें शमन करूं शकणार नाहीं. आणि कफाची शांति करणाऱ्या रसांत स्नेह, गुरुपणा व शीतळपणा असेल तर तो कफाची शांति करणार नाहीं. यावरून वीर्याचें प्राधान्य सिद्ध होतें.

५. याप्रमाणें वीर्याचें प्राधान्य मानणारांचें भाषण ऐकून, पाक हाच प्रधान असें मानणारा पुरुष म्हणतो कीं, कोणतेंही द्रव्य उत्तम प्रकारें शिजवून त्याचा उपयोग केला तरच तो गुणाची अभिवृद्धि करतो, आणि बरोबर शिजविलें नसेल तर तें दोष वाढवितें. अर्थात गुणदोष उत्पन्न करणारा पाक असल्यामुळें, तोच सर्व पदार्थांत प्रधान म्हटला पाहिजे. कित्येक जण या पाकालाच प्रत्येक रसांत वेगवेगळा मानतात; आणि कित्येक जण "मधुर, आंबट व तिखट

याप्रमाणें सर्व रस मिळून तीन प्रकारचा पाक मानतात. परंतु हीं दोन्ही मतें वाजवी दिसत नाहींत. कारणकीं भूताच्या गुणावरून व आगमावरून विचार केला असतां, आंबट पाक सिद्ध होत नाहीं. फक्त अग्नीच्या मंदतेमुळें अर्धवट जळलेलें पित्तच आंबट लागतें. आणि अर्धवट जळलेल्यास पाक म्हणावयाचें असेल तर अर्धवट जळलेला कफ खारट होतो. ह्मणून खारट हाही एक चौथा पाक मानावा लागेल. या घोटाळ्यास्तव मधुरांचा मधुर, आंबटाचा आंबट याप्रमाणें एकेक रसाचा एकेक पाक वेगळा वेगळा. जे कोणी मानतात, ते असा दृष्टांत देतात कीं स्वभावें करून मधुर असें दूध पाककाळीं देखील आपली मधुरता टाकीत नाहीं; तशींच साळी, जव, आणि मूग इत्यादि धान्येंदेखील आपआपला स्वाभाविक रस पाकावस्थेंत टाकीत नाहींत. यास्तव प्रत्येक रसाचा पाक वेगवेगळा असला पाहिजे, असें या मतवाद्याचें ह्मणणें आहे. कित्येक जण असें ह्मणतात कीं बळहीन पदार्थ बळवंताच्या स्वाधीन होऊन आपला प्रभाव सोडतात. अशा प्रकारच्या घोटाळ्यावरून वर लिहिलेला वाद शुष्क ठरतो. अर्थात तो सिद्धांतरूप मानतां येत नाहीं. तर आह्मी आगमास अनुसरून असें सांगतों कीं मधुर आणि तिखट असा दोन प्रकारचाच पाक आहे. त्यांत मधुर पाक गुरु गुणानें युक्त आहे, व तिखट पाक लघुगुणानें युक्त आहे. अर्थात पृथ्वी आदि करून पंचमहाभूतें गुरु आणि लघु अशा दोनच गुणांनीं युक्त होत. त्यांतही पृथ्वी आणि जल गुरु ह्मटलीं आहेत, आणि अग्नि, वायु व आकाश हीं तीन लघु ह्मटलीं आहेत. यावरून पाक दोन प्रकारचा आहे असें ह्मणणें सप्रमाण सिद्ध होतें. असें ह्मटलें आहे कीं ज्या द्रव्यांत पृथ्वी आणि पाणी यांचा अंश अधिक असतो त्याचा पाक मधुर आणि गुरु या गुणांनीं युक्त असतो. शिजविल्यावर ज्या द्रव्यांत

अग्नि, वायु आणि आकाश यांच्या गुणाची अभिवृद्धि होते, त्यांचा पाक तिखट आणि लघु गुणांनीं युक्त असतो.

याप्रमाणें द्रव्य, रस, वीर्य व विपाक या चार पदार्थांचें वेगवेगळें प्रधानत्व मानणारे वर सांगितलेले चार महात्मे पुरुष जें मत प्रगट करतात, त्याची सिद्धता काईम राखण्यासाठीं कोणी सुवद पंडित असें प्रतिपादन करतो, कीं कांहीं द्रव्यें आपल्या गुणांनीं व कांहीं आपल्या ठिकाणीं असलेल्या रसानें व वीर्यानें, तशीच कांहीं द्रव्यें आपल्या पाकांनीं दोष उत्पन्न करतात व हरतात; परंतु वीर्यावांचून पाक, रसावांचून वीर्य आणि द्रव्यावांचून रस असण्याचा संभव नाहीं; ह्मणून सर्व पदार्थांत द्रव्यच प्रधान होय. जरी या द्रव्याचा व रसाचा जन्म, देह आणि देही यांच्या जन्माप्रमाणें, एकमेकांचा आश्रय करून असल्यामुळें, दोनही प्रधान ठरतात, तरी वीर्य नांवाच्या वर लिहिल्याप्रमाणें आठ गुणांचा आश्रय केवळ द्रव्य होय असें ठरतें, तसा रस हा त्यांचा आश्रय आहे असें कधींही ठरणार नाहीं. कारण कीं, रस हा गुण आहे, आणि गुणांत गुण रहातो असें कधींही कोणी वर्णिलें नाहीं. आणखी द्रव्यांत द्रव्य पाकरूपानें उत्पन्न होतें, पण साहा रस उत्पन्न होत नाहींत. यावरूनही द्रव्याचेंच श्रेष्ठत्व सिद्ध होतें. अर्थात बाकीचे पदार्थ द्रव्याचे आश्रित होत.

**संग्रामांगणगामिशूरजनतासंसर्गसंशोभिनां**
**भूपानां रणकर्मसाधनगणाग्रेगण्यतां प्रापितः ।**
**प्राक्स्तंबेरम इत्यवेक्ष्य विधिवच्छास्त्रार्थयुद्धार्थिना-**
**माकांक्षाविषयस्य चास्य गदितं नामेभरत्नं मया ॥**

---

# परिशिष्ट.

गंधक शुद्ध करण्याचा प्रकार—लोखंडाच्या भांड्यांत तूप टाकून विस्तवावर ऊन करावें. मग तुपा इतक्याच वजनाचें गंधकाचें चूर्ण त्यांत घालावें. नंतर गंधक विरघळून गेला ह्मणजे तो रस बारीक वस्त्रावर टाकून दुधांत पिळावा. असें केल्यानें गंधक शुद्ध होतो, व कोणत्याही कामांत योजण्यास योग्य होतो.

बचनाग शुद्ध करण्याचा प्रकार—बचनाग तीन दिवसपर्यंत गोमूत्रांत ठेवावा. नंतर तांबड्या शिरसाच्या तेलांत भिजवलेल्या फडक्यांत ठेवावा. ह्मणजे तो शुद्ध होतो. त्यांत जे विषारी तीव्र गुण आहेत ते शुद्ध केल्यानें न्यून होतात. यास्तव शुद्ध केल्यावर त्याचा औषधांत उपयोग करण्यास चिंता नाहीं.

तांबे शुद्ध करण्याचा प्रकार—जास्वंदीच्या फुलासारखें, स्निग्ध, जड, घणानें ठोकलें असतां न फुटणारें, आणि लोखंड व शिसें यांचें मिश्रण नसलेलें असें जें तांबें तें औषधाच्या कामीं घ्यावें. जें तांबें काळें, रूक्ष, कठिण, पांढरें, घण मारला असतां फुटणारें आणि ज्यांत लोखंड व शिसें यांची मिसळ आहे तें अयोग्य समजावें. अशा स्वच्छ तांब्याचे पातळ पत्रे विस्तवांत तापवावे. तापवून तापवून ते तेलांत, ताकांत, कांजींत, गोमूत्रांत व कुळिथांच्या काढ्यांत टाकून निववावे. याप्रमाणें तीन तीन वेळ केलें असतां, तांब्याचे पत्रे शुद्ध होतात. तांबें उत्तम प्रकारें शुद्ध केल्यावांचून जर औषधांत त्याचा उपयोग झाला, तर भ्रमण, वमन, रेच, श्रम, शरीराला चिकटा, मूर्च्छा, आग, आणि अरुचि हीं उत्पन्न होतात. यास्तव तें शुद्ध करून मग भस्माकरितां घ्यावें.

**तांब्याचें भस्म करण्याचा प्रकार**—तांब्याचे लहान लहान तुकडे करून, तीन दिवस लिंबाच्या रसांत उकळावे नंतर खलांत घालून, त्यांत त्यांच्या चवथ्या भागाइतका पारा टाकून, एक प्रहरपर्यंत लिंबाच्या ताज्या रसांत ते खलावे. मग तुकडे काढून, एक प्रहरपर्यंत लिंबाच्या रसांत खललेला गंधक, तुकड्यांच्या दुप्पट वजनाचा, घेऊन, त्यांत ते तुकडे टाकून, त्याचा गोळा करावा. पांढऱ्या दुर्वा अथवा चोपानी आंबट लूण अथवा [illegible] वांटून तिच्या ठेंच्याचा त्या गोळ्यावर दोन बोटें थर द्यावा. मग थरसहित तो गोळा एका परळांत ठेवून, त्याच्या तोंडावर एक पणती उपडी घालावी. परळाच्या बाकीच्या रिकाम्या भागांत रेती भरून तोंडावर भिजवलेली राख व लूण हीं लिपून तोंड बंद करावें नंतर तो परळ चुलीवर ठेवावा, आणि क्रमानें वाढवीत वाढवीत चार प्रहरपर्यंत उत्तम प्रकारें विस्तवाची आंच द्यावी. विस्तव विझवून, परळ थंड झाल्यावर, त्यांतून तांबें काढून घेऊन, एक प्रहरभर सुरणाच्या रसांत खलावें. खललेल्या तांब्याचा फिरून गोळा करून तो, सुरणाच्या चाकीला भोंक पाडून, त्याच्या पोटांत घालावा, आणि त्या चाकीभोंवतीं एक बोट जाडीचा मातीचा लेप करावा. नंतर गजपुटांत लागलीच ती चाकी शिजवावी. म्हणजे तांब्याचें हटकून भस्म होतें. अशा रीतीनें मारलेलें तांबें औषधांत योजिलें असता वमन, रेच, भ्रम, ग्लानि, अरुचि, दाह, घाम, चिकटा वगैरे दोष उत्पन्न करित नाहीं.

**ताम्रभस्माचे गुण**—तांबें तुरट, मधुर, कडवट, खारट आणि पाकानें तिखट आहे. तें रेचक आहे. पित्त व कफ नाहींसें करणारें आहे. थंड आहे. व्रण रुजवून कातडी पूर्ववत् करणारें आहे. हलकें आहे. मळ भेदून टाकणारें आहे. तें पांडुरोग, उदररोग, अर्श, ताप,

कोड, खोकला, श्वास, शैत्य, क्षय, अम्लपित्त, मूळ, कृमि व शूळ यांचा नाश करतें. परंतु शरीराला पुष्ट करण्याच्या कामांत त्याचें बळ कमी आहे.

**रुप्याची योग्यायोग्यता व तें शुद्ध करण्याचा प्रकार**—जें रुपें जड, स्निग्ध, मऊ, पांढरें, दाह व छेद केला असतां रंग न सोडणारें, घणानें ठोकलें असतां सहन करणारें, सुवर्णाचा वगैरे संसर्ग नसलेलें आणि स्वच्छ असें असेल तर तें भस्म करण्याला योग्य आहे. जें रुपें कडक, रुक्ष, तांबडें, पिवळ्या पंख्याचें, हलकें, तापविलें असतां अथवा कापिलें असतां तुकडे होणारें, आणि घणानें ठोकलें असतां फुटणारें असें असेल तर भस्म करण्याला अयोग्य समजावें. रुप्याचे पातळ पत्रे अग्नींत तापवावे, आणि तेलांत, ताकांत, कांजींत, गोमूत्रांत व कुळिथांच्या काढ्यांत बुडवावे. असें तीन तीन वेळां केल्यानें रुपें शुद्ध होतें. अशुद्ध रुपें शरीरांत ताप उत्पन्न करतें, कोष्टबद्ध करतें, वीर्य व बळ यांचा क्षय करतें व शरीराची पुष्टि नाहींशी करून रोग उत्पन्न करतें.

**रुप्याचें भस्म करण्याचा प्रकार**—एक भाग हरताळ घेऊन, एक प्रहरपर्यंत कोणत्या तरी आंबट रसांत खलून मर्दन करावा. नंतर त्याच्या तिप्पट वजनाच्या रुप्याच्या पत्र्यांवर त्या हरताळाचें लेपन करावें. हे पत्रे मग पत्र्यांच्या संपुटांत ठेवून व कापड मातीचा थर देऊन लिंपून, त्यास तीस रानशेण्यांच्या विस्तवांत ठेवावें. याप्रमाणें चवदा पुटें दिल्यावर रुप्याचें भस्म होऊन जातें.

**रुप्याच्या भस्माचा २ रा प्रकार**—सुवर्णमाक्षिक रुप्याच्या एका भागाइतकें घेऊन, तिचें थोराच्या चिकांत खूप मर्दन करावें. नंतर तीन भाग वजना इतके रुप्याचे पत्रे घेऊन, त्यांजवर त्या

सुवर्णमाक्षिकाचा लेप करावा. नंतर ते पत्रे संपुटांत ठेवून, त्यांस कापड-मातीनें लिंपून, तीस रानशेण्यांच्या अग्नीचा पुट द्यावा. थंड झाल्यावर काढून घेऊन, फिरून सुवर्णमाक्षिकाचा लेप करून, कापडमातीनें लिंपावें, व अग्नीचा पुट द्यावा. याप्रमाणें चवदा वेळ पुटें दिल्यावर रुप्याचें भस्म होऊन जातें.

**रुप्याच्या भस्माचे गुण**-रुपें थंड, तुरट, आंबट, पाकानें व रसानें मधुर, शौचास साफ करणारें, यौवन स्थिर ठेवणारें व स्निग्ध असें आहे. तें भेदी असून, वायु व पित्त यांचें शमन करतें. आणखी, थोड्याच दिवसांत प्रमेह आदि करून रोगांचा अवश्य नाश करतें.

**कथील शुद्ध करण्याचा प्रकार**—रुप्याप्रमाणें चकचकीत कथील घेऊन, तें तापवून, गाळून गाळून, तेलांत, ताकांत, कांजींत, गोमूत्रांत आणि कुळिथांच्या काढ्यांत तीन तीन वेळ थंड करावें, तसेंच रुईचे चिकांतही तीनवेळ थंड करावें; ह्मणजे कथील, शुद्ध होतें. अशुद्ध कथील आक्षेपकवायु, कंप गोळा, कोड, शूळ, वायुसंबंधीं सूज, पांडुरोग, प्रमेह, भगंदर, रक्तविकार, क्षय, मूत्र-कृच्छ्र, कफज्वर, मुतखडा, विद्रधि आणि वृषणाचे रोग वगैरे दोष उत्पन्न करतें.

**कथील मारण्याचा प्रकार**—एका मडक्यांत गाळलेलें कथील, त्याच्या चौथ्या हिश्या इतकें चिंचेच्या व पिंपळाच्या सालीचें चूर्ण घालून, लोखंडाच्या पळीनें दोन प्रहर ढवळावें, म्हणजे कथिलाचें भस्म होतें. नंतर त्या भस्मांत तितकाच हरताळ टाकून, त्याचें आंबट रसाबरोबर खलांत खूप मर्दन करावें. नंतर त्याला अग्नीच्या गजपुटांत शिजवून व त्यांत दहावा हिस्सा हरताळ घालून, आंबट रसांत एक प्रहर मर्दन करावें, व फिरून गज-

पुटांत तें शिजवावें. या रीतीनें दहा पुटें दिल्यावर उत्तम प्रकारचें भस्म तयार होतें.

**मारलेल्या कथिलाचे गुण**—कथील हलकें, शौचास साफ करणारें, रूक्ष, डोळ्यांस हितकर व किंचित् पित्त उत्पन्न करणारें आहे. तें कोड, प्रमेह, कफ, कृमि, पांडुरोग, व श्वास हे रोग बरे करतें. सिंह जसा हत्तीचा नाश करतो, तसें कथील सर्व प्रकारच्या प्रमेहाचा नाश करतें, शरीरास सुख देतें, इंद्रियांस प्रबळ करतें व देहास पुष्टि देतें.

**जस्त शुद्ध करण्याचा व मारण्याचा प्रकार**—वर कथिल शुद्ध करण्याचा जो प्रकार सांगितला आहे, त्याच प्रकारें जस्ताचीही शुद्धि होते. अशुद्ध कथिलाच्या उपयोगानें जे रोग उत्पन्न होतात, तेच अशुद्ध जस्तानेंही होतात. कथील मारण्याचा जो प्रकार, तोच जस्त मारण्याचाही समजावा.

**मारलेल्या जस्ताचे गुण**—मारलेलें जस्त शौचास साफ करणारें, कडवट व थंड आहे. तें कफाचा व पित्ताचा नाश करतें, डोळ्यांस हितकारक आहे, व प्रमेह, पांडुरोग व श्वास यांचा नाश करतें.

**शिसें शुद्ध करण्याचा प्रकार**—कथील शुद्ध करण्याचा जो प्रकार तोच शिसें शुद्ध करण्याचाही समजावा. अशुद्ध कथिलापासून जे रोग होतात, तेच अशुद्ध शिशापासूनही होतात.

**शिसें मारण्याचा प्रकार**—विड्याच्या पानांच्या रसांत मनशीळ बारीक खलून, त्याचा शुद्ध केलल्या शिशाला लेप करून गजपुट द्यावें. याप्रमाणें पुनः लेप करून अग्नीचीं बत्तीस गजपुटें

दिल्यावर, शिशाचें भस्म होतें. या भस्मांतून कितीही यत्न केला तरी फिरून शिसें निघत नाहीं.

**शिसें मारण्याचा प्रकार २रा**—मडक्यांत शिसें गाळून, त्याचा चौथा भाग पिंपळाच्या व चिंचेच्या सालींच्या चूर्णांत घालून, लोखंडाच्या पळीनें एक प्रहर ढवळीत बसावें, ह्मणजे शिशाचें भस्म होतें. मग तें भस्म, तितक्याच वजनाचा मनशीळ व कांजी यांत वांटून एका पंतींत ठेवावें, व त्यावर दुसरी झांकण ठेवावी. मग त्यास गजपुट देऊन शिजवावें. गजपुटाचा अग्नि विझून थंड झाल्यावर, फिरून मनशीळ व कांजी याबरोबर खलून, पंत्यांत घालून, आणखी गजपुट द्यावें. अशा प्रकारें साठ अग्नीचीं पुटें दिल्यानें शिशाचें उत्तम प्रकारचें भस्म होतें.

**मारलेल्या शिशाचे गुण**—हे गुण कथिलाच्या गुणांप्रमाणेंच आहेत. शिसें विशेषें करून प्रमेहाचा नाश करतें. शिशाचें सेवन सदोदित केलें असतां, तेणें करून बहुत बळ प्राप्त होतें, व्याधींचा नाश होतो, जीवित वाढतें, अग्नि प्रदीप्त होतो, व मरण दूर पळतें.

**लोखंड शुद्ध करण्याचा प्रकार**—लोखंडाचे पातळ पत्रे विस्तवांत तापवून तापवून, तेलांत, ताकांत, कांजींत, गोमूत्रांत व कुळिथांच्या काढ्यांत तीन तीन वेळां टाकून थंड करावे. ह्मणजे लोखंड शुद्ध होतें. अशुद्ध लोखंडापासून पांडुरोग, मरण, छातीचे रोग, शूळ, मुतखडा, तोंडाला चूळ सुटणें, आणि दुसरेही अनेक रोग उत्पन्न होतात.

**लोखंड मारण्याचा प्रकार**—पोलादाच्या चूर्णांत, त्याच्या दहाव्या भागा इतका हिंगूळ टाकून, कोरफडाच्या रसांत दोन प्रहर

खलून त्याला अग्नीचें गजपुट द्यावें. याप्रमाणें सात वेळां अग्नीचें पुट दिल्यावर पोलाद मरून जातें, व लोखंडाचें भस्म तयार होतें.

**लोखंड मारण्याचा उत्तम प्रकार २रा**—पाऱ्यांत त्याच्या दुप्पट गंधक टाकून, त्यांची कज्जली करावी. त्या कज्जलीच्या वजना-इतकें पोलादाचें चूर्ण त्यांत टाकून, कोरफडाच्या रसांत खूप खलून मर्दन करावें. नंतर या चूर्णाचा गोळा करून तो तांब्याच्या भांड्यांत ठेवून, त्याच्यावर एरंडाचीं पानें झांकण घालून, उन्हांत ठेवावा. याप्रमाणें दोन प्रहर उन्हांत ठेवल्यावर तो ऊन होईल. नंतर एका पेटींत ठेवून, धान्याच्या रांजणांत तीन दिवस पुरून ठेवावा. तिसरे दिवशीं बाहेर काढून, वांटून, फडक्यांतून गाळून घ्यावा. नंतर चौपट पाण्यांत डाळिंबाचीं पानें वांटून, त्यांचा रस काढावा व त्या रसांत हें चूर्ण कालवून पुन्हा सुकवावें. सुकल्यावर अग्नीचें गजपुट द्यावें. याप्रमाणें पुनःपुन्हा सुकवून, अग्नीचीं एकवीस गजपुटें द्यावीं, म्हणजे तें चूर्ण मरतें. सोनें वगैरे इतर धातु मारण्यासही हीही रीत उपयोगी पडते.

**मारलेल्या लोखंडाचे गुण**—मारलेलें लोखंड कडवट, शौचास साफ करणारें, थंड, तुरट, मधुर, जड, रुक्ष यौवनाला स्थिर ठेवणारें, नेत्राला हितकारक, मळ भेदणारें, वायुकारक असें आहे. तें कफ, पित्त, विष, शूळ, सूज, अर्श, कौलू, पांडुरोग, मेदोवृद्धि, प्रमेह, कृमि, व कोड यांचा नाश करतें. लोखंडाच्या किटांतही लोखंडाचेच गुण आहेत.

**सोनें शुद्ध करण्याचा प्रकार**.—जें सोनें तापविलें असतां लाल दिसतें, कापलें असतां पांढरें दिसतें व ओतलें असतां केशरा-सारखें दिसतें, ज्यांत रुप्याची व तांब्याची मिसळ नाहीं, जें स्निग्ध,

मऊ व जड आहे, अशा सोन्याचे पातळ पत्रे करून, विस्तवांत तापवून लाल करावे. नंतर तेलांत, ताकांत, कांजींत, गोमूत्रांत व कुळथांच्या काढ्यांत टाकून थंड करावे. याप्रमाणें तीन वेळां केल्यानें, सोनें शुद्ध होतें. सोनें बरोबर शुद्ध न झाल्यास, तें बळाचें व वीर्याचें हरण करतें, व अनेक रोगांस उत्पन्न करून, असुख व मरण देतें.

**सोनें मारण्याचा प्रकार.**—शुद्ध सोन्याचे फार पातळ पत्रे घेऊन व त्यांच्या दुप्पट वजनाचा पारा घेऊन, ते दोनही पदार्थ लिंबाच्या रसांत खलून, त्याचा गोळा करावा. त्याच्या वजनाइतकी गंधकाची पूड करून, त्या गोळ्याच्या चारी बाजूंस लावावी, आणि ज्या दोन पंत्यांत तो गोळा ठेवावयाचा, त्या पंत्यांसही लावावी. मग एका पंतींत तो गोळा ठेवून, दुसरी वर झांकण ठेवावी, आणि दृढ बांधून त्यांस कापडमातीनें लिपावें. सुकल्यावर तीस रानशेण्यांच्या विस्तवांत त्या पंत्या ठेवाव्या. सर्व शेण्या जळून गेल्यावर व राख थंड झाल्यावर, पंत्यांतील गोळा काढून, फिरून त्याचप्रमाणें कृति करून, तीस शेण्यांच्या आगींत गोळ्यासहित पंत्या ठेवाव्या. याप्रमाणें पुनःपुन्हा अग्नीचीं चवदा पुटें दिल्यावर, सोन्याचें भस्म होतें. प्रत्येक पुटाचे वेळीं, वर लिहिल्याप्रमाणें, गंधक वारंवार पसरीत जावा.

**सोनें मारण्याचा प्रकार २रा.**—पारा आणि गंधक समभाग घेऊन, कांचनाच्या रसांत त्यांस खलून कज्जली करावी. व तींपैकीं सोन्याच्या पत्र्याच्या इतक्या वजनाची घेऊन, तिचा त्या पत्र्यांस लेप करावा. नंतर कांचनाची साल बारीक वांटून, तिच्या ठेंच्याच्या दोन खोलगट पाऱ्या कराव्या. त्यापैकीं एकींत सोन्याचे ते पत्रे ठेवून, तो गोळा दोन पंत्यांच्या मध्यें घालून त्या पंत्यांस कापडमा-

तीचा थर द्यावा. सुकल्यावर त्या पंत्या अग्नींत ठेवून, त्यांस आंच द्यावी. याप्रमाणें तीन पुटें दिलीं असतां, सुवर्णाचें पूर्णपणें भस्म होतें. तें अनेक रोगांवर योजण्यास योग्य आहे. कांचन जसा सोन्यास मारतो तसा कलगारी, कलमाका, व मनशील या औषधिही मारतो.

**सोनें मारण्याचा प्रकार ३ रा.**—सोनें शुद्ध करून, त्यांत सोळावे भागाइतकें शिसें मिश्र करावें. नंतर त्या मिश्रणाचें चूर्ण करून व लिंबाच्या रसांत खलून, गोळा करावा, गोळ्याच्या वजनाइतकें गंधक घेऊन, त्याचें चूर्ण गोळ्यावर चारी बाजूस चिकटवून, बाकीचें दोन पंत्यांवर पसरावें. नंतर तो गोळा एका पंतींत घालून, दुसरी पंती वर ठेवावी व वट्ट बांधून त्यांवर कापडमातीचा थर द्यावा. सुकल्यावर वीस शेण्यांच्या विस्तवांत त्या पंत्या ठेवाव्या. याप्रमाणें अग्नीचीं सात पुटें द्यावीं म्हणजे सोन्याचें भस्म होतें. या प्रकारांतही पूर्वींप्रमाणेंच पंत्यांत गंधक पसरीत जावा.

**सोनें मारण्याचा ४ था प्रकार.**—मनशीळ आणि शेंदूर समभाग घेऊन, त्यांचें चूर्ण करावें. व त्यास रुईच्या चिकाची भावना द्यावी व तें उन्हांत सुकवावें. याप्रमाणें सात वेळ भावना देऊन, सुकल्यावर गाळलेलें सोनें घेऊन, त्यांत त्याच्या वजनाइतकें हें चूर्ण घालावें. व अग्नीची खूप आंच द्यावी, इतकी कीं सर्व चूर्ण नाहींसें होईल. याप्रमाणें मनशीळ व शेंदूर यांचें चूर्ण आंच देऊन देऊन जाळून टाकलें असतां, सोनें मरून जातें.

**मारलेल्या सोन्याचे गुण**—मारलेलें सोनें थंड, कामी पुरुषाला हितकारक, बळ देणारें, जड, जरेचा व व्याधीचा नाश करणारें, मधुर, कडवट, तुरट, पाकावस्थेंत मधुर, चिवट, पवित्र, पुष्टि देणारें,

डोळ्यांस हितकर, बुद्धि चांगली करणारें, स्मरण शक्ति देणारें, बुद्धीचें बळ वाढविणारें, सर्वांस प्रिय वाटणारें, व आयुष्य वाढविणारें असें आहे. तें कांति चांगली करतें, वाणी शुद्ध करतें, स्थिरता देतें, आणि विष, क्षय, उन्माद, तिन्ही दोष, ज्वर आणि शोष यांचा नाश करतें. सोनें चांगलें मारलेलें नसलें, तर त्यापासून वीर्याचा व बळाचा नाश होतो, रोग उत्पन्न होतात, आणि मरण देखील प्राप्त होतें.

**सुवर्णमाक्षिक शुद्ध करण्याचा प्रकार**–तीन भाग सुवर्णमाक्षिक आणि एक भाग सैंधव घेऊन, त्यांस मदनफळाच्या व लिंबाच्या रसांत लोखंडाच्या भांड्यांत शिजवावें. शिजतां शिजतां, लोखंडाचें भांडें लाल होई तोंपर्यंत हालवीत रहावें. असें केलें असतां, सुवर्णमाक्षिक शुद्ध होतें. अशुद्ध सुवर्णमाक्षिकाचे भस्मापासून अग्निमांद्य, बळाची अतिशय हानि, बद्धकोष्ठता, नेत्रांचे रोग, कोड आणि व्रण हे विकार उत्पन्न होतात.

**सुवर्णमाक्षिक मारण्याचा प्रकार**–सुवर्णमाक्षिक कुळिथांच्या काढ्यांत अथवा तेलांत अथवा ताकांत अथवा बकरीच्या मुतांत खलत घालून, उत्तम प्रकारें वांटून, अग्नीचा गजपुट द्यावा. ह्मणजे सुवर्णमाक्षिक मरतें.

**मारलेल्या सुवर्णमाक्षिकाचे गुण**–सुवर्णमाक्षिकांत सोन्याच्या गुणांसहित, आणखी इतर पदार्थांच्या संसर्गानें, दुसरेही गुण आहेत. सुवर्णमाक्षिक मधुर, कडवट, स्वर चांगला करणारें, कामी पुरुषाला हितकारक, जरा आणि व्याधि यांस प्रतिबंध करणारें, नेत्रांना हितकर असें असून, मूत्राशयाचे रोग, कोड, पांडुरोग, प्रमेह, विष, उदराचे रोग, अर्श, सूज, क्षय, कंडु व तिन्ही दोष यांस दूर करतें.

**रूपामुखी शुद्ध करण्याचा प्रकार**—रूपामुखी एक दिवसपर्यंत वांझ करटुली, मुरुडशेंग, आणि लिंबू यांत खलून, तिला कडकं ऊन देऊन सुकवावी, ह्मणजे ती शुद्ध होते. अशुद्ध रूपामुखीचे दोष अशुद्ध सुवर्णमाक्षिकाचे दोषासारखेच आहेत. यास्तव रूपामुखी शुद्ध केल्यावांचून ती भस्म करण्याकरितां घेऊं नये.

**रूपामुखी मारण्याचा प्रकार**—सोनामुखी मारण्याचा जो प्रकार तोच रूपामुखी मारण्यालाही कामास येतो.

**मारलेल्या रूपामुखीचे गुण**—रूपामुखीचे गुण रुप्याप्रमाणें असून, आणखी इतर पदार्थांच्या संसर्गानें वर सोनामुखीचे जे गुण सांगितले आहेत, तेही तिचे गुण आहेत, असें समजावें.

**मोरचुत शुद्ध करण्याचा व मारण्याचा प्रकार**—मोरचुतांत दहावा हिस्सा टांकणखार घालून मांजराच्या व पारव्याच्या विष्टेंत खूप खल करावा, व अग्नीचें हलकें पुट द्यावें, ह्मणजे मोरचूत शुद्ध होऊन मरतो.

**मारलेल्या मोरचुताचे गुण**—मोरचूत तिखट, खारट, तुरट, वमन करविणारा, हलका, मळाचा भेद करणारा, शौचास करणारा, थंड, डोळ्यांस हितकारक असा असून, कफ, पित्त, विष, मुतखडा, कोड व कंडु हे विकार दूर करतो.

**कांसें व पितळ शुद्ध करण्याचा प्रकार**—कांशाचे पातळ पत्रे तापवून तापवून, ते तेलांत, ताकांत, कांजींत, गोमूत्रांत व कुळिथांच्या काढ्यांत, अनुक्रमानें, तीन तीन वेळां, बुडवून थंड करावे, ह्मणजे कांसें शुद्ध झालें: पितळ शुद्ध करण्याचाही प्रकार हाच.

**कांसें व पितळ मारण्याचा प्रकार**—कांशाच्या पत्र्यांच्या वजना इतका गंधक घेऊन, तो रुईच्या चिकांत खलावा नंतर आंबट रसांत वारंवार शुद्ध केलेल्या कांशाच्या पत्र्याला लेप करून, दोन परळांच्या मध्यभागीं ते पत्रे ठेवून, त्यास अग्नीचें गजपुट द्यावें. याप्रमाणें दोन पुटें दिलीं असतां, कांशाचें भस्म होतें. हाच पितळ मारण्याचाही प्रकार समजावा.

**मारलेल्या कांशाचें व पितळेचे गुण**—कांसें तुरट, तीक्ष्ण, उष्ण, मळ भेदणारें, आर्द्रपणा दूर करणारें, शौचास करणारें, जड, डोळ्यांस हितकारक, रूक्ष असें असून, कफ व पित्त यांस हरतें. पितळ हें रूक्ष, कडवट, रसानें खारट, मळसमूहाला दूर करणारें, पांडुरोगाचा नाश करणारें व कृमिदोष बरा करणारें असें आहे.

**शेंदूर शुद्ध करण्याचा प्रकार**—दूध आणि आंबट रस यांच्या योगानें शेंदूर शुद्ध होतो.

**शेंदुराचे गुण**—शुद्ध शेंदूर उष्ण असून, विसर्प, कोड, कंडु, व विष यांचा नाश करतो, मोडलेले अवयव सांधतो, व व्रण शुद्ध करून रुजवितो.

**शिलाजित शुद्ध करण्याचा प्रकार**—जो शिलाजित गोमूत्रासारख्या गंधाचा, काळा, स्निग्ध, कोमल, जड, कडवट, तुरट व थंड असा असेल, तोच औषधाचे कामास उपयोगीं आहे. यास्तव पुढें सांगितल्याप्रमाणें तो शुद्ध करावा. शुद्ध केल्यावांचून तो निरुपयोगी आहे. शिलाजिताचे खडे आणून, त्याचे लहान लहान तुकडे करावे, व आधणाच्या पाण्यांत ते टाकून, एक प्रहरपर्यंत ते राहूं द्यावे. नंतर तें पाणी पांढऱ्या स्वच्छ वस्त्रांत गाळून घ्यावें, व तें मातीच्या भांड्यांत ओतून, उन्हांत ठेवावें. याप्रमाणें केल्यावर

त्या पाण्यावर साईसारखा साखा जमेल. तो काढून घेऊन दुसऱ्या भांड्यांत ठेवावा. नंतर या साख्यास फिरून ऊन पाण्याचा संस्कार देऊन, पाण्यांत चांगल्या प्रकारें खळबळून, तें पाणी वस्त्रांतून गाळून, मातीच्या भांड्यांत भरून, उन्हांत ठेवावें. ह्मणजे या पाण्यावर साईसारखा जो साखा येईल तो काढून घेऊन, फिरून दुसऱ्या भांड्यांत ठेवावा. याप्रमाणें दोन महिनेपर्यंत फिरून फिरून कृति केली असतां, पाण्यावर साखा येणें बंद होईल, व सर्व काळा भाग खालीं राहील. हा काळा भाग ह्मणजे शुद्ध झालेला शिलाजित समजावा. शिलाजित निखाऱ्यांवर टाकला असतां, शिवलिंगासारखी आकृति होऊन, धूर निघणार नाहीं असें झालें ह्मणजे तो शुद्ध आहे असें समजून, वाटेल त्या कामांत योजण्यास योग्य होतो.

**शुद्ध केलेल्या शिलाजिताचे गुण**—शिलाजित हा कडवट, तिखट, उष्ण, पाकावस्थेंत तिखट असून, जरा व अकाल मृत्यु यांचा प्रतिबंध करतो; संसर्गी पदार्थांचे गुण ग्रहण करतो; आणि कफ, प्रमेह, पाणथरी, मूत्रकृच्छ्र, क्षय, श्वास, सूज, अर्श, पांडुरोग, वातरक्त, कोड, वायु व उदराचे रोग यांचा नाश करतो.

**अभ्रक शुद्ध करण्याचा प्रकार**—काळा अभ्रक कोळशांत घालून, अग्नि खूप पेटवावा. अभ्रक लाल झाला ह्मणजे तो दुधांत टाकून, थंड करावा. नंतर त्याचे पदर वेगळे वेगळे करून, तांदूळजाच्या व लिंबाच्या रसांची आठ प्रहरपर्यंत भावना द्यावी. असें केलें असतां, अभ्रक शुद्ध होतो. अशुद्ध अभ्रक अनेक प्रकारची पीडा करतो, हृदयांत व कुशींत असह्य व्यथा उत्पन्न करतो, दाह उत्पन्न करतो, आणि कोड, क्षय, व पांडुरोग हे विकार उत्पन्न करतो. यास्तव अभ्रक शुद्ध करूनच, त्याचें भस्म करावें.

**अभ्रक मारण्याचा प्रकार**—पुढें लिहिल्याप्रमाणें धान्याभ्रक तयार करून, तें सुकवावें व खलांत एक दिवसपर्यंत रुईच्या चिकांत त्याचें मर्दन करावें. नंतर त्याच्या चाक्या करून, रुईच्या पानांत गुंडाळून, उत्तम प्रकारचें अग्नीचें गजपुट द्यावें. अग्नि थंड होतांच त्या चाक्या काढून घेऊन, रुईच्या चिकांत फिरून खलाव्या. व फिरून चाक्या करून रुईच्या पानांत गुंडाळून त्यास गजपुट द्यावें. याप्रमाणें सात वेळ कृति केल्यावर, वडाच्या पारंब्यांच्या काढ्यांत खलांत मर्दन करून, तीन वेळ अग्नीचें गजपुट द्यावें. असें केलें असतां, अभ्रक हटकून मरतो. नंतर लोखंडाच्या पात्रांत मेलेल्या अभ्रकाच्या वजना-इतकें तूप घालून, त्यांत तो अभ्रक कढवावा. अभ्रकाला हें सगळें तूप पचलें ह्मणजे सर्व प्रयोगांत योजण्याला तो योग्य झाला असें समजावें.

**धान्याभ्रक करण्याचा विधि**—अभ्रकाच्या वजनाच्या चौथ्या हिश्या-इतकें भात घेऊन, त्यांतच अभ्रक घावळींत बांधून, तीन रात्री पाण्यांत बुडवून ठेवावा. नंतर भिजलेला तो अभ्रक हातानें चोळून, घावळींतून गाळावा. घावळींतून रेतीसारखा सूक्ष्म अभ्रक खालीं पडेल, त्यासच धान्याभ्रक ह्मणतात. तो कसा मारावा हें वर सांगितलेंच आहे."

**मारलेल्या अभ्रकाचे गुण**—मारलेला अभ्रक तुरट, मधुर, फार थंड, आयुष्य व धातु यांची वृद्धि करणारा असून, त्रिदोष, व्रण, प्रमेह, कोड, कौलू, पोटांतील गांठ, विष व कृमि यांचा नाश करतो. जर मारलेला अभ्रक सदोदित सेवनांत येईल तर रोग टळतील व शरीर दृढ होईल, वीर्याची वृद्धि होईल, तरुण स्त्रियांशीं सुखसंभव होऊं शकेल व उत्तम मुलें बाळें होतील.

**हरताळ शुद्ध करण्याचा प्रकार**–हरताळाची पूड करून, ती एक प्रहरपर्यंत दोलायंत्रांत कांजीमध्यें उकडावी. नंतर आणखी एक प्रहरपर्यंत कोहळ्याच्या रसांत, एक प्रहरपर्यंत तिळांच्या तेलांत, आणि एक प्रहरपर्यंत हरडा, बेहळा आणि आंवळकटी यांच्या पाण्यांत उकडावी. याप्रमाणें दोलायत्रांत चार प्रहरपर्यंत उकडल्यावर हरताळ शुद्ध झाला असें समजावें. अशुद्ध हरताळ आयुष्याचें हरण करतो, ताप उत्पन्न करतो, कोड उत्पन्न करतो, अंगाचा संकोच करतो, आणि वायु व प्रमेह उत्पन्न करतो. यास्तव हरताळ शुद्ध केल्यावरच भस्म करण्याला योग्य आहे.

**हरताळ मारण्याचा प्रकार**—शुद्ध केलेले हरताळाचे पत्रे एक दिवसपर्यंत पुनर्नव्याच्या रसांत खलून सुकवावे. नंतर एका मडक्यांत ठेवून, त्याच्या अर्ध्या-इतका पुनर्नव्याचा खार घालून त्यावर हरताळाचा गोळा ठेवावा, आणि त्यावर फिरून त्या मडक्याच्या गळोंगळ पुनर्नव्याचा खार भरावा. नंतर झाकण ठेवून तें मडकें चुलीवर चढवावें, आणि हळू हळू ताप वाढवीत जावा. एकसारखा पांच अहोरात्र अग्नीचा ताप दिल्यावर हरताळ मरतो.

**मारलेल्या हरताळाचे गुण**–हरताळ तिखट, स्निग्ध, तुरट व उष्ण आहे. विष, कंडु, कोड, तोंडाचे रोग, रुधिरदोष, कफ व पित्त, यांचा तो नाश करतो. हरताळ रोगांचा प्रतिबंध करतो; इतकेंच नव्हे, तर कांति चांगली करतो, वीर्यवृद्धि करतो, व दीर्घायुष्य देतो.

**मनशीळ शुद्ध करण्याचा प्रकार**–मनशीळ तीन दिवसपर्यंत दोलायंत्रांत घालून, बकरीच्या मुतांत उकडावा. नंतर त्याला बकरीच्या पित्ताची सात वेळां भावना द्यावी; ह्मणजे मनशीळ शुद्ध

झाला. अशुद्ध मनशीळ बळ मंद करतो, मळबंध करतो, मूत्राचा अवरोध करतो आणि शर्करायुक्त मूत्रकृच्छ्र उत्पन्न करतो.

**शुद्ध केलेल्या मनशीळाचे गुण**-शुद्ध केलेले मनशीळ जड, वर्ण चांगला करणारा, शौचास साफ करणारा, उष्ण, मलाचा भेद करणारा, तिखट, कडवट व स्निग्ध असून, विष, श्वास, खोकला, कफ व रक्तदोष हे विकार दूर करतो. मनशीळ हा हरताळाचाच एक प्रकार आहे. फरक एवढाच की हरताळ फार पिवळा असतो, व मनशीळ तांबडा असतो.

**कलखापरी शुद्ध करण्याचा प्रकार**—कलखापरी ही मोर्चुताचीच एक जात आहे. कलखापरी दोलायंत्रात सात दिवसपर्यंत मनुष्याच्या मुतांत व सात दिवसपर्यंत गाईच्या मुतांत उकडावी. म्हणजे ती शुद्ध झाली. शुद्ध केल्यावरच तिची औषधांत योजना करावी.

**शुद्ध केलेल्या कलखापरीचा गुण**-ही तिखट, खारट, तुरट, वमन करविणारी. हलकी, मळ भेदणारी, शौचास करणारी, थंड, डोळ्यांस हितकारक असून, कफ व पित्त यांचे हरण करते. व विष, मुतखडा, कोड आणि कंडु, यांचा नाश करते.

**उपरस शुद्ध करण्याचा साधारण प्रकार**-गार, तुरटी, खडू, कवडी, रेती, हिराबोळ, व सोरटी माती इत्यादि उपरस हे हिरवा माका, खाजरा सुरण, रानकेळ, कुकडवेल, शेगवा, कडु घोसाळें, वांझकरटुली, पिलुडी आणि वाळा यापैकीं कोणत्याही एकाचा रस, जवखार, टांकणखार, साजीखार, पंचलवण आणि आंबट पदार्थांचा रस यांत एक दिवसपर्यंत भिजवून ठेवावे, नंतर दोलायंत्रांत आणखी एक दिवसपर्यंत वर सांगितलेल्या पदार्थांच्या रसांत उकडावे, म्हणजे ते शुद्ध होतात.

**अभ्रक उपरस शुद्ध करण्याचा विशेष प्रकार**—कंकुष्ठ (ज्याच्या योगानें रेच होतात), गेरु, शंख, हिराकुस, टांकणखार, सुरमा, निरनराळ्या जातींच्या शिंप्या, कवडे आणि कवड्या, यांस लिंबाच्या मांत, उकडून किंचित् ऊन पाण्यानें धुतलें असतां, तीं शुद्ध होत ।.

**हिरा शुद्ध करण्याचा प्रकार**—भुईरिंगणीच्या कांद्यांत हिरा घालून, दोलायंत्रांत कुळिथांच्या आणि कोद्रूच्या काढ्यांत तीन दिवसपर्यंत उकडला असतां तो शुद्ध होतो, अथवा भुईरिंगणीच्या कांद्यांत हिरा घालून, तो कांदा म्हशीच्या शेणांत लिपून, चार प्रहर रात्रपर्यंत रानशेण्यांच्या विस्तवांत शिजवावा, आणि सकाळीं घोड्याच्या मुतांत टाकून थंड करावा. याप्रमाणें एकामागून एक सात रात्रीपर्यंत कृति केली असतां हिरा शुद्ध होतो.

**हिरा मारण्याचा प्रकार**—हिरा तापवून तापवून, हिंग आणि सैंधेलोण यांची पूड घातलेल्या कुळीथाच्या काढ्यांत तो टाकावा. याप्रमाणें एकवीस वेळां केलें असतां, हिऱ्याचें भस्म होतें. अथवा मेंढ्याचें शिंग, सर्पाचें हाड, खेकड्याची पाठ, आंवळ्यांचें चूर्ण आणि ससाचे दांत हे पदार्थ समभाग घेऊन, थोर वृक्षाच्या चिकांत खलून, त्याचा गोळा करावा. मग त्यांत हिरा ठेवून अग्नीचें पुट द्यावें, म्हणजे हिरा तत्काळ भस्म होतो.

**मारलेल्या हिऱ्याचे गुण**—हिऱ्याचें भस्म सेवन केलें असतां आयुष्य वाढतें, पुष्टि येते, बळ व वीर्य यांची वृद्धि होते, शरीराचा वर्ण चांगला होतो, सुख प्राप्त होतें, आणि अनेक प्रकारचे रोग नाश पावतात.

**इतर रत्नें शुद्ध करण्याचा व मारण्याचा प्रकार व त्यांच्या भस्माचे गुण**—माणिक वगैरे सर्व रत्नें हिऱ्याप्रमाणेंच शुद्ध करावीं व मारावीं. शुद्ध करून मारलेल्या रत्नाचा गुण शीतवीर्य. मधुर. रसानें तुरट, नेत्राला हितकारक, मळाचा भेद करणारा, शोषनाश करणारा, व विषाचें हरण करणारा, असे आहेत.

**मंडूर करण्याचा प्रकार**—वेहळ्याच्या लांकडाचे कोळसे करून ते पेटवावे; व त्यांत लोखंडाचें कीट तापवून लाल करावें व सात वेळ गोमूत्रांत टाकावें. नंतर लोखंडाच्या किटाचें ठेंचून चूर्ण करावें, आणि त्यांत त्याच्या दुप्पट त्रिफळाचा क्वाथ घालून तें मडक्यांत भरावें. तोंडावर कापडमातीचें लिंपण घालून, एकवीस रानशेण्यांचें गजपुट द्यावें, म्हणजे शुद्ध मंडूर तयार होतो.

**योगराज गुग्गुळ**—चित्रक, पिंपळमूळ, यवान, शोपा, वावडिंग, ओंवा, जिरें, शाहाजिरें, देवदार, चवक, वेलची, सैंधव, कोष्ट, रासना, गोखरू, धणे, हरडा, वेहळा, आंवळकटी, नागरमोथा, सुंठ, मिरीं, पिंपळी, दालचिनी, वाळा, जवखार, तालिसपत्र आणि तमालपत्र, यांचें बारीक चूर्ण करून त्यांत चूर्णाइतका गुग्गुळ घालून, तो तुपाबरोबर खूप खलून मिश्रित करावा. मग तो गुग्गुळ तुपाच्या रामलेल्या मडक्यांत भरून ठेवावा. मनास आवडेल तसा आहार केला असतांही, या गुग्गुळाची मात्रा सेवन केल्यावर, अग्नीचा मंदपणा, उदराचे रोग, पोट चढणें, अर्श, आमवात वगैरे रोग, कृमि, दुष्ट व्रण आणि कोड यांचा नाश होतो. त्याचप्रमाणें अग्नि प्रदीप्त होऊन, त्याची वृद्धि होते, आणि बळ वाढतें. हा गुग्गुळ सांध्यांतील व मज्जेंतील वायुसंबंधी रोगाचें हरण करतो.

**कांचनार गुग्गुळ**—कांचनार झाडाची साल चाळीस तोळे, हरडा, बेहडा आणि आंवळकटी हे पदार्थ आठ आठ तोळे, सुंठ, मिरें आणि पिंपळी हे चार चार तोळे, वायवर्णा चार तोळे आणि वेलची, दालचिनी व तमालपत्र हे एकेक तोळा, याप्रमाणें सर्व जिन्नस घेऊन, त्यांचें चूर्ण करून, त्यांत त्या चूर्णाइतकाच शोधलेली गुग्गुळ घालावा व सर्वांचा एक गोळा करावा. नंतर त्या गोळ्यांतून चोवीस गुंजांची एकेक गोळी करून, तीं नित्य प्रातःकाळीं सुंठीच्या काढ्यांत अथवा खैरसाराच्या अथवा हरड्याच्या काढ्यांत अथवा ऊन पाण्यांत खावी. या गोळ्यांच्या सेवनानें गंडमाळा, अपाचन, अर्बुद, गांठी, व्रण, गुल्म, कोड व भगंदर हे रोग नाश पावतात.

**सितोपलादि चूर्ण**—सोळा तोळे खडीसाखर, आठ तोळे वंशलोचन, चार तोळे पिंपळी, दोन तोळे वेलची, आणि एक तोळा दालचिनी, यांचें कुटून चूर्ण करावें. हेंच सितोपलादि चूर्ण. हें मध आणि तूप यांत घेतलें असतां, खोकला, दमा, क्षय, हात, पाय, व अंग यांचा दाह, अग्निमांद्य, कुशींत दुखणें, अरुचि, ज्वर, पडसें, नाकांतून वगैरे पडणारें रक्त आणि पित्त हे विकार तत्काळ नाहींतसे करतें.

**त्रिवृतादि चूर्ण**—निशोत्तर, कचोरा, खपाट, रासना, सुंठ, हरडे आणि एरंडमूळ यांचें जें चूर्ण त्यास त्रिवृतादि चूर्ण ह्मणतात. हें चूर्ण खाल्लें असतां अथवा त्याचा गोमूत्रांत काढा करून प्याला असतां, तो कफ व छातीचे रोग यांचा नाश करतो.

**हिंग्वाष्टक चूर्ण**—सुंठ, मिरें, पिंपळी, ओंवा, सैंधव, जिरें, शहाजिरें आणि हिंग, हीं द्रव्यें समभाग घेऊन चूर्ण करावें. तें

तुपाबरोबर जेवणापूर्वी एक दोन घांसाबरोबर कालवून खावें ; ह्मणजे जठराग्नि प्रदीप्त होतो, आणि वायुसंबंधी रोगही बरे होतात.

**वृद्धगंगाधर चूर्ण**–नागरमोथा, अरलू, सुंठ, धायटी, लोध्र, वाळा, बेलफळ, मोचरस ( सांवरीचा डीक ), पहाडमूळ, इंद्रजव, कडासाल, आंब्याची कोय, लाजाळू आणि अतिविष, यांचें चूर्ण करून, मध आणि तांदुळाचें धुवण याच्या बरोबर प्यालें असतां, प्रवाहिका, सर्व प्रकारचे अतिसार आणि ग्रहणी रोग तत्काळ बरे होतात. हें वृद्धगंगाधर चूर्ण गंगेच्या प्रवाहाप्रमाणें मळास आवरून धरतें.

**सुदर्शन चूर्ण**–हरडा, बेहळा, आंवळकटी, हळद, दारुहळद, बैठी भुईरिंगणी, उभी भुईरिंगणी, कचोरा, सुंठ, मिरें, पिंपळी, पिंपळमूळ, लहान कांगोणी, गुळवेल, धमासा, कटुकी, पित्तपापडा, नागरमोथा, त्रायमाण, वाळा, कडुलिंब, कोष्ट, जेष्टीमध, कडासाल, यवान, इंद्रजव, भारंग, शेगवा, शेगव्याचें बीज, सोरटी माती, वेखंड, दालचिनी, पद्मकाष्ट, काळावाळा, चंदन, अतिविषाची कळी, अतिबला, मोठी सालवण, गांव सालवण, वावडिंग, तगर, चित्रक, देवदार, चवक, तमालपत्र, कडू शिराळें, ऋषभक, जीवक, लवंग, वंशलोचन, पांढरें कमळ, कंकोळीचीं पानें, जायपत्री, आणि तालिसपत्र हीं औषधें समभाग घेऊन, त्यांचें चूर्ण करून, त्यांत या सर्व चूर्णाच्या अर्ध्या वजना इतका किराईत घालावा, ह्मणजे सुदर्शन चूर्ण तयार होतें. हें चूर्ण तीनही दोष, सर्व प्रकारचे ज्वर, प्रमेह, बेशुद्धि, भ्रम, तृषा, खोकला, श्वास, पांडुरोग, छातीचे रोग, कामळा आणि शूळ यांस दूर करतें. सर्व प्रकारचे ज्वरांचा प्रतिबंध करण्याकरितां हें चूर्ण थंड पाण्यांत प्यावें. या चूर्णांत भारंगी न मिळेल तर भुईरिंगणीचें मूळ, सोरटी माती

न मिळेल तर फटकी, आणि तालीसपत्र न मिळेल तर भुईरिंगणीचें मूळ हे प्रतिनिधि घ्यावे. जीवक, ऋषभक आणि काकोली हीं औषधें मिळत नाहींत. यास्तव जीवक व ऋषभक यांच्या ऐवजीं विदारीकंद दोन भाग, आणि काकोलीच्या ऐवजीं आस्कंदाचें मूळ घ्यावें.

लाईचूर्ण—एक तोळा गंधक आणि अर्धा तोळा पारा घेऊन त्यांची कज्जली करावी. तींत तीन तोळे त्र्यूषण ( सुंठ, मिरें आणि पिंपळी ) दीड तोळा पंचलवण, ( लोण, टाकणखार, सैंधेलोण, बीडलोण, संचळ खार ) आणि एकेक तोळा भाजलेला हिंग, जिरें, शहाजिरें, आणि या सर्वांच्या वजनाच्या अर्ध्यानें भांग घालून, ताकाबरोबर अथवा बेलफळाच्या गिराबरोबर हें चूर्ण चोवीस गुंजा खावें ह्मणजे शौचाचा विकार बरा होतो.

मरिचादि तेल—मिरें, हरताळ, नारळ, रुईचा चीक, कळलावी, कुचला, हळद, बचनाग, कडुलिंब, नागरमोथा आणि इंद्रजव यांचा काढा घालून, त्यांच्या चौपट गोमूत्र घेऊन, त्यांत तेल उकळावें. यासच मरिचादि तेल ह्मणतात. हें तेल चोळल्यानें वातरक्त नाहींसा होतो.

बृहन्मरिचादि तेल—मिरें, निशोत्तर, नेपाळाचें मूळ, रुईचा चीक, शेगाचा रस, देवदार, हळद, दारुहळद, जटामांसी, कोष्ट, रक्तचंदन, इंद्रवारुणी, कण्हेरीचें मूळ, हरताळ, मनशीळ, चित्रक, कळलावी, वावडिंग, टाकळा, शिरीष इंद्रजव, कडुलिंब, सप्तपर्ण गुळवेल, थोर, बहाव्याचा गीर, करंज, खैर, मालकांगोणी, पिंपळी व वेखंड, हीं द्रव्यें चार चार तोळे व बचनाग आठ तोळे घ्यावा. नंतर एका मातीच्या किंवा लोखंडाच्या भांड्यांत चौपट गोमूत्र व एकपट

शिरसाचें तेल असें दोनशें छपन्न (२५६) तोळे मिश्रण घालून, त्यांत वरील सर्व द्रव्यें घालावीं आणि तें हळू हळू मंदाग्नीवर उकळत ठेवावें, ह्मणजे जें तेल सिद्ध होतें त्यास बृहन्मरिचादि तेल ह्मणतात. हें तेल लावलें असतां, कोडाचे व्रण, वातरक्त, खाज, विस्फोटक आणि विचर्चिका यांचा नाश होतो.

**लक्ष्मीविलास तेल**—वेलची, चंदन, रासना, लाख, नखला, कापूर, मरीच कंकोळ, मोथा, बळदाणा, दालचिनी, देवदार, काळा अगरु, तगर, जटामांसी व कोष्ट, हीं द्रव्यें समभाग घेऊन, त्यांत तिप्पट राळ टाकून डमरुयंत्रानें त्याचें तेल काढावें. त्यास लक्ष्मी-विलास तेल ह्मणतात. या तेलाचा युक्तीनें उपयोग केला असतां, वातरोगाचा व दुसऱ्या अनेक रोगांचा नाश होतो. विड्याच्या पानास लावून हें तेल खाल्लें असतां, जठराग्नि प्रदीप्त होतो. शरीरास चोळलें असतां, अर्श व क्षयरोग यांचा नाश होतो. याच तेलास सुगंधी फुलांची वगैरे भावना दिली असतां, त्यास गंधतेल ह्मणतात.

**लाक्षादि तेल**—तेल, लाखेचा काढा आणि दूध, हीं द्रव्यें चौसष्ट चौसष्ट तोळे घेऊन, त्यांचा क्वाथ करून, चतुर्थांश अवशिष्ट राहिला ह्मणजे त्यांत लोध्र, कायफळ, मंजिष्ठ, मोथा, नागकेशर, पद्मकाष्ट, वाळा आणि ज्येष्ठीमध, यापैकीं प्रत्येक द्रव्याचा चार चार तोळे कल्क घालून, अग्नीवर उकळावें, ह्मणजे तेल सिद्ध होतें. या तेलानें दंतरोग बरे होतात, आणि अभ्यंग केला असतां सर्व प्रकारचे ज्वर नाश पावतात.

**कुंकुमादि तेल**—केशर, चंदन, लोध्र, पतंग, रक्तचंदन, वाळा, मंजिष्ठ, जेष्ठीमध, तमालपत्र, पद्मकाष्ठ, कमळ, कोष्ठ, गोरोचन,

हळद, लाख, दारुहळद, सोनकाव, नागकेशर, किंशुक गवला, वडाच्या कोंवळ्या पारंब्या, मालती, मेण, सर्षप आणि सुगंधी वेखंड यापैकीं प्रत्येक द्रव्य एकेक तोळा घेऊन, चौपट दुधांत वांटून, एकशें अठ्ठावीस तोळे तेलांत घालून, तें तेल मंदाग्नीवर कढवावें, ह्मणजे कुंकुमादि तेल सिद्ध होतें. हें तेल तोंडावर चोळलें असतां, तोंडावरचे डाग, तीळ, चामखीळ, शिबें वगैरे विकार नाहींतसे होतात.

**इरिमेदादि तेल**—काळ्या खैराची साल चारशें तोळे घेऊन, ती कुटून एक हजार चौवीस तोळे पाण्यांत टाकून पाक करावा. चतुर्थांश पाणी राहिलें असतां, त्यांत दोनशें छपन्न तोळे तेल घालावें, आणि काळा खैर, लवंग, सोनकाव, अगरु, पद्मकाष्ठ, मंजिष्ठ, लोध्र, जेष्ठीमध, लाख, वड, मोथा, दालचिनी, जायफळ, कापूर, मरीच कंकोळ, पांढरा खैर, पतंग, धायटीचीं फुलें, बारीक वेलची, नागकेशर व कायफळ, ह्या द्रव्यांचा एकेक तोळा कल्क त्यांत घालावा. मग तें मिश्रण कढवून कढवून, तेल सिद्ध झालें, ह्मणजे तें गाळून घ्यावें. त्यासच इरिमेदादि तेल ह्मणतात. या तेलानें तोंडाचे रोग, दुष्ट झालेलें दांताचें मांस, दांताचीं छिद्रें आणि दुर्गंध वगैरे विकार दूर होतात.

**कंटकारी अवलेह**—चारशें तोळे भुईरिंगणी घेऊन तिचा एक हजार चोवीस तोळे पाण्यांत काढा करावा. चतुर्थांश अवशिष्ठ राहिल्यावर, त्यांत चार तोळे चवक, चार तोळे चित्रक, चार तोळे मोथा, चार तोळे काकडाशिंग, चार तोळे सुंठ, चार तोळे मिरीं, चार तोळे पिंपळी, चार तोळे धमासा, चार तोळे भारंग, चार तोळे रासना, चार तोळे कचोरा, ऐंशी तोळे खडीसाखर या सर्वांचें चूर्ण, बत्तीस तोळे तूप आणि बत्तीस तोळे

तेल हीं सर्व द्रव्यें घालून उकळावीं. त्यांचा शिरा झाला ह्मणजे थंड झाल्यावर त्यांत बत्तीस तोळे मध, आठ तोळे वंशलोचन, आणि सोळा तोळे पिंपळी हीं द्रव्यें घालावीं, ह्मणजे अवलेह सिद्ध झाला. तो चांगल्या, बळकट मातीच्या घागरींत ठेवावा. हा अवलेह सेवन केल्यानें, उचकी, खोकला आणि श्वास हे विकार पूर्णपणें बरे होतात.

**हरड्यांचा अवलेह**—( भृगु हरीतकी ) मूळ, साल आणि पानें यांसहित चारशें तोळे भुईरिंगणी, आणि शंभर हरडे यांचा, एक हजार चोवीस तोळे पाणी घेऊन, एका भांड्यांत, काढा करावा. उकळून उकळून चतुर्थांश पाणी उरलें ह्मणजे तें पातळ वस्त्रांतून गाळून घ्यावें. मग त्यांत पुन्हा शिजवलेले ते शंभर हरडे घालून, आणखी चारशें तोळे गूळ घालून, त्यांचा पाक करावा, विस्तवावर उत्तम प्रकारें पाकल्यावर खालीं उतरून थंड होऊं द्यावा. मग त्यांत सुंठ, मिरें, पिंपळी, वेलची, दालचिनी, तमालपत्र आणि नागकेशर हीं द्रव्यें, प्रत्येक चार चार तोळे घेऊन, घालावीं आणि मध चोवीस तोळे घालावी. या सर्वांचें मिश्रण झालें ह्मणजे भृगु हरीतकी अवलेह सिद्ध झाला. हा अवलेह, शरीराचें व अग्नीचें बळ पाहून, सेवन केला असतां, तो वायुसंबंधी खोकला, पित्तसंबंधी खोकला, कफसंबंधी खोकला, दोन दोषांमुळें झालेला खोकला, तिन्ही दोषांपासून झालेला खोकला, उरःक्षतापासून झालेला खोकला, क्षयाचा खोकला, श्वास, पडसें आणि अकरा स्वरूपांचा उग्र क्षयरोग या सर्वांचा नाश करतो.

**पुनर्नवा-आसव**—रक्त पुनर्नवा, पहाडमूळ, नेपाळ्याचें मूळ, गुळवेल, चित्रक, भुईरिंगणी, हरडे, वेहळे व आंवळकटी हीं द्रव्यें

प्रत्येक आठ आठ तोळे घेऊन, दोन हजार अठ्ठेचाळीस तोळे पाण्यांत घालून, काढा करावा. अर्धे पाणी उरल्यावर गाळून घेऊन, थंड होऊं द्यावें. मग त्यांत दोनशें तोळे जुना गूळ व दोनशें छप्पन्न तोळे मध घालून, एक महिना तुपाच्या रामलेल्या मडक्यांत भरून ठेवावें, ह्मणजे पुनर्नवा-आसव सिद्ध झाला. नंतर त्यांत चार तोळे जवाचें चूर्ण आणि दोन दोन तोळे नागकेशर, दालचिनी, वेलची, मिरें, वाळा, तमालपत्र व गंधक हीं द्रव्यें घालून, हा आसव, व्याधीचें बलाबळ पाहून, योग्य मात्रेनें मधांत घ्यावयास द्यावा. याच्या योगानें छातीचे रोग, पांडुरोग, सूज, कावीळ, भ्रम, अरुचि, प्रमेह, गुल्म, भगंदर, अर्श, उदररोग खोकला, श्वास, ग्रहणी रोग, कोड, कंडु, शाखागत वायु, बद्धकोष्ट, उचकी व हलीमक, हे विकार नाश पावतात. या आसवावर मांसरसाचें पथ्य करावें.

**द्राक्षासव**—चारशें तोळे काळीं द्राक्षें घेऊन, आठ हजार एकशें बहात्तर तोळे पाण्यांत घालून, चतुर्थांश पाणी उरे इतकें कढवावें, व वस्त्रगाळ करून घ्यावें. या काढ्यांत चारशें तोळे मध, चारशें तोळे खडीसाखर, व अठ्ठावीस तोळे धायटीचीं फुलें घालून, तुपाच्या रामलेल्या मडक्यांत ठेवावा. आणि त्यांत दोन दोन तोळे जायफळ, लवंग, मरीच कंकोळ, हरपररेवडीचीं फळें आणि चंदन, यांचें चूर्ण टाकावें, व पुढें एक दिवस तसेंच ठेवावें, ह्मणजे तो द्राक्षासव तयार झाला. त्याच्या सेवनानें अर्श, शोष, अरुचि, छातीचे रोग, पांडुरोग, रक्तपित्त, भगंदर, गुल्म, उदररोग, कृमि, गांठ आणि ज्वर यांचा नाश करून, कांति आणि बळ वाढवितो.

**दोषघ्न लेप**—पुनर्नवा, देवदार, सर्षप, सुंठ आणि शेगव्याची साल हीं पांच औषधें आंबट रसांत वांटून, त्याचा लेप केला असतां, सर्व प्रकारची सूज बरी होते.

**दशांग लेप**—शिरीष, जेष्ठीमध, तगर, रक्तचंदन, वेलचें, जटामांसी, हळद, दारुहळद, कोष्ठ आणि वाळा, या द्रव्यांचें चूर्ण करून, त्यांत पांचव्या भागाइतकें तूप घालावें, नंतर पाण्यांत कालवून त्याचा लेप करावा, ह्मणजे विसर्प, विष, विस्फोटक, सूज आणि दुष्टव्रण यांचा नाश होतो. यास दशांग लेप ह्मणतात.

**चंद्रोदया वर्ति**—शंखाचें उदर, वेहळ्याचा गर्भ, हरडे, मनशीळ, पिंपळी, मिरें, कोष्ठ आणि वेखंड, हीं द्रव्यें समभाग घेऊन, वकरीच्या दुधांत वांटून, एक एरंडीच्या वजनाची जवासारख्या आकाराची वात करावी. हीच चंद्रोदया वर्ति. ही वात पाण्यांत उगाळून, डोळ्यांत अंजन करावें; ह्मणजे तिमिर, मांसाची वृद्धि, कांच, पडळ, पापणीच्या आंतली गांठ, रातांधळें आणि एक वर्षाचें फूल हे विकार बरे होतात.

**जात्यादि तूप**—चमेलीचीं पानें, कडुशिराळें, कडुलिंब, कटुकी, हळद, दारुहळद, उपलसरी, मंजिष्ठ, मोरचुत, कलखापरी, मेण, जेष्ठीमध आणि करंजाचें बीज, यांच्या कल्कांत जें तूप कढविलें असतां सिद्ध होतें, त्यास जात्यादि तूप असें ह्मणतात. हें तूप लावल्यानें बारीक तोंडाचे, मर्मस्थानीं असून स्रवणारे, वेदनायुक्त आणि अंगांत गति करणारे असे व्रण साफ बरे होतात, आणि रुजून कातडी साफ होते.

**द्राक्षादि तूप**—द्राक्ष, जेष्ठीमध, खजूर, विदारीकंद, शतावरी, फालसा, हरडे, वेहळे आणि आंवळकटी हीं द्रव्यें चार चार तोळे घेऊन दोनशें छप्पन तोळे पाण्यांत त्यांचा काढा करावा. चतुर्थांश उरल्यावर त्यांत आंवळकटीचा रस, उसाचा रस, हरड्यांचा कल्क, दूध आणि तूप हीं काढ्याच्या चतुर्थांशा

इतकीं घेऊन घालावीं व उकळावीं.. याप्रमाणें उकळून जें तूप सिद्ध होईल त्यास द्राक्षादितूप असें ह्मणतात. या तुपांत चतुर्थांश खडीसाखर व मध घालून तें प्यालें असतां पित्त व सर्व प्रकारचे गुल्मसंबंधी विकार नष्ट होतात.

**द्राक्षादि तूप, प्रकार २ रा**— चौसष्ट तोळे द्राक्षें आणि बत्तीस तोळे जेष्ठीमध, यांचा दोनशें छप्पन्न तोळे पाण्यांत काढा करून चतुर्थांश पाणी उरल्यावर त्यांत चार तोळे जेष्ठीमध, चार तोळे द्राक्षें, आठ तोळे पिंपळींचें चूर्ण, आणि चौसष्ट तोळे तूप घालून, चौपट दुधांत पाक करावा. पाक होऊन थंड झाल्यावर त्यांत बत्तीस तोळे खडीसाखर टाकावी, ह्मणजे द्राक्षादि तूप सिद्ध आलें. हें तूप उरःक्षत, शोष, वायु, पित्त, श्वास, विस्फोटक, हलीमक, प्रदर व रक्तपित्त यांचा नाश करतें, आणि मांस आणि बळ यांची वृद्धि करतें.

**रोहिड्याचें तूप**— चारशें तोळे रक्त रोहिडा, आणि दोनशें छप्पन्न तोळे बोर, हीं एक हजार चोवीस तोळे पाण्यांत उकळून काढा करावा. चतुर्थांश पाणी उरल्यावर त्यांत चौसष्ट तोळे तूप आणि दोनशें छप्पन्न तोळे बकरीचें दूध घालून, आणखी सुंठ, मिरें, पिंपळी, हरडे, बेहळे व आंवळकटी, हिंग, ओंवा, धणे, बीडलोण, वावडिंग, चित्रक, पलाशी, चवक, वेखंड, जिरें, सामरलोण, डाळिंब, देवदार, पुनर्नवा, इंद्रवारुणी, जवखार आणि एरंडमूळ, या द्रव्यांचा एकेक तोळा कल्क घेऊन टाकावा. नंतर उकळल्यावर जें तूप सिद्ध होईल तें मजबूत घागरींत भरून ठेवावें. या तुपाची चार तोळ्यांची मात्रा मांसरसाबरोबर, दुधाबरोबर, अथवा गोमूत्राबरोबर द्यावी, ह्मणजे यकृत्, कोळु,

उदररोग, शूळ, अग्निमांद्य, अरुचि, कोष्टबद्धत्व, पांडुरोग, कामला, ओकारी, अतिसार, तंद्रा, ज्वर आणि कृमि यांचा नाश होतो.

**चांगेरी तूप**— चुका, बोर, दहीं, सुंठ, जवखार, हीं द्रव्यें तुपाच्या चौपट घेऊन, एकत्र करावीं, व उकळावीं, म्हणजे चांगेरी तूप सिद्ध झालें. याच्या योगानें मुलांचें गुदद्वार बाहेर येण्याचा रोग बरा होतो.

**चांगेरी तूप; प्रकार २ रा**— पिंपळी, पिंपळमूळ, चित्रक, गजपिंपळी, गोखरू, सुंठ, धणे, पहाडमूळ, बेलफळ व यवान हीं दहा औषधें चारचार तोळे घेऊन, त्यांचा कल्क करून, दोनशें छपन्न तोळे तुपांत तो कल्क व तुपाच्या चौपट चुकयाचा रस व दह्याचें सायटें घालून, हळू हळू तें उकळावें. हें चांगेरी तूप कफ, वायु, ग्रहणी, अर्श, पोट फुगणें, गुदद्वार बाहेर येणें, मूत्रकृच्छ्र व प्रवाहिका यांचा नाश करतें.

रथोद्धतावृत्तम्.

वैद्यशास्त्रिमणिशंकरश्रमं
सज्जनाः सफलयंतु सत्क्रमम् ।
कल्पवृक्षमिव वांछितार्थदं
ग्रंथमेनमवलोक्य सादरम् ॥



# आतंक–निग्रह.



आतंक–निग्रह गुटिका,—ह्या शुद्ध वनस्पतीच्याच बनविल्या असून बिघडलेलें वीर्य शुद्ध करितात, नपुंसकपणा घालवितात आणि संसारसुख भोगण्यास असमर्थ झालेल्या पुरुषाला सामर्थ्य व बळ देतात.

आतंक–निग्रह गोळ्या,—पुरुष व स्त्रिया यांस अनेक प्रकारच्या गुंतागुंत झालेल्या विकारांवर हटकून गुण देणारा एक उपाय आहे.

आतंक–निग्रह गोळ्या,—दूषित रक्त शुद्ध करितात, ज्ञानतंतूंस शक्ति देतात आणि मनाची व शरीराची दुर्बलता घालवितात.

आतंक–निग्रह गोळ्या,—शरीराच्या तमाम अवयवाला दृढपणा आणितात, स्मरणशक्ति वाढवितात, दैन्य घालवितात, पुरुषत्वहीन मनुष्यांला पुरुषत्व देतात, लघवींतून व स्वप्नावस्थेमध्यें धातु जात असली तर ती बंद करितात, गेलेली शक्ति पुन्हां आणितात आणि रक्त वाढवितात.

आतंक–निग्रह गोळ्या,—बिघडलेली पचनशक्ति सुधरतात, रंगरूपांत आश्चर्य वाटेसा फेरफार करितात, आयुष्यमर्यादा वाढवितात, नष्टशक्ति पुन्हां आणितात आणि धातुक्षयजन्य क्षीणता घालवितात.

आतंक–निग्रह गोळ्या,—जुनाट प्रमेह, धेरी, प्रदर, ऋतुविकार वगैरे शेकडों रोग घालविण्यास हा उत्तम उपाय आहे.

आतंक–निग्रह गोळ्या,—खरें पुरुषत्व देतात, शुष्क झालेल्या मेंदूस चेतना आणितात, नष्ट झालेला उत्साह उत्पन्न करितात व स्त्रीपुरुषांच्या मूत्रमार्गाचे विकार मोठ्या शिताफीनें बरे करितात.

आतंक–निग्रह गोळ्या,—घेतल्या असतां कोणत्याही प्रकारचें पथ्य करावें लागत नाहीं. त्यांचा गुण सर्व ऋतूंमध्यें सारखाच दिसून येतो.

३२ गोळ्यांच्या एका डबीची किंमत रु. १.

**वैद्यशास्त्री मणिशंकर गोविंदजी, जामनगर, काठेवाड.**

# पूर्ण यश संपादून प्रख्यात झालेल्या, पौष्टिक आतंकनिग्रह गोळ्या.

ह्या गोळ्यांच्या सेवनानें मनाप्रमाणें गुण ज्यांस आला आहे, असे असंख्य लोक कृतज्ञतापूर्वक या गोळ्यांची फार प्रशंसा करतात, व इतरांस हें चमत्कारिक औषध घेऊन पाहण्याविषयीं मनःपूर्वक शिफारस करतात. कारण कीं वीर्यस्राव, अशक्तता, कपाळ दुखणें, हातापायांत कळा मारणें, प्रमेह, रक्त बिघडणें, बारीक ताप, स्त्रियांची धुपणी वगैरे, जे विकार हळुहळू शरीरास खाऊन टाकणारे म्हणून गणले आहेत, त्यांवर ह्या गोळ्या पूर्ण प्रभाव दाखवतात. आणि याच कारणास्तव आजकाल आतंकनिग्रह गोळ्या आणि स्त्रीपुरुषांस ग्रासणारे अनेक रोग, यांच्यामध्यें

## भयंकर लढाई

माजलेली आहे. यांत, प्रत्येक वेळेस, प्रत्येक ठिकाणीं, आतंकनिग्रह गोळ्यांचाच जय होतो. स्मरणशक्ति कमी होणें, बद्धकोष्ठता, लघवीस वारवार होणें, व ऋतुस्राव अनियमित होणें वगैरे रोग. आतंकनिग्रह गोळ्यांच्या मारानें ठार होतात. प्रकारांतरानें असेंही म्हणतां येईल कीं ज्याप्रमाणें शत्रूवर जय मिळविण्यासाठीं मदशाली गजश्रेणी साधनरूप आहे, त्याचप्रमाणें रोगांचा फडशा पाडण्यासाठीं आतंकनिग्रह गोळ्या हें एक अद्वितीय साधन आहे. त्यांचा उपयोग करणारे त्यांस

## सर्वोत्कृष्ट पौष्टिक गोळ्या

असेंच नांव देतात. त्या ज्ञानतंतूंची अशक्तता दूर करतात, रक्ताचें पोषण करून त्याची वृद्धि करतात, व जीवित वाढवितात.

याशिवाय त्यांच्या योगानें आरोग्य उत्तम स्थितींत राहतें पूर्णपणें शक्ति प्राप्त होते, व एकंदरीनें, स्वप्नांत धातु जाणें या विकारावर व कमपुरुषत्वावर त्यांचा फार उत्कृष्ट गुण येतो.

आरोग्य, कांति, प्रत्येक इंद्रियाचें बळ, आयुष्य व स्मरणशक्ति यांची वृद्धि करणें, फिकट चेहरा सतेज करणें, पाचनशक्ति वाढविणें, शौचाची अडचण नाहींशी करणें, वेरी, कळा, व कोणत्याही प्रकारची क्षीणता यांस दूर करणें, ही आतंकनिग्रहगोळ्यांची दृढ प्रतिज्ञा आहे.

ह्या गोळ्या केवळ वनस्पतींपासून बनविल्या असल्या कारणानें, त्यांच्या संबंधानें कोणत्याही प्रकारचें पथ्य पाळावें लागत नाहीं. याशिवाय, खराब पाण्याच्या उपयोगानें सूज, पांडुरोग, कातडीचे दोष, अपचन, खोकला, पडसें, दमा, शूळ व पोटांत होणारे अनेक प्रकारचे रोग उत्पन्न होतात. तेव्हां आतंकनिग्रह गोळ्या घेतल्यानें,अमोघ वरदानाप्रमाणें, त्यांचें फळ मिळाल्यावांचून राहत नाहीं. कारण, या गोळ्यांच्या आंगीं वाईट पाण्याचे दोष शरीरांतून बाहेर काढण्याचें सामर्थ्य आहे. इतकेंच केवळ नाहीं, तर जोंपर्यंत या गोळ्यांचा प्रभाव शरीरांत राहील, तोंपर्यंत वाईट पाण्याचा परिणाम शरीरावर होऊं शकणार नाहीं.

स्त्री व पुरुष या सर्वांसच ह्या गोळ्या उपयोगाच्या आहेत. अर्थात्, पुरुषाचें बिघडलेलें वीर्य व स्त्रियांचें बिघडलेलें रज, या गोळ्या उत्कृष्ट रीतीनें सुधारतात. याच कारणास्तव, अनुभव घेतलेलीं मनुष्यें मोकळ्या मनानें असें ह्मणतात, कीं कोणत्याही कारणानें नपुंसकत्व आलें असो, वाजीकरणरूप या आतंकनिग्रह गोळ्या सेवन केल्यानें अवश्य गुण येणारच. मात्र, या चिकित्साब्धि ग्रंथाच्या ४६ व्या पृष्ठावर वर्णिलेले असाध्य असे जे नपुंस-

करणाचे प्रकार आहेत, त्यांस सोडून, बाकीच्या प्रकारांवर या गोळ्या सर्वोत्कृष्ट होत. याचप्रमाणें स्त्रियांच्या सर्व प्रकारच्या दुष-णांविरहीं आतंकनिग्रह गोळ्या खात्रीच्या होत. आणखी

## आतंकनिग्रह गोळ्या

गर्भाशयाची शुद्धि करतात; गर्भाची वृद्धि करतात; आणि बाळंतपणीं जडलेल्या कोणत्याही रोगाचा नाश करतात. सांजसकाळ जेवल्यावर एकेक गोळी दुधाबरोबर घेत गेल्यानें, पुरुषांचे धातुसं-बंधी आणि स्त्रियांचे रजोसंबंधी सर्व प्रकारचे रोग निर्मूळ होऊन, रक्तांत अतिशय शुद्धि व वृद्धि होते.

दूध हें जसें जीविताची वृद्धि करणारें, आरोग्याचें रक्षण करणारें, बळाची व बुद्धीची वृद्धि करणारें, वीर्याची पुष्टि करणारें, व शरीराला बळकट करणारें आहे, तसेच गुण आतंकनिग्रह गोळ्यां-च्याही आंगीं आहेत. याप्रमाणें बहुतेक सारख्या गुणांनीं युक्त अशीं दूध व आतंकनिग्रह गोळ्या हीं दोनही औषधें एकत्र मिळा-ल्यानें त्यांचा उत्कृष्टच परिणाम व्हावा. यांत काय आश्चर्य आहे! याप्रमाणें उत्तम लाभकारक असल्यावरून, आतंकनिग्रह गोळ्या ह्मणजे

## पृथ्वीवरचें अमृत

असेंही नांव त्यांस प्राप्त झालें आहे. कारण कीं, रोगी तसेच नीरोगी, या उभयतांसही सेवण्यास योग्य अशा या गोळ्या अकाळमृत्यु, वार्धक्य व रोग या सर्वांस दूर राखणाऱ्या असून, स्मरणशक्ति, अंगकांति, बळ व वीर्य यांस पुष्टि देणाऱ्या व आयु-ष्याची वृद्धि करणाऱ्या असल्या कारणानें, सर्व प्रकारें अमृताची बरोबरी करतात. आणि म्हणूनच त्यांचा उपयोग केवळ हिंदुस्थानां-

तच नव्हे, तर इराण, अरबस्थान, बलुचिस्थान, चीनदेश, सीलोन, मोझांबीक, डेलागोवा बे, नाताळ, ट्रान्सवाल, इंग्लंड वगैरे दूरदूरच्या ठिकाणींसुद्धां दिवसेंदिवस वाढत असून, खपही वाढत चालला आहे.

कोणकोणत्या मुख्य औषधि या आतंकनिग्रह गोळ्यांमध्यें पडतात, त्यांविषयीं सगळें वैद्यकशास्त्र आणि अनुभविक वैद्य व डाक्टर लोक इतकी प्रशंसा करतात की या औषधिच मर्त्य जीवनरक्षक होत. याच कारणास्तव ह्या गोळ्या पुरुष व स्त्रिया यांस होणाऱ्या, अनेक प्रकारच्या.. निदान न करता येणाऱ्या रोगांचा नाश करण्यासाठीं, दुसऱ्या कोणत्याही औषधान बरोबरी न होण्याजोगा एक रामबाण उपाय आहे असें सिद्ध झाले आहे.

ह्या गोळ्या सर्वांस एकसारख्या मानवण्याचें आणखी एक विशेष कारण असें आहे की या गोळ्यांमध्यें

## वनस्पति-लोह

येत असतो. रक्तांत जे लाल रजःकण आढळतात, ते सुधारून वाढविण्याला लोहच सर्व प्रकारें समर्थ आहे. परंतु सामान्य लोह मलबद्ध करणारा असल्या कारणानें, या वनस्पति-लोहाला वरचें स्थान मिळालें आहे. वनस्पति-लोहांत सामान्य लोहाचे सर्व गुण असून, आणखी शौचास साफ करण्याचा गुण आहे. म्हणूनच या गोळ्या शरीराला हितावह होऊन, वनस्पतिगत लोखंडाचा योग त्यांच्यांत असल्यामुळें, शरीरालाही लोखंडासारखें बळकट बनवितात.

## शक्ति देणारीं औषधें

पुष्कळ आहेत. कित्येक डोळ्यांस शक्ति देतात, कित्येक रक्ताला शक्ति देतात, कित्येक मेंदूला शक्ति देतात व कित्येक छातीला शक्ति देतात. याप्रमाणें शरीराच्या निरनिराळ्या भागांस शक्ति

देणारीं वेगवेगळीं अनेक औषधें आहेत, पण आतंकनिग्रह गोळ्यांच्या ठिकाणीं सर्वांस शक्ति देण्याचा गुण असल्या कारणानें सर्व शरीराला एकदम शक्ति प्राप्त होते.

## शौचास साफ न होणें.

प्रत्येक मनुष्यास नेहमीं, रोज एकदा तरी साफ शौचास झालेंच पाहिजे. शौचास साफ न झाल्यानें वारंवार रेचक घेण्याचा प्रसंग यावा हें नुकसान करणारें आहे. कांकीं तशा रेचक औषधांनीं शरीरांतली शक्ति कमी होते. परंतु आतंकनिग्रह गोळ्यांच्या सेवनानें शौचास आपोआप साफ होत जाऊन, शक्ति हटत नाहीं, इतकेंच नव्हे तर दिवसेंदिवस वृद्धिंगतच होत जाते. यासाठीं शौचास साफ करणारीं औषधें न घेतां, आतंकनिग्रह गोळ्या चालू ठेवल्यानें, शौचास साफ होत नाहीं अशी कुरकुर करण्याची व शक्ति कमी झाल्याची कुरकुर करण्याची पाळी कधीं येणार नाहीं. कारण ह्या गोळ्या रेचक नसूनही, शौचास साफ करतात.

## विजयध्वज

हातीं घेऊन आतंकनिग्रह गोळ्या धातुक्षय, धातुपात, आणि धातुविकार यांनीं ग्रासलेल्या रोग्यांस काळाचे दाढांतून ओढून काढून वांचवितात; गरमीच्या दुःखांतून पीडितांस सुखी करतात; ऋतुदोषानें कष्ट भोगीत असलेल्या स्त्रियांस आरोग्याची प्राप्ति करून देतात— तात्पर्य त्या शरणागत रोग्याला अभय देऊन दुःखमुक्त करतात.

किंमत—गोळ्या ३२ च्या डबी १ ची, रुपाया १.



# बाळमित्र.

## मुद्दाम मुलांकरताच.

ताप, शौचास होणें, ओकारी, खोकला, शरीर पिवळें पडणें, छाती भरून येणें, पोटाचें डेरकें वाढणें वगैरे, मुलांस होणाऱ्या रोगांचा ह्या गोळ्या नाश करून, त्यांस निर्मूळ करतात. या औषधामुळें मुलांस जंतांचा उपद्रव होत नाहीं. या गोळ्यांच्या सेवनानें मुलांच्या आंगीं चपळता वाढते, इतकेंच केवळ नाहीं, तर त्यांच्या शरीराचा बांधा देखील बळकट होतो.

जेवढ्या वर्षांचें बालक असेल तितक्या गोळ्या, सांजसकाळ, अतिविषाची कळी व सुरवारी हरडा पाण्यांत उगाळून, त्यांतच मिश्रण करून देणें.

किंमत—सुमारें ३०० गोळ्यांच्या १ डबीचा रु. १

---

# नेत्रानंदमंदार.

## डोळ्यांच्या विकारांवर.

डोळ्यांचे विकार दूर करण्यांत हें औषध सर्वोत्कृष्ट ह्मणून नांवाजलेलें आहे. हें डोळ्यांचें तेज वाढवून, ह्मातारपणीं प्राप्त होणाऱ्या आंधळेपणाची धास्ती दूर करतें.

ह्या औषधाची गोळी, तांब्याच्या भांड्यावर पाण्याचे दोन तीन थेंब टाकून, त्यांत घासावी व तें डोळ्यांत अंजन करावें.

किंमत—अर्ध्या तोळ्याच्या, गोळीस रु. १.

---

# आयुष्य आणि आरोग्यवर्धक तैल.

हें तेल चोळलें असतां शरीराला कोणताही दुर्गंध येत नाहीं, व कोणताही सातीचा रोग शरीरांत प्रवेश करूं शकत नाहीं. केश व लव फारच मऊ व तेजस्वी होतात; त्याचप्रमाणें अंगकांति देखील अमर्याद चमकूं लागते. कामाचा शीण हरतो; नवीन कामाला हुशारी येते; झोप चांगली येते; व एकंदरीनें आयुष्याची वृद्धि होते.

किंमत–पांच तोळ्यांच्या, शिशीस रु. १.

---

# कासांतक.

खोकला व दमा यांनीं पीडलेल्यांस या गोळ्या फार उपयोगाच्या आहेत.

सकाळीं, दुपारीं व रात्रीं, एकेक गोळी थंड पाण्याच्या घोटाबरोबर, अथवा अडुळशाच्या पानांच्या रसांत उगाळून खावी.

किंमत–पन्नास गोळ्यांच्या डबीस रु. १.

---

# शुद्ध मोत्यांचा सुरमा.

हा सुरमा डोळ्यांत घातल्यानें, कंडु, जळजळ, पाणी गळणें वगैरे विकार बरे होतात. त्याचा सतत उपयोग करीत गेल्यास म्हातारपणीं दृष्टिमांद्याचें भय राहत नाहीं.

किंमत–काळा सुरमा, १ तोळ्यास रु. १॥.

पांढरा सुरमा, १ तोळ्यास रु. २.

---

## व्रणमर्दन.

चट्टे, खंट, जखमा, घरे, स्तनपाक, मुलांचें डोकें चिडणें, पुरळ, सुकी खरुज, न रुजणारीं गळवें व पोकळ गळवें वगैरे त्वग्रोगांवर हा एक उत्तम उपाय आहे.

खोल जखमांच्या वगैरे रोगांत हें मलम आंत भरावें व गळवांवर केवळ लावावें.

किंमत—एका डबीस रु. १.

---

## कॉलरा पील्स.

कॉलऱ्याचीं चिन्हें वाटतांच दोन गोळ्या घ्याव्या. व जोंपर्यंत गरज असेल तोंपर्यंत प्रत्येक तासाला किंवा दोन दोन तासांला एकेक गोळी पाण्याबरोबर घेत जावी.

कॉलऱ्याशिवाय, आणखी साधारण परसाकडणें, अजीर्ण, अग्निमांद्य वगैरे विकारांवर देखील ह्या उत्तम उपयोगाच्या आहेत. अशा विकारांवर सांजसकाळ एकेक गोळी पाण्याबरोबर घेणें.

किंमत—तीस गोळ्यांच्या डबीस रु. १.

---

## ज्वरांतक.

अगदीं नवथर किंवा फार दिवसांचा—कोणत्याही प्रकारचा ताप असो; तसाच तो केव्हां चढ उतर होणारा किंवा मुळींच न उतरणारा असो; एकांतराड येणारा, तीन दिवसांनीं येणारा किंवा चातुर्थिक असो—या सर्व प्रकारच्या तापावर, तसाच जीर्णज्वर ह्मणजे

शरीरांत लपून राहणारा चोरताप, की ज्याला हाडीज्वर असेंही ह्मणतात, व ज्याची उपेक्षा केल्यानें पुढेंमागें क्षयरोग जडण्याचा संभव असतो, अशा तापावर, आणि खोकल्यासहित जो ताप येत असतो, त्यावर हें औषध उत्तम आहे. तें या सर्व तापांस हळुहळू शांत पाडीत नेऊन, अखेरीस निर्मूळ करतें. तापवरच्या या गोळ्या रुग्णास केवळ सिद्ध पुरुषाच्या आशीर्वचनाप्रमाणें असून, कधींही निष्फळ व्हावयाच्या नाहींत.

सांजसकाळ एकेक गोळी पाण्याच्या घोटाबरोबर सेवन करावी.

किंमत—चाळीस गोळ्यांच्या डबीस रु. १.

---

## मंडूरवटक.

हें औषध कावीळ, पंडुरोग, कौलु इत्यादि विकारांचा नाश करून रक्तांत अतिशय सुधारणा करितें. ज्यांच्या शरीरांतील रक्त जळून गेलें असेल त्यांनीं तर याचा अवश्य उपयोग करावा. ही गोळी, सांजसकाळ, एकेक, पाण्याबरोबर किंवा गोमूत्राबरोबर घ्यावी.

किंमत–१०० गोळ्यांच्या डबीस रु. १.

---

## चंद्रप्रभा.

या गोळ्यांनीं नवा प्रमेह, मूत्रकृच्छ्र, अंडवृद्धि व मूळव्याध, याचप्रमाणें स्त्रियांस होणारे रक्तप्रदर व बाळंतपणाचा दोष हे रोगही बरे होतात. जेवणापूर्वी सांजसकाळ अर्धी गोळी दुधाबरोबर घेणें.

किंमत–सोळा गोळ्यांच्या डबीस रु. १.

---

## झोपेच्या गोळ्या.

निजते वेळीं दोनच गोळ्या पाण्याबरोबर घेतल्या तर साह सात तासपर्यंत गाढ झोप लागेल.

**किंमत**–सोळा गोळ्यांच्या डबीला रु. १

—•—

## रेचक गोळ्या.

रात्रीं निजते वेळीं दोन गोळ्या पाण्यांत घेतल्यानें सकाळीं एक वेळ साफ शौचास होईल, व मोठा आराम वाटेल.

**किंमत**–बत्तीस गोळ्यांच्या डबीस रु. ०॥.

—•—

## जीवनचूर्ण.

हें औषध जीवित वृद्धिंगत करतें, रक्तास सुधारतें, व आरोग्याचें रक्षण करतें.

जेवणापूर्वी सांजसकाळ, चवलीचवली भार चूर्ण तुपसाखरेशीं किंवा मधाशीं मिश्र करून खावें.

**किंमत**–पांच तोळ्यांच्या डब्यास रु. १.

—•—

## योगराजगुग्गुळ.

हा उदररोगांवर व शरीरांतील वायुसंबंधी सर्व रोगांवर उत्कृष्ट आहे. जेवणापूर्वी, सांज सकाळ, एकेक गोळी तुपांत घेणें.

**किंमत**–पांच तोळ्यांच्या बाटलीस रु. १.

—•—

# नावगजकेसरी-तैल.

संधिवात, चमक मारणें वगैरे वाताच्या विकारांवर हें तैल चोळलें असतां विकार शांत होतो.

किंमत—पांच तोळ्यांच्या बाटलीस रु.

# कर्णतैल.

कानांतून पू वगैरे निघणें, ठणका लागणें; दुखणें, बहिरेपणा व कानांत नाद होणें वगैरे रोगांवर या तेलाचे बिंदु कानांत सोडल्यास ते ते रोग बरे होतात.

किंमत—दोन तोळ्यांच्या बाटलीस रु. १.

# केसरादि गोळ्या.

गरमी व सांधे धरणें या विकारांवर हें औषध ह्मणजे शेंकडों वर्षांच्या अनुभवानें खात्रीलायक उपाय ह्मणून ठरला आहे. या गोळ्या दोनदोन, सांजसकाळ, तुपाबरोबर गिळाव्या.

किंमत—शंभर गोळ्यांच्या, डबीस रु. १.

# गजकर्णगुटी.

कितीही वर्षांवरील जुनें आणि केवढ्याही भागावर पसरलेलें, काळें किंवा लाल, गजकर्ण असो, त्यावर, ही गुटी साहाणेवर पाण्यांत उगाळून, तें पाणी विकृत भागीं लावावें.

किंमत—दोन तोळ्यांच्या गुटीस रु. ०।.

# दंतमंजन.

दांत सडणें, हिरड्यांतून रक्त निघणें, दांतांस कीड लागणें, तोंडास घाण येणें वगैरे विकारांवर, दांतांस हें मंजन घासून, तोंड धुऊन गेल्यास, फार हितकारक आहे.

किंमत—चार तोळ्यांच्या पुडीस रु. ०।.

## वैद्यशास्त्री मणिशंकर गोविंदजी.

मालक—आतंकनिग्रह औषधालय.

हेड आफीस

## जामनगर. काठेवाड.

शाखा आफिसें.

नं. १, मुंबई, काळकादेवी रोड.

नं. २, कलकत्ता, हारीसन रोड.

नं. ३, पुणें शहर, बुधवारपेठ.

नं. ४, बडोदें, रावपुरा.

# निश्चित विकारांवर निश्चित उपाय.

| | विकार. | उपाय. | किंमत. |
|---|---|---|---|
| | अजीर्ण (नुकतेंच झालेलें) ... | कॉलरा पिल्स | रु. १. |
| २ | अजीर्ण (फार दिवसांचें) ... | आतंकनिग्रह गोळ्या | ,, ,, |
| ३ | अजीर्ण (धातुक्षयजन्य) ... | ,, | ,, ,, |
| ४ | अर्धशिशी ... ... ... | ,, | ,, ,, |
| ५ | अनाज वमणें... ... ... | कासांतक | ,, ,, |
| ६ | अशक्तपणा ... ... ... | आतंकनिग्रह गोळ्या | ,, ,, |
| ७ | ओकारी (नुकतीच आलेली) . | कॉलरा पिल्स | ,, ,, |
| | ओकारी (फार दिवस चालू) . | आतंकनिग्रह गोळ्या | ,, ,, |
| ९ | कमळा ... ... ... | मंडूरवटक | ,, ,, |
| १० | कानाचे विकार ... ... | कर्णतैल | ,, ,, |
| ११ | कॉलरा ... ... ... | कॉलरा पिल्स | ,, ,, |
| १२ | कोड... ... ... | मंडूरवटक | ,, ,, |
| | | रेचक गोळ्या | रु. ०॥ |
| १३ | खरूज ... ... ... | व्रणमर्दन मलम | ,, १ |
| १४ | खोकला ... ... ... | कासांतक | ,, ,, |
| १५ | गजकर्ण ... ... ... | गजकर्णगुटी | रु. ०। |
| १६ | गर्भाशयाचा बिघाड... ... | आतंकनिग्रह गोळ्या | ,, १ |
| १७ | गर्मीचे चट्टे (लावण्याकरतां). | व्रणमर्दन मलम | ,, ,, |
| | ,, ,, (खाण्याकरतां). | केसरादि गोळ्या | ,, ,, |
| १८ | गळवें ... ... ... | व्रणमर्दन मलम | ,, ,, |

| | | | |
|---|---|---|---|
| १९ | जखम ... ... | ...व्रणमर्दन मलम | रु. १. |
| २० | झोप न येणें ... | ...झोपेच्या गोळ्या | ,, ,, |
| २१ | डोकें दुखणें (लावण्याकरतां) | .आयुष्य व आरोग्यवर्धक तैल | ,, ,, |
| | ,, (खाण्याकरतां) | .आतंकनिग्रह गोळ्या | ,, ,, |
| २२ | डोळ्यांस गळ लागणें | ...शुद्ध मोत्यांचा सुरमा | ,, ,, |
| २३ | डोळ्यांची आग ... | ...शुद्ध मोत्यांचा सुरमा | ,, ,, |
| २४ | डोळे येणें ... ... | ...नेत्रानंदमंदार | ,, ,, |
| २५ | ताप (उतरण्यासाठीं) | ...ज्वरांतक नं. १ | ,, ,, |
| | ,, (प्रतिबंधक)... | ...ज्वरांतक नं. २ | ,, ,, |
| २६ | त्वग्रोग ... ... | ...व्रणमर्दन मलम | ,, ,, |
| २७ | दमा ... ... | ...कासांतक | ,, ,, |
| २८ | दांतांचे रोग ... | ...दंतमंजन | रु. ,, |
| २९ | दृष्टीचा अंधकपणा... | ...नेत्रानंदमंदार | ,, ,, |
| ३० | धातुपात ... ... | ...आतंकनिग्रह गोळ्या | ,, ,, |
| ३१ | धातुक्षय ... ... | ... ,, | ,, ,, |
| ३२ | नपुंसकपणा... ... | ... ,, | ,, ,, |
| ३३ | नायटा ... ... | ...व्रणमर्दन मलम | ,, ,, |
| ३४ | नासुर ... ... | ...व्रणमर्दन मलम | ,, ,, |
| ३५ | पडसें... ... ... | ...कासांतक | ,, ,, |
| ३६ | परमा (नुकताच झालेला) | ...चंद्रप्रभा | ,, ,, |
| ३७ | ,, (जुना) ... | ...आतंकनिग्रह गोळ्या | ,, ,, |
| ३८ | परसाकडचा विकार... | ...कॉलरापिल्स | ,, ,, |
| ३९ | पांढरें कोड... ... | ...आयुष्य व आरोग्यवर्धक तैल | ,, ,, |
| ४० | पोकळ गळूं... ... | ...व्रणमर्दन मलम | ,, ,, |
| ४१ | प्रदर (धुपणी) ... | ...आतंकनिग्रह गोळ्या | ,, ,, |

| | | | |
|---|---|---|---|
| ४२ | बद्धकोष्ठ ... ... | ...रेचक गोळ्या | रु. ॥. |
| ४३ | मुरुमें ... ... | ...आयुष्य व आरोग्यवर्धक तैल | ,, १ |
| ४४ | मुलांस होणारे रोग... | ...बालमित्र गोळ्या | ,, ,, |
| ४५ | मूळव्याध ... ... | ...चंद्रप्रभा | ,, ,, |
| ४६ | रक्त बिघडणें... ... | ...आतंकनिग्रह गोळ्या | ,, ,, |
| ४७ | लघवी बंद होणें ... | ...चंद्रप्रभा | ,, ,, |
| ४८ | लघवीस कष्टानें होणें | ...आतंकनिग्रह गोळ्या | ,, ,, |
| ४९ | लघवीस वारंवार होणें | ... ,, ,, | ,, ,, |
| ५० | लवकर म्हातारपण येणें | ...आतंकनिग्रह गोळ्या | ,, ,, |
| ५१ | वायु, अपस्मार ... | ...आतंकनिग्रह गोळ्या | ,, ,, |
| ५२ | विस्फोटक (लावण्याकरतां)... | व्रणमर्दन मलम | ,, ,, |
| | ,, (खाण्यासाठीं )... | केसरादि गोळ्या | ,, ,, |
| ५३ | वृषणवृद्धि ... ... | ...चंद्रप्रभा | ,, ,, |
| ५४ | संधिवात (लावण्यासाठीं)... | वातगजकेसरी तैल | ,, ,, |
| | ,, (खाण्यासाठीं) ... | योगराज गुग्गुळ | ,, ,, |
| ५५ | स्वप्नदोष ... ... | ...आतंकनिग्रह गोळ्या | ,, ,, |
| ५६ | हातापायांची आग... | ...आयुष्य व आरोग्यवर्धक तैल | ,, ,, |

---

हा ग्रंथ वाचीत असतां, वाचकांस प्रसिद्ध बाणभट्ट कवीच्या विद्वन्मान्य कादंबर्यादि अद्भुत कथाग्रंथांची आठवण होईल. तथापि कादंबर्यादि ग्रंथांत कथानकाचें अनुसंधान ठेवतां ठेवतां वाचणाऱ्याची जी तारांबळ उडून फजिती होते, ती हा ग्रंथ वाचतांना होत नाही. पहिल्यापासून शेवटपर्यंत कथेचा ओघ अस्खलित मार्गानें चालत राहून, वाचकांची चित्तवृत्ति उल्हसित करण्यास कारणीभूत होतो.

असा हा अपूर्व ग्रंथ मराठींत छापून तयार आहे. वाचल्यानें बोध व मनोरंजन प्राप्त होईल. कागद सफेद, जाड; बांधणी कापडी, सोनेरी अक्षरांसहित; पृष्ठसंख्या ५५० व किंमत रु. ४

पण आतंकनिग्रह औषधालयापैकीं रु. ६ किमतीची कोणतीही औषधें एकदम विकत घेणारास हें "मुक्ता" नामें मोठें पुस्तक भेट म्हणून देण्यांत येत असतें.

## वैद्य शास्त्री मणिशंकर गोविंदजी,

### आतंकनिग्रह औषधालय,

हेड ऑफीस—जामनगर, काठेवाड.

ब्रांच नं. १—मुंबई, काळकादेवी रस्ता.

ब्रांच नं. २—कलकत्ता, हारीसन रोड.

ब्रांच नं. ३—पुणें, बुधवारपेठ.

ब्रांच नं. ४—बडोदें, रावपुरा.